# प्रकाशकीय निवेदन

प्रस्तुत 'पुण्यास्रव कथाकोष' नामक हा ग्रंथ प्रथमानुयोगातील महत्त्वपूर्ण ग्रंथ आहे. या ग्रथामध्ये पुराणपुरुषांच्या पुण्य जीवन कथा प्राचीन मराठी भाषेमध्ये भट्टारक श्री. चद्रकीर्ती यानी रचल्या असून त्याचा मराठी भाषेमध्ये संपादन—प्राध्यापक श्री. शांतिकुमार जयकुमार किल्लेदार, विभाग प्रमुख पाली प्राकृत, नागपूर महाविद्यालय यांनी—करून मराठी जैन वाङ्मयात फार मोठी भर घातली आहे. सदरहू ग्रथाचे मुद्रण कार्य–नारायण मुद्रणालय नागपूर यांनी अल्प अवधीत सुदररीतीने केले आहे. त्याबद्दल ही ग्रंथमाला वरील अनुवादक व मुद्रक याचे आभार मानीत आहे.

सदरहू ग्रंथ मराठी भाषा वाचणाऱ्या बालमनावर धर्माचे संस्कार टाकण्याचे दृष्टीने अत्यत उपयुक्त होईल अशी आशा आहे.

प्रकाशक
वा. दे. शहा
मंत्री

# अनुक्रमणिका

# प्रास्ताविक

## १. हस्तलिखिताची विशेपता

१.१ ह्या हस्तलिखितात हे सपूर्ण स्वतःचे हातचे लेखन आहे अस उल्लेख अनेकदा आढळतो.

१ २ काही पाने कोरी सोडलेली आढळतात.

१.३ प्रसग संपताना त्याची खूण म्हणून मस्कृत श्लोक वापरलेला आढळतो

१ ४ काही ठिकाणी गाथाचे अनुक्रमाक चुकीचे दिले आहेत.

१ ५ काही ओव्या लिहिल्यानंतर दुरुस्त करून समासामध्ये लिहिल्या आहेत

१ ६ भापेवर सस्कृत भापेचा प्रभाव दिसून येतो.
कर्मणि भूतकाळवाचक धातुसाधित विशेपण वापरून वाक्य बनविण्याचा प्रयत्न अनेकदा केलेला आहे

१ ७ आग्लभापेचा प्रभाव अजिबात दिसत नाही.

१ ८ अनुनासिकाचा व अनुस्वाराचा वापर मर्यादित आहे

१ ९ सामाजिक चालीरीति व धर्माचा सर्व जीवनावर प्रभाव उत्कट-त्वाने दिसतो

## २. भापा-विशेपता

२.१ पहिला स्वर अनेकदा दीर्घ केलेला आढळतो.
अमृतासमान ऐवजी आमृतासमान

२ २ श प स ह्यामध्ये श प ऐवजी स चा वापर अनेकदा आढळतो.
अश-औप, शीप-सिप

२ ३ अत करण–ऐवजी अत कर्ण, स्वरलोपाची प्रवृत्ति दिसून येते.
( व्याकरण–व्याकर्ण ) ( प्रयत्न- प्रेत्न )

२ ४ ऱ्हस्वदीर्घाचा घोटाळा.
प्रिय–प्रीय, क्रिया–क्रीया, दीक्षा–दिक्षा, दीन–दिन, शीप-सिप, मी-मि, तू–तु, समीप-समिप

२ ५ डोहाळे ऐवजी डोहोळे ह्यात आ ऐवजी ओ वापरला आहे
प्रज्ञप्ति–प्रज्ञाप्ति जाहला ऐवजी जाहाला. अ ऐवजी आ

२.६ ए ऐवजी य अनेकदा वापरलेला आढळतो
एके–यके

२.७ ऋ–रु
ऋतुत–रुतुत.

२.८ जोडाक्षराचा घोटाळा
सम्यक्त्व–सम्येत्क, सिद्धान्त–सिधात, व्यर्थ–वेर्थ, आश्चर्य, आश्चिर्यं,

२ ९ चुकीची सधि :
मुनीश्वर–मुनेश्वर

२ १० निश्चय- नि श्चय

२ ११ चरण–चेरण

२ १२ आगम–अगम

२ १३ बृहस्पति–ब्रहस्पति

२.१४ दिगवर–दिगावर

२.१५ व–ब अभेद

२ १६ ळ–ल अभेद्

२ १७ न–ण अभेद

२ १८ पचमीचा प्रत्यय–आतौत

२ १९ हलन्ताचा घोटाळा
तत्क्षण–ततक्षण, हिमवत्–हिमवत.

२.२० काही दुर्मिळ प्रयोग दिसून येतात. वेघला–प्रजलला.
कर्म्म, धर्म्म, वर्क्क ह्यासारखे प्रयोग दिसून येतात

२.२१ धूमाच्छादिले–तत्करि अशी दोन शब्दाची सधि केलेली आढळते.
२ २२ वेगळ्या परिच्छेदाची सूचना वेळोवेळी निरनिराळ्या प्रकारे केली आहे आता आइकावे, परिसावे.
२.२३ शब्दप्रयोग विस्कळित वाटतात. माध्यान दोन प्रहर रजनि.
२ २४ एकाच गावाची भिन्न भिन्न नावे गजपुर हस्तनापुर, हस्तनागपुर.
२.२५ पाच चरणाची ओवी क्वचित् आढळते.
२.२६ सस्कृत भाषेच्या अवनतीची परिसीमा आढळते
२.२७ अ, छ, भ, ज्ञ, क्षु, द्रू, स्थि, ण, द्र, च, क्षु, वृ, द्ध, त्क, ण्ण, उ, त्क्ष, गु, ग्न, ध्य, द्व, ण्ग, ज्ञ, क्ष, जे, ज्ज, ल, द्र्य, श्र, श्रु, भ्र, ल्हे, घ, ध्य, य्य ह्या शब्दाची लिंहिण्याची घाटणी प्रचलित घाटणीपेक्षा किंचित वेगळी आहे.

## ३. ग्रंथांची परंपरा

३ १ आचार्य हरिषेणकृत (इ स ८३१) मध्ये लिहिलेला. सस्कृत भाषेतील पद्यामध्ये बृहत्कथाकोश हा पहिला कथाकोश दिसतो

३ २ आचार्य प्रभाचद्र (९२५–१०२३) ह्यानी सस्कृत भाषेत गद्यामध्ये कथाकोश लिहिला.

ह्यावरच आधारित कथाकोश नेमिदत्ताने (१५१८) सस्कृत भाषेत लिहिला असा उल्लेख ह्या ग्रथाच्या प्रारभी आला आहे.

३ ३ त्यानतर रत्नकीर्तिने शिष्य चद्रकीर्तिने (इ स. १८२५) मध्ये गुरु रत्नकीर्तिच्या आज्ञेवरुन लिहिला. सध्याची प्रत ही त्यानी आपल्या हातानी लिहिली असा उल्लेख ह्याच ग्रथात आला आहे ह्या ग्रथाची सुरुवात कुठे झाली हे माहीत नाही तथापि ग्रथामध्ये १८२५ च्या चातुर्मासात ते उस्मानाबाद (धाराशिव॰ प्राचीन नाव– तेर येथे झाले व शेवट मुक्तागिरीत ( सध्या जि. बेतूल मध्यप्रदेश) झाला असे दिसते.

३.४ ज्या संस्कृत ग्रंथावरून त्यानी हा ग्रंथ रचला ती ब्रह्म नेमिदत्ताची (अपूर्ण) कृति अपूर्ण स्वरूपात सापडली आहे आराधना कथा-कोश हे त्या पोथीवर दिलेले नाव आहे पृष्ठ क्रमाक ५२ पासून ती उपलब्ध आहे. शेवटच्या पृष्ठाचा क्रमाक १७७ आहे. मध्ये काही पृष्ठे गहाळ आहेत. पुष्पिका खालीलप्रमाणे आहे

'इति श्री कथाकोशे श्री भट्टारक मल्यभूषण शिष्ये ब्रह्म नेमिदत्तविरचिते श्रीजिनपादपूजाफलदृष्टान्तवर्णनाया चतुर्थ परिच्छेद " स. १८४८ वर्षे आसोज शुक्ल तिथौ २ गुरुवासरे लिखायत आचार्य श्री माणिक्यनदजी लिखित व्यास म्हजरामेण तक्षेतपुरमध्ये लिखित ।

३.५ त्यातच पुढे आचार्य श्री १०५ श्री रत्नकीर्तिजी स्वपठनार्थ मिती जेष्ठ कृष्ण ४ स. १८८१ का कामालपुरो सहर सुहावणो चदविराजत देव श्रावकतो सुयस बसै नितिप्रति करै नितिसेव

चद्रप्रभजिन नत्वा, केवलज्ञानभास्करा ।
लोकालोकप्रकाशाय, स्वर्गमोक्षसुखप्रद ।।
श्रीमत् पद जिन नत्वा चतुर्विंशतिसत्पुमान् ।
घातिकर्मक्षयोद्भूत सद्नतचतुष्टयान् ।।
लिखित पडित गिरिधारीलाल रूपनगरमध्ये
आदिनाथचैत्यालये जिनागारे मगल भूयात्
श्री जिनेंद्र जयति "

३.६ ह्यावरून नेमिदत्त ब्रह्मचारी ह्यानी सस्कृत भाषेत पद्यात लिहिलेला आराधना कथाकोश रत्नकीर्तिच्या सग्रही होता. त्यावर स १८८१ चा काळ आहे. बरोबर १५३ वर्षापूर्वीचा त्याचवेळी हा मराठी पुण्यास्रव कथाकोश पूर्ण झाला. त्यापूर्वी मूळप्रत १३ वर्षापूर्वी लिहिल्या गेली असे दिसते.

कामालपुरा शहर किंवा रूपनगर कुठे आहे हे पाहावे लागेल पण ते उत्तर हिंदुस्थानात असले पाहिजे असे दिसते.

## ४. भौगोलिक विशेषता

४.१ ह्यात भौगोलिक नावामध्ये सर्वात मोठा परिचित भूभाग म्हणून जवुद्वीपाचा निर्देश आहे. त्यात जवु म्हणजे जाभळाच्या झाडाचे वाहुल्य असले पाहिजे. त्यात सात क्षेत्रे व सात पर्वत आहेत ही मान्यता आली आहे परतु क्षेत्रामध्ये भरत, ऐरावत, विदेह व उत्तरकुरु व पर्वतामध्ये हिमवत् व सुदर्शन मेर ह्याचा उल्लेख आहे. हिमवत् त्याच्या वैशिष्ट्यामुळे सर्वांच्या परिचयाचा आहे. सुदर्शन मेर म्हणजे सध्याचे पामीरचे पठार असले पाहिजे. त्याठिकाणापर्यंत जिनधर्मानुयागाची ये–जा प्राचीनकाळी असली पाहिजे खंडामध्ये आर्यखड व म्लेच्छखंड असे भेद केले आहेत. जेथे जीवनकलह उग्र नाही ते आर्यखड व जेथे जीवनकलह उग्र आहे ते म्लेच्छखंड असा हिशेव असावा म्लेच्छखडामध्ये धर्म, धर्मायतन, साधु, साध्वी, व्रत व नेम इत्यादिकाचा आचार-विचाराचा लोप असतो असे वर्णन आहे.

४.२ द्वीपामध्ये रत्न सापडणारे द्वीप होते लका द्वीप दक्षिणेकडील सीमा म्हणून प्रसिद्ध असावे. नंदीश्वरद्वीप हा विपुववृत्तावर असणारा वारमाही प्रदेशाचा प्रदेश असावा त्यामुळे तेथील वर्णन त्या प्रदेशाला साजेसे आहे तेथील जाण्यायेण्याची वहिवाट कधी व का तुटली हे नक्की सागता आले नाही तरी एके काळी लोकाचे तेथे जाणेयेणे होते हे स्पष्ट आहे

४.३ समुद्रसपाटीपेक्षा कमी किंवा खोलगट प्रदेशाला नागभुवन म्हणण्याचा प्रघात होता असे दिसते. तेथे नागवशाचे लोक राहात असतील तेथील नगरे, स्त्रिया व वावड्या ह्याचे वर्णन कुठे कुठे आढळते.

४ ४ सर्व कथात मिळून ३२ देशाचा उल्लेख आहे. त्यात पूर्वेकडच्या अग, कलिग, गौड, मगध, पश्चिमेकडच्या आभिर, कच्छ, लाट, सोरट, उत्तरेकडच्या कुरुजागल, गधमाली, टक्क, सूरसेन, दक्षिणेकडील अध्र, उड्र, करनाटक, तेलग, द्रविड, मलय, तर

मध्यविभागातील अवती, कासी, कुतल, माणिवत्, मालव, वत्स, वऱ्हाड ह्यांचा समावेश आहे जैनधर्माचा प्रसार सर्व हिंदुस्थानात क्रमाक्रमाने कसा झाला हे दिसून येते.

४.५ काही देशाची ओळख नक्की पटवता येत नाही. उतुखल, वरेंद्र, विनीता, विपयारम्य हे देश या यादीत टाकता येतील.

४.६ नगर, नगरी, नेर, पुर, पुरी व महापुर इत्यादिकाच्या उल्लेखात ८० शहराचा उल्लेख आहे त्यात कुसुमपुर किवा पाटलीपुत्राला महापुर म्हटले आहे. अयोध्या, काशी, वाराणशी, उज्जयिनी, द्वारका, उत्तर मथुरा, दक्षिणमथुरा, काची करहाटक, काकंदी, कौशावी, गिरिनगर, तेरपुर, दशपुरनगर, वेनातट (पवनी) राजगृह, शतद्वारनगर, हस्तनागपुर हे उल्लेख विशेप महत्त्वाचे आहेत, सिंधुतट उर्फ अटकचा उल्लेख असाच वैशिष्ट्यपूर्ण आहे

४.७ काही काही खेड्याचा उल्लेख ग्राम किंवा खेट ह्या उपपदाने झाला आहे. त्यातील काही नावे उदा– सिरसगाव अजूनही चालू आहे.

४.८ जेथून मोठमोठी जहाजे समुद्रात शिरतात अशा दोन पट्टनाचा उल्लेख आला आहे शिखर पट्टन व गलग्रोद्रहपट्टन ही ती दोन पट्टने होत

४ ९ आकार वा वर्णाहून पर्वताना नावे दिली आहेत. छोटा असल्यास गिरि– मोठा असल्यास पर्वत म्हणतात मध्ये खोल असणाऱ्या पर्वताला द्रोण, मध्ये उभट असणाऱ्याला नितव पर्वत, गाईच्या कानासारखा तो गोकर्ण, तर मुद्गलासारखा दिसणारा खाली लहान वर मोठा असावा असे वाटते कृष्णामुळे गोवर्धन पर्वत प्रसिद्ध झाला आहे

४ १० अनेक गुफात गिरनारजवळची चद्रगुफा व मथुरेजवळची क्षेत्रिय-गुफा स्मृतीमध्ये शिल्लक राहली. शिखरामध्ये पलासकूट, मेघकूट (पूर्वेकडचे) सिद्धकूट (मध्यभागातील) सम्मेदशिखर पूर्वेकडचे परिचित राहले.

४.११ अरण्यातून भूतारण्य मधुवन व विंध्याचलवनाचा खास उल्लेख करावा लागेल

४.१२ नद्यामध्ये गगा, गगाप्रवाह, गगातट व गगासंगम प्रसिद्ध आहे, नर्मदा व क्षिप्रा ही प्रसिद्ध आहे गगेची उपनदी म्हणून यमुना प्रसिद्ध आहे. वेगवती हे अचिरवतीचे दुसरे नाव असावे सीता हे क्वचित् गोटणाऱ्या नदीचे नाव असावे दक्षिणगंगा म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या गोदेचाही उल्लेख आला आहे वेन्नातट शब्दाने वैनगगा नदीचा काठ सूचित होतो. ती गोदेची उपनदी आहे.

४ १३ समुद्रामध्ये लवण प्रसिद्ध आहे स्वच्छ पाण्यासाठी प्रसिद्ध असणारे क्षीरोदधि व मोठ्या माशासाठी प्रसिद्ध असणारा स्वयभूरमण विख्यात झाले. व स्मृतीत राहले. क्षीरोदधिचे स्मरण जिनेंद्रजन्माभिषेकाच्या निमित्ताने लक्षात राहले तर स्वयभूरमणापलीकडे मानवाचा सचार त्याकाळी होत नसावा असे दिसते

## ५. काही कथांचे रसग्रहण

### ५.१ पात्रकेसरी

अन्तर हे नेहमीच त्रासदायक असते मग ते काळातील असो की स्थानातील, भाषेतील असो की मनातील. त्यामुळेच ते लोकाच्या चिरकाल स्मरणात राहते. पात्रकेसरी हा मूळचा ब्राह्मण भरतखडात जन्मलेल्या ब्राह्मणापासून पृथ्वीवरील सर्व मानवानी आपापली वागणूक निश्चित करावी ह्या परपरेतला तोही जिज्ञासू वृत्तीमुळे एका ठिकाणी अडखळतो व मतपरिवर्तनाला वा धर्मपरिवर्तनाला तयार होतो. त्याच्या प्रचड इच्छाशक्तीमुळे इतरानाही वदलवितो त्यामुळे ही घटना काळाच्या ओघात जनमानसात शिल्लक राहली हे दिसते. वारसाहक्काने मिळालेल्या अधिकारापेक्षा स्वकर्तृत्वाने मिळविलेला अधिकार माणसाला अधिक प्रिय असतो व त्याला पुष्कळ काळ-

पावेतो क्रियाशील ठेवू शकतो ही गोष्ट पात्रकेसरीच्या कथा-नकावरून सिद्ध होते.

### ५.२ अकलंकस्वामी

अकलकस्वामींचे चरित्रही (विस्मयावह) आश्चर्यकारकच दक्षिणेकडील आध्र देशात जन्म झाला. जिज्ञासावृत्ती गप्प बसू देईना म्हणून बौद्ध तत्त्वज्ञान व धर्म ह्याचा अभ्यास केला त्यात लहान भावाचे बलिदान झाले तरी न डगमगता देशभर विहार करून वादविवाद करून धर्माची यशोपताका देशभर फडकत ठेवली. कोणताही धर्म असो त्यात काही चागले मुद्दे असतात, काही वाईट असतात त्यातील आपल्या धर्माच्या चागल्या मुद्याच्या प्रसारासाठी इतराच्या धर्मातील वाईट मुद्याच्या प्रसारासाठी इतराच्या धर्मातील वाईट मुद्याच्या किंवा उणीवाचा उपयोग प्रभावीसणे करून घेणे सर्वांनाच जमत नाही. त्यासाठी ज्ञानाची अखड उपासना, वाणीवर अधिकार, लेखणीवर प्रभुत्व, समाज-जीवनाचा सूक्ष्म अभ्यास, व सफल नेतृत्व आवश्यक असतात ह्या सर्व गोष्टी अकलकस्वामीमध्ये प्रकर्षाने एकत्रित झालेल्या दिसतात म्हणून काळाच्या चाळणीतून त्याचे वाङमय व स्मृती अक्षर ठरली

समाजाच्या व धर्माच्या प्रसारासाठी वैयक्तिक सुखावर तुळशीपत्र ठेवावे लागते हे ओघानेच आले ह्यातील वादविवाद जयामध्ये चमत्काराचा थोडा भाग घातला आहे एकतर कथेच्या दृष्टीने तो आवश्यक असेल किंवा त्याकाळी झालेला वादविवाद कोणत्या मुद्यावर झाला. त्याचा पूर्वपक्ष वा उत्तरपक्ष कसा माडण्यात आला व त्यात अकलकस्वामीचा जय कसा झाला ह्याचे सामान्य विवरण ह्या चमत्कारकथेत दिसून येते

### ५ ३ सनतकुमार

गरीबी व श्रीमती हा एक मानवामधील महान चमत्कार आहे त्याचे स्पष्टीकरण वेगवेगळया धर्मांनी वेगवेगळया प्रकारे

दिले आहे. विषमता आहे मग ती हटवायची कशी ? ती हटविण्याचे दोन प्रकार गरीबानी जबरदस्तीने श्रीमती कमी करायची किंवा श्रीमंतानी आपणहून गरीब व्हायचे, ह्यातला एक प्रकार बंद झाला की दुसरा सुरू होणार. हा निसर्ग नियम आहे. प्राचीनकाळी श्रीमंत लोक नित्यनियमाने मधून मधून गरीबीचा उपभोग घेण्यास आपखुषीने तयार होत हा,इतिहासाचा दाखला आहे चक्रवर्ती हा माणसामधला सर्वात श्रीमंत माणूस, षट्खंड पृथ्वीचे राज्य, चतुरंग रत्नाची प्राप्ती, ८४,००० हत्ती, १८ कोटी घोडे, ८४ लक्ष रथ, ८४ कोटी पायदळ, ९६ कोटी गावे (खेडी), ९६,००० स्त्रिया, १२,००० म्लेच्छभूप मांडलिक, ३२००० हजार राजे सामंत अशा प्रकारे त्याच्या वैभवाचे वर्णन करतात तो माणूस जेव्हा अंगावर चिंध्याही ठेवत नाही, भिक्षा मागून अन्न मिळवितो ( दिवसातून एकदाच ) आकाशाला निवारा मानतो व ज्ञान व निर्भयता ह्याचे वितरण करीत हिंडतो तेव्हा कुणाचे मन हेलावणार नाही ? सामान्य माणसाच्या मनातून क्रांतीचे बीज नष्ट करण्याला ही गुप्त आत्मक्रांतीच तर कारणीभूत नसेल असे वाटते ही गोष्ट सनत्कुमाराच्या कथेत लोकांच्या मन पटलावर कायम कोरून ठेवायला निमित्त झाली असेल

५४ **समंतभद्र**

समंतभद्राचा जन्म तमिळमध्ये झाला. शैव, वैष्णव व जैनांचे सारखेच प्रभुत्व असणाऱ्या कांचीमध्ये त्याचे बालपण गेले परंतु आपल्या प्रतिभेने त्यानी सारा भारतवर्ष उजळून टाकला. जीवनाचा पाव भाग ज्ञानसंपादनात, पाव भाग रोगाशी झगडण्यात व अर्धा भाग वादविवाद, शास्त्रचर्चा, ग्रंथरचना, धर्मोपदेश ह्या सारख्या महान गोष्टीत घालविला त्याच्या स्मरणाविना जैन इतिहास अपूर्व रहावा ह्यात काही आश्चर्य नाही आकाशामध्ये सूर्यचंद्रानंतर बृहस्पतीचे स्थान आहे त्याप्रमाणे महावीर सूर्य, कुंदकुंद चंद्र तर समंतभद्र गुरू म्हणून खासच शोभतील शैवा-

बरोबरच्या सघर्षात ते विजयी झाले. त्यानी आपल्या विहाराने काची, पुड्रोड्र, दशपुर, वाराणसी, पाटलीपुत्र, माळवा, सिधु, टक्क, करहाटक इत्यादी स्थानाना पुनीत केल्याची साक्ष इतिहासात आहे म्हणूनच इतिहासात त्याची ठळक नोद.

५५ **संजयंत**

काही नीच लोक विघ्नाच्या भयाने सत्कार्याचा आरंभ करीत नाहीत. काही मध्यम प्रवृत्तीचे लोक शुभकार्याला प्रारभ केल्या-नतर अडचणी उत्पन्न झाल्या की त्याला मध्येच सोडतात. परतु विघ्नानी पुन पुन चाल केली तरी न डगमगता शेवटपर्यंत बालेकिल्ला लढवत राहणारे सजयत मुनीसारखा एखादाच. अशाची गणना जैन वाङमयात अतकृत् केवली ह्या नावाने केली आहे. त्याना देहाचा त्याग करावा लागतो, पण ते ध्येयाचा त्याग करीत नाहीत ३५१ ओव्यामध्ये सागितलेल्या ह्या लावलचक कथेत निदान आहे, तप आहे, उपसर्ग आहे, भवावळीचे वर्णन आहे, समुद्रगमन आहे, मत्रसाधना आहे, काटचाने काटा काढण्याची युक्ती आहे, न्यायनिवाडा डोळसपणे न्याय करणारा राजा आहे, तिर्यंचाशी माणसासारखा व्यवहार ठेवण्याची शिकवण आहे, हस्तीदताचा ळळा व मुक्ताहाराच्या आवडीपासून वेगळे करण्याचे कसब आहे. ह्या वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तित्वामुळे सजयत मुनीचे पुण्यस्मरण पुण्यास्रव कथाकोशात झाले आहे बराच काळ लोटून गेल्यानतरही काही काही घटना मानवी मनात कशा घर करून राहतात ह्याची 'हिमवत्' पर्वताची आठवण ही साक्ष आहे. सन्याशी होऊन हिमालयात जायचे आहे का हा वाक्प्रचार अजूनही घरोघरी आढळेल त्याचे मूळ अशा प्रकारच्या कथामध्ये आहे

५६ **श्रेणिक व चेलना**

श्रेणिक व चेलना ह्याच्या उल्लेखाशिवाय कोणताही कथाकोश पूर्ण होत नाही श्रेणिक हा बिबिसाराचा कर्तृत्ववान राजपुत्र,

पहिल्या मगधसम्राटाचा राजपुत्र आपल्या कर्तबगारीने इतर भाऊबंदाना डावलून गादीवर बसला परधर्मी-प्रसु चलाख अशा चेलनेशी लग्न केले ययातिप्रमाणे मुलाकडून आपल्या वासना-पूर्तीची आवश्यकता परिपूर्ण केली. अशा कलंदर व्यक्तिमत्त्वाचा माणूस भगवताच्या समवशरणात प्रश्न विचारण्यासाठी समोर बसलेला त्याच्या गुरुनेही गणधरानीही न कटाळता उत्तरे दिली काही प्रश्न अडचणीचे असतील नाही असे नाही. तथापि ते त्यांच्या गुरुशिष्य सबधात बाधक ठरले ह्याची इतिहासात साक्ष नाही. जीवनकाळात ६०,००० प्रश्न त्याने विचारले त्यातील एक प्रश्न 'शकेबाबतचा' एखादा मार्ग स्वीकारल्या-नंतर शका नको 'सशयात्मा विनश्यति' सतत शका ठेवणारा माणूस नष्ट होतो, औरगजेबाच्या उदाहरणावरून हे स्पष्ट होते. सात वेळा साधु होऊन सात वेळा गृहस्थपद स्वीकारणारा भर्तृहरि ह्याच मार्गातला आणि शस्त्राने दोरी कापल्यावर खाली पडून घात झाला तर काय म्हणणारा सोमदत्त ह्यातीलच. त्यापेक्षा निःशक होऊन कृती करणारा अजनचोर यशस्वी झाला हे ह्यात ठसविले आहे शकेखोर माणसापेक्षा कृतीशूर चागला हे दाख-विण्याचा स्पष्ट प्रयत्न येथे आहे निःशंकता ही सम्क्यत्वाची सुरुवात ही ह्या कथेची मध्यवर्ती कल्पना आहे म्हणून कालौघात अजनचोर अजरामर झाले.

१७ **अनंतमति**

'कर्मफलाची इच्छा न ठेवता कर्म करा' 'निष्काम कर्मयोग' ही गीतेची शिकवण आहे. तीच निष्काक्षितागाचे रूपाने जैनग्रथात प्रकट झाली आहे काही फलाची इच्छा न ठेवता काम करणे किती कठीण आहे हे आपल्याला पदोपदी जाणवते टिप हा प्रकार तर पाश्चात्यात शिष्टाचारात मोडतो. येताजाता आभार मानण्याचे प्रकार युरोप अमेरिका खडात दिसून येतात अशा प्रकारे माणसानाही पाळण्यास अवघड निष्काम

कर्मयोग अनतमती सारख्या स्त्रीजातीत जन्मलेल्या बाईने सिद्ध करावा हे कौतुकास्पद आहे बाई हे सकट आहे बाईवर व बाई-मुळे सकटाची परपरा सुरू होते असे मानले तरी अत्यत प्रतिकूल परिस्थितीत जे टिकते ते खरे असे वाटते सोन्याच्या जशा चार कसोटचा असतात तशा माणसाची पारखही अनेक कसोटचानी होते त्या प्रतिकूल परिस्थितीत एखादी व्यक्ती कशी वागते ह्याला फार महत्त्व आहे. अनतमतीचा व्रतपालनाचा उत्साह, हरण झाल्यानतरही सतुलन न खोवता ताठ राहण्याची भूमिका, जगली मानसाशी सुसस्कृतपणे राहण्याची वृत्ती, व्यापाऱ्याच्या कपटाला समर्थपणे दिलेले तोड, वेश्येच्या मोहजालातही न फसून त्यागी बनून ध्येयवेडेपणा सिद्ध केला हे अद्‌भुत आहे अशी व्यक्ती जनमानसात उजळून न दिसली तर आश्चर्य.

५.८ **अवंतिराज उदयन**

आजारपणात आपपर ओळखू येतो जो आजारात जवळ येतो तो आपला अशी व्याख्या केली तर धर्ममार्गात किळस येत नाही तो खरा धार्मिक म्हणावा लागेल आजकालही 'महारोग्याची सेवा' ही सेवकाची कसोटी मानली जाते त्यामुळे कधी स्नान न करणाऱ्या, धुळीने साखलेल्या, जखमी अशा साधु-साध्वीची सेवा महाकठीण काम आहे त्यासाठी मन मोडावे लागते ते मन मोडले तो खरा माणूस होय म्हणूनच असाधारण परिस्थितीत असलेल्या साधुपुरूषाच्या सेवेला इतिकर्तव्यता मानणाऱ्या व्यक्ती धर्मग्रथात मूर्धन्य स्थानी विराजमान होतात ह्यात आश्चर्य नाही कोणत्याही धर्माला विश्वधर्माचे स्वरूप द्यावयाचे असल्यास अशा किळस न करता काम करणाऱ्या सेवाभावी लोकाच्या सेनेची आवश्यकता आहे

५९ **रेवती राणी**

नाणे सुरू झाले तसा खोटेपणा सुरू होतो. चागल्या नाण्या-बरोबर वाईट नाणे चालविण्याचा माणसाला व्यामोह पडतो

पण माणसाला खरे व खोटे ओळखता आले पाहिजे. त्याशिवाय तरणोपाय नाही. हा खऱ्याखोटयाचा खेळ सर्व क्षेत्रात सदैव चालू असतो नग्न झाले की खायला मिळते असा समज झाल्या-बरोबर अनेक व्यक्ती नग्न होतील परतु ही नग्नता सापेक्ष आहे की निरपेक्ष हे श्रावकाला ओळखता आले पाहिजे. नाहीतर त्याची व त्याला मार्गदर्शन करणाऱ्याची फजगत होईल. 'डोळसपणा' हा सम्यक्त्वाचा प्राण आहे पण हा साधा चर्मचक्षू नाही. हा प्रज्ञाचक्षु आहे, हा सामान्य डोळ्यापेक्षा फार सशक्त व तेजस्वी असतो अशा असामान्य चक्षु बाळगणारी रेवतीराणी चिरकाळ स्मरणात राहली.

५.१० **जिनेंद्रभक्त**

दुसऱ्याचे दोष झाकणे व दुसऱ्याचा गुणाची प्रशसा ह्यासारखे दुष्कर काम नाही. जो माणूस असे काम करू शकतो तो अद्वितीय म्हटला पाहिजे, असे अद्वितीय व्यक्तिमत्व जिनेंद्र-भक्ताचे आहे. पापाचा द्वेष करावा पापी पुरुषाचा नको. ही धर्माची अनतकाळची शिकवण आहे त्याशिवाय वाल्याचा वाल्मिकी होऊ शकत नाही ज्याला आपण चागला समजतो तो वाईट वागू शकेल. आपण ज्याला वाईट समजतो त्याच्यातही चागुलपणा असू शकेल अशा मान्यतेशिवाय तडतोडीची जागा शिल्लक राहत नाही. ह्या कथेचे खिश्चन धर्मात प्रसिद्ध असलेल्या कथेशी साम्य आहे चोराने रात्री नेलेले चादीचे ताटवाटी मीच त्याला दिले असे म्हणणारा धर्मोपदेशक व क्षुल्लकाने चोरलेली रत्नप्रतिमा मीच त्याला दिली म्हणणारा धर्मोपदेशक व क्षुल्लकाने चोरलेली रत्नप्रतिमा मीच त्याला दिली म्हणणारा जिनेंद्रभक्त ह्यात काय फरक आहे ? जिथे एखाद्या माणसाची सद्भावना कमी पडते तीआपल्या सद्भावनेने भरून काढावी त्याशिवाय माणुसकीची प्रस्थापना जगात होऊ शकत नाही असे व्यक्तिमत्व धारण करणारा जिनेंद्रभक्त अनेक धार्मिक पुरुषाना नकळत मार्गदर्शन करू शकेल.

## ५.११ वारिसेन :

भावनावेगात येऊन अनेक माणसे अनेक कार्य करतात. परतु भावनावेग ओसरल्यानतर ते कार्य टिकविणे किती कठीण असते हे नित्य जाणवते. विचारी पुरुषानी प्रचड इच्छा शक्तीच्याद्वारे असे भावनाप्रधानी लोक सदैव साभाळले पाहिजे त्याशिवाय धर्ममार्गाची परपरा चालू शकत नाही. जगात भावना, विचार व इच्छा ह्या प्रचड शक्ती आहेत. त्याचे मानवाच्या मनावर नियत्रण असते. जो माणूस ह्या गोष्टीवर नियत्रण बसवितो तो सफल नेता, शास्ता, आचार्य, होय ह्यात शका नाही. साधुपदाच्या स्वीकारानतर आपल्या कुरूप बायकोच्या स्मरणाने व्याकुळ झालेल्या पुष्पडालाला आपल्या घरी नेऊन अथाग वैभवाचे प्रदर्शन दाखवून धक्का देऊन स्थिर करणाऱ्या वारिसेनाना कोण विसरू शकेल ?

## ५ १२ विष्णूकुमार

गाय प्राण पणाला लावून वत्साचे रक्षण करते तसे माणसाने तनमनधन पणाला लावून धर्माचे रक्षण केले पाहिजे. तत्त्व सर्वांना माहित असते. आचरणात आणणारा पुरुषोत्तम विरळाच असतो. 'सत्य वद' हा पाठ समजला नाही अशी कबुली देणारा युधिष्ठिरासारखा विद्यार्थी आगळाच असतो. त्याप्रमाणे सकट आले असता माणसाची कसोटी लागते. त्यात 'विष्णूकुमार' कसोटीत उतरले असे म्हणावे लागते त्यासाठी पुस्तकातील लिखित आचार बाजूला ठेवला काळवेळचे भान न ठेवता, नात्यागोत्याच्या सबधाकडे लक्ष न देता मुनीना वाचविण्याच्या एकाच सदिच्छेने प्रेरित होऊन नगानाच करणाऱ्या समाजातील व्यक्तीना त्यानी ज्याप्रकारे दडित केले ती गोष्ट सर्वसाधारण नीति नियमात वसत नाही. परतु निर्मल आशय असल्यास केलेली कोणतीही कृती ही निर्मल आहे ही गोष्ट विष्णुकुमाराच्या उदाहरणावरून स्पष्ट होते.

५.१३ वज्रकुमार

समाज हा उत्सवप्रिय असतो त्या उत्सवप्रियतेत माणसाची स्पर्धा सदैव चालू असते त्यावेळी एखाद्या प्रसगी समाजातील जास्तीत जास्त माणसे जास्तीत जास्त प्रकारे भाग घेतील अशी व्यवस्था, समाजनेत्याना करावी लागते. सघर्षात देखील आपण धर्माचे घोडे पुढे दामटले पाहिजे हे मनाला पटत नाही. तथापि मानवी मन देखील स्पर्धेमध्ये जसे सक्रिय राहते तसे स्पर्धा-विरहित वातावरणात राहत नाही ही मानवी मनाची उणीव आहे. पण ज्ञानतेजाने आतरविश्व उजळल्याशिवाय बाह्य जग उजळणे शक्य नाही ही वज्रकुमारच्या कथेची मध्यवर्ती कल्पना आहे.

ह्या कथाकोशाची हस्तलिखित प्रत उपलब्ध करून दिल्याबद्दल बलात्कार दिगबर जैन मदिर, अमरावती ह्याच्या पदाधिकाऱ्याचा मी आभारी आहे.

तसेच ग्रथ लिहिते वेळी सगळ्या कुटुबियानी आत्मीयतेने मदत केली व हा ग्रथ पूर्णत्वास नेला त्याबद्दल तेही अभिनदनास पात्र आहेत.

ग्रथप्रकाशन अत्यत महागडे असताना देखील जीवराज गौतम ग्रथमालेच्या पदाधिकाऱ्यानी हा ग्रथ प्रकाशनासाठी निवडला त्याबद्दल मी त्या ग्रथमालेच्या पदाधिकाऱ्याचा अत्यत कृतज्ञ आहे

ग्रंथप्रकाशन उशीरा का होईना सुबक रीतीने करून दिल्याबद्दल नारायण मुद्रणालयाचे मधुसूदन वनहट्टी हे धन्यवादास पात्र आहेत

नागपूर
३१-७-७८

शां. ज. किल्लेदार
विभाग प्रमुख पाली आणि प्राकृत
ना म. वि. नागपूर

# जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापूर

## मराठी प्रकाशने

१. **रत्नकरण्ड श्रावकाचार**-प सदासुखजी विरचित वृहत् हिंदी वचनिकेचा समग्र मराठी अनुवाद अनु० पू. ब्र जीवराज गौतमचद जोशी. किं १० रु.

२ **आर्यादशभक्ति** – पूज्यपादकृत सस्कृत दशभक्तीचा मराठीत आर्याबद्ध अनुनाद. कि. १ रु.

३. **भ. कुदकुंदाचे रत्नत्रय** – भ. कुदकुदाच्या समयसार, प्रवचनसार व पचास्तिकाय या ग्रथरत्नातील सर्व विपयाची सुदर माडणी. किं. १–५० रु.

४ **महामानव सुदर्शन** – आ सकलकीर्तीच्या सुदर्शनचरित्राचा मराठीत आधुनिक तत्रात अवतार किं १ रु

५. **नित्यनैमित्तिक जैनाचार** – गृहस्थाला आवश्यक असणाऱ्या सर्व क्रिया-कर्माची शास्त्रोक्त माहिती, शिवाय पचामृताभिपेक, अष्टके व व आरत्या याचाही एकत्र सग्रह. किं. १–५० रु.

६. **पार्श्वनाथचरित्र व महावीरचरित्र** – किं प्रत्येकी ५० पैसे

७ **जीवधर** – श्री वादीभसिंहसूरिकृत 'क्षत्रचूडामणि' या अलौकिक काव्यावर आधारलेली सपूर्ण कथा. दुरगी मुखपृष्ठ किं. १–५० रु.

८ **पाडवकथा** – जैनधर्मपरपरेतील कौरव–पाडवाची सपूर्ण कथा दुरगी मुखपृष्ठ किं १–७५ रु.

९ **रत्नाची पारख** – 'सत्यघोप' या पौराणिक कथेवर आधारित स्त्री-पात्रविरहित शालोपयोगी नाटिका कि ५० पैसे

१०. **सम्यक्त्वकौमुदीकथा** - कि १–७५ रु

११, **भ ऋषभदेव** – किं १-२५ रु

१२. **जीवधरपुराण** – मराठी ओवी किं २ रु.

१३. **जिनसागरकृतव्रतकथा** – रविवार, निर्दोपसप्तमी, कालदशमी, सुगध-दशमी, पचमेरुपूजा, नवग्रहपूजा, नदीश्वरपूजा, अनेकस्तोत्रे व आरत्या याचा सग्रह किं ४ रु

१४ **भ. नेमिनाथ चरित्र** – किं. १ रु

# आराधना - कथाकोश

## प्रसंग पहिला

### आराधना-कथा-प्रकाश-ग्रंथ
### -पात्रकेसरी-दर्शन-शुद्धि-कथा-

अथ आराधना-कथा-कोश लिख्यते

लोकालोक स्वरूप प्रकाशक । भव्य जन करोनी आराधनिक ।
चतुर्विंशति जिन नायक । भव्यार्थसाधक नित्य नमु ।।१।।
जे वसति त्र्यैलोक्याग्रवासी । सहारोनि अष्टकर्मासी ।
भोगिति अनंत सौख्यरासी । त्या सिद्धासी नमस्कार ।।२।।
आचार्या छत्तीस गुणधारी । तल्लीन तप-जप-ध्यानातरी ।
तरण तारण ससार सागरी । नमु निरतर तत्पकजा ।।३।।
जेन्ही अंगपूर्वाचा प्रकास । व्यक्त करोनी श्रावकाहीस ।
लाविले असे मुक्तीमार्गासि । तत् पाठकास वदु सदा ।।४।।
सर्वसाधु मुनीश्वरा । तपश्चरण करीती घोर ।
मोक्षसुख साधिती निरंतरा । असो नमस्कार तत्पकजी ।।५।।
माय माझी सरस्वती । वदनीक असे त्रिजगती ।
त्वत्पदी नित्य मम नुति । ग्रथोत्पत्तिसिद्धिस्तवे ।।६।।
उक्त च ।। नमस्तस्यै सरस्वत्यै सर्वविज्ञानचक्षुषे ।
यस्या सप्राप्यते नाम्ना पारसज्ञान-वारिधे ।।७।।

आप्त[१] भारती आनि सद्‌गुरु । तत्क्रम[२] नित्य हृदइ स्मरु ।
कथाकोश ग्रंथारंभ करू । असे आधारू त्वत्पंकजाचा ॥८॥

श्री मूलसघे भारतिगच्छे । बालात्कार गण दिसे स्वच्छ[३] ।
श्री कुदकुदान्वये[४] कक्ष । ज्ञानार्णवि[५] दक्ष प्रभाचंद्र ॥९॥

तत्प्रभाचद्र मुनिश्वरान । श्रावक अनुग्रहाकारण ।
आराधना[६] सारकथा कठिन । प्रबध करोन निर्मिला असे ॥१०॥

विचारोनि तत्कथा अर्थ । स्वज्ञाने[७] करोनि नेमिदत्त ।
श्लोकबद्ध रचिला ग्रथ । पुण्यअर्थं प्राप्त व्हाया ॥११॥

आराधना कथाकोश[८] । नाम असे या ग्रथास ॥
श्रवण करोनि रत्नकीर्तिस । हृदि उल्हास दाटला ॥१२॥

तदा भासिले[९] मम चित्ति । सार कथाकोश उत्पत्ति ।
करावि परी मी मदमति । न जाने युक्ति कवित्वाचि ॥१३॥

ऐसे जानोनि राहिलो स्थिर । परि चित्ति उत्कर्प असे फार ।
हर्षं उद्भवे वारवार । बालबोध सार रचायासि ॥१४॥

ऐसी निशिदिन करित चिंता । भरवसा न वाटे मम चित्ता ।
तत्क्षणी स्मरिलि जगन्माता[१०] । मम मूर्खता दूर गेली ॥१५॥

मग विचारिले स्वचित्तास । भारति दिधले साहस ।
रचाया आराधना कथाकोश । प्रासाद कलस सिद्धि होईल ॥१६॥

आराधना कथाकोश जान । या ग्रथाचे असे अभिधान ।
चतुर्भेदे करोनि पावन । ज्ञानवतं निर्मानि केले असे ॥१७॥

---

१. अर्हंत देव, २ पादकमल, ३. निर्मल, ४ पट्टावलि, ५ समुद्र, ६. दर्शनाराधना, ज्ञानाराधना, चारित्र्याराधना, तपाराधना. ७. ब्रह्म (ज्ञाने), ८. कथारूपी भाडार, ९. आवडलि, १०. सरस्वति.

दर्शनज्ञानाराधना सार । चारित्रानि तप मनोहर ।
आराधना चतुप्रकार । धरणिवर प्रसिद्ध असे ।।१८।।
मनवाक्काया करोनि सहित । उद्योत उद्यम जानिजे व्यक्त ।
निर्वाहि साधन निस्तरनांत । दिवसरात पालिजे ।।१९।।
चतु प्रकारे आराधना । जिनराज कथिले भव्यजना ।
जे आचरिति शुद्धमना । ते सकलजना पूज्य होति ।।२०।।
उक्तं च । सम्यग्दर्शन बोध[11]वृत्त[12]तपसा ससारविच्छेदिना ।
शक्त्या भक्तिभरेण सद्गुरुमतात्[13] स्वर्गापवर्गश्रिये ।।
उद्योतोद्यमने तथा च नितरा निर्वाहिण साधन ।
पूतं निस्तरणं महामुनिवरैराराधनेतीरिता[14] ।।२१।।
उज्झो[15]वणमुज्झवण[16] णिव्वाहण[17] साहण[18]च णिच्छरण[19] ।
दंसणणाचरित्तं तवाणमाराहणा भणिया ।।२२।।
आता याचे पृथग्भेद । मी किंचित्कथितो मतीमद ।
न जाने मी शास्त्रच्छद । भव्यजनानद आइकिजे ।।२३।।
दर्शनज्ञानचारित्रतप । जगि विस्तरिजे प्रताप ।
उद्योताराधना निष्पाप । मुनि अध्यापके कथिले जना ।।२४।।
उक्तच । यत्सम्यग्दर्शनज्ञानचारित्रतपसा भवेत् ।
लोके प्रकाशन तत् स्यात्युद्योतनमिति ध्रुव[19] ।।२५।।
अगिकारिले असे सद्व्रत । बाह्याभ्यतरे करोनि सहित ।
ते पालिजे आलस्यवर्जित । उद्यम त्यात कथिले मुनि ।।२६।।

---

११ ज्ञान, १२. चारित्र, १३ सद्गुरुवचनात्, १४ कथिता, १५ सम्यग्दर्शनज्ञानचारित्रतपमा गृहीताना सिद्धिनिमित्त अनालस्य कुर्वन्स उद्यम । १६. धरणितले प्रसिद्ध कुर्वं स उद्योत । १७ महोपसर्गेण त्यजति यावज्जीवपर्यंत पालयन्ति स निर्वाहण । १८ सम्यग्दर्शनज्ञानचारित्रतपसा चतुर्णां समग्रता साधकत्व साधन कथ्यते । १९ निश्चयेन.

उक्तच । तथा हि स्वीकृताना च, तेषामालस्यवर्जितः ।
बाह्याभ्यतरमुद्योगः, प्रोक्तमुद्यमनं बुधैः ॥२७॥

दृगादि[२०] व्रत पावल्यावरि । सकष्ट येवोनि पडे जरी ।
कदा न तजि दृढशरीरि । निर्वाह् करि यावज्जीवित ॥२८॥

उक्तच । तेषा सद्दर्शनादीना सप्राप्ते त्यागकारणे ।
सकष्टैरपरित्यागो भवेन्निर्वाहण शुभ ॥२९॥

तत्त्वपदार्थादि सत्शास्त्र । दृगादि व्रत जे पवित्र ।
साधन कीजे दिनरात्र । साधन सत्सूत्र कथिले जिन ॥३०॥

उक्तच । तत्वार्थादिमहाशास्त्र– । पाठने यन्मुने. सदा ।
दर्शनादे' समग्रत्व साधन रागवर्जितं ॥३१॥

मुनि अगिकारिले जे व्रत । तयासि यावज्जीवपर्यंत ।
पालन कीजे विघ्नरहित । निस्तरण त्यात कथिले ज्ञानि ॥३२॥

उक्तच । तथा दृग्ज्ञानचारित्रतपसा मरणावधि ।
निर्विघ्नैः प्रापण प्रोक्त बुधै. निस्तरण पर ॥३३॥

चतुराधनाचे कारण । पचधा प्रयोगे करोन ।
जे पालिति मुनिसत्तम । ते निर्भय[२१]स्थान पावति ॥३४॥

सम्यग्दर्शन उद्योत थोर । जेन्हे केला पृथ्वीवर ।
तत्कथा अत्यत मनोहर । ऐकावि सार भव्यजन ॥३५॥

अहो अहो सभाजन । श्रवण करावे स्थिर मन ।
जरी म्हणाल होय कथन । जानावे साधन ससृतीचे ॥३६॥

हे कथा असे प्रौढि[२२] । मम बुद्धि असे थोडी ।
सागता वळत असे बोबडि । परतू करावि गोडि ज्ञानीजन ॥३७॥

---

२०. दर्शन आदि करोन, २१. मोक्षस्थान, २२ थोर.

या जंबूद्वीपामाजि पवित्र । शोभत असे भरतक्षेत्र ।
वनोपवन दिसति यथा मित्र । पश्यता[23] नेत्र तृप्ति होति ।।३८।।

षड्विंशाधिक[24] पंचशत । योजन असे विस्तारवत ।
षट्खण्डे करोनि मंडित । असे भरित सारसपदा ।।३९।।

त्यामाजि असे आर्यखण्ड । किंवा पुण्यमातृका प्रचंड ।
विहार करिति मुनि उदण्ड । सदा घेति दंड कर्मशत्रुसि ।।४०।।

जेथे तीर्थंकर पंचकल्याण । नित्योत्सव पश्यति जन ।
चक्रवर्ती नारायण होति । उत्पन्न चतुर्थकालि ।।४१।।

त्या आर्य खण्डाची शोभा । काय वर्णावे रत्नगर्भा ।
निर्जर[25] इच्छिति जन्मलाभा । पश्यता अचंभा वाटे जिवा ।।४२।।

त्या आर्य खण्डामाजि शुद्ध । मनोज्ञ देश असे मागध ।
कूप तडाग शोभति अगाध । श्वापद[27] निर्बाध फिरति वनी ।।४३।।

त्या मगध देशामाजि जान । सर्वे धर्मिष्ट वसति जन ।
नित्य करिति जिन पूजन । देति दान मुनिजना ।।४४।।

जेथे नित्य विहार करिति मुनि । धर्मोपदेश देवोनि जनि ।
तारिति भव्य जनाला गुणी । अचल स्थानी ठेविती ।।४५।।

त्या देशाचे करिता वर्णन । सीन ठाकला सहस्रवदन[28] ।
जनी लज्जित होऊन । पातालभुवन सेविले ।।४६।।

त्या मगधदेशा भीतरि । अहिछत्र नामे असे नगरि ।
नेत्री पश्यता शोभा भारी । इंद्रपुरि दिसे दुजि ।।४७।।

---

२३. पाहणाऱ्याचे, २४. पाचशे सव्वीस योजन सकल भरतक्षेत्र विस्तार असे, २५. पाच म्लेंच्छखंड एक आर्यखंड, २६ देवदेवेंद्र, २७. हरिनादिक, २८. धरमेंद्र,

महोन्नत दिसे प्राकोठ । प्राकारावर ककोरे शोभति मनोहरं ।
बलाढच दिसति गोपुर[२९] । यथा द्वार अयोध्याचे ।।४८।।
परति सखोल असे ख्रातिका । रक्षण करिति नग्रलोका ।
शत्रुगणासि भयदायका । वेष्टिति लका सिंधु[३०] जंसे ।।४९।।
त्या ग्रामि सुखे जन नादति । सदा विचित्र[३१] भोग भोगिति ।
जिनधर्म सदा सेविति । नित्य पालिति जीवदया ।।५०।।
त्या नगराचे पुण्यास्तवे । राज्य करिति शुद्ध भावे ।
नृपति अवनिपाल नावे करोनि । प्रापिति वैधव्य शत्रुभार्यासि ५१
त्या ग्रामाचे अभ्यतरि । पार्श्वजिन चैत्यालय असे थोरी ।
फणालकृत मस्तकावरि । हरिविष्टरावरि दिसे बैसला ।।५२।।
छत्रमय शिरि विराजमान । ढलति चौषष्टि चामर प्रकीर्ण ।
नख शोभा कोटच चद्रमाण । रत्न निर्माण बिंब असे ।।५३।।
स्वर्णमय चैत्यालय शोभति । कलस शिखरि उल्लालिति ।
पटकुले ध्वजा लहकति । आह्वानन करिति भक्तजनां ।।५४।।
नित्य येवोनि श्रावकजन । भावे करिति न्हवन पूजन ।
गीत वाद्योत्सव नर्तन । पठति स्तवन भावशुद्ध ।।५५।।
मग येवोनि निजमदिरासि । पाणी धरोनि स्वपाणीसि ।
अवलोकिति दशदिसि । द्याया मुनिसि अन्नदान ।।५६।।
ज्याचे पदरी असे सुकृत । उत्तम पात्रदान घडे त्यात ।
नवविध पुण्य करोनि सहित । दाता मुनीस दान देती ।।५७।।
आहारदान घेवोनि मुनि । अक्षय दान वदोनि वचनि ।
त्वरे निस्पृहि जाति वनि । अचल ध्यानि तिष्टति ।।५८।।

---

२९. दरवाजे, ३० समुद्र, ३१ आश्चर्यदाइ

अहो त्याची ग्रामांतरि । पंचशत विप्र वसति थोरि ।
तन्मध्य मुख्य पात्रकेशरि । विद्यादर्प शरीरि थोर असे ।।५९।।
नित्य पठति वेदवेदाग । वादार्थि जैसे सिधुतरग ।
वादिजनाचा मानभंग । करिती वेग ज्ञान बले ।।६०।।
सर्व विप्रामाजि सार । पात्रकेशरि असे थोर ।
पार पावला ज्ञानसागर । वहत असे फार ज्ञानगर्व ।।६१।।
तद्विधा प्रभावे करोनि । राज्यमान्य पावला जनि ।
लोक वदना करिति चरणी । कीर्ति अवनिवरी असे ।।६२।।
विद्यारत्न असे ज्यापामी । जगी काय उने असे त्यासि ।
जो माननिक असेल भूपतीसि । जन काय त्यासि न वदिति।।६३।।
उक्तच । विद्वत्व च नृपत्वं च । नैव तुल्यं कदाचन ।
स्वदेशे पूज्यते राजा, विद्वान् सर्वत्र पूज्यते ।।६४।।
मिथ्यामतगजावर । बैसले असति निरंतर ।
जिनधर्मासि चालविति वैर । जिनलिगासि फार निदिति ।।६५।।
क्वचिच्चैत्यालयापुढोनि जाति । वस्त्रे वदन आच्छादिति ।
नावलोकावि नग्नमुर्त्ति । ऐसे वदति वेदशास्त्री ।।६६।।
जिनमदिरि न येति कदा । सदैव करिति जिनधर्मनिदा ।
प्रविष्ट करिति चतुर्वेदा । मिथ्यात्वकदा वाढविति ।।६७।।
ऐसे असता एके वासरि । विप्रमुख्य पात्र केसरि ।
मार्गे जाता जिनमदिरावरि । महध्वजा शिखरी पाहिली ।।६८।।
तदा वदे शिष्याहि कारण । हे कवन मनोज्ञ दिसे स्थान ।
ध्वजावरि असे नागचिह्न । काय असे भुवन शकराचे ।।६९।।
नयनि पश्यता हे मदिर । हृदइ हर्षोद्भवला थोर ।
चाला रे पाहावया लवकर । महामनोहर स्थान दिसे ।।७०।।

शिष्य वदति अहो स्वामी । जिनसद्मनि न जावे तुम्हि ।
नग्नमूर्ति पश्यता नयनि । होईल हानि स्वधर्म्माचि ।।७१।।

शिष्यवाक्य ऐकोनि ऐसे । पात्रकेसरि वदत असे ।
नेत्रि पश्यता दारुणविशे । काय प्राण नासे मानवाचा ।।७२।।

ज्याचे उदेले शुभ कर्म । त्याचे लोप होति अशुभकर्म ।
दूर होय मिथ्यामतभ्रम । जिनभाषितधर्म सत्य मानिति ।।७३।।

ऊक्त दुहाद्वय—जैसे ज्वरके ज्योरसु भोजनकि रुचि जाय ।
तैसे कुकर्मके उदे जिनबचन न सुहाय ।।७४।।

लगे भूख ज्वरके गय । रुचसु लेत अहार ।
कुकर्म बिनसे शुभ कर्म्म जगे । तब जाने धर्म्म बिचार ।।७५।।

तदा तो पात्रकेसरि भला । चित्तोत्से करोनि चालिला ।
जिनमदिरि प्रवेस केला । हृदइ पावला थोर हर्ष ।।७६।।

तदा साइकाल जानोनि । मुनि प्रवेश करोनि जिनसद्मनि ।
मस्तकि जोडिनिया पाणि । कृत जिनचरणि नमस्कार ।।७७।।

तदा देवागमस्तोत्रासि । पाठ करतसे मनोह्लासी ।
शुद्ध स्पष्टाक्षरमालिकासि । मजुळस्वरेसि उच्चारिति ।।७८।।

ते स्तोत्र करिता श्रवण । पात्रकेसरिचे हर्षिले मन ।
क्वचिदर्थ होताचि अवगम । अमृताहून गोड लागे ।।७९।।

मग मुनीसि वदे विप्रनाथ । भो मुने या स्तोत्राचा अर्थ ।
जानसि काय पठसि व्यर्थ[32] । वद भावार्थ मजपुढे ।।८०।।

तद्वाक्य अैकोनि मुनि । वदत असे मिष्टवचनि ।
अर्थ भावार्थ न जानोमि । नवदीक्षित मी बुद्धिहीन ।।८१।।

---

३२. उगलाच

मुनि वाक्य आयकोनि ऐसे । पात्रकेसरी वदत असे ।
स्थीरचित्ते पदन्यासे । पुनरपि सरसे वद मुने ॥८२॥
तद्भाव जानोनि यतिश्वर । पदन्यास ठेवोनि स्थीर ।
अर्थसमग्रकृतोच्चार । मधुरस्वर करोनिया ॥८३॥
संपूर्ण स्तोत्र ऐकोनि द्विज । अर्थविगम्य केले सहज ।
तदादर्शनमोहनिरज[33] । उपसम मेघराज प्रक्षालिलि ॥८४॥
उपसम सम्यक्त प्राप्त होता । स्तोत्रार्थ कलोनि आला पुर्ता ।
पुनः पुन्हा विचारिता । सप्ततत्त्वार्था जानीतले ॥८५॥
ह्मने या जिनमार्गाभीतरि । वस्तुलक्षण[34]दिसे थोरि ।
हे अ[35]नर्घ्यरत्नपट् मतांतरि । स्वप्नामाझारि असेचि ना ॥८६॥
जीवाजीवाश्रवबंध । संवरनिर्ज्जरामोक्ष शुद्ध ।
जिनमार्गि कथिले विवुध । ते मिथ्याज्ञानाध न जानति ॥८७॥
जिनागम प्रशंसोनि थोर । तद्रस[36] प्रासिति वारंवार ।
हेतु जडला जिनधर्म्मावर । हृदयमदिर भरोनि उरला ॥८८॥
मग तो विप्र हर्षचित्ते । स्तोत्रार्थावरि धरोनि प्रीति ।
गमन केले स्वगृहाप्रति । यथा धनप्राप्ति दरिद्रासि ॥८९॥
मग निशामुखे[37] मचकावरि[38] । उत्तानशयन करोनि सत्वरि ।
मनवचकाया करोनि स्थीरि । स्तोत्रार्थ उच्चारि ज्ञानवले ॥९०॥
पदपर्यायसमास लाउनि । भावार्थ विचारिता मनि ।
अनुमानशव्द ठेविला ज्ञानि । तदर्थ चिंतनि कलेचि ना ॥९१॥
चित्ति साहस धरोनि थोर । तदर्थ विचारि वारंवार ।
तदपि न दिसे पाडित्यघर । जन्माधा सारवस्तु यथा ॥९२॥

---

३३ धूलि, ३४. आत्मस्वरूपलक्षण, ३५ अमोल, ३६ अमृतरस,
३७. प्रथमपहरि, ३८ पलगावरि.

मग फार होवोनि क्षत क्षीण । तदा निद्रा व्यापिलि येऊन ।
महद्विश्रातांचे कारण । पुण्यवतालागुण नित्य प्रति ॥९३॥
पापिष्ट जर जे असति । ते सदाकाल दुःख भोगिति ।
निसिदिन देशावरि हिडति । कैंचि विश्राति निद्रादिक ॥९४॥
विप्र असता निद्रागत । तत्क्षणि होता झाला जागृत ।
जो प्राणि असे वेग्रचित्त । निद्रा त्यात असेचि ना ॥९५॥
मग स्वस्थचित्ते करि चिंतन । या तत्त्वाचा अर्थ कथिला पुर्ण ।
परि अनुमानशब्दाचे लक्षण । ज्ञानिजन का न कथिले ॥९६॥
श्रीमज्जिनागम असे निर्मल । शरत्कालचद्राहोनि उज्वल ।
येथे का ठेविला सदेहमल । असता प्रबल ज्ञानि मुनि ॥९७॥
ऐसे चिंतन करितातरि । दोन प्रहर मध्यरात्री ।
चिंताग्रस्त ऽसे पात्रकेसरि । तदा कौने परी काय वर्त्तले ॥९८॥
आसनकंप होता तत्क्षणि । जानितले ऽवधिलोचनि ।
तद्गृहि पातलि पद्मिनी[३९] । जिनभक्तालागुनि साह्य असे ॥९९॥
पुढे येवोनि उभी ठाकली । गुप्त विप्रासि वाक्य बोलि ।
तव हृदि जे चिंता व्यापिलि । ते मी आलि फेडावया ॥१००॥
प्रातःकालि उठोनी जरि । जासील पार्श्वजिनमदिरि ।
तद्दर्शने करोनि सत्वरि । होईल दूरि तव सशय ॥१०१॥
ऐसे वदोनि पद्मावति । जावोनि जिनमदिराप्रति ।
पार्श्वेशफणमडपे युक्ति । लिहिलि निरुक्ति सशय ध्वस ॥१०२॥
अनुमानशब्दाचे लक्षण । तदर्थं लिहोनि सपूर्ण ।
जिनभक्तकार्य सपादुन । स्वकीय स्थान पावलि ॥१०३॥

---

३९ पद्मावती.

देवतादर्शने करोनि । विप्र फार हर्षला मनि ।
ह्मने जिनशासन त्रिभुवनि । जिवालागुणि तारक दिसे ।।१०४।।

ऐसे वदोनि जिनधर्म्मावर । अंतरि श्रद्धा जडलि फार ।
नुक्रमे उदयाचलावर । प्रशस्त दिनकर उगविला ।।१०५।।

तदा पात्रकेशरि ब्राह्मण । त्वरे जिनसद्मनि[40] जाऊन ।।
करिता पार्श्वेश्वरदर्शन । मिथ्यात्वभ्रम दूर गेले ।।१०६।।

पार्श्वेशफणमंडपावरि । अनुमानशब्दार्थाचि परि ।
दृष्टि पाहोनि पात्रकेशरि । सर्वार्थ अंतरि भेदला ।।१०७।।

फाकोनिया मिथ्यात्वपटल । उदेले सम्यक्त्व भानुमंडल ।
यथा सूर्योदयि सकल । तमतुवल[41] नास होय ।।१०८।।

उक्तंच–जातस्तल्लक्षणोत्कृष्टनिश्चयश्च द्विजन्मनः ।
भास्करस्योदये जाते न तिष्ठति तमो यथा ।।१०९।।

तदा तो ब्राह्मणाधीश । हृदी पावला थोर हर्ष ।
जिनधर्म्मविनाऽन्यमतास । मानिति विप हलाहल ।।११०।।

निर्दोष[42] एकदेवोऽ[43]हंत । कथिला धर्म्म हिंसावर्ज्जित ।
भव्यजनाचे व्हायासि हित । ससाराब्धि तारावया ।।१११।।

ऐसी श्रद्धा धरिताऽंतरि । दर्शनमोहनि तत्क्षणातरि ।
क्षयोपशम पावल्यावरि । सम्यक्त्व शरीरि उदीरले ।।११२।।

उक्तंच गाथा । हिंसारहियधम्मे, अट्ठरहदोस विवज्जिये देवे ।
णिग्गथे पव्वज्जा, सद्दहण होदि सम्मत्त ।।११३।।

---

४० जिनमंदिरि, ४१ थोर अंधकार, ४२ अष्टादशदोशरहित,
४३ क्षुधातृषाजननविस्मयरागमोहा चिंताविषादमदखेदजरारुजोथ ।
प्रश्वेदमृत्यूरतिरोशभय च निद्रा एतैश्च दोशनिवहैंरहितो जिनेंद्र ॥

मग करोनि स्तुतिवंदना । जाता झाला स्वकिय सदना ।
जिनप्रणित-तत्त्वमहिमा । नित्य बाह्मणापुढे वर्णिति ।।११४।।
तद्वाक्य ऐकोनि गर्विष्ठ । विप्राहृदयी भेदिले यथा शस्त्र ।
वदते झाले होवोनि एकत्र । हे काय अपवित्र वाक्य वदसि ।।११५।।
रे रे पात्रकेशरि । द्विजमार्गक्रियानष्टा ।
ब्रह्मक्रियाआचारभ्रष्टा । संस्कारकष्टा थोर पावसि ।।११६।।
ऐसे वदोनि ते ब्राह्मण । धिक्कारिति तयाकारण ।
अहो त्वा मीमांसकधर्म्मा साडून । करिसि भाषण जिनधर्माचे ११७
त्रिलोकि थोर चतुर्वेदा । ब्रह्मक्रियातरुवरकद ।
स्ववक्त्रे भाषिले मुकुद । ते त्वामतिमद का साडिले ।।११८।।
क्रोधोक्ति ऐकोनि पात्रकेसरि । क्षमाजलसिंचि तयावरि ।
म्हणे हो द्विजोत्तम ज्ञान धारि । क्षोभ मजवरि न किजे तुम्ही ११९
तुम्ही तर असा महाज्ञानी । परि मद्वाक्य धरावे श्रवणि ।
अर्हंतशासन-तुल्य-भुवनि । थोरमत कोन्हि दिसेचि ना ।।१२०।।
यथा गगनाहोनि थोर । दुजे न दिसे पृथ्वीवर ।
तथा जिनशासन समान सार । अन्यमतातर न तुलति ।।१२१।।
ऐसे विचारोनि स्वमानसि । मिथ्यात्व तजावे दुःखरासी ।
भजावे सम्यक्रत्नासि । प्राप्त व्हाव्यासि शिवसुख ।।१२२।।
तद्वाक्य करोनि श्रवण । एकत्र होवोनि ते ब्राह्मण ।
अल्पज्ञानि उद्धटपणा । करिति भाषण वेदउक्ति ।।१२३।।
मिलोनि रायाचे सभातरि । सर्व्वमुख्यपात्रकेसरि ।
स्याद्वादमते करोनि थोरि । जिकिले सत्वरि सर्वे द्विज ।।१२४।।
तत्त्वज्ञाने करोनि त्वरित । विध्वंसिले मिथ्यामत ।
उद्योतिले जिनेश्वरमत । स्वसम्यक्त्व प्रगटिले ।।१२५।।

नृपादिजन पाहोनि ऐसे । अंतरि महदाश्चर्य भासे ।
मिथ्यात्व सांडोनि सर्वंसे । हृदयी प्रकासे जिनदर्शन ॥१२६॥

मग ते सर्वे विद्वज्जन । स्वमुखे करिति स्तवन ।
धन्य धन्य वदति अवघे जन । करिति वंदन तत्पदि ॥१२७॥

गगणि होति पंचाश्चर्य । देव शब्द वदति जय जय ।
धन्य जिनशासन जगी होय । वर्णावे काय येक जिन्हे ॥१२८॥

धन्य दिसे हा पात्रकेसरि । विचक्षण जिनमतातरि ।
उद्योत केला धरणिवरि । भास्करापरि भूमडलि ॥१२९॥

वहुताप्रकारे करोनि सार । स्तुति करिति चतुर नर ।
होवोनिया सेवातत्पर । तद्‌गुणविस्तार करिति ॥१३०॥

मग कोन्हे घेवोनिया दीक्षा । करपात्रि करिति भिक्षा ।
करिति पट्‌कायजीवरक्षा । तपे कर्म्मकक्षा जालिति ॥१३१॥

कवने घेवोनि व्रतानेमा । स्वच्छ पालिति गृहस्थधर्मा ।
तत्त्वार्थाचा जानोनि मर्म्मा । संसृतिभ्रम उडविति ॥१३२॥

कोन्ही होवोनि दृढसम्यक्त्वि । जिनप्रवजि तल्लीन होति ।
जिनदेवशास्त्रसद्‌गुरुभक्ति । श्रद्धा चित्ति वसे सदा ॥१३३॥

जिनशासनमहिमा थोर । पात्रकेसरि कृत विस्तार ।
दर्शनोद्योत धरणीवर । केला सार सौख्यदायी ॥१३४॥

ऐसे जानोनि भव्यजन । त्रैलोक्यवद्य जिनशासन ।
उद्योत कीजे पुण्यपावन । होय प्राप्त जेन्ह स्वर्गमोक्ष ॥१३५॥

इत्थं श्रीशिवशर्मदं शुचितरं, सम्यक्त्वमुद्योत्तकं ।
कृत्वा प्राप्य नरेंद्रपूजनपरं, पात्रादिक. केसरी ।

अन्यश्चापि जिनेंद्रशासनरताः, सद्दर्शनोद्योतन ।
भक्त्या यस्तु करोति निर्मलयशो, स स्वर्गमोक्ष भजेत् ॥१३६॥

इति आराधना कथाकोशे पात्रकेसरिविप्रसम्यक्त्व उद्योग कथा प्रसंग पहिला।

इति आराधनाकथाकोपे रत्नकीर्ती विरचिते स्वहस्तेन लिखित्वा संपूर्ण शुभं भवतु ॥



# प्रसंग दुसरा

## अकलंक चरित्र

प्रथम नमु देव अर्हता । दुजे नमन सारद माता ।
तिसरे नमन सद्‌गुरु दाता । कार्यसिद्धि कर्ता सेवकाचि ॥१॥
तत्प्रसादे करोनि पवित्र । अकलंक स्वामिचे चरीत्र ।
रचितो आधारे जिन सूत्र । तुच्छ बुद्धिमात्र करोनिया ॥२॥
पृथविवरि स्वकिय ज्ञान । उद्योत केला असे जयान ।
तत्कथा कथितो पावन । करावे श्रवण जिन भाक्तिक ॥३॥
या भारत क्षेत्रा माजि सार । मान्यखेट असे नगर ।
रत्नादि वस्त्रामृत भांडार । यथा कुबेरनग्रापरि ॥४॥
तया नगराचा नृपाल । शुभतुंग नामे असे सबल ।
वैरि गण जिकोनि सकल । राज्य तुबल करितसे ॥५॥
त्या नृपाचा असे प्रधान । पुरुषोत्तम नामे करोन ।
असे जिन मार्गि प्रवीण । नित्यव्रत नेम पालिति ॥६॥
तत्भार्या असे पद्मावती । स्वरूपे जैसी कामरति ।
शील गुणे महासती । नित्य स्वामि भक्ति तत्पर ॥७॥
स्वकिय स्वामिचिय सग । नित्य नवनवे भोगिति भोग ।
स्वप्नि न दिसे इष्ट वियोग । पुण्य संजोग करोनिया ॥८॥

भ्रताराचे समागम । नित्य पालिति जिन धर्म ।
दान पूजा व्रत नेम । हेचि काम दिवस प्रति ॥९॥
भोग भोगिता पुण्य परिपाक । पुत्र जाहले सौख्यदायक ।
अकलंक आनि निष्कलक । आनदकारक भव्य जना ॥१०॥
दिनदिन प्रति करिति वृद्धि । कला गुण रूप विशेष बुद्धि ।
मातृ पिता पाहोनि हृदि । आनद वर्द्धि वाढति ॥११॥
पुत्र भार्या करोनि सहित । सौख्य भोगिति दिन रात ।
नित्य करिति स्वातम हित । पापवनाते छेदिति ॥१२॥
एकदा श्री जिन मंदीरासि । नदिस्वराष्टमीचे दिवसि ।
स्त्रीपुत्र सहित मनोल्हासि । जिन पदपकजासि वदिले ॥१३॥
तीन प्रदक्षणा फीरति । मुखे जय जय कार वदति ।
पढोनिया स्ववन स्तुति । करिति नुति पुनः पुनः ॥१४॥
मग पाहोनिया मुनीश्वर । पुत्रासहित येवोनि सत्वर ।
मस्तकि जोडोनिया कर । कृत नमस्कार गुरुपदि ॥१५॥
पुन्हा उभे राहोनिया । निज भालि पानि जोडोनिया ।
दिनाष्ट मर्यादा वदोनिया । शीलव्रत प्रीया सहित घेतले ॥१६॥
विनोदे करोनि प्रधान । वदत असे मुनिलागुण ।
स्वामि मद्‌वालकाहि कारण । द्यावे भवतारण शीलव्रत ॥१७॥
मुनि ऐकोनि वाक्य ऐसे । कुमराहि प्रति वदतसे ।
तुम्हा प्रतिहि शील व्रत असे । त्रिकर्णसरसे पालिजे ॥१८॥
मुनिवाक्य ऐकोनि कर्णि । कुमर हर्षिले निजमनि ।
मग निजमदिरि जावोनि । ब्रम्हचर्यीत -कर्णि धरिले ॥१९॥
मग कितिक दिन गेल्यावर । पठन योग्य पाहोनि कुमर
निजातरि करि विचार । म्हणे पठनावसर हाचि असे ॥२०॥

योग्यकालि रोपिता बीज । धान्य उद्भवति सहज ।
तथा बालपन असे वेकाज । विद्या सहज येत असे ।।२१।।
ऐसे चित्ति विचारून । जैनोपाध्यायातपाचरुण ।
पांहोनि उत्तम मुहूर्त दिन । केले अर्पन पुत्र त्यासि ।।२२।।
मग स्वहस्ते करोनि पडित । लेहोनि दिधले दोघाहित ।
ॐ नम सिद्धं स्वात्म–हित । हेचि जगात ऽ पूर्व मगल ।।२३।।
मग व्याकरण छंद अलंकार । तर्क साहित्य सिद्धांत सार ।
सिखते झाले बुध्यानुसार । मति प्रखर करोनिया ।।२४।।
एक पाठि अकलक असे । द्विपाठि निष्कलक भासे ।
कलागुण सिखोनि स्वल्प दिवसे । स्व आवासे आले त्वरे ।।२५।।
ऐसे पाहोनि माता पिता । फार हर्ष मानिति चित्ता ।
पुत्र यौवन पद दृश्यता । मानसिक चिंता उद्भवली ।।२६।।
पुत्र विवाहाकारण । साहित्य करिति प्रधान ।
ऐसे समारंभ पाहुन । पित्याला गुण वदताति ।।२७।।
अहो पिता आमचि उक्ति । श्रवण करावे एक चित्ति ।
हा आरंभ करिता किमर्थि । ते आम्हाप्रति निरूपिजे ।।२८।।
पुत्रवाक्य ऐकोनि श्रवणि । वदते झाले जनक जननि ।
बारे तुमचे विवाहालागोनि । हे कार्य आम्ही आरभिले ।।२९।।
पुत्र वदति पित्यासि । पुर्वि देवोनि ब्रह्मचर्यासि ।
साप्रत्य करिता विवाहासि । हे आश्चर्य आम्हासि थोर दिसे ।।३०।।
पुत्रोक्ति ऐकोनि प्रधान । पुन्हा वदे मोह वचन ।
ब्रह्मचर्य तुम्हालागुन । विनोदे करोन देवविले ।।३१।।
जनक वाक्य ऐकोनि ऐसे, । नि.शंकपणे भासत असे ।
जिन धर्मिकैचे विनोद हास्य । लज्जाहीन ऐसे का भासिता ।।३२।।

दृढवाक्य ऐकोनि श्रवणि । वदतसे पुत्रालागोनि ।
वारे शीलव्रत दिधले मुनि । मर्यादा करोनि दिनाष्टक ॥३३॥
पिता वाक्य आयकोनि सुत । वदते झाले वचनामृत ।
मुनिश्वर देता शीलव्रत । प्रमाण दिना सात केले नसे ॥३४॥
पुन्हा वदति पित्याप्रति । वाक्य आमचे धरावे चित्ति ।
यावज्जीव आम्हाप्रति । असे निवृत्ति विवाहाचि ॥३५॥
ऐसे वदोनिया कुमार । साडोनि संश्रुति व्यापार ।
नाना शास्त्रार्थ-विस्तार । निरतर क्रीडति ॥३६॥
जिनधर्मवसे ज्याचे मनि । तो विनोद वाक्य सत्य मानि ।
विस्मृति नपडे व्रति नेमि । स्वत्मकार्या लागुनि सावध असे ॥३७॥
सर्वशास्त्र करोनि पठन । विचार करिति दोघे जन ।
आता बौद्ध मताचे ज्ञान । सिखाया कारण इच्छा असे ॥३८॥
या मान्यखेट नगरात । कोन दिसे ज्ञानवंत ।
विचार करोनि दोघे भ्राता । देशातरात चालिले ॥३९॥
नगरग्रामी बौद्ध-शाला । पाहत पाहता एक वेला ।
धर्माचार्य ज्ञान प्रबला । पाहोनि स्थला गेले त्याचिया ॥४०॥
मूर्ख शिष्य होवोनिया । प्रवर्तले तत्सेवा कराया ।
बौद्ध मतातर जानाया । तत्ज्ञान घ्यावया कारने ॥४१॥
गुप्त राखोनि जैन वचन । कापटचरूपे पठति ज्ञान ।
बौद्धमत जानोनि सपूर्ण । जाहले प्रवीना बौधागमि ॥४२॥
मूर्खता दर्शविति बाहिर । अंतरि ज्ञानाचे भाडार ॥
बावनमातृका पढोनसार । झाले तयार स्वल्प दिवसे ॥४३॥
अकलंक पूर्वपुण्यास्तव । एकपाठि झाला सद्भाव ।
द्विपाठि असे निष्कलकदेव । जानितले सर्व बौद्धमत ॥४४॥

बौद्धगुरु वसे उर्ध्वस्थानि । नित्य शास्त्र चिंतिति मनि ।
अर्थ सहित दिन–रयनि । प्रीति करोनि नित्य प्रति ॥४५॥
ऐसे करिता एके दिवसि । बोधगुरु विचारि स्वमानसि ॥
जिनोक्त सप्तभंगि ग्रथासि । व्याख्यान अर्थासि विचारिति ॥४६॥
अर्थ सहित करिता व्याख्यान । एकेस्थली कूटत्वे करोन ।
शुद्ध स्पष्टार्थ नव्हे जान । संशयोत्पन्न निजातरि ॥४७॥
पुनः पुन्हा स्वकीय चित्ति । व्याख्यान अर्थ विचारिति ।
परंतु न लाभे प्रमाण युक्ति । संशय भ्राति फिटेचिना ॥४८॥
तदाव्यग्र चित्त होवोनि । व्याख्यान ठेविले गुडाळुनि ।
जाता झाला वहिर्भूमि । निर्जन स्थानि वनांतरि ॥४९॥
अकलंक पाहोनि स्थल रिक्त । उर्ध्वस्थानि जावोनि त्वरित ।
शुद्ध करोनि कूटाक्षरात । पुन्हा यथावत् ठेवोनि गेला ॥५०॥
मग येवोनि धर्म्माचार्य गुरु । करोनि स्नानादिक आचारू ।
मम वैसला होवोनिया स्थिरू । स्वमनि विचारू लागला ॥५१॥
वदे हा संशय मनातरी । उद्भविला तो कैसा होय दूरि ।
पुन्हा शास्त्र घेवोनि करि । व्याख्यान करि स्थीरचित्ते ॥५२॥
व्याख्यान करिता सत्वर । नूतन पाहोनि अक्षर ।
म्हने हा ग्रंथ क्लिष्ट थोर । असता सार कोने शोधिला ॥५३॥
अहो माझिया सभास्थानि । प्रवर्तला कोण्हि जैन ज्ञानि ।
राहिला असे गुप्त होवोनि । जानाव्या लागुनि मत आमुचे ॥५४॥
आमुचे वैरि असति जैन । विध्वंस करोनि मम दर्शन ।
प्रकाशिती जैन–धर्म । जैसे निशातमसूर्योदयी ॥५५॥
धरोनिया वौध वेस । धूर्तपणे ममाश्रमास ।
राहोनि करिति ज्ञानाभ्यास । मर्म भेदास जानावया ॥५६॥

तदा पाचारोनि शिष्यवर्ग । म्हने कोन जानेरे जैन मार्ग ।
सत्य वदे त्यासि देईन स्वर्ग । न तरि उपसर्ग थोर होईल ॥५७॥
एथे कोण असे जैनमति । ते सत्य वदावि वचनोक्ति ।
मम पायाचि तुम्हा प्रति । असे शपति तुम्हा लागि ॥५८॥
गुरु वाक्य ऐकोनि ऐसे । वदते झाले सर्वहि शिष्या ।
स्वामि येथे कोन्हि न दिसे । तव पायाचि असे शपथ ॥५९॥
तत्परीक्षा कराव्या सत्वरी । जिनबिंब ठेविले सभांतरी ।
शिष्यवर्गासि पाचारि । भाषण करि सर्वाहित ॥६०॥
पृथक् पृथक् सर्वे जन । हे प्रतिमा करावि उल्लंघन ।
जो मत्वाक्य न करि प्रमान । त्याचे मरण समीपाले ॥६१॥
गुरु वाक्य ऐकोनि ऐसे । उलंघन करिति सर्व शिष्ये ।
अकलक विचारि निजमानसे । आम्हा आले असे प्राण संकट ॥६२॥
निजयज्ञोपवीत काढिले । तद्बिंबावरि टाकिले ।
बोधलिंग बिंब करोनि भले । उल्लंघोनि गेले सत्वरि ॥६३॥
ऐसिया उपाय करोन । संकष्ट केले निवारण ।
धम्र्माचार्य म्हणे येथे जैन । निश्चय करोन असे खरा ॥६४॥
तदा कोन्हे एके दिवसि । विचारोनि स्व-मानसि ।
गौनि भरोनि कास भांड्रासि । तृतीय तलावासि ठेविले ॥६५॥
निशा मध्य दोन प्रहरि । शिष्य निद्रस्थ असता भारि ।
एक एकाचे सिरान्यातरि । सेवक चतुरि बैसविले ॥६६॥
तयासि केले निरूपण । या सर्वहि शिष्यामाजि जान ।
उठोनि वदे जो जिन जिन । त्यासि धरोन आना येथे ॥६७॥
ऐसे वदोनि त्वरित । भांड गौन लौटिलि चौकात ।
तत् शब्द उठला ग्रामात । यथा इद्युत्पात भूमंडळी ॥६८॥

निद्र–स्त शब्द ऐकोनि असा । उठोनि पळति दस–दिशा ।
कितियक वदति बोबड भाशा । भय–ग्रस्त पिशा–सारिखे ॥६९॥
तदा ते बंधू दोघे जन । एकाकि बैसले उठोन ।
मुखे वदति जिन जिन । नसे देहभान नेत्रि निद्रा ॥७०॥
जिन नाम ऐकोनि श्रुति । तत्क्षणि धरोनि दोघाप्रति ।
भृत्य घेवोनिया जाति । स्व–स्वामिप्रति निवेदिले ॥७१॥
सेवक वदति तयासि । स्वामि आज्ञा असे कैसि ।
तत्सिक्षा करू कुमराहिसि । स्वामि कार्यासि असो तत्पर ॥७२॥
सेवक वाक्य ऐकोनि सत्वर । म्हणे हे दुष्ट जैन कुमार ।
नेवोनि सप्ततलावर । ‘ठेवावे तस्कर मम ज्ञानाचे ॥७३॥
मग उगवला दिन मान । स्मशानांतरि नेऊन ।
मारावे हे दोघे जन । तुम्हासी मम आज्ञा ऐसे ॥७४॥
तत्वाक्य ऐकोनि सत्वरि । नेवोनि सप्तम भूमिवरि ।
स्थापोनि गेले स्व स्व घरि । करिति चाकरि अधम्मपणे ॥७५॥
उक्तंच वाणशणि मंत्री–स्तभी वादीच मौनजा ।
स्वामि–कार्यंन् कुर्वंति षडेति सेवकाधमा ॥७६॥
निःकलंक होवोनि भयभीत । वदे जेष्ट बाधवात ।
आपण येवोनि नृजन्मात । किंचिदात्म–हित नाहि केले ॥७७॥
अत्यत प्रयत्न करोन । ज्ञान रत्न केले उत्पन्न ।
तदु द्योतन केला आपण । वृथा मरण आले असे ॥७८॥
भयभीत पाहोनि बाधवासि । अकलक वदे तयासि ।
मृत्युचे भय काय धरिसि । जीवनोपायासि विचारिजे ॥७९॥
तत्क्षणि पूर्व पुण्योदये । आतुरला एक उपाये ।
हे छत्रिका होवोनि सहाये । करील कार्य सिद्धि त्वरे ॥८०॥

तत्छत्रिका घरोनि स्व स्व करि । झंपापात केला सत्वरि ।
तदा छत्रिका तारू धरि । जैसे अबरि गृद्धपक्षि ॥८१॥
मग धरातलि उतरोन । माध्यान रात्रि दोघे जन ।
वदनि वदोनि जिन नाम । केले गमन देशातरी ॥८२॥
तदानिशाचिय अति । बौध गुरू तो दुर्मति ।
कुमाराहित माराया प्रति । भृत्याहि प्रति आज्ञापिले ॥८३॥
तदाज्ञा घेवोनि लौकर । वेधिले सप्त तलावर ।
तेथे न दिसति कुमार । ते स्वामिसि सत्वर सागीतले ॥८४॥
तत्वाक्य करोनि श्रवण । म्हणे धावारे धावा सर्वे जन ।
ग्राम वाटिका मार्ग सोधुन । आनावे धरोन मम तस्कर ॥८५॥
मग भृत्य धावले दसदिसि । मोधिते झाले सर्व ठायासि ।
न सापडले पापिष्ठासि । दोन चार कोसि गवेसता ॥८६॥
नदा ते सर्वे फिरोनी आले । स्वामिप्रति वदु लागले ।
ग्रामिवनि पर्वति पाहिले । आम्हासि सापडले नाहि कोठे ॥८७॥
तदा वदे तो धर्माचार्य । अश्वावरि आरूढ व्हावे ।
शीघ्र जावोनि धरावे । छेदोनि टाकावे मस्तक ॥८८॥
तदा होवोनि तुरगारूढ । धावति एकमेकाचे पुढ ।
तत्च्चरण धूलि पाहोनि गाढ । निःकलंक अमूढ बंधुसि म्हणे ॥८९॥
दादा पश्य पश्य माघारि । धावुनि आले आपणावरि ।
निश्चय प्राण घेतिल वैरी । क्वचित बुद्धि विचारि प्राणरक्षनि ९०
तु ज्ञानि एक-पाठि असे । दर्शनोद्योत करिसि भर्वसे ।
यदर्थि स्वकिय प्राणरक्षे । मम मोह फासे न पडावे ॥९१॥
ममाशा सोडोनि सत्वरि । प्रवेसावे या सरोवरि ।
कमल पत्र धरावे सिरी । राहिजे स्थिरि घडी एक ॥९२॥

मार्गी जाता मज कारण । पाहोनि ते पापि दुर्जन ।
माघारे जातील मारून । मग त्वा निघोन जावे त्वरे ॥९३॥
वंधु वाक्य ऐकोनि ऐसे । अत्यत शोक करितसे ।
म्हणेरे प्राक्तना केले कैसे । दुःख डोहि कैसे मज लोटिले ॥९४॥
नि.कलंक म्हणेगा वाधव । तू एक असता चिरजीव ।
दुष्ट वौधाचा फेडसील ठाव । ममान्त–र्भाव पूर्ण होईल ॥९५॥
शोकाचा हा अवसर नव्हे । सरोवराचा करि आश्रय ।
कैसेपरि प्राण रक्षावे । जेन्हे मन कार्य सिद्धि होईल ॥९६॥
वधुवाक्य ऐकोनि सत्वरि । प्रवेश केला सरोवरी ।
पद्मपत्र धरोनि सीरि । तदाश्रय स्थिरिभूत राहिला ॥९७॥
चित्ति स्मरि वीजाक्षर । पंचगुरू नमस्कार ।
त्रैलोक्यामाजि असे सार । जगादाधार सौख्यदाई ॥९८॥
केवल पद्मपत्राश्रय । म्हणाल यत्ने धरिला आहे ।
हृद धरिले सद्गुरू पाय । तोचि आश्रय थोर असे ॥९९॥
उक्तंच न चक्रे केवलं तेन । शरण्य पद्मपत्रक ।
अनन्य–शरणीभूत । शासने च जिनेशिना ॥१००॥
मग पळतसे नि.कलंक । तदा पुसति मार्गस्थ लोक ।
कारे पळसि करीत शोक । कष्टकारक मुखातरि ॥१०१॥
कुमर वदे पथिकाकारण । लौकर पलावे सर्व जन ।
मागे लागिले वैरी जन । मनुष्य पाहुनि प्राण हरति ॥१०२॥
तत् शब्द ऐकोनि परिठ । दोघे होवोनि यकवट ।
मार्गि पलु लागले नीट । तदा पातले दुष्ट येवोनिया ॥१०३॥
पलता पाहोनि युग्मनर । वदति हेचि आपले चोर ।
मग धरोनिया सत्वर । छेदोनि शीर गेले त्वरा ॥१०४॥

निर्दयी नर जे असति । कैचि कारुण्य त्याहा प्रति ।
न कराचे ते करिती । न विचारिनति पाप पुण्य ॥१०५॥
उक्तं च । कि न कुर्वंति भो लोके । पापं ये पापपंडिता:
जैनधर्म विनिर्मुक्ता, मिथ्यात्व–विषदूषिता: ॥१०६॥
तदा अकलक स्वस्थ पाहुन । निघता झाला तेथुन ।
देशातरि केले गमन । असे ध्यान जिन पदि ॥१०७॥
उलंघिति ग्राम नगर । स्व–ज्ञान प्रकाशिति थोर ।
शिष्य मिळविले प्रचुर । पुण्य अपार करोनिया ॥१०८॥
शिष्य सहित चालता मार्गि । महामान्य पावे जगि ।
कलिंग देश पावला वेगि । मग आले ज्या जागी ते सागतो ॥१०९॥
त्याचि देशा माझारि । असे रत्नसचयपुरि ।
सोभे जैसि देवेन्द्र नगरि । हेमरत्न भाडारी पूर्ण भरिले ॥११०॥
त्या नगरावाहिर आम्रवनि । शिष्यवर्ग सहित येऊनि ।
मार्गखेद विश्रातालागुनि । योग्य स्थानि उतरिला ॥१११॥
तदा त्या नगरि वर्तले काय । ते सभाजन आइकावे ।
जेंन्हे महत्पुण्य होय । तेचि कार्य करावे त्वरा ॥११२॥
तेथे हिम शीतल भूपति । निष्कटक राज्य करिति ।
स्व प्रजा पुत्रवत्पालिति । भाडार भरति सुश्रुताचे ॥११३॥
मदन सुदरि तयाचि रानि । असे स्वरूप गुणाचि खानि ।
सोभत असे जैसि इंद्रानि । श्री जिनचरणि लुब्ध असे ॥११४॥
सदा जैन धर्म आचरि । प्रीति असे दान पूजावरि ।
व्रत नेमासि सदैव करि । सचय करि पुण्याचा ॥११५॥
एकदा जिनेश्वर भुवन । तिन्हे करविले नूतन ।
नित्य होति न्हवन पूजन । चाले प्रभावन जिनमार्गि ॥११६॥

ऐकदा फाल्गुण अष्टान्हिका । मदनावलि परम धार्मिका ।
तद्भाव उत्पन्न झाला निका । तो आइका भव्य जन ॥११७॥
रथयात्रा करावयासि । भाव उद्भवला मानसि ।
मेळवुनि चतु.सघासि । आरभ रथासि केला असे ॥११८॥
ऐसि वार्ता ऐकोनि । महज्ञान दर्प्पे करोनि ।
संघश्री बौध क्षोभला मनि । गेला तत्क्षणि राज–मदिरि ॥११९॥
तदा तो वंदक दुर्मति । वदता झाला नृपाप्रति ।
आम्हासि जिंकोनि वादार्थि । मग रथाप्रति चालविजे ॥१२०॥
तद्वाक्य करोनि श्रवण । नृप वदे रानिकारन ।
प्रिये आइकावे मद्वचन । तुज कारण सागितो ॥१२१॥
वोध्र दर्शन मेघडवर । विस्तारिले पृथवीवर ।
जेन्हे जिनदर्शन दिवाकर । झाकोनि अंधार पाडिला ॥१२२॥
साप्रत्य आपुले जिन शासनि । कोन्हि ज्ञानवान दिसे मुनि ।
बौद्ध मतासि उच्चाटुनि । रथालागुनि चालावे ॥१२३॥
जिनदर्शन करोनि समर्थ । मग त्वा चालवावे रथ ।
जेन्हे पुरती मनोरथ । होईल कीर्त जगामाजि ॥१२४॥
ऐकोनि रायाचे वचन । रानीचे दुखविले मन ।
म्हने धर्म्मासि आले विघ्न । कैसे निवारण होईल ॥१२५॥
उद्विग्न होवोनि निजातरि । शीघ्र जावोनि जिनमदिरि ।
मस्तक ठेवोनि पृथ्वीवरि । वदना करि जिनपदि ॥१२६॥
तदा देखिला मुनीश्वर । तत्पाद केला नमस्कार ।
म्हने हो स्वामि ज्ञानभाडार । करि पूर्ण सत्वर मन्मनोरथ ॥१२७॥
स्वज्ञाने जिंकोनि वंदकासि । त्वरे चालवावे रथासि ।
उद्योत होइल जिनमार्गासि । भव्यजनासि सौख्य होइल ॥१२८॥

मुनि म्हणे मी नवदीक्षित । न जाने मी क्वचित् ज्ञानात ।
परंतु असति साप्रत । ते तव हेतु पूर्ण करतील ॥१२९॥
मान्याखेट ग्रामातरि । पडित असति थोर थोरि ।
बौधमत मातंगकेशरि । परतु दूरि राहिले ॥१३०॥
तदा राज्ञि म्हणे हो स्वामि । सर्प बैसलासे सिरुनि ।
धन्वंतरि असे शतयोजनी । तो कौन कामि येतसे ॥१३१॥
तदा प्रतिज्ञा करितसे । रथयात्रा मम नेत्रि दिसे ।
अन्नपान करू तद्दिवसे । न तरि असे मज निवृत्ति ॥१३२॥
ऐसी वदोनि मदनावलि । उभी राहोनि एकातस्थलि ।
कर जोडोनि हृदयकमलि । जिनपत्कमलि ध्यान लाविले ॥१३३॥
निश्चल करोनि शरीर । चित्र लाविले जिनाघ्रिवर ।
जपतसे पचनमस्कार । यथा मुनीश्वर वनातरि ॥१३४॥
तदा दो प्रहरा निशातरि । थोर साहस जानोनि अतरि ।
भक्तवत्सला चक्रेश्वरि । आली सत्वरी धावोनिया ॥१३५॥
वदत असे राज्ञीप्रति । त्वा भय न धरावे चित्ति ।
आज निशाचिय अति । पूर्ण होति त्वन्मनोरथ ॥१३६॥
प्रातःक्कालि आम्रवनि । अकलंक नामे महा ज्ञानी ।
शिष्यवर्ग सहित येउनि । श्रात स्थानि राहिल ॥१३७॥
तो संघश्रीचे दर्प्पपर्वत । चूर्ण करोनि क्षणात ।
जिनधर्माचा करोनि उद्योत । तव मनोरथ पूर्ण करील ॥१३८॥
ऐसि वदोनिया देवि । जाति झाली निज ठाइ ।
जिनभक्ताचे धावन्या धावी । सदासेवी जिनपकज ॥१३९॥
देविवाक्य ऐकोनि राज्ञी । थोर आनद पावलि मनि ।
वदना करोनि जिनचरणी । करि तत्क्षणी महास्तुति ॥१४०॥

मग यवोनि स्वगृहात । रायासी जानविलि मात ।
न्हवन पूजा उतसव सहित । केलि त्वरित जिनमंदिरि ॥१४१॥
मग पाचारोनि चतुर नर । राज्ञि वादोनि गूढातर ।
अष्टदिशि धाडिले सत्वर । ज्ञानवत नर पाहावया ॥१४२॥
तितुक्या माजि सेवक । पूर्व दिशा गेला असे येक ।
तेन्ही अम्रवनी अकलक । ज्ञाननायक पाहिला ॥१४३॥
अशोक वृक्षाध वैसलासे । सेवाभक्ति करिति सिष्य ।
अकलक देव नाम असे । प्रतापे जैसे दिवाकर ॥१४४॥
ऐसे पाहोनि सेवकाने । पुसिले एक्या शिष्याकारने ।
याहाचे ग्रामनाम सांगने । मजकारने मित्रराया ॥१४५॥
मग सदेशा घेवोनि बरा । राज्ञी सन्निध यवोनि त्वरा ।
पाहला व्रतात कथिला सारा । यथा रामचद्रा मारुति ॥१४६॥
सेवक वाक्य ऐकोनि राज्ञि । सर्वसघ सवे घेउनि ।
महदाडवरे करोनि । तदाम्रवनि गेला त्वरे ॥१४७॥
पाहोनिया अकलंक देव । वदना केलि भक्तिभाव ।
अतिआनंद पावला जीव । पद्मिनि इव सूर्योदइ ॥१४८॥
यथा पाहोनि मेघडबर । नृत्य करिति मयूर ।
चातक जैसे वर्षता नीर । आनंद थोर मानीतसे ॥१४९॥
उक्तच तस्य सदर्शनात् तुष्टा । सा सती शुद्धमानसा ।
पद्मिनीवरवेर्मेघा मुनेर्वा तत्वदर्शनात् ॥१५०॥
तदा तद्भक्ति पाहुन । अकलंक देव वदे वचन ।
देविश्रीसघ मिळोन । आनंद क्षेम कुशल असा ॥१५१॥
तद्वावय ऐकोनि ऐसे । राज्ञि रुदन करितसे ।
स्वामी अपमाना सरिसे । दु.ख नसे त्रिभुवनि ॥१५२॥

ऐसे असता कैचे कुशल । चतुसंघ मिळोनि सकल ।
दुःखपीडित असो प्रबल । चित्त व्याकुल फार असे ॥१५३॥
राज्ञीचे वाक्य ऐकून । पुसे अपमानाचे कारन ।
जे संघश्री पासून । केले निवेदन ते सत्वरि ॥१५४॥
अकलंक देव ऐकोनि ऐसे । क्रोधे करोनि वदत असे ।
शून्य गृह पाहोनि जैसे । श्वान प्रवेसे स्वेच्छाचारे ॥१५५॥
हा संघश्री वंदक आज । क्षणामाजि जिंकीन सहज ।
विद्या गर्व करी बेकाज । साडोनि लाज जगातरि ॥१५६॥
त्या संघश्रो वंदकाकारने । मम पत्रिका घेवोनि जाने ।
स्वदर्प्पं टाकोनि पत्रदर्शने । रथोत्सवा कारने आज्ञा देइल ॥१५७॥
ऐसे वाक्य वदोनि त्वरित । राज्ञिचे शात केले चित्त ।
आश्वासन देवोनि संघसहित । पाठविले तीस निजमदिरि॥१५८॥
मग सर्वश्रीसघ मिळोनि । गीत वाद्योत्सव करोनि ।
अकलक देवा लागुनि । आले घेऊनि जिनमंदिरी ॥१५९॥
मग राज्ञिने सेवकाहाति । पत्र पाठविले सघश्री प्रति ।
क्रोधे खवळोनि तो दुर्मति । टाकिले पत्राप्रति फाडोनिया ॥१६०॥
ज्ञानदर्प्पे वदे दूताकारने । त्वा तयासि जावोनि सागने ।
शीघ्र यावे वादस्थाने । आम्हा दाखवे ज्ञान तुझे ॥१६१॥
तद्‌वाक्य ऐकोनि त्वरे । दूत येवोनि माघारे ।
तत्कथित वाक्य सारे । नृपासि त्वरे निवेदिले ॥१६२॥
तदा हिमशीतल भूपतिने । अकलक देवाकारने ।
महदाडंवरे वैसवोनि याने । स्वसभास्थाने आनिले ॥१६३॥
मग श्रीसघ यवोनि तैथ । परस्पर पुसति श्लोकार्थ ।
वाग्डंवरे वदति व्यर्थ । मार्ग सत्यार्थ न जानति ॥१६४॥

वाद करिता तद्दिवसि । असमर्थ जानोनि आपनासि ।
भयभीत होवोनि मानसि । सिघ्र वादासि विसर्जिले ॥१६५॥
जावोनिया निजोपासरि । पत्र पाठवोनि देशावरि ।
जे ज्ञानि होते थोर थोरि । ते आले सत्वरि धावोनिया ॥१६६॥
मग वादस्थानि येवोनि त्वरित । शुद्ध तपने वाद करित ।
अकलक देवाने क्षणात । सर्व वोधात जिंकिले ॥१६७॥
सघश्री वदे राया कारन । आज द्वादशीचा दिन ।
आम्ही सोडोनि आलो पारन । म्हनोनि ज्ञान आच्छादिले ॥१६८॥
आता उदइक प्रात काली । येवोनिया वादस्थलि ।
वादे जिंकु हा ज्ञानवलि । जेन्हे धरातलि कीर्ति होय ॥१६९॥
मग जावोनिया निजस्थानि । वदति येकमेका लागुनि ।
अहो या सरिसे न पुरो आम्ही । हा थोर ज्ञानी दिसे जगि ॥१७०॥
वाद कराया वोध सकल । होते झाले निर्वल ।
जैनधर्म असता निर्मल । तयासि काजल कोन लावि ॥१७१॥
पूर्वसाधित तारादेवता । सघश्री आराधिलि त्वरिता ।
म्हने सकटी धाव माता । निजभक्तचिंता फेडावया ॥१७२॥
उदइक वाद करायासि । ज्ञान नसे आम्हापासि ।
त्वदाश्रय वौधमार्गासि । भक्तजनासि साह्यकरि ॥१७३॥
जैसे सैन्यासि कोटि भट । जिकोनि घेति येकवट ।
तैसा दिसे हा ज्ञानसुभट । आम्ही जैसे मर्कट यापुढे ॥१७४॥
तद्वाक्य ऐकोनि श्रवनि । वदे संघश्री लागुनि ।
वादस्थलि अत पट वाधोनि । मध्य घट ठेवोनि आराधि मज १७५
घटपूजा करोनि भावे । मज त्यामाजि अवतारावे ।
मग त्या जैन पंडिता सर्वे । वादे जिंकावे सहजचि ॥१७६॥

अगा संघश्रीय भक्ता । तुवा न करावी क्वचिच्चिंता ।
मजसवे वाद करिता । नसे कोन्हि ज्ञाता धरातलि ॥१७७॥
एकोनि देवतावचन । पच उष कालि उठोन ।
राजमदिरि जाऊन । नृपाकारन वदतवे ॥१७८॥
राया मद्वाक्य आइक । त्यासवे वाद करीन मुख ।
परतु कौनाचे न पाहावे मुख । ऐसी भीख द्यावी मज ॥१७९॥
ऐसे पुसोनि नृपात । अंत पट बाधोनि त्वरित ।
सघश्री बैसोनिया आत । देवि कुंभात अवतारिलि ॥१८०॥
कपटि जनजनामधि । विच्छिति स्वकिय कार्यसिद्धि ।
शतमूर्खासि ज्ञानवृद्धि । कैंचि नवनिधि पापिष्टगृहि ॥१८१॥
तदा अकलक देवा कारन । रायाने पाठवोनि यान ।
वादस्थानी आले घेऊन । श्रीसघ मिळून जैनधर्मि ॥१८२॥
तदा देवि वदे क्षणोपन्यास । स्वमत करी प्रकास ।
अकलंक स्वज्ञान प्रकाश । टाकि तत् न्यास खडोनिया ॥१८३॥
पुन. पुन॰ स्वपक्षपात । देवि स्थापे एकातमत ।
अनेकातमते करोनि त्यात । टाकिती त्वरित उच्चाटुनि ॥१८४॥
देवि स्वमत समर्थ करि । ते स्वज्ञाने करोनि थोरी ।
क्षणामाजि निसिद्ध करि । निशाधकारि भानू यथा ॥१८५॥
ऐसा वाद दोघे जन । षड्मासपर्यन्त केला जान ।
तदाकलंक देवाचे मन । चिंता करोन ग्रस्त झाले ॥१८६॥
म्हने हा संघश्री मजपुढे । किमात्र असे वापुडे ।
षण्मास वाद केले गाढे । हे महत्साकडे मज दिसे ॥१८७॥
ऐसि चिंता स्वमानसि । अकलक देव करिता निसि ।
तत्चिंता दूर करायासि । चक्रेश्वरि त्यासि वदे येऊनि ॥१८८॥

अहो अकलंक तत्त्वज्ञानी । मद्वाक्य ऐकावे श्रवणि ।
तुजसी वाद कराया ज्ञानि । त्रिलोकि कोन्हि दिसेचि ना ॥१८९॥
परतु तुजसि वहिला । आजपर्यंत वाद झाला ।
तो गुप्त तारादेविने केला । ते मी आली तुज सागावया ॥१९०॥
त्वा आइकावे मम वचन । जैत वादि होसिल जेंन्हे ।
प्रात:कालि श्रीसघ मिळोल । वैसावे जाऊन वादस्थलि ॥१९१॥
मग देविवाद करिता तुजसि । त्वा वदावे तारादेविसि ।
जे त्यास कथिले पूर्वदिवसि । ते आज सभेसि वद त्वरे ॥१९२॥
ऐसे पुसता तिजकारने । तदा ते धरोनि राहिल मौन्य ।
मानभंग होइल तत्क्षणे । जाइल स्वस्थाने पळोनिया ॥१९३॥
ऐसे वदोनि चक्रेश्वरी । जाती झालि निजमदिरि ।
जिनशासन रक्षण करि । संकट निवारि जिनभक्ताचे ॥१९४॥
ऐकोनि देविचे उत्तर । अकलक निजासरि थोर ।
हरूष पावला निर्भर । जैसा चकोर चंद्रोदइ ॥१९५॥
मग प्रात.कालि उठोनि । जिनवदना करोनि ।
सर्व श्रीसंघ मिळोनि । वादस्थानि गेला त्वरे ॥१९६॥
मग सभामाजि प्रगट । वदे अकलक सुभट ।
आज वाद जिकीन नीट । तदा सुण्ट करू भोजन ॥१९७॥
पाहोनिया तत्साहस । देवि वदे उपन्यास ।
अहवृत्ति आनोनि चित्तास । म्हने मी यास जिकीन ॥१९८॥
मग वदतसे देविप्रति । कैसि असे पूर्व उक्ति ।
ते वदावे मजप्रति । विचार चित्ति करोनिया ॥१९९॥
तद्वाक्य ऐकोनि देवता । कुठित झाली वाक्य वदता ।
मानभंग झाला त्वरिता । सूर्योदय होता यथा निशा ॥२००॥

देवि वदे नित्य नूतन । न जाने पूर्विचे भाषण ।
जैसे शोनिता प्रवाह जान । माघे फिरोन जायेचि ना ॥२०१॥
तदा तो जैनपडित भला । महाक्रोधे खवळला ।
अंत:पट फाडोनि टाकिला । घट फोडिला पदघाते ॥२०२॥
मानभंग पावोनि सूरि । पळोनिया गेलि दूरि ।
बौध अपमान पावोनि थोरि । देशातरि गेले त्वरा ॥२०३॥
तदा मदनसुदरी राज्ञी । थोर हर्ष पावलि मनि ।
अकलंक देवाचे चरणि । केला उठोनि नमस्कार ॥२०४॥
मग करिति झालि स्तवन । म्हणे तू धन्य पुण्यपावन ।
मिथ्यामत विध्वसून । जिनशासन रक्षिले ॥२०५॥
स्वामि आता त्वा त्वरित । पूर्ण करावा मन्मन हेत ।
त्वा आपुले निजहस्त । करावा रथमहोत्सव ॥२०६॥
राज्ञिवाक्य ऐकोनि कर्णि । अकलंक वदे मेघगर्जनि ।
अहो संघश्री अभिमानी । प्रथमान्हि म्या जिंकिला ॥२०७॥
हे बोध मिळोनिया सर्वे । देवि स्थापोनि कपटभावे ।
वाद करविला मजसवे । यासि का म्हणात्रे महाज्ञानी ॥२०८॥
चंद्रा आड येता मेघपटल । खद्योत मिळोनि सकल ।
स्वतेज दाखवोनि प्रबल । निशातम तुबळ का नासिति ॥२०९॥
ऐक हे हे मदन मुदरि । चित्ति बोधाचे भय न धरि ।
श्रीसघ मिळवोनि सत्वरि । रथोत्सव करि महदानदे ॥२१०॥
म्या वादे जिंकिले वौधात । प्रगट कराया जिनमत ।
स्वज्ञानाचा कराया उद्योत । अहंकार चित्तात क्वचिन्नसे ॥२११॥
म्या संघश्री वंदकासवे । वाद न केला द्वेशभावे ।
जिनभाक्तिकासि सौख्य व्हावे । या कारुनाभावे जानिजे ॥२१२॥

उक्तंच । नाऽहंकारवशीकृतेन मनसा न द्वेषिना केवलम् ।
नैरात्म्यं प्रतिपद्य नश्यति जन कारुण्यबुध्या मया ।
राज्ञ श्री हिमशीतलस्य सदसि प्रायो विदग्धात्मनो ।
बौद्धोधान् सकलान् विजित्य सुगत. पादेन विस्फालित ॥२१३॥
त्या हिमशीतल भूपतीन । ऐकोनिया तद्वचन ।
सर्व बौध देशातून । दिधले काढून सत्वरे ॥२१४॥
नृपसर्वजन सहित । साडोनिया मिथ्यामत ।
जिनमार्गि झाले रत । शुद्ध सम्यक्त्व आदरिले ॥२१५॥
अकलंक देवाचा बहुमान्य । करोनि पूजिला वस्त्रभूषने ।
ज्याचे उदय असे पूर्व पुण्य । तो जगी मान्य का न पाने ॥२१६॥
उक्तंच । पूजयति स्म तं पूतमकलक बुधोत्तमं ।
श्रीमज्जिनेंद्र सज्ञान प्रभावात् के न पूजिता ॥२१७॥
मग त्या भूपतिने सार । पाचारोनि कारागिर ।
रथ करावयासि तयार । आज्ञा सत्वर दीधलि ॥२१८॥
कारागिर मिळोनि बहुत्त । तयार करिते झाले रथ ।
पचवर्ण चित्रचित्रित । कुशलता बहुत करोनिया ॥२१९॥
स्वर्णरत्नानि पटकुला । लावोनि केल्या पट्टशाला ।
लाववील्या मुक्ताफलमाला । दिसति सुढाला अमोलिक ॥२२०॥
स्वर्ण कलस वर झलकति । गगनी ध्वजा लहकति ।
तयाची सोभा वर्णावी किति । अत्यत दिसति मनोहर ॥२२१॥
चतुर्दिशि वाधोनि घटे । झल्लरि आणि जेगटे ।
वाजविता येकवटे । नाद उमटे अंबरि ॥२२२॥
द्रव्य खर्चोनिया फार । शीघ्र रथ केला तयार ।
जनमनासि हर्ष थोर । रचना थोर रचियलि ॥२२३॥

सप्तखने करोनि सहित । दिसते महाउन्नत ।
जैसा स्वर्णाचलपर्वत । पाहाता नेत्र तृप्त न पावति ।।२२४।।

अंतिम खनावरि जान । सोभति तीन सिंहासन ।
स्वर्णरत्नकृत निर्मान । वरि श्री जिनबिंब स्थापिले ।।२२५।।

छत्नत्रय मनोहर । जैसे चंद्रसूर्याकार ।
जिनमस्तकि सोभति सार । उद्योत फार दशदिसि ।।२२६।।

सिंधुवेला सम उद्धल । ढळति चामर निर्म्मल ।
पुढे सोभति अष्टमंगल । कोलाहल जयशब्द ।।२२७।।

श्राविका आनि श्रावक । अर्जिका आनि मुनिनायक ।
चतुर्विध सघ महद्धार्मिक । मिळाले भाविक भव्यजन ।।२२८।।
रथासि यौजिले कुजर । पुढे वाजंत्र्याचा गजर ।
भेरि नौबदि वाजति फार । नाना प्रकार वाद्य वाजति ।।२२९।।
वाजति ताल मृदग वीणे । गुनिजन करिति गायने ।
हरुप धरोनि निजमने । उत्तम पुण्य प्राप्त व्हाया ।।२३०।।
वरिल खनावरि पावन । बैसले असति मुनिजन ।।
साहावे खनि अजिका जान । श्राविका मिळोन बैसल्या ।।२३१।।
पचम स्थानि शुद्धश्रावक । चतुर्थ स्थानि नर्तकी भाविक ।
तृतीय स्थलि हर्षदायक । गाति गायक गायने ।।२३२।।
द्वितीय आनि प्रथम खनि । नाना चित्र पचवर्णि ।
चित्नशाला पाहाता नयनि । स्वात कर्णि हर्ष पावति ।।२३३।।
मग मिळोनिया भव्यवृद । थोर करिति जै जै शब्द ।
हृदइ वाढे आनदकद । तदा मद मद चालिला रथ ।।२३४।।
वाद्याचा होतसे गजर । नादे गर्जतसे अवर ।
तत्शब्द आइकोनि मयूर । नृत्य मनोहर करिति वनि ।।२३५।।

धननन वाजविति घंटे । झणझण वाजति जेगटे ।
वाद्य वाजति येकवटे । नाद उमटे दशदिशि ॥२३६॥
तालमृदगाचे गजरि । थै थै नाचति किन्नरि ।
जै जै शब्दकृत नरनारी । स्वर्णाचलाकारी चाले रथ ॥२३७॥
नाना प्रकारे महोत्सव । करिति भव्य जनमानव ।
हृदइ धरोनि थोर भाव । दाविति प्रभाव जिनधर्माचा ॥२३८॥
थोर महोत्सव करित । सर्वत्र फिरविति रथ ।
हरुष न मावे हृदयात । स्वमनोरथ पूर्ण करिति ॥२३९॥
रथोत्सवाची थोर महिमा । एके रसने वर्णवेना ।
कृत प्राग्भवि पाप नाना । तद्दर्शना पळोनि जाति ॥२४०॥
उक्तच । वर्ण्यंते स रथकेन यस्य दर्शनमात्रत ।
अनेक जन्मकृत पाप तत्सर्वं नाशमेस्यति ॥२४१॥
राज्ञीने थोर धरोनि भाव । थोर केला रथोत्सव ।
संसारसागरि धर्म नाव । भव्यजीव तरावया ॥२४२॥
नंतर चतु सघाप्रति । आदरे दानमान देति ।
वस्त्राभरणे देवोनि प्रीति । विदा करिति यथायोग्य ॥२४३॥
मग अकलंक स्वामी कारणे । बहुत प्रकारे करोनि मान्य ।
म्हने स्वामि तू जगी धन्य । स्वकीय ज्ञाने जिंकिले रिपु ॥२४४॥
मम मनाचे मनोरथ । त्वा पुरविले त्वरित ।
तू जगद्बंधु करुणानाथ । तारिले जनात धर्महस्ते ॥ २४५॥
ऐसी स्तुति करोनि राज्ञि । बहुप्रकारे मान्य देऊनि ।
वस्त्राभूषणे करोनि । भक्तिभावे करोनि पूजिला ॥ २४६॥
अकलक स्वामिने जनात । करोनि स्वज्ञान उद्योत ।
मग होवोनि दीक्षित । स्वात्महित साधिले ॥२४७॥

ऐसे जानोनि भव्यजन । श्रावक लोकाहि कारण ।
प्रकास करोनि तत्वज्ञान । जिनशासन रक्षावे ॥२४८॥

उक्तंच । यथाकलकदेवो सोचक्रे ज्ञानप्रभावनां ।
अन्येनापि सुभव्येन कर्तव्या सा सुखप्रदा ॥२४९॥

**इति आराधना कथाकोशं ग्रंथे अकलंकदेवज्ञानोद्योतन कथा समाप्ता प्रसंग दुसरा।**
**इति चतुर्थ आराधनाकथाकोषे रत्नकीर्ति विरचिते स्वहस्तेन लिखित्वा ।**



# प्रसंग तिसरा

## सनत्कुमार चक्रवर्ति कथा

या त्रैलोक्यामाजि सार । पंच परमेष्टि गुरु थोर ।
तत्पदि मम नमस्कार । कृतकार्याधार तेचि मज ॥१॥
सनत्कुमार चक्रवर्ति । प्रख्यात झाला त्रिजगति ।
चारित्र उद्योत करोनि क्षिति । पचमगति साधिलि ॥२॥
तच्चरित्र पुण्यपावन । करितो मी निरूपन ।
श्रवन करावे भव्यजन । सौख्याचे कारण भवि भवि ॥३॥
या भरतक्षेत्रा माझारी । वीतसोका असे नगरि ।
तत्सोभा काय वर्णु थोरि । जैसि इंद्रपुरि दुजी जाना ॥४॥
त्या पुण्यपावननग्राप्रति । अनतवीर्य नामे असे भूपति ।
स्वप्रतापे राज्य करिति । प्रजा पालिति नीतिमार्गे ॥५॥
त्या भूपतिचि रानि । ऐसे सीता नामे करोनि ।
स्वरूपे जिंकिलि पद्मिनि । सर्वगुणि पतिव्रता ॥६॥
स्वस्वामिचिय सग । भोगिति मनोवाछित भोग ।
पूर्वपुण्याचा दिसे सजोग । श्रीजिनमार्ग चालविति ॥७॥
कवने येकियदिवसि । निद्रस्थ असता पश्चिमनिसि ।
सुस्वप्न पाहिले सौख्यरासि । आनंद मनासि थोर झाला ॥८॥

मग उठोनि प्रातःकालि । जावोनिया सभास्थलि ।
स्वप्नफल पुसे स्वामिजवळि । हृदयकमलि धरोनि हर्ष ॥९॥
तदा राज्ञिसहित भूपति । वनी जावोनि वंदिला यति ।
कर जोडोनि मुनिप्रति । पुसि युक्ति स्वप्नफल ॥१०॥
मुनिस्वर म्हणे गा भूपाल । ऐक सुखस्वप्नाचे फल ।
पुत्र होइल पुण्यप्रबल । षट्खडमडल साधिल ॥११॥
जिकोनि सर्वे शत्रुगण । चक्रवर्तिपद भोगून ।
चारित्रसहित तप साधून । मोक्षाकारण जाइल ॥१२॥
मुनिवाक्य ऐकोनि दपति । थोर हर्ष मानला चित्ति ।
पुन्हा वदोनि महायति । स्वस्थानाप्रति पावले ॥१३॥
तदा त्या राज्ञिचे उदरि । स्वर्गजीव येवोनि सत्वरि ।
गर्भ धरिला शुभवासरि । पुण्य थोरि पुर्वार्ज्जित ॥१४॥
गर्भ वाढे दिवसदिवसि । डोहळे उद्भवले राज्ञिसी ।
नृप आनद मानि मानसि । तन्मनोरथासि पूर्विति ॥१५॥
मग नवमास होताचि पूर्ण । सुदिनि नक्षत्र योगकर्ण ।
राज्ञी प्रसवलि नदन । जैसा भान पूर्वदिशा ॥१६॥
मग पुत्रजन्म महोत्सव । आनदे करिता झाला राव ।
गर्भस्थ जानोनि स्वर्गजीव । सनत्कुमार नाव ठेविले ॥१७॥
जव जव वाल करे वृद्धि । तव तव वाढे विवेकबुद्धि ।
क्रिडा करिति मदिरामधि । निजछदि सर्वकाल ॥१८॥
वाललीला पाहोनि नयनि । जनक आनि जननि ।
थोर आनंद मानिति मनि । घेति हिरोनि सर्वांचि मन ॥१९॥
अनुक्रमे करोनि कुमर । यौवनपद पावला थोर ।
ऐसे पाहोनि नरेश्वर । स्वराज्यभार त्यासि दिधला ॥२०॥

त्वरे जावोनि वनासि । दीक्षा घेवोनि मुनिपासि ।
उग्रोग्र करोनि तपासि । सिद्धपदासि साधले ॥२१॥
पितृराज्यपालिता जान । पूर्वपुण्योदय करोन ।।
प्राप्त झाले चक्ररत्न । आदि करोन चतुर्दश ॥२२॥
पद पावोनि चक्रवर्ति । साधोनिया पट्खंड क्षिति ।
उत्कृष्ट पावोनि सपत्ति । स्वनग्राप्रति पावला ॥२३॥
पूर्वपुण्य उदयागत । नवनिधि करोनि सहित ।
चतुर्दशरत्न अभुत्प्राप्त । मनोवाछित फल देति ॥२४॥
चौन्याशी लक्ष गयवर । महोन्नत पर्वताकार ।
स्वर्णरत्नजडित पाखर । अतिसुदर सोभति ॥२५॥
अष्टादश कोटि तुरगम । वायुवच्चचल जान ।
शृगारिले रत्नभूषण । जैसे श्यामकर्ण इद्राचे ।।२६॥
चौन्याशी लक्ष शोभति रथ । नानाप्रकारे सोभान्वित ।
पुर्विति मनाचे मनोरथ । जैसे स्वर्गाति इद्रसौध ॥२७॥
चतुराशीति कोडा पायदळ । भयकर जैसे महाकाळ ।
शस्त्रपानि युधि सबळ । करिति निर्मूल शत्रुसैन्य ।।२८॥
शाहान्नउ कोटि प्रमाण । धान्यभरित असति ग्राम ।
सकल सपदाचे व्याख्यान । ग्रथाकारण वृद्धि होय ॥२९॥
शाणौसहस्र अत पुर । मदिरि सोभति मनोहर ।
देवागणासि आनिलि हार । चक्रधर आज्ञांकित ।।३०।।
द्वात्रिसत्सहस्रम्लेच्छभूप । तत्पदसेविति आपरूप ।
आज्ञा पालिति रहितकोप । चक्रि प्रताप थोर दिसे ।।३१॥
बत्तीसहजार भूगोचरि । आज्ञा वाहति मस्तकावरि ।
सेवा करिति निरंतरि । पुण्य पदरि थोर असे ।।३२॥

बत्तीस सहस्र विद्याधर । नृप सेविति चक्रधर ।
कीर्ति व्यापिलि पृथ्वीवर । पुण्य थोर पूर्वकृत ।।३३।।
नानाविधसंपदासहित । चक्रवर्ति राज्य करित ।
जिनधर्ममार्गि असे रत । स्वप्रजा पालित न्यायमार्गें ।।३४।।
प्रागभवपुण्य करोन । सर्व वल्लभास हित जान ।
भोग भोगिति नित्य नूतन । सवत्सरात क्षणतुल्य मानिति ।।३५।।
कवने येकिय दिवसि । सौधर्म्मेंद्र स्वकिय सदसि ।
बैसला असे मनोल्लासि । धर्म्मचर्चासी करितसे ।।३६।।
मध्यलोकामाजि सार । धर्म्मवत वसति नर ।
स्वरूपगुणाचे भांडार । सौख्यप्रचुर भोगिति ।।३७।।
इंद्र स्वमुखे करोन । विशेस करि स्वरूपवर्णन ।
तदा यक देव करी प्रश्न । देवा या प्रमाण कोन्ही असे ।।३८।।
इंद्र ऐकोनिया सुरोक्ति । म्हने सनत्कुमार चक्रवर्ति ।
तस्माद्दधिक रूप असति । पश्यताक्ष तृप्ति न पावति ।।३९।।
रत्नचूलमणिमालि सुर । देवेंद्रवाक्य ऐकोनि सार ।
चक्रवर्तिचे रूप सुदर । पाहावया सत्वर पावले ।।४०।।
गुप्त राहोनिया गगनि । रहित वस्त्राभूषणाहूनि ।
चक्रवर्तिमज्जनस्थानि । स्वरूप नयनि पाहिले ।।४१।।
परस्पर वदति वाचे । वस्त्रभूषणाविन साचे ।
अद्भुतरूप दिसे याचे । नसे इद्राचे रूप ऐसे ।।४२।।
महदाश्चर्य मानोनि चित्ति । त्वरे उतरोनिया क्षिति ।
वदति द्वारपालाप्रति । निवेदन भूपतिलागि करी ।।४३।।
त्वत्स्वरूप पाहाव्याकारण । मुरयुग्म आले स्वर्गाहून ।
त्वा सांगावे तयासि जाऊन । तदाज्ञा घेऊन यावे त्वरे ।।४४।।

ऐसे ऐकोनि द्वारपाल । जावोनि विनविला भूपाल ।
सुरोक्त निवेदन केले सकल । तयासि तत्काल वदे नृपति ॥४५॥
तू सांग जावोनि त्याहाप्रति । क्षण येक करोनि विश्राति ।
मग यावे सभेप्रति । मद्रूपसंपति पाहावया ॥४६॥
ऐसे वदोनि चक्रेश्वर । शरीरि करोनि अलंकार ।
वैसोनि हरिविष्टरावर । मग ते निर्जर पाचारिले ॥४७॥
तदा ते यवोन सभास्थानि । तत्स्वरूप पाहोनि नयनि ।
मस्तक हालविति तत्क्षणि । क्षोभ अंत·कर्णि पावले ॥४८॥
मग येकमेकासि वदति । पाहा हो या कर्म्माची गति ।
जैसे पाहिले गुप्तवृत्ति । तैसे न दिसति सांप्रत ॥४९॥
अहो करिता वेळे स्नान । शरीरि नसता आभूषण ।
अद्भुतरूप पाहिले आपन । त्या प्रमाण आता नसे ॥ ५०॥
याप्रमाणे संसारात । सर्वहि दिसे अशाश्वत ।
प्राणिजन होवोनि मोहित । स्वात्महित न करिति ॥५१॥
ऐसे ऐकोनि सभाजन । बघू लागले त्याहा कारण ॥
अहो हो पूर्वस्वरूपाहून । किंचिन्नून दिसेचि ना ॥५२॥
तदा त्या नरेस्वरासि । अतरि प्रतीति यावयासि ।
पूर्ण जल भरोनि कुभासी । नृप सदसि बोलाविले ॥५३॥
सर्वासि काढोनि बाहिर । साक्ष करोनि चक्रेस्वर ।
तृणशलाका करोनि निर्जर । काढिले बाहिर नीरबिंदु ॥५४॥
मग पाचारोनि सर्वे जन । देव पुसति त्याहाकारन ।
पूर्ववज्जल असे पूर्ण । किवा क्वचिन्नून झाले असे ॥५५॥
जन वदति तितुकेच असे । क्वचिन्मात्र उने नसे ।
देव वदति राया ऐसे । स्वरूपायु जातसे दिनदिन ॥५६॥

ऐसे वदोनिया निर्जर । स्वस्थानि गेले सत्वर ।
तदा चित्ति विचारि चक्रेस्वर । म्हने हा संसार असार असे ।।५७।।
माता पिता बधू जन । पुत्रभार्यादि सज्जन ।
क्षणिक दिसति मजकारण । विद्युल्लता समान चचल ।।५८।।
नानाविध धन संपति । पाइक रथ तुरग हस्ति ।
रत्ननिधान विद्याप्राप्ति । क्षयात पावति क्षणामाजि ।।५९।।
हे शरीर दिसे सुदर । विचारिता दिसे असार ।
केवल मलमूत्राचे घर । कषायतस्करमाजि वसति ।।६०।।
गौरचर्मवेष्टित असे । म्हणोनि क्वचित्सुदर दिसे ।।
माजी अमेध्य भरले असे । पश्यता जैसे मातगगृहि ।।६१।।
ऐसे कुत्सित असता तरि । स्थिर न दिसे क्षणभरि ।
जैसा पतासा जलाभीतरि । विरोन्नि सत्वर जात असे ।।६२।।
याचे करिता रक्षण । दु ख देति जिवा कारण ।
मुनिस्वर करिति आकर्षण । त्याहाकारण मोक्ष देति ।।६३।।
पचेद्रि भोगविषयोत्पत्ति । सेवन करिता प्रेम वाटति ।
परभवि महाकष्ट देति । असह्य दुर्गतिमाजि जान ।।६४।।
जीव वह्वारभे करोनि । भोगिति लक्ष चौऱ्यासि योनि ।
केवल दु खाचि खानि । दुष्कृतगहनि फीरति ।।६५।।
मिथ्यात्वयोगे भवसागरि । उमज्जननिमज्जन करि ।
जिनधर्म नौका परहरि । म्हनोनि थोरि दुक्ख भोगि ।।६६।।
आता शीघ्र साडोनि मोहात । करावे आपुले आत्महित
ऐसे चितोनि चित्तात । परमवैराग्या पावला ।।६७।।
सर्वे मिळोनि बधुजन । जिनमदिराप्रति जाउन ।
महामहोत्सवे करोन । केले जिनन्हवन आनि पूजन ।।६८।।

मग करोनि वंदनस्तुति । येता झाला मंदिराप्रति ।
थोर करुणा अनोनि चित्ति । दान देति याचकजना ।।६९।।
निजपुत्र असे देवकुमार । त्यासि दिधला राज्यभार ।
मग वनी जावोनि सत्वर । त्रिगुप्त मुनिश्वर वंदिला ।।७०।।
क्षमाभाव पुसोनि सर्वांसि । द्विधासग सोडोनि मानसि ।
दिक्षा घेवोनि गुरूपासी । महाव्रतासि आदरिले ।।७१।।
मग उग्रोग्र करिति तप । चारित्र पालिति निष्पाप ।
मदनावरि धरोनि कोप । मोडिति व्याप विषयाचा ।।७२।।
चतु.कषाय करोनि शांत । जिंकिला मोहमल्ल उद्धत ।
परिणाम करोनि दयांकित । रागद्वेषात जिंकिले ।।७३।।
पक्षमास करी उपोषण । क्वचित् क्वचित् करिति पारण ।
गिरिकंदरि धरिति ध्यान । शाश्वतस्थान प्राप्त व्हाया ।।७४।।
क्षुत्तृषादि परीषहृ । द्वाविंशति अतिदुस्सहृ ।
साहृति साडोनि सरीरमोह । धरि उत्साह धर्मध्यानि ।।७५।।
कितियक दिवसानतरि । विरुद्ध आहारे करोनि थोरि ।
महाव्याधि व्यापिलि शरीरि । दुर्ज्जनापरि दु खदाइ ।।७६।।
सर्वांगि व्यापिलि व्याधि । दिन दिन करिति वृद्धि ।
तरी न त्यजीति ध्यानशुद्धि । विवेकबुद्धि स्थिरपने ।।७७।।
तदा कवने येके दिवसि । सौधर्मेंद्र आनंद मानसि ।
बैसोनि स्वकिय सदसि । धर्मचर्चासि करितसे ।।७८।।
शुद्धचारीत्राचे वर्णन । विशेषपने करि व्याख्यान ।
येक्या सुराने करोने श्रवन । इंद्रा कारण पुसियले ।।७९।।
देवा ऐसा चारित्रधारि । सांप्रतमध्य लोकातरि ।
असे का नसे भरतक्षेत्रि । ते त्वा सत्वरि वदावे मज ।।८०।।

श्रवण करोनि सुरउक्ति । देवेंद्र वदे तया प्रति ।
सनत्कुमारसे चक्रवर्ति । वैराग्य चित्ति राज्य केले ॥८१॥
जैसे नि राहो नि निराल । माजि वसे नित्य कमल ।
तैसे भोगि तो राज्य सकल । पुण्य प्रबळ करोनिया ॥८२॥
तृणवत् साडोनि राज्य थोर । घेता झाला दिक्षा भार ।
चारित्र पालिति पंचप्रकार । करिति दुष्कर घोर तप ॥८३॥
ममत्व नसे कायावरि । परीषह सहति शरीरि ।
ध्यान धरिति गिरिकंदरि । कर्मवैरि जिकावया ॥८४॥
देव ऐकोनि ऐसे वचन । संशय फेडावया कारण ।
मध्यलोकामाजि येऊन । मुनिकारण पाहिले ॥८५॥
चारित्रधारि पाहोनि ऋषि । थोरानंद मानि मानसि ।
म्हने धन्य धन्य हा तपसि । महच्चारित्रासि पालिति ॥८६॥
यया चारित्र दिसे वाहेरि । तैसे असे का नसे अतरि ।
आता परीक्षा पाहू सत्वरि । ऐसे विचारि स्वमानसि ॥८७॥
तदा भेषजरूप करोनि । म्हने मी वैद्यामाजी सिरोमणि ।
नाना व्याधि दूर करोनि । काचनवर्णि करीन काया ॥८८॥
वैद्य वैद्य ऐसे वदतसे । मुनिश्वरपरता फिरतसे ।
तद्वाक्य श्रवण करोनि ऐसे । तदा मुनि भासे त्याप्रति ॥८९॥
अहो तू मूर्ख दिससि नर । या निर्जन वनामाजि थोर ।
यरक्षारा करिसि वारंवार । वृथा पुत्कार का करिसि ॥९०॥
तदा म्हने स्वामिनाथा । त्वत्सरीरिजे असे व्यथा ।
तस्फेटन करोनि सर्वथा । स्वर्णसाम्यता करीन काया ॥९१॥
मुनि म्हने गा वैद्यमुधी । जरी दूर करिसि व्याधि ।
महद्रोग मग संसारवार्द्धि । तोच्चि आधि दूर करि काया ॥९२॥

वैद्य वदे हो सद्गुरु स्वामी । ससृतिरोग फेडाया लागुनि ।
त्रिलोकि समर्थ नसे कोन्हि । तुजवाचुनि मुनिराया ॥९३॥
पुन्हा मुनि वदे त्यासी । शरीररोग नासायासि ।
प्रयोजन नसे मजसि । लाविता थुक्यासि दूर होती ॥९४॥
ऐसे वदोनि त्याकारन । घेवोनिया निष्टिवन ।
वामकरात करिता स्पर्शन । दिसे तप्त स्वर्ण सम बाहु ॥९५॥
स्वर्णशलाकावत् पाहोनि पाणि । देव थोराश्चर्य मानिति मणि ।
म्हने धन्य धन्य महामुनि । दिसे त्रिभुवनी वदनिक ॥९६॥
मायारूप करोनि दूर । तत्पदि करोनि नमस्कार ।
म्हने हो स्वामी कृपासागर । चारित्र दुर्धर दिसे तुझे ॥९७॥
इद्रसभेसि बैसोनि स्वता । त्वच्चारित्र झाला वर्णिता ।
सशय आला मम चित्ता । त्याकरित्ता आलो पाहावया ॥९८॥
तव चारित्राचे गुण । इद्राने जैसे केले वर्णन ।
अधिक दिसति त्याजहून । पाहोनि मन्मन सतोषिले ॥९९॥
धन्य धन्य तव चारित्र । त्रैलोक्यामाजि पवित्र ।
कर्मवैरि सिरच्छेदनशस्त्र । त्रिजगत्रचित्रकारि ॥१००॥
पुन पुन्हा करोनि स्तुति । वारवार करिति नुति ।
जिनशासन धरोनि प्रीति । स्वर्गाप्रति गेला त्वरे ॥१०१॥
तदा सनत्कुमार मुनिश्वर । करोनि तप अति दुर्धर ।
घातिकर्माचा करोनि सहार । उदेला भास्कर ज्ञान केवल ॥१०२॥
आसन होताचि कपारव । अवधिज्ञाने जानोनि सर्व ।
यवोनि चतुर्णिकाय देव । थोर उत्सव करिताति ॥१०३॥
कैवल्यज्ञानाचे पूजन । करोनि सर्व भव्यजन ।
योग्य पाहोनिया स्थान । पाणि जोडून बैसले ॥१०४॥

तदा केवलज्ञानि यति । द्विविध धर्मांचि स्थिति ।
वदोनि भव्यजनाहि प्रति । स्वर्ग मुक्तिमार्ग दाविला ॥१०५॥
आइकोनि धर्मोपदेश । अंतरि मानोनि थोर हर्ष ।
वंदोनिया केवलीस । स्व स्वस्थानास गेले त्वरा ॥१०६॥
मग तो महामुनीस्वर । देशातरि करोनि विहार ।
सवोधिले भव्य नर । जिनधर्म विस्तार करोनिया ॥१०७॥
मग शुक्लध्यानासि करोन । अघातिकर्म संहारून ।
प्राप्त केले अचल स्थान । जन्म मरण चुकविले ॥१०८॥
सनत्कुमार चक्रवर्ती । चारित्र उद्योत केले क्षिति ।
पावला मोक्षसुख सपति । जगी थोर कीर्ति विस्तारिलि ॥१०९॥
भव्य जानोनि स्वात्महित । नित्य चारित्राचा उद्योत ।
करित असावे जगत्रात । सिद्धि सौख्य प्राप्त होय जेन्हे ॥११०॥

**इति सनत्कुमार मुनिश्वर कथा सपूर्ण प्रसंग तिसरा ।**
**इति कथाकोशे रत्नकीर्तिविरचिते संपूर्ण शुभं भवतु ।**



# प्रसंग चवथा

## समंतभद्रमुनिकथा

प्रथम नमन अर्हंतासी । दुजे नमन भारतीसि ।
तृतीय सद्‌गुरुचरनासि । चिंतिल्या कार्या सिद्धि व्हाव्या ॥१॥
पावोनिया तत्पदाश्रय । अंतरि होवोनिया निर्भय ।
समतभद्र मुनिराय । सम्यग्ज्ञानोदय कथिन कथा ॥२॥
या भारतक्षेत्रमाझारी । दक्षिणदेशाभीतरि ।
असे काचिपुरनगरि । स्वर्गापरि सोभत असे ॥३॥
तेथे समतभद्रमुनि । चारित्रधारि जिनशासनि ।
शुद्ध दर्शन महाज्ञानि । कीर्ति त्रिभुवनि असे व्यापिलि ॥४॥
तर्क्कव्याकरण करोनि सहित । छंदोलंकार वदे व्यक्त ।
काव्य नाटक आनि साहित्य । करोनि मडित असे मुनि ॥५॥
शुद्ध त्रयोदश प्रकार । चारित्र पाळिति मनोहर ।
तप करिति अतिदुर्द्धर । ज्ञाने रत्नाकरसम दिसे ॥६॥
तयाचे शरीरि जान । सम्यक्त्व असे स्फुरायमान ।
सदैव करिति धर्मध्यान । नानागुणसपन्न असे ॥७॥
सदा सप्ततत्त्वोपदेश । करितसे जिनभाक्तिकास ।
निरतर करि ज्ञानाभ्यास । करिति प्रकाश जिनमार्ग ॥८॥

द्रव्य खर्चोनिया फार । नूतन केले शिवमंदिर ।
नयनि पाहता अति सुदर । शिवमहिमा थोर वाढविलि ॥३३॥

अहो ज्या धर्माचा साह्यकारि । नृपति असे परोपरि ।
त्या महिमाचे आश्वीर्य अ्तरि । जनचतुरि न मानिजे ॥३४॥

अष्टादशख दिनप्रति । शिवासि नैवेद्य चढविति ।
पक्वान्न करोनि नाना भाति । नेत्राप्रति प्रियकारि ॥३५॥

पोळिया करोनि पातळ । सेवया आणि भात दाळ ।
जुदे जुदे भरोनि स्थाल । नैवेद्य रसाल विस्तारिति ॥३६॥

पूर्ण पोळचा माडे वडे । तक्रमिश्रित चनवडे ।
सेकोनि उच्छल पापडे । इश्वरापुढे चढविति ॥३७॥

लाडू आणि अनारसे । दधिवडे करोनि सरसे ।
दृष्टि पाहता क्षुद्रोगनासे । विस्तारिले असे स्वर्णताटि ॥३८॥

बरफि आणि बावर । दुग्ध पेडे पारे शर्क्कर ।
जिलब्या लड्डू मोतिचूर । करोनि प्रचुर योग्य स्त्रिया ॥३९॥

फेणिफिनले सजोरिया । सेव दिवडे पाकोनिया ।
नानाविध भरोनि थालिया । चतुर स्त्रिया निर्मापिले ॥४०॥

नाना परिचे पक्वान्न । मुखरोचक बहुव्यजन ।
तिक्ताम्ल क्षार कषाय मेलुन । त्या विना भोजन वृथा असे ॥४१॥

दधि दुग्धाचे भरोनि माठ । आणि इक्षुरसाचे घट ।
ग्रामस्त्रिया मिळोनि येकवट । चरूचे ताट घेति स्वकरि ॥४२॥

भक्तजन मिलोनि समस्त । गीतवाद्योत्सव करित ।
शिवमदिरि जावोनि त्वरित । नित्य नैवेद्या चढविति ॥४३॥

शिवकल्पित पक्वान्न । तत्सेवक जाति घेउन ।
करिति निज कुटुवपोपण । कालक्षपण नित्य करिति ॥४४॥

तो समंतभद्र गूढ यति । ऐसि पाहोनिया वृत्ति ।
अद्भुत हर्ष मानिला चित्ति । म्हने क्षुद्व्याधि शाति होय येथे ४५
ऐसे पाहोनि नयनि । बैसता झाला योग्य स्थानी ।
शिवभक्त पूजा करोनि । समस्तान्न आनोनि द्वारि ठेविले ।।४६।।
तदा त्या पूजक जनासि । वदता झाला गुप्त ऋषि ।
ऐसे सामर्थ नसे कौनासि । हे सर्वान्न देवासि भक्षवी ।।४७।।
ऐसे आइकोनि वचन । वदते झाले मुनि कारण ।
पाषाण मूर्तिसि भोजन । करवायाचा गुण नसे आम्हा ।।४८।।
हे सामर्थे असे तुजपासि । तरी सपूर्ण भक्षरासि ।
भोजन करवि विश्वरासि । त्वत्कीर्ति देशाशि जाइल ।।४९।।
तद्वाक्य ऐकोनि सत्वर । वदे स्वात्मबडिवार ।
म्हणे मी भक्ति करोनि थोर । करिन इश्वर तृप्त भोजनी ।।५०।।
तद्वाक्य ऐकोनि श्रवणि । सीघ्र जावोनि राजभुवनि ।
मात जानविलि नृपालागुणि । आश्चर्य मनि जन मानिति ।।५१।।
राया तव शिवालयाप्रति । कोन्ही यक आला असे यति ।
तो वदता झाला आम्हा प्रति । ते तू ऐक चित्ति धरोनिया ।।५२।।
आम्ही जान्रोनि शिवमदिरि । भक्ति धरोनिया थोरी ।
तव नैवेद्य मनोहरि । अर्पोनि बाहिरि ठेविले ।।५३।।
तेन्हे पाहोनि पक्वान्नराशि । वदे वाक्य भाक्तिकासि ।
ऐसे सामर्थ्य नसे कौनासि । सर्वान्न शिवासि भक्षवि ।।५४।।
तद्वाक्य ऐकोनि भक्तजन । वदते झाले त्या कारण ।
तुजपासि असे ऐसा गुण । तरी करोन दावि आम्हा ।।५५।।
तो म्हने जावोनि सत्वरि । पक्वान्ने आना नानापरि ।
तुमचा देव त्रिशूलधारि । त्यासि भक्ष सत्वरि भोजवितो ।।५६।।

पुण्यमार्गे काल गमाविति । परि पूर्वकर्म उदयागत ।
भस्मक व्याधिरोगमहत । मुनिश्वरात उद्भविला ॥९॥
अहो या जीवाकारण । पुण्यपापास्तव जान ।
साता असाता दुःखदान । निसिदिन देत असे ॥१०॥
तदा ते व्याधि येके सरी । प्रगट होताचि शरीरि ।
क्षुधा उद्भवती थोरि । प्रचुर आहारि तृप्ति नव्हे ॥११॥
स्वच्यारित्र रक्षायासि । असमर्थ होता झाला ऋषि ।
महाचिंचता व्यापिलि मानसि । क्षुद्वेदनासी सोसवेना ॥१२॥
जैसी प्रचुर इंधनि । शात नव्हे हुताशनि ।
अथवा सिंध्वापगाजीवनि । तथा क्षुधाग्नि नव्हे शांति ॥१३॥
त्या नगरिचे श्रावकजन । नित्य करोनि पक्वान्न ।
पुष्कल घृत दुग्ध व्यंजन । देति भोजन मुनिप्रति ॥१४॥
तरी ते दुर्द्धर भस्मव्याधि । दिन दिन करिति वृद्धि !
तव तव वाढे दु खवार्द्धि । चारित्रशुद्धि भंगकारी ॥१५॥
तदा काचिपुराभीतरि । श्रावक जनाचे मंदिरि ।
आहार न लभे लौकरि । कपाटे सत्वरि लाविति ॥१६॥
ऐसे पाहोनि म्हणे मुनि । आता न राहावे या स्थानि ।
या जिनलिंगे करोनि । क्षुधा अग्नि शात नव्हे ॥१७॥
ऐसा विचार करोनि चित्ति । गमन केले देशाप्रति ॥
पुड्रोड्रा नगरा जावोनि युक्ति । जिनवेशाप्रति सोडिले ॥१८॥
तेथे पाहोनि दानशाला । वदकजनाचा जिव्हाळा ।
शीघ्र जावोनि त्या स्थळा । शरीरि धरला बौद्ध वेश ॥१९॥
तेथे करी पुष्टभोजन । नाना परीचे पक्वान्न ।
घृत दुग्ध दधि व्यजन । तऱ्ही उदर पुर्ण होयेचि ना ॥२०॥

मग तेथे नव्हे अन्न प्राप्ति । क्षुद्वेदना न होय शाति ।
म्हने येथे करिता स्थिति । मृत्यु प्राप्ति होइल ॥२१॥
ऐसे विचारोनि अतरि । तेथोनि निघाला सत्वरी ।
फिरता ग्राम पूर नगरि । क्षुद् व्याधि दूरि होयेचि ना ॥२२॥
क्षुद्वेदना करोनि पीडित । देशातरि फिरत फीरत ।
दशपुर नग्र महात । पावला त्वरित महत्कष्टे ॥२३॥
उक्तंच । क्षुधासमं नास्ति शरीरवेदन चितासम न्नास्ति शरीरशोषणं
विद्यासम नास्ति शरीर भूषण क्षमासमं नास्ति शरीररक्षण ॥२४॥
तेथे असे भागवत स्थान । तल्लिगी तेथे वसति जन ।
तद्भक्त भक्ती करोन । देति भोजन नित्यप्रति ॥२५॥
पाहोनिया ऐसे परि । तेथे जावोनिया सत्वरि ॥
वदक वेष करोनि दूरि । धरिला सत्वरि तोचि वेश ॥२६॥
मग त्या भागवताचे मठी । भोजन करि शरीर पुष्टि ।
ते भस्म होय उग उठि । यथाग्नि काष्टि तृप्ति नव्हे ॥२७॥
अतरि स्फुरे सम्यक्त । बहि कुलिगे करोनि व्याप्त ।
यथा अबरि घनवेष्टित । भानु आच्छादित दिसेजना ॥२८॥
उक्तच । अत स्फुरितसम्यक्तो बहिर्व्याप्तकुलिंगकः ।
शोभितोऽसौ महाकाति कर्दमाक्तो मणिर्यथा ॥२९॥
मग तेथोनि निघाला । फिरता फिरता सीन ठाकला ।
वाराणसि प्रति पातला । फिरू लागला ग्रामातरि ॥३०॥
तेथे चार्वाक मताश्रमि । जावोनि पाहिले लोचनी ।
योगिरूपे करोनि स्वस्थानि । वसति अज्ञानी नित्यप्रति ॥३१॥
त्या नगरीचा असे राजा । शिवकोटि नामे पालिति प्रजा ।
नित्य शिवाचि करिति पूजा । मिथ्यामत काजा प्रवर्तला ॥३२॥

द्रव्य खर्चोनिया फार । नूतन केले शिवमंदिर ।
नयनि पाहता अति सुदर । शिवमहिमा थोर वाढविलि ॥३३॥
अहो ज्या धर्माचा साह्यकारि । नृपति असे परोपरि ।
त्या महिमाचे आश्वीर्य अतरि । जनचतुरि न मानिजे ॥३४॥
अष्टादशख दिनप्रति । शिवासि नैवेद्य चढविति ।
पक्वान्न करोनि नाना भाति । नेत्राप्रति प्रियकारि ॥३५॥
पोळिया करोनि पातळ । सेवया आणि भात दाळ ।
जुदे जुदे भरोनि स्थाल । नैवेद्य रसाल विस्तारिति ॥३६॥
पूर्ण पोळचा माडे वडे । तक्रमिश्रित चनवडे ।
सेकोनि उचछल पापडे । इश्वरापुढे चढविति ॥३७॥
लाडू आणि अनारसे । दधिवडे करोनि सरसे ।
दृष्टि पाहता क्षुद्रोगनासे । विस्तारिले असे स्वर्णताटि ॥३८॥
बर्फि आणि बावर । दुग्ध पेडे पारे शक्कर ।
जिलब्या लड्डू मोतिचूर । करोनि प्रचुर योग्य स्त्रिया ॥३९॥
फेणिफिनले सजोरिया । सेव दिवडे पाकोनिया ।
नानाविध भरोनि थालिया । चतुर स्त्रिया निर्मापिले ॥४०॥
नाना परिचे पक्वान्न । मुखरोचक बहुव्यजन ।
तिक्ताम्ल क्षार कषाय मेलुन । त्या विना भोजन वृथा असे ॥४१॥
दधि दुग्धाचे भरोनि माठ । आणि इक्षुरसाचे घट ।
ग्रामस्त्रिया मिळोनि येकवट । चरूचे ताट घेति स्वकरि ॥४२॥
भक्तजन मिलोनि समस्त । गीतवाद्योत्सव करित ।
शिवमदिरि जावोनि त्वरित । नित्य नैवेद्या चढविति ॥४३॥
शिवकल्पित पक्वान्न । तत्सेवक जाति घेउन ।
करिति निज कुटुवपोषण । कालक्षपण नित्य करिति ॥४४॥

तो समंतभद्र गूढ यति । ऐसि पाहोनिया वृत्ति ।
अद्‌भुत हर्ष मानिला चित्ति । म्हने क्षुद्‌व्याधि शाति होय येथे ४५
ऐसे पाहोनि नयनि । बैसता झाला योग्य स्थानी ।
शिवभक्त पूजा करोनि । समस्तान्न आनोनि द्वारि ठेविले ।।४६।।
तदा त्या पूजक जनासि । वदता झाला गुप्त ऋषि ।
ऐसे सामर्थ नसे कौनासि । हे सर्वान्न देवासि भक्षवी ।।४७।।
ऐसे आइकोनि वचन । वदते झाले मुनि कारण ।
पाषाण मूर्तिसि भोजन । करवायाचा गुण नसे आम्हा ।।४८।।
हे सामर्थे असे तुजपासि । तरी संपूर्ण भक्षरासि ।
भोजन करवि विश्वरासि । त्वत्कीर्ति देशाशि जाइल ।।४९।।
तद्‌वाक्य ऐकोनि सत्वर । वदे स्वात्मबडिवार ।
म्हणे मी भक्ति करोनि थोर । करिन इश्वर तृप्त भोजनी ।।५०।।
तद्‌वाक्य ऐकोनि श्रवणि । सीघ्र जावोनि राजभुवनि ।
मात जानविलि नृपालागुणि । आश्चर्य मनि जन मानिति ।।५१।।
राया तव शिवालयाप्रति । कोन्ही यक आला असे यति ।
तो वदता झाला आम्हा प्रति । ते तू ऐक चित्ति धरोनिया ।।५२।।
आम्ही जावोनि शिवमदिरि । भक्ति धरोनिया थोरी ।
तव नैवेद्य मनोहरि । अर्पोनि बाहिरि ठेविले ।।५३।।
तेन्हे पाहोनि पक्वान्नराशि । वदे वाक्य भाक्तिकासि ।
ऐसे सामर्थ्य नसे कौनासि । सर्वान्न शिवासि भक्षवि ।।५४।।
तद्‌वाक्य ऐकोनि भक्तजन । वदते झाले त्या कारण ।
तुजपासि असे ऐसा गुण । तरी करोन दावि आम्हा ।।५५।।
तो म्हने जावोनि सत्वरि । पक्वान्ने आना नानापरि ।
तुमचा देव त्रिशूलधारि । त्यासि भक्ष सत्वरि भोजवितो ।।५६।।

तद्वाक्य ऐकोनि श्रवणि । आश्चर्य वर्तले आमुचे मनि ।
राया तुज सागावया लागुनि । आलो आम्ही लवलाहे ॥५७॥
तद्वाक्य ऐकोनि भूपति । आश्चर्य हर्ष मानोनि चित्ति ।
नैवेद्य करोनि नाना भाति । विस्तारिति स्वर्णभाजनि ॥५८॥
तदा शिवकोटि नरेश्वर । गीत वाद्योत्सव करोनि थोर ।
नैवेद्य घेवोनि प्रचुर । पासला सत्वर शिवमदिरि ॥५९॥
मग वदतसे योगियासी । स्वामि हे उत्तम भक्षरासि ।
भोजन करवावे शिवासि । जेन्हे होय मजसि थोर पुण्य ॥६०॥
योगि वदे नृपाकारण । वाहिर काढावे सर्वजन ।
चरु विस्तारा तेथे नेउन । करवीन भोजन तया हस्ते ॥६१॥
तद्वाक्य ऐकोनि नरपाल । वाहिर काढोनि सकल ।
अन्नपानादिक प्रवल । विस्तारिले निर्मल देवापुढे ॥६२॥
देउळामाजि जावोनि मुनि । युग्मकपाटे दिली लाउनि ।
सर्वान्नि पानादि भक्षुणि । द्वारि येवोनि बैसला ॥६३॥
त्वरे वदे नृपालागि । भाजन वाहिर काढा वेगी ।
रिक्त भाजन पाहोनि त्या जागि । भूप सर्वांगि संतोसला ॥६४॥
जन आश्चर्य मानिति थोर । वदति धन्य हा योगीश्वर ।
जेन्हे भोजने करोनि प्रचुर । देव ईश्वर तृप्त केला ॥६५॥
तदा भूप दिन दिन प्रति । नूतन चरू करविति ।
शिवमंदिरि पाठविति । ईश्वर तृप्ति व्हावयासि ॥६६॥
मुनी करिति तद्भक्षण । षण्मासपर्यंत जान ।
तदा भस्मव्याधि आपन । अनुक्रमे करोन शात झालि ॥६७॥
मग न्यून करिता आहार । अन्न उरू लागले फार ।
तदा योगिंद्रासि सत्वर । वदति नर तद्भावितक ॥६८॥

देवा शंकर सौख्यदाता । पूर्वी सर्वान्न भक्षित होता ।
ते पात्र का उरते आता । वदावे त्वरिता आम्हा प्रति ॥६९॥
मुनी म्हणे हो आइका तुम्हि । भूपतीचि भक्ति पाहुनि ।
तृप्त झाला शूलपाणि । स्तोकान्न म्हणोनि भक्षिति ॥७०॥
मुन्योक्ति करोनि श्रवण । नृपति सन्निध जाऊन ।
करिते झाले निवेदन । वर्तमान समस्त ॥७१॥
रोसे ऐकोनि भूपति । म्हणे शिवभक्ता प्रति ।
तुम्ही पाहा त्या मुनिचि स्थिति । कैसे जेववितो देवशकरा ॥७२॥
नृपवाक्य ऐकोनि भक्त । शिवमदिरि येवोनि त्वरित ।
सर्वे विचार करिता व्यक्त । उपाय त्याहात आठविला ॥७३॥
त्या देउळा माझारी । शुष्क पुष्परासी भीतरि ।
धूर्त लपवोनि सत्वरि । येवोनि बाहिरि सर्वे बैसले ॥७४॥
तदा समतभद्र यति । युग्म कपाटे लावोनि देति ।
आपणचि भोजन करिति । धूर्त तद्वृत्ति पाहिली तदा ॥७५॥
मग ते जावोनि सर्वजन । नृपासि केले निवेदन ।
राया नित्य पाठविसि अन्न । ते नित्य भक्षण करी योगि ॥७६॥
नृपति ऐकोनि उत्तर । क्रोधे खवलिला थोर ।
शिवमदिरि यवोनि सत्वर । योगि तदुष्कर वाक्यवदे ॥७७॥
रे योगिया तू महादुष्ट । हृदि धरोनि थोर कपट ।
लावोनि युग्मकपाट । सर्वान्न उत्कृष्ट नित्य भक्षिसि ॥७८॥
ईश्वर करिति भोजन । म्या ऐसे अतरि जाणून ।
चरू करोनि नित्य नूतन । प्रीति धरोन नित्य धाडिले ॥७९॥
तदन्न भक्षोनि निरंतर । पुष्ट केलेसी कलेवर ।
शिवातन करिसी नमस्कार । दिससी थोर अहकारी ॥८०॥

यात क्रोध युक्त पाहुनि । वदता झाला महामुनि ।
नमन करिता शिवालागुनि । श्लाघ्यता जनि दिसेचि ना ॥८१॥
जैसे सामान्य नराप्रति । नमस्कार करिता भूपति ।
भयभीत होवोनि पडे क्षिति । मृत्यु पावति तत्क्षणे ॥८२॥
रागद्वेषे करोनि सहित । तव देव असे दोषयुक्त ।
मन्नमस्कार प्रतापवत । असह्य तयात होइल ॥८३॥
मम देव जो जिनेश्वर । अष्टादशदोष रहित सार ।
त्रैलोक्य प्रकाशक भास्कर । मन्नमस्कार साहिल ॥८४॥
राया तव देवा कारण । शुद्ध भावे करिता नमन ।
तत्क्षणी जाइल फुटोन । हे मद्वचन सत्य मानी ॥८५॥
मुनिश्वरोक्त ऐकोनि भूप । वदता झाला सहित कोप ।
फुटे तरी फुटो आपरूप । त्वन्नुति प्रताप दावि आम्हा ॥८६॥
तदा नृपति वदे यति । मम नमस्काराचि प्रतिती ।
निशाते दाविन तुज प्रति । निश्चय चित्ति मानिजे ॥८७॥
ऐसे ऐकोनि नृप सत्वरी । म्हने प्रात.काल नसे दूरी ।
जीव लपविसि कववरी । उदय भास्करि पाहू कौतुक ॥८८॥
देउळामाजि ठेवोनि मुनि । युग्मकपाटे दिली लाउनि ॥
दृढमुद्रा करोनि तत्क्षणी । निज निकेतनि गेला नृप ॥८९॥
परत ठेविले सुभट । महद्भयकर दुष्ट ।
करि घेवोनि खड्गखेट दिसति । उद्भट कालरूप ॥९०॥
त्या परते ठेविले अश्वार । बैसले असति तुरगावर ।
वाधोनिया पहात्यार । तिष्ठले तय्यार होवोनिया ॥९१॥
ऐसी करोनि बदोबस्ती । सर्वहि जागृत दिसति ।
तदा दोप्रहरा मध्यानराती । थोर चिंता चित्ती करी मुनि ॥९२॥

अहो म्या अविचारे करोन । येकायेकि नृपाला गुण ।
बोलिलो उद्धतवचन । उगविल्या दिन कैसे होईल ॥९३॥
ऐसि चिंता वर्तलि हृदि । तदा ध्यान लावले जिनपदि ।
निर्भय होवोनि वाक्य वदि । पळतील व्याधि जिन नामे ॥९४॥
नामे उद्धरिला अजनाचोर । श्रीपाल तरिला सागर ।
स्वर्गास गेला कुर्कुर । पचनमस्कार फल प्राप्ति ॥९५॥
जिन नामाचा विश्वास । दृढ धरोनि साहस ।
स्मरण करिति धरोनि हर्ष । अतरि भयास न मानिति ॥९६॥
हृदि करिता जिनस्मरण । अविका देवीचे आसन ।
होते झाले कपायमान । स्वावधिज्ञान विचारिति ॥९७॥
देवि म्हने जिनभक्तावरि । सकष्ट येवोनि पडले भारी ।
तेथे जावोनि सत्वरि । तद्भय दूरि करू त्वरे ॥९८॥
ऐसे विचारोनि मनि । त्या स्थळि गेलि तत्क्षणि ।
वदति झालि मुनिलागुनि । नमस्कार करोनि तत्पदि ॥९९॥
म्हने अहो सद्‌गुरुनाथा । सम्यक्त्वधारक ज्ञानवता ।
दयापालक जिनभक्ता । न करावि चिंता त्वया हृदि ॥१००॥
नृपापुढे केले जे भाषण । तैसेच होइल सत्य जान ।
करोनिया स्थिरमन । करावे स्तवन जिनसत्पदि ॥१०१॥
चतुर्विंशतितीर्थंकर । स्तवन करिता मनोहर ।
कुलिंग फुटोनि सत्वर । जिनमहिमा थोर वाढल ॥१०२॥
स्वयभुवा भूतहितेन ऐसे । प्रथमपद देवोनि भर्वसे ।
जिनगुण चिंतित मनोल्हासे । निज आवासे गेलि त्वरा ॥१०३॥
तदा श्री समतभद्र मुनि । देवतादर्शने करोनि ।
थोर हर्ष पावला मनि । जिनस्तवनि प्रवर्तला ॥१०४॥

चतुर्विशति जिनस्तुति । रत्नमाला गुफोनि राति ।
सौख्यसागरि कृतस्थिति । धर्मध्यान करिति एकचित्ते ॥१०५॥
मग सूर्योदय झाल्यावरी । कौतुक पाऱ्हा नृप सत्वरि ।
जावोनिया शिवमदिरि । मुनिसि बाहेरि काढिले ॥१०६॥
बाहिर निघता मुनिश्वर । मुखाभोज दिसे विकश्वर ।
आकासी जैसा भास्कर । तैसे तेज फार प्रकाशिले ॥१०७॥
हर्षवदन पाहोनि मुनि । नृप विचारि अत.कर्णि ।
म्हने जैसे वदले वचनि । तैसेच करोनि सत्य दाविल ॥१०८॥
कौतुक पाहावयालागुण । धावोनि आले नगरजन ।
वदति येकमेकालागुण । दिसे कारण अद्भुत हे ॥१०९॥
तदा मुनिसि वदे भूपति । अहो यौगीद्र महायति ।
नमस्कार करोनि प्रचिति । सर्व जनाप्रति दाखवि ॥११०॥
नृपोक्ति आइकोनि मुनिश्वर । अतरी हर्ष धरोनि थोर ।
पाठ करिता झाला सत्वर । चोवास जिनवर स्तवन ॥१११॥
अष्टमजिनपर्यंत जान । तमस्तमोरेरिवरस्मिभिन्न ।
करिता झाला स्तवन । शुद्ध करोन मनोवाक्काये ॥११२॥
भावे स्तुति करिता पाठ । कुलिंग फुटोनि पावले नष्ट ।
जिनबिंब झाले प्रगट । चद्रार्ककोट तेज फाकले ॥११३॥
आश्चर्य पाहोनि जन सर्व । हृद धरोनि थोर भाव ।
करिते झाले जयजयारव । पश्चाश्चर्य देव करिति ॥११४॥
तदाश्चर्य पाहोनि नृपति । यतिश्वरासी पुसति ।
देवा तू कोण कोण मति । अद्भुत स्थिनि दिसे तुझि ॥११५॥
मुनि ऐकोन नृपभाषण । निर्भयपणे वदे वचन ।
प्रगट कराव्या जिनशासन । काव्ययुग्म वदतसे ॥११६॥

काच्यां नग्नाटकोऽहं मलमलिनतनुर्लांबुशे पांडुपिंडः ।
पुड्रोड्रे शाकभिक्षुर्दशपुरनगरे मिष्टभोजी परिव्राट् ।
वाराणस्यामभूवं शशिकर धवलः पाडुरागस्तपस्वी ।
राजन् यस्यास्ति शक्तिः स वदतु पुरतो जैननिर्ग्रंथवादी ॥११७॥
पूर्वं पाटलिपुत्रमध्यनगरे भेरी मया ताडिता ।
पश्चान्मालवसिंधुटक्कविषये काचीपुरे वैडुषे ।
प्राप्तोहं करहाटकं बहुभटैर्विद्योत्कटै. सकटं ।
वादार्थी विचराम्यहं नरपते शार्दूलविक्रीडित ॥११८॥
तत्काव्य वदता यतीश्वर । नृपादिक जे भव्य नर ।
शिवमत साडोनि सत्वर । केले अगिकार जिनधर्म ॥११९॥
स्याद्वादमते करोनि मुनि । समस्त प्रवादि जिंकुनि ।
कुलघोषवेश टाकुनि । धरिलि तत्क्षणि नग्नमुद्रा ॥१२०॥
मग तो शिवकोटि भूपति । जानोनि भव्यात्मा शुद्ध सम्यक्ति ।
जानोनिया ससारवृत्ति । वैराग्य चित्ति थोर पावला ॥१२१॥
शीघ्र राज्यभार साडून । शुद्ध जैन दीक्षा घेऊन ।
नित्य करिति ज्ञानाध्ययन । करिति साधन त्रिकालयोग ॥१२२॥
श्रीसमतभद्र मुनिश्वर । भावि होनार तीर्थंकर ।
ज्ञानदर्शन उद्योत थोर । केला सार जगामाजि ॥१२३॥
तत्कथा पुण्यपावनि । नित्य व्याख्यान करिति ज्ञानी ।
ते ससारसौख्य भोगुनि । अचल स्थानि जाति नुक्रमे ॥१२४॥

**इति कथाकोशे श्रीसमंतभद्रदर्शनज्ञानोतन कथा प्रसंग चवथा ।**

**इति कथाकोशे रत्नकीर्तिविरचितं स्वहस्तेन लिखित्वा शुभं भवतु ॥**

०●०

# प्रसंग पाचवा

॥१॥

॥२॥

॥३॥

॥४॥

॥५॥

॥६॥

॥७॥

वित्त ।
धार्मिक जन वसति तत्र । प्रतीति जिनसुत्रश्रवनि असे ॥८॥
त्या विदेहक्षेत्राभीतरि । गंधमालिन्य देशांतरि ।
वीतशोका असे नगरि । इंद्रपुरितुल्य जाना ॥९॥

अहो त्या नगरीचा राजा । वैजयंत नामे असे वोजा ।
निजात्मजवत् पालिति प्रजा । धर्मकाजा सावध असे ॥१०॥

भव्यश्री नामे करोनि । असे तयाचि भामिनि ।
स्वरूपे जैसि पद्मिनि । स्वामिचरनि लीन असे ॥११॥

स्वकिय भर्तराचे सग । भोगिति नित्य नवनवे भोग ।
जिनमार्गि असे अनुराग[1] । जागेजाग पुण्याचा ॥१२॥

कवने येकिय दिवसि । मचकि पहुडलि होति निसि ।
पश्चिमरयनि निजमानसि । तदा सुस्वप्नासि पाहिले ॥१३॥

मग सर्वार्थसिद्धिपासुनि । अहमिंद्र देव चवोनि ।
भव्यश्रीचे गर्भाधानि । निजात्मा लागुनि ठेविले ॥१४॥

मग दिवसदिवसाप्रति । पिडारहित गर्भ वाढति ।
तव तव मातृपिताचित्ति । हरुष वाढति उत्कृष्ट ॥१५॥

तदाष्टमास झाल्यावरि[2] । दोहद उद्भविले अंतरी ।
तेन्हे कृश दिसे शरीरि । ऐसी नारी नृपे पाहिली ॥१६॥

तदा भूपति वदे हे प्रिये । त्वदगे व्यथा उद्भवलि काय ।
ते त्वा मज शीघ्र वदावे । मकोच काय असे धरिला ॥१७॥

जे इच्छा तवांतरि असे । ते ते पूर्विन भवंसे ।
मद्गृहि काहि न्यून नसे । दुर्लभ नसे स्वर्गवस्तु ॥१८॥

मग ते वदे स्वामीप्रति । जिनधर्म वसे मम चित्ति ।
तीर्थयात्रा करावि निगुति । मम चित्ति हेचि वसे ॥१९॥

ऐसे वाक्य आईकोनि । जे जे होते स्त्रियेचे मनि ।
न्हवन पूजा आद्य करुनि । सर्व शुभ मनि पूर्विलि ॥२०॥

---

१ प्रीति २. दोहले

मग संपूर्ण नवमासी । सुनक्षेत्रे शुभ दिवसि ।
प्रसविति झालि सुपुत्रासि । यद्व भानुसी पूर्वदिशा ॥२१॥

तदा पुत्रजन्ममहोत्सव । करिता झाला वैजयतराव ।
सजयतकुमर दिधले नाव । दिसे प्रभाव पुण्याचा ॥२२॥

जव जव वृद्धि कटी वाल । तव तव वाढे वुद्धिवल ।
स्वरूपे जिंकिले चद्रमडल । ज्ञान सकल व्यक्त[3] केले ॥२३॥

पुन्हा भव्यश्रियकारन । अल्पदिवसानतर जान ।
जयत नामे पुण्यपावन । शुभनदन उद्भविला ॥२४॥

मग कुलवत नृपाच्या नदनि[4] । रूपलावन्य शुभगुनि ।
महा महोत्सवे करोनि । दिधल्या पर्णुनि पुत्राहित ॥२५॥

तदा पुत्रपौत्र करोनि भूपति । नानाविध भोग भोगिति ।
स्वप्रतापे राज्य करिति । सदैव पालिति जिनधर्म ॥२६॥

नित्य जावोनि जिमंदिरि । न्हवन पूजा करिति थोरी ।
सुपात्री दान देति च्यारि । भाडार भरी सुकृताचा ॥२७॥

कवने येकिय दिवसी । महदानदे सुमानसि ।
नृप बसला होता सदसि[5] । मानि मानसी महत्सौख्य ॥२८॥

तदा एकाकि यवोनि दूत । रायासि जानविलि मात ।
स्वामि तव पटहस्तीत । टाकोनि वज्रपात यमे नेले ॥२९॥

तद्वाक्य ऐकोनि नृपवर । म्हने धिग्धिग् हा ससार ।
रभा[6]गर्भवद्दिसे असार । क्वचित्सार असेचि ना ॥३०॥

जे पाहिले प्रातःक्कालि । ते म दिसे माझ्यानवेलि ।
अनित्य सर्वहि भूमडली । राज्यादि सकलि दिसे मज ॥३१॥

---

३. प्रगट ४. कन्या ५ सभामध्य ६ कदलिगर्भ

ऐसा विचार करिता चित्ति । वैराग्य पावला भूपति ।
म्हने हे थोर राज्यसंपत्ति । जेष्टसुताप्रति देउ आता ॥३२॥
ऐसे विचार करोनि मनि । संजयंतकुमरवाहुनि ।
वदता झासा त्यालागुनि । प्रीतिवचनि नृपवर ॥३३॥
म्हने बारे मद्राज्य थोर । त्वा घेइजे सत्वर ।
मी घेवोनि दीक्षाभार । करीन सार आत्महित ॥३४॥
कुमरवाक्य ऐकोनि ऐसे । पिताप्रति वदत असे ।
तू का सोडिसि राज्य सरसे । पाहिले कैसे काय वाईट ॥३५॥
तदा पिता वदे गा कुमर । हा वेव्हार असे परपरा ।
पित्याने राज्य देवोनि पुत्रा । करावे त्वरा आत्महित ॥३६॥
ऐसे विचारोनि अतरि । मम वचन अगिकारी ।
राज्यपट्ट बाधावे सिरी । जेन्हे हर्ष थोरि होय मज ॥३७॥
ऐकोनि पित्याचे वचन । तोडिता झाला मोहबधन ।
म्हने मी तुझ्यापूर्वि जाऊन । दिक्षा घेईन त्वरित ॥३८॥
पुत्राचे पाहोनि दृढचित्त । कुमर बाहोनि जयत ।
वदता झाला तयात । मद्राज्य महत घ्यावे त्वया ॥३९॥
जयत वदे जी मम पिता । अगा अगा सजयत भ्राता ।
साडोनिया दृढ ममता । मज का लोटिता भवजलि ॥४०॥
तुम्हि साडोनि दु खापदा । घेउ पाहता सिवसपदा ।
ऐसे पाहि जानितले दादा । न घेमि कदा राज्य आता ॥४१॥
कठिन पाहोनि दोघाचे मन । सजयतपुत्राचा नदन ।
विजयतसामतसाक्ष जान । राज्यस्था पुन अभिसिचला ॥४२॥
मग तिघेहि वनि जावोनि त्वरा । वदिले मुनि श्रुतसागरा ।
घेवोनिया सजमभारा । तप दुष्करालागि साधिति ॥४३॥

तपबले मुनि वैजयत । घातिकर्माचा करोनि घात ।
उद्भविले केवलज्ञानात । त्रैलोक्यात अर्च्चनिक ॥४४॥

जानोनि केवलज्ञानोद्भव । पावले चतुर्निकाय देव ।
करिते झाले जयजयारव[7] । पूजादि उत्सव थोर करिति ॥४५॥

तत्समइ जयत मुनि । धरणेद्ररूपसंपत्ति पाहुनि ।
ऐसी सपत्ति मजलागुनि । तपफले करोनि होइजे ॥४६॥

ऐसा बाधोनि निदानबंध । तप करीतसे शुद्ध ।
अत:कालि मरोनि विबुध । धरणेद्र पद पावला ॥४७॥

अहो ज्या तपे करोन । अहमिंद्रपद होय जान ।
ते निदानदोसे करोन । नागेंद्रभुवन पावला ॥४८॥

यथा मूर्खाचा सिरोमणि । हातिचे टाकोनि चितामनि ।
काचासि धरे बलकुनि । निदान जनि जान तैसे ॥४९॥

ज्ञानिजन जानोनि ऐसे । निदान न करावे सर्वसे ।
जो जिनपदि तल्लीन असे । उने असे काय त्यासी ॥५०॥

उक्तच । लक्ष्मीकात अनतहस्तकमले, देता न भागे कदा ।
मागे स्वल्प तयासि कल्पतरु दे, सतुष्टभावे सदा ॥५०॥
निष्कामे भज का समर्पण करि, मोक्षादिके सपदा ।
ऐसा स्वामि असोनि क्षुल्लकपदा, का इच्छिसी दुर्मदा ॥५१॥

तो संजयत मुनिश्वर । तप करिति महाथोर ।
त्रिकालयोग धरि दुर्द्धर । निरतर ध्यान मौने ॥५२॥

अहो उष्णकालि तो मुनि । पर्वतसिखरि जाउनि ।
सतप्तशिलावरि उभे राहुनि । तप आतापनि[8] साधिति ॥५३॥

---

७ शब्द ८ सूर्यासमोर

उक्तंच । दिनकरकिरणनिकरसंतप्तसिलानिचयेषु निस्पृहः ।
मलपटलावलिप्ततनव. सिथिलिकृत कर्मबंधनः ॥५४॥

कदाचिन्मुनि वर्षाकालि । कायोत्सर्गे वृक्षातलि ।
ध्यान धरिति महाबलि । शपा[९] विक्रालि कडकडे ॥५५॥

जलधारा तेचि बान । मुनेंगे लागति येऊन ।
तरी न त्यजति स्वात्मध्यान । सिद्धासमान शक्ति असे ॥५६॥

उक्तच । जलधाराशरताडिता न चलति चरीत्रत: सदा नृसिंहः ।
ससारदु खभीख परिसहातिघातिनः प्रवीरा. ॥५७॥

सीतकालि सरिता तिरी । सजयत मुनि ध्यान धरी ।
महत्तुषार पीडा करी । दुर्जनापरि जानिजे ॥५८॥

पक्ष मास उपोषण करी । क्षुत्तृषाबाधा साहे शरीरि ।
परीषह साहे भारि । कृश शरीरि फार दिसे ॥५९॥

ऐसे तप करिति सार । संजयंत मुनिश्वर ।
गिरीद्रवत्तीष्ठोनि[१०] धीर । कर्म दुर्द्धर जीकावया ॥६०॥

तदा कवने येके दिनि। विद्यादष्ट्र नामे करूनि ।
विद्याधर बैसोनि विमानि । स्वच्छदे गगणि जात होता ॥६१॥

मुन्योपरि येताचि त्वरित । विमान झाले खुटित ।
तदा अधस्तलि वीक्षित । तदा मुनित पाहिले ॥६२॥

मग पूर्वभवाचे वैर । आठविता झाला थोर ।
क्रोध उद्भविला दुर्द्धर । उपसर्ग घोर करितसे ॥६३॥

महोपसर्ग साहाति मुनि । न चलति ध्यानापासूनि ।
यथा कल्पातराते करुनि । मेरुस्थानाहूनि न चले ॥६४॥

---

९. विजलि, १० मेरु

उक्त दुहा। दया धरम जग मे बडो, सव धरममाहि परधान।
साधो दया न छाडिय, जव लग घट मे प्राण ॥८७॥

याहाचे सप्तभवातरी। वैर चालिले असे थोरि।
यास्तव मुनिचे शरीरि। उपसर्ग भारि महत्केला ॥८८॥

तत्सबोधवाक्य ऐकून। नागेद्र वदे त्या कारण।
हे वैर उद्भविले कवने गुण। ते निवेदन करि मज ॥८९॥

ऐकोनिया फणीद्र उक्ति। दिवाकर वदे त्याप्रति।
तुवा आइकावे येकचित्ति। जेन्हे क्रोध शाति पावल ॥९०॥

या जबूद्वीपामाजि सार। भरतक्षेत्र असे सुदर।
स्वर्गमोक्षाचे माहेर। असे धर्माधार भव्यजना ॥९१॥

त्या भारतक्षेत्रामाझारि। सिहपुर नामे असे नगरी।
वनोपवने करोनि साजिरि। अमरपुरीसम असे ॥९२॥

तया नगरीचा राजा। सिंहसेन वो जा।
प्रतापे जैसे भानु दुजा। पालिति प्रजा नीति मार्गे ॥९३॥

तया भूपतिच्चि रामा। रामदत्ता असे नामा।
लावन्यगुणाच्चि सीमा। शीलमहिमा असे जनि ॥९४॥

त्या भूपतीचा प्रधान। श्रीभूति नामे असे जान।
मिथ्यादृष्टि पापिष्ट दुर्जन। दाभीक वचन फार वदे ॥९५॥

फाकल वाक्य वदोनि फार। सत्य गुणाचा विस्तार।
जगी करिता झाला थोर। पावला प्रचुर मान्य जगि ॥९६॥

यज्ञोपवित्तासि कर्तरी। बांधोनि वदे सभातरि।
हे जिह्वा अलीक[16] वदे जरि। तदा येकेसरी छेदिन ॥९७॥

---

१६. असत्य.

नृपे करोनि माननिक । जानोनि मानिति सर्व लोक ।
मूर्ख काय जानिति विवेक । परीक्षक परिक्षिति ॥९८॥
येथे असो हे कथन । अपर आइका सभाजन ।
पद्मखड ग्राम असे जान । जेथे धनाढ्य जन वसति ॥९९॥
आपुलाल्या हवेल्यावरि । कोटिध्वजा लाविल्या सिखरि ।
वेवसाय करिति दिपातरि । जहाजे सागरि चालति ॥१००॥
विकाया माडिति रत्नरासी । उने नसे स्वर्णरौप्यामी ।
मुक्ताफल प्रवाल विसेसि । ग्राह्यकासि वीकिति ॥१०१॥
त्या नगरामाजि थोर । सुमित्र असे सावकार ।
जिनधर्म आचरि निरतर । दान चार नित्य देति ॥१०२॥
सुमित्रा नामे करोनि । तयाचि असे भामिनि ।
व्रतनेमे शुभगुणि । जिनपूजनि भक्ति असे ॥१०३॥
त्याहाप्रति पुण्यवत । पुत्र असे समुद्रदत्त ।
पित्यासमान गुणवत । वदे सदोदित सत्यवचन ॥१०४॥
जिनागमि प्रतीत असे । शीलव्रत पालि सरसे ।
जिनपकजि तल्लीन असे । चालत असे जिनमार्गि ॥१०५॥
ऐसे असता येके दिनि । वेवहार कराया लागुनि ।
आला त्या सिंहपुरपाटनि । क्रयान[१७] घेवोन इकावया ॥१०६॥
तदा वनिग् मिळोनि सर्वे । वस्तु घेति चित्तोत्सवे ।
महालाभ जानोनि जीवे । देती रुपय लवकरि ॥१०७॥
मग जायालागि दिपातंरि । उद्योग धरिला थोरि ।
मेळवोनि सर्वसामग्री । प्रस्थान मूहूर्त्ति साधिले ॥१०८॥

---

१७ किराना

मग त्या विद्याधरान । विद्याचे बले करोन ।
मुनिश्वरात उचलुन । भारतक्षेत्रि नेऊन टाकिले ॥६५॥
महाक्षिप्रानदीप्रति । पचापगा[11] मिळाल्या असति ।
नेवोनि तत्संगमाप्रति । टाकिले दुर्मति दुर्जनाने ॥६६॥
तद्देशाचे मूर्खजन । पापीष्टे शीघ्र पाचारुन ।
वदत असे त्याहाकारण । रे रे सावधान व्हावे तुम्ही ॥६७॥
हा आला असे राक्षस । तुम्हालागि भक्षाव्यास ।
सर्वे मिळोनिया यास । शीघ्र दुष्टास मारिजे ॥६८॥
ऐकोनि तयाचे उत्तर । सर्वेहि मिळोनि गवार ।
धोंडे काष्टाचे प्रहार । मुनिश्वरावर टाकिति ॥६९॥
महादुष्ट उपद्रव । निर्दयी करिति जव जव ।
मुनींद्र धरिति क्षमाभाव । शत्रुमित्रु सर्व सम[12] मानिति ॥७०॥
उक्तंच । आकृष्टोपि हतो नैव हतो वा न द्विधाकृतः ।
मारितो न हतो धर्मं मदीये नेन बंधुना ॥७१॥
तदा तो सजयंत मुनि । दुर्द्धर उपसर्ग जिंकुनि ।
घातिकर्म विनासोनि । उद्भविले तत्क्षणि ज्ञान केवल ॥७२॥
अहो सजयत मुनि तदा । नासोनि अघातिक कर्मापदा ।
जावोनिया सिद्धपदा । अक्षय सपदा पावला ॥७३॥
तत्क्षणि निर्वाणपूजास्तव । पावले चतुर्णिकाय[13] देव ।
पूजा करिति महदुत्साव । जयजयारव थोर करिति ॥७४॥
तदा मुनीचे शरीर । धरणेंद्र पाहोनि सत्वर ।
क्रोधरूप होवोनि थोर । म्हने दुष्ट नर हे दुराचारी ॥७५॥

---

११ सिन्धवती, गम्यवती, श्यामी करवनी, कुम्भवती, चद्रवेगा.
१२ बरोबर, १३ कल्पवासी, ज्योतिर्वासी, व्यतरवासी, भुवनवासी.

मम बंधूचा घेतला प्राण । शीघ्र मारावे याहाकारण ।
ऐसे वदोनिया जान । नागफासे करोन वाधिले ।।७६।।

तदा ते सर्वे नागेद्राप्रति । दीनवचने ग्लात करिति ।
देवा ऐकावि आमुचि उक्ति । निज चित्ति धरोनिया ।।७७।।

हा खगेद्र वदे आम्हासि । हा राक्षस होय मारायासि ।
ना तरि खाइल तुम्हासि । सिक्षा ऐसि दिल्हि यान्हे ।।७८।।

जैसे आम्हास कथिले यान्ह । तैस आम्हि केले जान ।
न्याय अन्याय निवडुन । आम्हाला गुणदड देइ ।।७९।।

तद्वाक्य ऐकोनि भुवनेश[१४] । वधमुक्त केले सर्व्यास ।
टाकोनिया नागफास । विद्युद्दष्ट्रास वाधिले ।।८०।।

मग स्वचित्ति विचारी । यासि मारावे कौने परि ।
की आपटावे शीलेवरि । होय क्षणातरि प्राणमुक्त ।।८१।।

किंवा टाकु भयंकर वनि । व्याघ्रसिह्व भक्षिति तत्क्षणि ।
जेन्हे दु ख होय यालागुनि । करीन मी यासि तैसे ।।८२।।

ऐसे विचारोनि मानसि । म्हने सागरि क्षपिजे यासी ।
तरि भक्ष मिले मगरमच्छासि । थोर दुक्खासि पावल ।।८३।।

ऐसे वदोनि उचलिला । सागरि टाकाया उद्योग केला ।
तत्क्षणि दिवाकरदेव आला । वदता झाला नागेद्रास ।।८४।।

अहोहो भुजगनायक । हा विद्याधर दिसे वराक[१५] ।
यासि मारोनि काय सार्थक । पुण्यदायक होय तुज ।।८५।।

तू प्राग्भवि होता मुनिश्वर । दया पट्काय जीवावर ।
पाळोनि पावला पद थोर । दया धर्म्मसार असे जगि ।।८६।।

---

१४. धरणेद्र १५. कगाल

उक्त दुहा । दया धरम जग मे बडो, सब धरममाहि परधान ।
साधो दया न छाडिय, जब लग घट मे प्राण ॥८७॥

याहाचे सप्तभवातरी । वैर चालिले असे थोरि ।
यास्तव मुनिचे शरीरि । उपसर्ग भारि महत्केला ॥८८॥

तत्सबोधवाक्य ऐकून । नागेद्र वदे त्या कारण ।
हे वैर उद्भविले कवने गुण । ते निवेदन करि मज ॥८९॥

ऐकोनिया फणीद्र उक्ति । दिवाकर वदे त्याप्रति ।
तुवा आइकावे येकचित्ति । जेन्हे क्रोध शाति पावल ॥९०॥

या जबूद्वीपामाजि सार । भरतक्षेत्र असे सुदर ।
स्वर्गमोक्षाचे माहेर । असे धर्माधार भव्यजना ॥९१॥

त्या भारतक्षेत्रामाझारि । सिहपुर नामे असे नगरी ।
वनोपवने करोनि साजिरि । अमरपुरीसम असे ॥९२॥

तया नगरीचा राजा । सिंहसेन वो जा ।
प्रतापे जैसे भानु दुजा । पालिति प्रजा नीति मार्गे ॥९३॥

तया भूपतिच्चि रामा । रामदत्ता असे नामा ।
लावन्यगुणाचि सीमा । शीलमहिमा असे जनि ॥९४॥

त्या भूपतीचा प्रधान । श्रीभूति नामे असे जान ।
मिथ्यादृष्टि पापिष्ट दुर्जन । दाभीक वचन फार वदे ॥९५॥

फाकल वाक्य वदोनि फार । सत्य गुणाचा विस्तार ।
जगी करिता झाला थोर । पावला प्रचुर मान्य जगि ॥९६॥

यज्ञोपवित्तासि कर्तरी । बाधोनि वदे सभासरि ।
हे जिह्वा अलीक[16] वदे जरि । तदा येकेसरी छेदिन ॥९७॥

---

१६. असत्य.

नृपे करोनि माननिक । जानोनि मानिति सर्व लोक ।
मूर्ख काय जानिति विवेक । परीक्षक परिक्षिति ॥९८॥
येथे असो हे कथन । अपर आइका सभाजन ।
पद्मखड ग्राम असे जान । जेथे धनाढ्य जन वसति ॥९९॥
आपुलाल्या हवेल्यावरि । कोटिध्वजा लाविल्या सिखरि।
वेवसाय करिति दिपातरि । जहाजे सागरि चालति ॥१००॥
विकाया माडिति रत्नरासी । उने नसे स्वर्णरौप्यासी ।
मुक्ताफल प्रवाल विसेसि । ग्राह्यकासि वीकिति ॥१०१॥
त्या नगरामाजि थोर । सुमित्र असे सावकार ।
जिनधर्म आचरि निरतर । दान चार नित्य देति ॥१०२॥
सुमित्रा नामे करोनि । तयाचि असे भामिनि ।
व्रतनेमे शुभगुणि । जिनपूजनि भक्ति असे ॥१०३॥
त्याहाप्रति पुण्यवत । पुत्र असे समुद्रदत्त ।
पित्यासमान गुणवत । वदे सदोदित सत्यवचन ॥१०४॥
जिनागमि प्रतीत असे । शीलव्रत पालि सरसे ।
जिनपकजि तल्लीन असे । चालत असे जिनमार्गि ॥१०५॥
ऐसे असता येके दिनि । वेवहार कराया लागुनि ।
आला त्या सिंहपुरपाटनि । क्रयान[१७] घेवोन इकावया ॥१०६॥
तदा वनिग् मिळोनि सर्वे । वस्तु घेति चित्तोत्सवे ।
महालाभ जानोनि जीवे । देती रुपय लवकरि ॥१०७॥
मग जायालागि दिपातरि । उद्योग धरिला थोरि ।
मेळवोनि सर्वसामग्री । प्रस्थान मुहूर्त्ति साधिले ॥१०८॥

---

१७. किराना

अहो धनपतिचा नंदन । शाम असे वायसा[२५] पाहून ।
त्या न सुदर वदती जन । जैसा दिसे कृष्ण द्वारकेचा ॥१३०॥

तदा चालत चालत क्षिती । नदी वन उल्लघिले किती ।
पावला सिंहपुराप्रति । जेथे श्रीभूति मत्री असे ॥१३१॥

मग चित्ति करी विचार । प्रात दिनेश उगवल्यावर ।
मन्त्रिगृहि जावोनि सत्वर । आनावे सुदर पचरत्न ॥१३२॥

मग सुखे दुखे क्रमलि निसी । प्रातर्उठोनि लवलाहेसि ।
पावला मन्त्रिचे मदिरासी । तो होता स्वसदसि बैसला ॥१३३॥

दुरोनि पाहोनि कुमरात । वदतसे सभाजनात ।
म्हने मी कथितो तुम्हात । ते सत्य चित्तात मानिजे ॥१३४॥

कोन्ही येक भिखारी । येवोनिया क्षणाभीतरि ।
मला याचना करीलथोरि । मद्रत्न सत्वरि पच देइजे ॥१३५॥

याचना करील वेळोवेळ । ऐसी मजवरि येइल आळ ।
पुढे होणार जे सकळ । ते पूर्वी प्राजळ कळले मज ॥१३६॥

जो सत्यवचनि रत असे । त्यात होनार कळतसे ।
अलीक वदत महत्त्वनासे । कौनासि नसे तद्विश्वास ॥१३७॥

ऐसे वदताचि वचन । तत्क्षणि येवोनि श्रेष्टिनदन ।
याचिता झाला पचरत्न । श्रीभूति कारण सत्वरी ॥१३८॥

पुन पुन्हा वदे त्यासि । स्वामि म्या ठेविले तुजपासी ।
ते पचरत्न मनोल्हासी । द्यावे मजसि शीघ्रत्वया ॥१३९॥

तदा मत्रि वदे जनाप्रति । म्या पूर्वि कथिले जे उक्ति ।
ते मद्वाक्याचि प्रचीति । तुमचे चित्ति कैसि भासे ॥१४०॥

---

२५ काक

जैन वदति गा मंत्रिवर । तू दिससी सत्याचा मंदिर ।
त्वत्सत्य वाक्याचा विस्तार । मेदिनिवर विस्तारिला ॥१४१॥
तदा कुमरात वदे प्रधान । त्वा गमावोनि स्वकीयधन ।
धनवाय लागलि तुज कारन । गहिला होऊन जगि हिंडसी १४२
का झोंबिसि परक्याचे गला । रत्न मागिसि वेळोवेळा ।
का पिसाट झालासि बाला । पाप प्रबला का जोडिसि ॥१४३॥
जरि दरिद्र आल्या प्राणियासी । तरी न सोडावे सत्यासि ।
तो मान्य होय इद्रादिकासि । कितिक भवासि जाय मोक्षा १४४
कुमर म्हने गा प्रधान । दुज्यासि सबोधाव्या कारण ।
विचक्षण असति सर्वेजन । परतु आपन नाचरति ॥१४५॥
उक्तच । विचक्षण किंतु परोपदेशे । न स्वस्यकार्ये सकलोपि लोका ।
नेत्र हि दूरेपि निरीक्षितोपि । आत्मावलोकत्व समर्थमेव ॥१४६॥
मग तो वदे कुमरासि । कारे उद्धत वाक्य वदसि ।
किंचित्‌भय न मानिसि । लज्जा तुजसि का न वाटे ॥१४७॥
ऐसे वदोनि त्वरित । मागे लावोनिया दूत ।
धक्काबुकि गचाटचा देत । काढिले त्यात गृहाबाहिरि ॥१४८॥
मत्रि सत्य वाक्याचि मात । विदित जाहाली भूपतीत ।
घोषणा देवविलि ग्रामात । वदावे मत्रीत सत्यघोस ॥१४९॥
मग तद्‌गृहा पासोनि कुमर । निघता झाला कुमर ।
ग्रामात फिरे निरतर । करित पुकार दिन निसी ॥१५०॥
म्हने ऐका हो सेटे महाजन । या श्रीभूति प्रधानान ।
अभलाकोनि पंचरत्न । मज मारोन बाहिर काढिले ॥१५१॥
घोषणा करिता रात्रदिवस । झाले सपूर्ण षट् मास ।
कोन्हि न पुसे तयास । गहिला ऐसे वदति जन ॥१५२॥

रत्न पच होते त्यापासि । तदा विचारि स्वमानसि ।
म्हने हे न्यावे कासियासि । कवनापासी थापिजे ॥१०९॥
ऐसे मनि विचारुन । पाहू लागला सात्विक[18] जन ।
निर्लोभ सत्य वाक्य भाषण । कापटच करोन रहित ॥११०॥
परद्रव्य परकामिनि । गई जे इच्छा न करितिजनि ।
तद्‌गुणाचि कथनि । येके रसनि कोन वर्णे ॥१११॥
ऐसे पाहाता समुद्रदत्त । कोन्ही निर्लोभी न दिसे त्यात ।
तदा सत्यभूति मन्त्रि विख्यात । असे नग्रात स्तोत्रि ऐकिले ॥११२॥
तदा त्याचे गृही जाउन । विनविला तो प्रधान ।
तत्वरी देवोनि पचरत्न । घालोन हेमकरडके[19] ॥११३॥
त्यात वदे हो मन्त्रिवरा । आम्ही जातो दिपातरा ।
पुन्हा येइन सप्तसवत्सरा । रक्षण करा तववरि ॥११४॥
मन्त्री वदे कुमरासी । बारे ज्या काळि तू येसि ।
तत्क्षणी न्यावे रत्नासि । ठेविल्या वस्तुसी काय उशीर ॥११५॥
अहो कापटच असे ज्याचे मनि । तो वदे मिष्ट अमृताहूनि ।
तयाचे कृत्य भोळे प्राणि । ऋजु प्रनामि[20] न जानति ॥११६॥
उक्तदुहा । कपटी नर न विजानिय । खसखस जैसो फूल ।
उपर लाल गुलाल है । नीच मरण को मूल ॥११७॥
मग निश्चित होवोनि समुद्रदत्त । सागरि बैसोनि जहाजात ।
पचगुरु मत्र स्मरित । दीपातरात पावला ॥११८॥
तेथे करोनि व्यापार । द्रव्य जोडिले फार ।
पुन्हा जहाजी बैसोनि सत्वर । स्वग्रामी सत्वर येत होता ॥११९॥

---

१८ भला मानुस १९ सोन्याचा, डबा. २० सरलचित्ति

उक्तदुहा । मन चिंत्ये मानवा ससा चिंते रान ।
मासाचिंते खोलपानि । कर्तार करे सो आन ॥१२०॥

सिंधुमध्ये[21] येता जलयान[22] । दैवसजोगे करोन ।
तत्क्षणि गेले बुडोन । यथा पापीजन भवजलि ॥१२१॥

तत्क्षणि तो समुद्रदत्त । जपता मन्त्र अपराजित ।
येक पटल्या[23] टोपलि त्यात । यथा सम्यक्त मानवासि ॥१२२॥

बैसोनि त्या पटलीवरी । मुखी परमेष्टि[24] नामोच्चारी ।
वायोप्रयोगे चालत सत्वरि । पैले तीरि येत झाला ॥१२३॥

मग तेथोनिया चालिला । पदरि नसे अधेला ।
भिक्षाटन करित चालिला । फिरु लागला पादचारे ॥१२४॥

मलीन दिसति वसन । शरीरि न दिसे आभूपण ।
जगी दिसे कायाहीन । स्नान लेपन रहित ॥१२५॥

चालत चाल्ता दिनांतरी । पीडित होय शरीरि ।
कटक वेधति पदांतरि । यथा वैरी प्राग्भवीचे ॥१२६॥

ज्यासि अशुभ कर्म नाडे । त्यावरि नाना संकट पडे ।
जेथे तेथे वाइट घडे । दुःखावर पडे होत असे ॥१२७॥

उक्तच काव्य । खल्वाटे सिरसे दिनेश्वर करि अत्यंत पै तापला ।
वांछि शीतल देश दैवगतिने तालातलि तिष्टला ॥
तो मूर्ध्नफिल पात होउनि महाघोपान्वटा भगला ।
जेथे जाय सवेचि संकट महा लाधे अदैवागला ॥१२८॥

दरीद्र आलिया प्राणियासी । कोन्हि न पश्यति त्यासी ।
वाक्य न वदति सुमानसी । जनरीति ऐसीच असे ॥१२९॥

---

२१ समुद्र २२ जहाज. २३ पारी २४ नौकारमंत्र.

अहो धनपतिचा नंदन । शाम असे वायसा[२५] पाहून ।
त्या न सुदर वदती जन । जैसा दिसे कृष्ण द्वारकेचा ।।१३०।।

तदा चालत चालत क्षिती । नदी वन उल्लघिले किती ।
पावला सिंहपुराप्रति । जेथे श्रीभूति मत्री असे ।।१३१।।

मग चित्ति करी विचार । प्रात· दिनेश उगवल्यावर ।
मत्रिगृहि जावोनि सत्वर । आनावे सुदर पचरत्न ।।१३२।।

मग सुखे दुखे क्रमलि निसी । प्रातर्उठोनि लवलाहेसि ।
पावला मत्रिचे मदिरासी । तो होता स्वसदसि बैसला ।।१३३।।

दुरोनि पाहोनि कुमरात । वदतसे सभाजनात ।
म्हने मी कथितो तुम्हात । ते सत्य चित्तात मानिजे ।।१३४।।

कोन्ही येक भिखारी । येवोनिया क्षणाभीतरि ।
मला याचना करीलथोरि । मद्रत्न सत्वरि पच देइजे ।।१३५।।

याचना करील वेळोवेळ । ऐसी मजवरि येइल आळ ।
पुढे होणार जे सकळ । ते पूर्वी प्राजळ कळले मज ।।१३६।।

जो सत्यवचनि रत असे । त्यात होनार कळतसे ।
अलीक वदत महत्त्वनासे । कौनासि नसे तद्विश्वास ।।१३७।।

ऐसे वदताचि वचन । तत्क्षणि येवोनि श्रेष्टिनदन ।
याचिता झाला पचरत्न । श्रीभूति कारण सत्वरी ।।१३८।।

पुन·पुन्हा वदे त्यासि । स्वामि म्या ठेविले तुजपासी ।
ते पचरत्न मनोल्हासी । द्यावे मजसि शीघ्रत्वया ।।१३९।।

तदा मत्रि वदे जनाप्रति । म्या पूर्वि कथिले जे उक्ति ।
ते मद्वाक्याचि प्रचीति । तुमचे चित्ति कैसि भासे ।।१४०।।

---

२५ काक.

जैन वदति गा मंत्रिवर । तू दिससी सत्याचा मंदिर ।
त्वत्सत्य वाक्याचा विस्तार । मेदिनिवर विस्तारिला ॥१४१॥
तदा कुमरात वदे प्रधान । त्वा गमावोनि स्वकीयधन ।
धनवाय लागलि तुज कारन । गहिला होऊन जगि हिंडसी १४२
का झोंबिसि परक्याचे गला । रत्न मागिसि वेळोवेळा ।
का पिसाट झालासि बाला । पाप प्रबला का जोडिसि ॥१४३॥
जरि दरिद्र आल्या प्राणियासी । तरी न सोडावे सत्यासि ।
तो मान्य होय इंद्रादिकासि । कितिक भवासि जाय मोक्षा १४४
कुमर म्हने गा प्रधान । दुज्यासि संबोधाव्या कारण ।
विचक्षण असति सर्वेजन । परंतु आपन नाचरति ॥१४५॥
उक्तच । विचक्षण किंतु परोपदेशे । न स्वस्यकार्य सकलोपि लोका ।
नेत्र हि दूरेपि निरीक्षितोपि । आत्मावलोकत्व समर्थमेव ॥१४६॥
मग तो वदे कुमरासि । कारे उद्धत वाक्य वदसि ।
किंचित्भय न मानिसि । लज्जा तुजसि का न वाटे ॥१४७॥
ऐसे वदोनि त्वरित । मागे लावोनिया दूत ।
धक्काबुकि गचाटचा देत । काढिले त्यात गृहाबाहिरि ॥१४८॥
मंत्रि सत्य वाक्याचि मात । विदित जाहाली भूपतीत ।
घोषणा देवविलि ग्रामात । वदावे मंत्रीत सत्यघोस ॥१४९॥
मग तद्गृहा पासोनि कुमर । निघता झाला कुमर ।
ग्रामात फिरे निरंतर । करित पुकार दिन निसी ॥१५०॥
म्हने ऐका हो सेटे महाजन । या श्रीभूति प्रधानान ।
अभलाकोनि पंचरत्न । मज मारोन बाहिर काढिले ॥१५१॥
घोषणा करिता रात्रदिवस । झाले संपूर्ण षट् मास ।
कोन्हि न पुसे तयास । गहिला ऐसे वदति जन ॥१५२॥

तदा येकिय दिवसि । दोन प्रहर माध्यान निसि ।
एवोनि राज्ञिचे मंदिरापासि । दीर्घ स्वरेसि करि पुकार ॥१५३॥

तद्वाक्य ऐकोनिया राज्ञि । विचार करितसे मनि ।
म्हने हा गहिला नव्हे प्राणि । षड्मास वाणि येकचि वदे ॥१५४॥

मग ते वदे नृपाप्रति । स्वामि हा फिरतो दिनराति ।
याचे वाक्य धरावे चित्ति । हा गहिला दिसेचि ना ॥१५५॥

ग्रामी फिरता निसदिन । षट् मास झाले याकारण ।
सदैव वदे येकवचन । क्वचिद्भीन्न न दिसे ॥१५६॥

गहिला फिरति ग्रामातरि । क्षण हासे क्षण रोदन करी ।
क्षण बैसे क्षण जनमदिरि । प्रवेस करि उगलाचि ॥१५७॥

कवनालागि सिव्या देति । भलतिसे वाक्य वदति ।
यद्वा तद्वा भविष्यति । वदावे त्या प्रति गहिला ॥१५८॥

याची चेष्टा तैसी नसे । नित्य एकवचन भासे ।
हा कुमर महादु खित असे । ते कोन नासे तुज विन ॥१५९॥

पाचारोनि त्याकारण । त्वा पुसावे अभय देऊन ।
ऐकोनि त्याचे वचन । तत्कार्य साधन करी त्वरा ॥१६०॥

राज्ञि वाक्य ऐकोनि त्वरा । पाचारिले श्रेष्ठिकुमरा ।
तदा तो यवोनि येकेसरा । नृपतिपुढारा उभा ठेला ॥१६१॥

भूप वदे रे न धरि भय । सत्यार्थवाक्य वदावे ।
त्व द्वास्तव्यज्ञाति काय । नाम काय मातृपिता ॥१६२॥

नृपोक्ति ऐकोनि सिंधुदत्त[26] । पूर्विपासोनि वृत्तात ।
सर्व व्यक्त केले नृपात । भयरहित होवोनिया ॥१६३॥

---

२६ समुद्र

तद्वाक्य ऐकोनि नृपाने । अभयाराज्ञिप्रति म्हने ।
याचे रत्न या कारने । मिळने हे दुर्लभ दिसे ॥१६४॥

यान्हे जेव्हा ठेविले त्यापासी । त्यासि कोन्हि नसे साक्षी ।
कैसे मागावे त्याजपासी । शाहानपणासि दोस लागल ॥१६५॥

परीक्षावाचोनिया कार्य । सुज्ञानि क्वचिन्न करावे ।
अविचार्य करिता जीवे । पश्चात्ताप होय ज्ञानियासि ॥१६६॥

उक्तंच । अविचार्य न कर्तव्यं । कर्तव्य च विचार्यत' ।
पश्चातापं भवेत् पश्चात् । ब्राह्मनिन कुलो यथा ॥१६७॥

नृपवाक्य ऐकोनि राज्ञि । वदत असे त्यालागुनि ।
मज आज्ञा द्यावी स्वामि । मी मन्त्रिपासुनि रत्न काढितो ॥१६८॥

भार्योक्ति ऐकोनि भूपति । म्हने त्वा करावि तद्युक्ति ।
जेव्हे रत्नाची होय प्राप्ति । ज्याचे त्याजप्रति देइजे ॥१६९॥

राज्ञि नृपाज्ञा घेऊनि । वदे समुद्रदत्ताकारन ।
त्वा असावे समाधान । मिळतिल रत्न तुझे तुज ॥१७०॥

मग कौने येकिय दिवसि । सत्यघोष आनदमानसि ।
आला राज्ञिचे मंदिरासि । बैसला वदनेसि करोनिया ॥१७१॥

मग त्या कारने वदे रानी । येक कौतुक असे मम मनि ।
सारिपाट खेळावे तुम्हि आम्हि । क्रीडे करोनि मन्त्रिवरा ॥१७२॥

तदा मन्त्रि वदे स्वामिनीसी । माते जे तू आज्ञापिसि ।
ते ते करने सेवकासि । योग्यकार्यासी दासापरी ॥१७३॥

मग खेल खेळति दोघेजण । राज्ञी पुसे त्या कारन ।
त्वा आज काय केले भोजन । ते मजकारण सागिजे ॥१७४॥

तो म्हन दाळ पोळ्या भात । सेवया शर्करा दुग्धमिश्रित ।
वैगणादि शाका बहुत । आनिक घृत लोनकडे ॥१७५॥

तद्वाक्य ऐकोनि श्रवणि । पाचारिले दासीलागुणि ।
नेत्रसज्ञा दाखवोनि । मन्त्रिचे सदनि पाठविलि ॥१७६॥

दासि जाव्रोनि मन्त्रिस्त्रीप्रति । वदोनिया भोजनवृत्ति ।
पचरत्न मागति । म्हने त्वत्पति मज धाडिले ॥१७७॥

मग मन्त्रिभार्या वदे तीत । मत्स्वामि यवोनि गृहात ।
वस्त नेइल स्वकिय हात । ठावे मत असेचि ना ॥१७८॥

तदा माघारे यवोनि दासी । हस्तसज्ञा कथिले राज्ञिसि ।
तदा राज्ञी वदे प्रधानासि । दूतकर्मासि खेळु आता ॥१७९॥

तदा तन्मुद्रिका जिंकुनि । दासी करि गुप्त देऊनि ।
पुन्हा धाडिल तत्सदनि । विज्ञानगुणि निपुन असे ॥१८०॥

मुद्रिका देवोनि तिचे करी । म्हने हे पाहोनि लौकरि ।
रत्नकरड द्यावा मत्करि । मुद्रिका जरि असे वळखिली ॥१८१॥

ऐसे ऐकोनि तद्वचन । तऱ्ही न दिधले रत्न ।
तदा दासी आलि फिरोन । संज्ञा करोन निवेदिले ॥१८२॥

तदोपरि कर्त्तरिसहित । राज्ञिने जिंकिले यज्ञोपवीत ।
पुन्हा पाठविले दासीत । मन्त्रीचे गृहात सत्वरी ॥१८३॥

यज्ञोपवीत दावोनि शीघ्र । म्हने तू दिससि अतिनिष्ठुर ।
बाइ तुझिया भ्रतारावर । होताति मार कोरड्याचे ॥१८४॥

बाइ ग त्या रत्नाचा धनि । फिर्यादा आला राजभुवनि ।
राजा पुसता धाक दाउनि । मन्त्रि तत्क्षणि कबुलला ॥१८५॥

जरी त्याचे प्राणाचि आस । बाइय गे असे तुस ।
तरी शीघ्र देइ रत्नास । तव चित्तास येईल जरि ॥१८६॥

भ्रतार असे निजमंदिरि । जगी सोहे तेचि नारी ।
स्वामि पावल्या लोकातरि । कौसिकापरीते[27] दिसतसे ॥१८७॥

तद्वाक्य ऐकोनि श्रवणि । भयभीत झाली निजमनि ।
गृहातरि शीघ्र जाउनि । रत्नकरंडातून दीधला ॥१८८॥

म्हने हा करंड घेवोनि जाइ । नृपालागि शीघ्र देइ ।
मम भ्रतारालागि वाचवि । न तरि बरवी गती नसे ॥१८९॥

मग तो रत्नकरड घेउन । राज्ञित दिधले आणून ।
द्यूतक्रीडा करोनि विसर्जन । नृपासि नेऊन दर्शविले ॥१९०॥

करड पाहोनि नरेश्वर । क्रोधे खवळला प्रधानावर ।
भृत्यासि आज्ञापिले सत्वर । म्हने बाधा तस्कर पापिष्ट हा ॥१९१॥

नृपाज्ञा पावोनि दूत । त्या श्रीभूतिप्रधानात ।
बाधोनिया कर्करित । क्षपिले त्वरित कारागृहे ॥१९२॥

उक्तच । काके शौच द्यूतकारेषु सत्य । क्लीबे धैर्यं मद्यपे तत्त्वचिंता ।
सर्पे क्षाति स्त्रीषु कामोपशाति । राजा मित्र केन दृष्ट श्रुत वा १९३

भूप कवनाचा नव्हे मित्र । वायस कदा नव्हे पवित्र ।
मद्यपासी जिनसूत्र । वदता यत्र सभवेन ॥१९४॥

मग प्रोहित आनि ज्ञानी जन । पाचारोनि पुसिले नृपान ।
चौर्यासत्यभासि त्यालागुण । प्रायश्चित्त सागणे काय असे ।१९५।

ते सुज्ञानि आनि प्रोहित । विचारोनि प्रायश्चित्त ग्रथ ।
वदते झाले नृपात । यासी प्रायश्चित्त त्रीणि असति ॥१९६॥

स्थाल भरोनिया गोमय । भक्षण केल्या पाप जाय ।
वा द्वात्रिंश मल्लमुष्टि साहे । तरि नास होय दोस जेने ॥१९७॥

---

२७ घुबड,

अथवा हरोनि सर्वे धन । ग्रामातोनि द्यावे काढून ॥
हे प्रायश्चित्त असति तीन । पूर्वाचार्यांनि कथिले असे ॥१९८॥
मग त्यात काढोनि वाहिर । पुसता झाला नरेस्वर ।
हे त्रिधादंड कथिले थोर । त्यात अंगिकार काय करिसि ॥१९९॥
तो नृपासि वदे सत्वरी । गोमय भक्षिण स्थालभरी ।
मग भृत्याने आनोनि लौकरि । त्याचे समोरी ठेविले ॥२००॥
येक दोन भक्षिता ग्रास । महत्कष्ट होति शरीरास ।
मग म्हने मुष्टि वत्तीस । मारविजे मस मल्लहस्ते ॥२०१॥
मग ते मल्ल त्यालागुनि । मुष्टि मारिता दोनि त्रीनि ।
रुधिर वमिले तत्क्षणि । लागिलि शारनि अधोद्वारे ॥२०२॥
मग ग्लात करी नृपाप्रति । देवा घेवोनि सर्व सपत्ति ।
जिवित्व द्यावे सेवकाप्रति । दया चित्ति आनोनिया ॥२०३॥
तद्वाक्य ऐकोनि नृपान । भाडारी घालोनि सर्व धन ।
काढोनि दिल्हे ग्रामातून । विप्र म्हणोन न मारिले ॥२०४॥
मग तो फिरे देशावरि । भिक्षा मागोनि पोट भरि ।
कष्ट भोगी नानापरि । सदैव करी आर्त्तध्यान ॥२०५॥
आयुष्यंते मरोनि त्वरे । भूपतीचे भाडागारे ।
भुजग होवोनि फुत्कार करे । निरंतरे भयदायक ॥२०६॥
त्या समुद्रदत्ताची नृपवर । परीक्षा पाह्यासी सत्वर ।
तद्रत्नामाजि फार । स्वरत्नसार क्षपिले ॥२०७॥
त्वरे वाहोनि त्याप्रति । वदता झाला भूपति ।
जे तुझे रत्न असति । ते घ्यावे युक्ति वळखुनि ॥२०८॥
तदा तो समुद्रदत्त ज्ञानि । नृपाचे आज्ञा करोनि ।
स्वकिय रत्न तितुक्यातुनि । सत्वर काढोनि घेतले ॥२०९॥

जो नर सदा आचार करिति । तो असत्य न वदे प्राणांति ।
परद्रव्य नाभिलासिति । भय मानिति सर्पापरि ॥२१०॥

उक्तच । श्रेष्ठपुत्रेन रत्नानि । गृहीतानि निजानि वै ।
न विस्मृति सता क्वापि । काले दीर्घतरे गते ॥२११॥

ऐसे पाहोनि नरेश्वर । म्हने धन्य धन्य हा नर ।
सर्वगुणेरत्नाकर[२८] । दिसे चतुर पुण्यपुरुष ॥२१२॥

थोर आनद पावोनि मनि । शुभ मुहूर्त दिन पाहुनि ।
मन्त्रिपद दिल्हे त्यालागुनि । साक्ष करोनि सर्व जन ॥२१३॥

पाहा पुण्याचा भाव । एक पावे पराभव ।
एक देशाचा होय राव । सुख दुःख जीव नित्य भोगिति ॥२१४॥

सुखे राज्य करिति नरेश्वर । मनोहर वनामाजि सार ।
सुधर्माचार्य मुनिश्वर । केले विहार ताराया जन ॥२१५॥

तदा नृपादि सर्वजन । जावोनि केले पदवदन ।
स्वच्छ चित्ते पुढे बैसुन । केला श्रवण द्विधाधर्म[२९] ॥२१६॥

कोन्हे घेतले महाव्रत । कोन्हि घेती अणुव्रत ।
कोन्हि अगिकारिति सम्यक्त्व । शक्ती ज्यात जैशी असे ॥२१७॥

समुद्रदत्त निजातरि । यतिधर्म आइकोनि थोरि ।
वैराग्य पावोनि शरीरि । दीक्षा सत्वरि घेतलि ॥२१८॥

मग करितसे घोर तप । कर्मावरि धरोनि कोप ।
नास करिति पूर्व पाप । जेन्हे दु खव्याप घडेचि ना ॥२१९॥

अत कालि स्वच्छ मन । साधोनि समाधिमरण ।
सिहसेन नृपाचा नदन । स्नेह करोन झाला असे ॥२२०॥

---

२८. समुद्र. २९. मुनिधर्म, श्रावकधर्म.

तदा सिंहसेन भूपति । कर्णि आइकोनि पुत्रोत्पत्ति ।
नानाविध उत्सव करिति । सिंहचद्र इति नाव ठेविले ॥२२१॥

मग द्वितियाचे चंद्रापरि । दिवसदिवस वृद्धि करी ।
मोह करिति नरनारी । ऐसे पदरि थोर पुण्य ॥२२२॥

तदा भूप येके दिवसि । आनंद धरोनि मानसि ।
भाडारगृहामाजि प्रवेसि । निजद्रव्यासि पाहावया ॥२२३॥

तदा श्रीभूतिचर सर्प । नेत्रि पाहिला तो भूप ।
अद्भुत उद्भवला कोप त्यात । खादले पापकर्मियाने ॥२२४॥

तत्क्षणि चढिले महाविष । अचेचन झाला तो नरेश ।
शीघ्र बाहोनि मात्रिकाहिस । ते उपायास करितात ॥२२५॥

मुख्य सुघोष मत्रवादिन । स्वमत्रशक्ति करोन ।
सर्वाऽहि[३०] कुलासि बाहुन । त्याहाकारण वदतसे ॥२२६॥

अहो जे असति निर्दोष । अग्निकुंडे करोनि प्रवेस ।
त्वरे जावे स्वास्पदास । भय त्याहिस क्वचिन्नसे ॥२२७॥

जो असे आमुचा चोर । त्याग्हे विश उत्रोनि सत्वर ।
जिवत करावा नरेश्वर । न तरि लौकर दीप द्यावे ॥२२८॥

तत्कथिल्याप्रमाणे करोनि । सर्वे गेले निजस्थानि ।
श्रीभुतिचर राहिला बैसोनि । महामानि महाक्रुधि ॥२२९॥

तदा मत्रवादि वदे त्यासी । तू येकला का रे बैसलासी ।
काढोनि घेइ निजजहरासि । न तरि प्रवेसी चाग्निकुडे ॥२३०॥

तो वदे मी अगधनकुलि । जन्मलो असो महाबलि ।
कृतकार्यासि न मिटलि । शरीर होळि होय जरि ॥२३१॥

---

३०. सर्प

मग तो सिहसेन भूपति । आर्त्तध्याने पावोनि मृति ।
सल्लकिवने झाला हस्ती । कर्मगति करोनिया ॥२३२॥

तो सर्प वदोनि वैद्यास । अग्निकुंडे केला प्रवेस ।
मरोनि त्याचि वनास । पुन्हा आसीविश[31] उद्भविला ॥२३३॥

उक्तच । मृत्वा कुर्कुटसर्पोभूत् पापी तत् सल्लकिवने ।
पापीना पुनरावर्तो भवत्येन कुयोनिषु ॥२३४॥

पतिमृत्यु पाहोनि त्वरित । रामदत्ता होवोनि दुक्खित ।
शीघ्र जावोनि वनात । महद्दिक्षात घेतले ॥२३५॥

पित्याचे पाहोनि मरण । सिंहचद्र वैराग्य पाउन ।
पूर्णचद्र वधुकारन । दिल्हा सपूर्ण राज्यभार ॥२३६॥

वनी जावोनि घेतलि दीक्षा । करपात्रि करिति भीक्षा ।
तपाग्नि करोनि कर्मकक्षा[32] । करिति रक्षा वैरियाची ॥२३७॥

तपप्रभावे करोन । उद्भविले चतुर्थ ज्ञान ।
पृथ्विवरि करिति पर्यटन । भव्यजनसबोधावया ॥२३८॥

विहार करिता येके दिनि । सिंहचद्र महामुनि ।
रामदत्तार्यिकाने पाहुनि । पाविलि मनि महदानद ॥२३९॥

तत्समीप जानोनि सत्वरी । भक्ति धरोनि अतरी ।
नमोस्तु केला चरणावरि । बैसली समोरि शुद्ध भावे ॥२४०॥

मग मुनिप्रति वदे ऐसी । स्वामी हे धन्य मम कुक्षी ।
जेन्हे नवमास वाहिले तुसि । पुरुषरत्नासि गुरुराया ॥२४१॥

पूर्णचद्र जो तवाऽनुज[33] । त्वा त्यासी दिधले थोर राज ।
तो मग्न असे त्यामाज । धर्मकाज विसरला ॥२४२॥

---

३१ सर्पचि झाला. ३२. वनाचि. ३३. भाऊ.

तो असता महाचतुर । राज्य करिति असार ।
केवल दुर्गतिचे माहेर । धर्मांगिकार करील कधि ॥२४३॥

ऐकोनि मातेचे वचन । मुनींद्र वदे तिज कारन ।
ससार विचित्र असे जान । ते मी सांगिन जननि तुज ॥२४४॥

सीहसेन जो तव पति । राज्य करिता धर्मरीति ।
सर्पाने भक्षिले वर श्रीभुति । पावला मृति ततक्षणि ॥२४५॥

मरोनिया आर्त्तध्याने । गजेंद्र झाला सल्लकिवने ।
मजवरि धावला क्रोधाने । माराव्या कारने मज प्रति ॥२४६॥

मग म्या म्हनितले त्यासी । रे करींद्र मज का न जानसि ।
तू सिहसेननृप होतासि । सीहपुरासि प्रसिद्ध ॥२४७॥

मी होये गा तव नदन । सीहचंद्र नामे जान ।
मजवरि मोह धरोन । पालग्रहन केले त्वया ॥२४८॥

आता होवोनि क्रोधयुक्त । आलासि मज माराव्यात ।
ऐसे वदता पावला शात । उद्भविले त्यात जातीस्मृति ॥२४९॥

मग करोनि दीर्घस्वर । रोदन करी गयवर ।
मम पदि करी नमस्कार । वारंवार भक्तिभावे ॥२५०॥

मग तो वैसोनि मम पुढा । प्रस्तावा करु लागला गाढा ।
म्या धर्मोपदेश देवोनि प्रौढा । त्या तिर्यंचमूढा संवोधिले ॥२५१॥

तेन्हे शुद्धभावसहित । मूलगुणाष्ट[३४] पंचाणुव्रत ।
घेवोनिया त्वरित । दोपरहित पाळी सदा ॥२५२॥

शुष्क तृण भक्षि निरंतरी । प्रामुक नीर प्राशन करी ।
जे आदळे पापाणावरि । वा दोनप्रहरि सूर्याताप ॥२५३॥

---

३४. वड, पीपल, फेपरी, उबर, कटुबरफल, मद्य, मास, मधु.

व्रत पालिता निशिदिन । शरीर झाले अतिक्षीण ।
येके दिवसि नदीकारन । पाण्यासि जीवन गेला त्वरे ॥२५४॥

तेथे कर्दमी मग्न झाला । तत्क्षणि तो कुर्कुटाहि[35] आला ।
इभ[36] मस्तकावरि बैसला । भक्षु लागला तत्पल[37] ॥२५५॥

उक्तंच । क्षीणकायो नदीतीरे । निर्मग्न. कर्दमे तदा ।
श्रीभूतिचर सर्पेण । कुर्कुटाख्येन भक्षित: ॥२५६॥

तत्कालि तो गयवर । स्मरी पंच नमस्कार ।
सकल सन्यास घेवोनि सार । साधिले सत्वर समाधिमृत्यु ॥२५७॥

मृत्युपावोनि शुद्धभाव । वारव्या स्वर्गि झाला देव ।
वृद्धिवंत श्रीधर नाव । सामान्य देवपद सेविति ॥२५८॥

देवागणामध्ये नितनित । नवनवे भोग भोगित ।
धर्मे करोनि त्रैलोक्यात । प्राणियात काय उणे ॥२५९॥

मुनि हत्या पापे करोनि । तो कुर्कुट सर्प मरोनि ।
चतुर्थ नरकि जानुनि । दु.खयोनि भोगिति ॥२६०॥

मग त्या दंतीचे दंत । मुक्ताफले करोनि सहित ।
भिल्लाने नेवोनि त्वरित । पूर्णचंद्र नृपात भेटविले ॥२६१॥

ते दंत आणि मुक्ताफल । नृपाने पाहोनि सुढाल ।
भिल्लाकारणे तत्काळ । उचित पुष्कळ दीधले ॥२६२॥

मग बलावोनि स्वर्णकार । गुफिला मुक्ताफलाचा हार ।
राज्ञि कंठे मनोहर । अति सुदर सोभतसे ॥२६३॥

त्या युग्मदंताचे च्यार पाये । करोनि पर्ल्यंकि लाविले आहे ।
वरि पहुडोनि भोग भोगावे । सौख्यामाजि जाय दिननिसि ॥२६४॥

---

३५. सर्प. ३६. हस्तीचे. ३७. मास.

माते कर्माचि विचित्र गति । म्या कथिलि तुजप्रति ।
त्वा जावोनि ऐसे रीति । त्यासि निगुति सबोधिजे ॥२६५॥

हे वाक्य ऐकोनि त्वत्सुत । जानोनि संसार दुःखान्त ।
जिनधर्म करील अगीकृत । अज्ञानदशात सांडोनिया ॥२६६॥

मुनिवाक्य ऐकोनि सार । पुन्हा करोनि नमस्कार ।
नृपासन्निध जावोनि सत्वर । दुऱ्होनि पुत्र पाहिला ॥२६७॥

तेन्हे पाहोनिया जननि । उठल्या पल्यका वरोनि ।
नमस्कार केला तत्क्षणि । मस्तक चरणि ठेवोनिया ॥२६८॥

मग योग्य स्थानि बैसलि । पुत्रास संबोधु लागलि ।
जैसी युक्ति मुनिने कथिलि । भासु लागली त्यापरि ॥२६९॥

म्हणे पुत्रा आइक मद्वचन । त्वत् पिता जो सीहसेन ।
मेला सर्पडंस होऊन । आर्तध्यान करोनिया ॥२६९ अ ॥

तो मरोनि सल्लकिवनात । गजेद्र झाला माहात ।
मुनिसंन्निध घेवोनि व्रत । मूलगुणसहित वसुविध ॥२७०॥
तो सर्प मरोनि त्याचि वनि । जन्मला कुर्कुट सर्पयोनि ।
दीर्घकाया पावोनि रौद्रध्यानि । सदा जीवाजोनि भक्षिति ॥२७१॥
एके दिवशी तो करी[३८] । तृषाक्रांत होवोनि शरीरी ।
जल प्याव्या गेला नदीतिरि । चिखलाभीतरि तो रुतला ॥२७२॥
निघायाचि नसे शक्ति । तो सर्प यवोनि दुर्मति ।
पुन्हा भक्षिले गजाप्रति । पापमति करोनिया ॥२७३॥
महदुपसर्ग पाहोनि । सकलसन्यास घेऊनि ।
समाधिमृत्यु साधोनि । स्वर्गि जावोनि देव झाला ॥२७४॥

---

३८. हत्ती.

त्याचि गजेंद्राचे दंत । भिल्लाने आनोनि दिल्हे तूत ।
त्वा लाविले पल्यंकात । मुक्ताहार सोभित राज्ञिकठे ॥२७५॥
आइकोनि माताचे वचन । कठमुक्त करिति रोदन ।
म्हने हे नर्कचि कारण । माते म्या अज्ञानपने केले ॥२७६॥
पल्यंकपाद काढोनि त्वरे । हृदइ धरोनि नरेश्वरे ।
पिता पिता पुकार करे । आक्रंदन करे पुन.पुना ॥२७७॥
सज्जन आनि अंत:पुर । रुदन करिति फार ।
आलिगिति दंत निहार । वारवार मोहवले ॥२७८॥
मिळोनिया वृद्धपुरुष । संबोधवाक्य वदोनि सरस ।
समजाविति भूपतीस । अनित्य वृत्तीस दर्शविति ॥२७९॥
राया या ससृतिभीतरि । नित्य असे भरो भरि ।
एक जन्मे एक मरे सत्वरि । यथा लहरि समुद्राच्या ॥२८०॥
ऐसे जानोनिया त्वया । अति शोक न करावा राया
चित्त द्यावे धर्मकार्या । मोहमाया साडोनिया ॥२८१॥
आइकोनि वृद्धाचे वचन । स्थिर करोनिया मन ।
गधाक्षतपुष्पे करोन । केले पूजन दंताचे ॥२८२॥
मग करोनि अग्निसंस्कार । स्वच्छ होवोनि नरेश्वर ।
जिनधर्म केला अंगिकार । जानोनि संसार क्षणभंगुर ॥२८३॥
उक्तच । अनित्यानि शरीरानि विभवो नैव शाश्वतः ।
सन्निसन्निहितो मृत्युः कर्तव्यो धर्मसग्रहः ॥२८४॥
तो पूर्णचद्र नरपति । मित्य श्रावक व्रत पालिति ।
सन्यास ग्रहन करोनि अती । दशम स्वर्गाप्रति देव झाला ॥२८५॥
रामदत्ता तपे करोनि । स्त्रिय लिंगासि छेदोनि ।
चतुराराधना आराधुनि । स्वर्गि जाउनि देव झाला ॥२८६॥

तो सिंहचंद्र मुनीश्वर । तपतपोनि महाघोर ।
अंती मृत्युसाधोनि सार । झाला अहमिंद्र ग्रैवांतिमे ॥२८७॥
यानंतर सभाजन । आइका स्वच्छ करोनि मन् ।
पुढे कथितो कथन । त्या सिंहसेन भूपतीचे ॥२८८॥
जबूद्वीपामाजि सार । भरत क्षेत्र असे सुदर ।
त्यामाजि पर्वत असे थोर । मनोहर रुप्पाचल ॥२८९॥
तेथे नग्र असे सूर्यपुर । नृप सुरावर्त खगेश्वर ।
राज्य करिति प्रताप थोर । जिनधर्मावर प्रीति असे ॥२९०॥
यशोधर तपाचि रानी । रूप सौभाग्य गुणाचि खानि ।
दानपूजाशील गुनि । उपोषण पर्वनिनित्य करी ॥२९१॥
सिंहसेन नृपचरजीव । स्वर्गाहोनि चवोनि देव ।
तत्गर्भि जन्मला पुण्यास्तव । रश्मिवेग नाव पावला ॥२९२॥
मग तोऽनुक्रमे करोन । पद पावला यौवन ।
सर्व गुणे दिसे निपुन । प्राग्पुण्य करोन जानिजे ॥२९३॥
तो सुरावर्त्त खगेश्वर । अस्थिर जानोनि संसार ।
पुत्रासि देवोनि राज्यभार । दिक्षा सत्वर घेतलि ॥२९४॥
मग तो रश्मिवेग भूप । राज्य करिति स्वप्रताप ।
धर्म आचरीति निष्पाप । भेदिति व्याप कर्माचा ॥२९५॥
कवने येकिय दिवसि । होवोनि यावि मानवासी ।
सिद्धकूट चैत्यालयासि । वदनेसि गेला त्वरा ॥२९६॥
जिनाध्रि वदन पूजन । केले शुद्ध भावे करोन ।
पुन्हा करोनि नमन । दिशावलोकन करिति ॥२९७॥
रगमडपामाजि सार । हरिचंद्र नामे मुनिश्वर ।
पाहोनि जावोनि सत्वर । केला नमस्कार तत्पदि ॥२९८॥

श्रवण करोनि द्विधाधर्म । तोडोनिया मोहनी कर्म ।
होता झाला मुनिमुत्तम । मोक्ष धाम प्राप्त व्हाव्या ॥२९९॥

भयंकर वनी तपा चरी । क्वचित् वसे गिरिगव्हरि[39] ।
शीतकालि नदीतीरि । नित्य धरी धर्मध्यान ॥३००॥

तदा येकिय दिवसि । रश्मिवेग महाऋषि ।
गुफामाजि निर्भयेसी । व्युत्सर्ग ध्यानासि होते धरिले ॥३०१॥

तो कुर्कुटसर्प मरोनि । गेला होता नर्क भुवनि ।
तेथे नाना दुःख भोगुनि । झाला मरोनि अजगर ॥३०२॥

प्राक्तन वैरे करोनिया । तो अजगर पापिया ।
त्वरे जावोनि त्या ठाया । मुनिवरकाया भक्षिलि ॥३०३॥

उपसर्ग साहोनि धोर । शुभ मृत्यु साधोनि मुनीश्वर ।
कापिष्टस्वर्गि झाला सुर । देवदेविनिकर पद सेविति ॥३०४॥

मग तो अजगर दुष्ट । मरोनिया अतिपापिष्ट ।
चतुर्थ नरकि भोगिति कष्ट । क्रियानष्ट दुराचारी ॥३०५॥

छेदन भेदन तापन । सूलारोपन विदारन ।
वैतरनीमाजी दुख दारुण । यथा लवन व्रणामाजि ॥३०६॥

सहस्र विंचुडकिल्या जैसी । वेदना होय मानवासी ।
त्यापेक्षा अधिक दिवानिसि । नारकिकासि होत असे ॥३०७॥

ऐसे जानोनि ज्ञानि नर । कवनासि न धरावे वैर ।
सर्वजनासि मित्राचार । निरतर असू द्यावा ॥३०८॥

त्या सीहसेन नृपाचा जीव । कापिष्टस्वर्गि असे जो देव ।
तो मरोनि अतिजन्मोद्भव । पावला ते सर्व सागितो ॥३०९॥

---

३९ गुफा.

चक्रपुर नामे असे नगर । सोभे जैसे फणींद्रपुर ।
तेथे चक्रायुध नरेश्वर । स्वप्रतापे थोर राज्य करिति ॥३१०॥

चित्रमाला नामे करोनि । त्या भूपतीची असे रानी ।
स्वामि आज्ञा पालि निसिदिनि । दानधर्मी प्रीति असे ॥३११॥

तदा तो देव पूर्णायुसि । चवोनि जन्मला तिचे कुसि ।
वज्रायुध नाम ठेविले त्यासी । महोत्सवेसि सज्जनाहि ॥३१२॥

मग तो दिन दिन वृद्धि करी । रूप गुणकलाचा तुरि ।
प्रताप व्यापिला पृथ्वीवरी । सूर्यापरि जानिजे ॥३१३॥

राज्य योग्य पाहोनि पुत्रासि । भूप आनदला मानसी ।
राज्यभार देवोनि तयासि । वैराग्य मानसी पावला ॥३१४॥

मग त्वरे जावोनिया वनि । वंदिला दिगबर मुनि ।
दिंक्षा घेवोनि तत्क्षणी । धर्मध्यानि राहिला ॥३१५॥

ते वज्रायुध भूपति । स्वप्रतापे राज्य करिति ।
दया धरोनिया चित्ति । प्रजा पालिति पुत्रभावे ॥३१६॥

नित्य पालिति श्रावकाचार । दानपूजा करी निरतर ।
भोग भोगिति पुण्याधार । मनोहर दिवानिसि ॥३१७॥

चिरकाल भोगोनिया राज्य । स्वपदि स्थापोनि आत्मज ।
साधिले स्वकिय आत्मकाज । दिक्षाभाज पणिलि ॥३१८॥

द्विपद्भेद करिति तप । क्षय करिति पूर्वपाप ।
कर्मावरि धरोनि कोप । मोडिति व्याप दुर्गतिचा ॥३१९॥

तो श्रीभूतिचर स्वर्प जान । चतुर्थ नरकि दु.ख भोगुन ।
आयुष्याते मरोन । किरात[४०] जन्म पावला ॥३२०॥

---

४०. भिल्ल

तो वज्रायुध मुनिश्वर । प्रियुंग नामे पर्वतावर ।
ध्याने तिष्टला होता स्थिर । जैसी गिरिवर चूलिका ॥३२१॥

भिल्लाने पाहोनिया यती । क्रोधे करोनि दुर्मति ।
वाने च्छेदिले मुनिप्रति । मुनिने सुमृति साधिली ॥३२२॥

मग सर्वार्थसिद्धि विमानी । अहमिंद्र पावला मुनि ।
आयु तेत्तीस सागर जानि । सौख्य त्या स्थानी भोगति ॥३२३॥

तो भील्ल मरोनि पापिष्ट । सप्तम नरकि गेला दुष्ट ।
तेत्तीस सागर भोगिति कष्ट । दु.ख उत्कृष्ट दुराचारी ॥३२४॥

तो अहमिंद्र सौख्य भोगुन । आयुष्याते चविला तेथुन ।
तव[41] ज्येष्ट बंधु झाला येऊन । नामे करोन सजयत ॥३२५॥

सीहसेनाचा लघु सुत । जन्म घेवोनि वहुत ।
तु संजयांताचा लघुभ्रात । नामे जयत होतासी ॥३२६॥

तुम्ही दोघे पितावरोबरी । दीक्षा घेवोनिया थोरी ।
तप करित होते भारी । गिरिकदरि निसिदिन ॥३२७॥

महद् उग्र तपे करोनि । वैंजयत महामुनि ।
अष्टकर्मासि जिकुनि । अचलस्थानी गेला त्वरे ॥३२८॥

ते निर्वाणपूजा करायात । देव आले होते समस्त ।
त्वा पाहोनि फणीद्र विभूतीत । निदान बधात बाधिले ॥३२९॥

शुभध्याने मरोनि सत्वर । तू झालासि भुवनेश्वर ।
तेथे सौख्य भोगिसि थोर । पुण्यप्रकर करोनिया ॥३३०॥

तो भिल्ल नरक दु ख भोगुनि । मध्यलोकि येउनि दुर्योनि ।
तिर्यंच गत्यादि करोनि । ॥३३१॥

---

४१. हे नागेंद्र.

ऐरावत क्षेत्रामाझारी । भूतारण्य वनाभीतरि ।
वेगवति नदीतीरि । गोशृग भिकारि तापसि वसे ॥३३२॥
शखिनि नामे असे तज्जाया । तो पापिष्ट संसारि भ्रमोनिया ।
हरिणशृग नामे करोनिया । तिचे पासोनिया उद्भवला ॥३३३॥
विद्युद्रष्ट नामे करोन । करिति पंचाग्नि तपसाधन ।
खगेंद्रवैभव पाहुन । बांधिला निदानबंध यान्हे ॥३३४॥
अहो नागेद्र या दोघाचे । वैर असे प्रागभवाचे ।
हेचि कारण उपसर्गाचे । जानिजे वाचे मम त्वया ॥३३५॥
तो संजयंत मुनिश्वर । उपसर्ग साहोनि घोर ।
अतकृत् केवलि होवोनि सार । झाला भ्रतार मुक्तिचा ॥३३६॥
अहो अहो नागपती । विचित्र असे ससारवृत्ति ।
जानोनि सोडि हा दुर्मति । दया चित्ति धरोनिया ॥३३७॥
तद्वाक्य करोनि श्रवण । म्हने मी सोडितो यालागुन ।
परतु यासि श्राप देइन । जेन्हे शासन घडे थोर ॥३३८॥
म्हने विद्याधराचे कुलि । जरी ध्यानासि असति बलि ।
तरी विद्यासिद्धि निर्मलि । कवने कालि न होइजे ॥३३९॥
ऐसे वदोनिया व्यक्त । नागफाशाहोनि केले मुक्त ।
विद्या छेदोनि समस्त । बलरहित केला त्वरे ॥३४०॥
दिवाकर देवासि वदोनि । बैसोनि स्वकीय विमानी ।
उद्योग धरिला ततक्षणि । निजस्थानि जावयासि ॥३४१॥
तत्कालि तो विद्याधर । फणीद्रापुढे आला सत्वर ।
मस्तक ठेवोनि चरणावर । वदे मी किंकर असे तुझा ॥३४२॥
जे जे म्या अपराध केले । ते त्वा न मोजावे वहिले ।
उदरि पाहिजे साटोपिले । दास आपुले जानोनिया ॥३४३॥

देवा तू आहेसि दयावंत । मद्विज्ञप्ति असे तूत ।
विद्या देवोनि सेवकात । करि अकित आपुले ॥३४४॥
ऐसे वदोनि विद्याधर । मस्तक ठेवोनि पायावर ।
रुदन करिति दीनस्वर । वारवार पाया पडे ॥३४५॥
श्रवन करोनि रंक उक्ति । नागेद्र वदे करुणचित्ति ।
जरी ऐकसी रे मद्उक्ति । तरीऽविद्या प्राप्ति होय तुज ॥३४६॥
या हिमवत पर्वती । सजयंत मुनिचि करोनि मूर्ति ।
करीतिल पूर्वी पूजाभक्ति । तऱ्ही विद्या प्राप्त होइल ॥३४७॥
वैसोनि मुनिचे समोरी । ध्यान लाविति नासाग्री ।
विद्यासिद्धि होय सत्वरि । मानवनारि कारणे ॥३४८॥
ऐसे वदोनिया त्यासि । होवोनिया विमानवासी ।
जाता झाला स्वास्पदासि । पद्मिनीसी सौख्य भोगिति ॥३४९॥
तो सजयंत महामुनी । तपमहात्म्य प्रगटोनि जनि ।
झाला अष्ट महागुणी । ते मजलागुनि देइ सपदा ॥३५०॥
उक्तच । इत्युत्कट तपोलक्ष्मीभूतत्कालक्ष्मी च शाश्वती ।
सजयत मुनिः प्राप्तः सोऽस्माक सत्सुख क्रियात् ॥३५१॥

इति आराधना कथाकोशे संजयंत मुनि तप महात्म्य कथा संपूर्ण । प्रसंग पांचवा ।

इति कथाकोश रत्नकीर्ति विरचिते स्वहस्ते लिखित्वा ।

ऐरावत क्षेत्रामाझारी । भूतारण्य वनाभीतरि ।
वेगवति नदीतीरि । गोशृग भिकारि तापसि वसे ॥३३२॥
शखिनि नामे असे तज्जाया । तो पापिष्ट संसारि भ्रमोनिया ।
हरिणशृग नामे करोनिया । तिचे पासोनिया उद्भवला ॥३३३॥
विद्युद्रंष्ट नामे करोन । करिति पंचाग्नि तपसाधन ।
खगेंद्रवैभव पाहुन । बाधिला निदानबंध यान्हे ॥३३४॥
अहो नागेंद्र या दोघाचे । वैर असे प्रागभवाचे ।
हेचि कारण उपसर्गाचे । जानिजे वाचे मम त्वया ॥३३५॥
तो संजयंत मुनिश्वर । उपसर्ग साहोनि घोर ।
अतकृत् केवलि होवोनि सार । झाला भ्रतार मुक्तिचा ॥३३६॥
अहो अहो नागपती । विचित्र असे संसारवृत्ति ।
जानोनि सोडि हा दुर्मति । दया चित्ति धरोनिया ॥३३७॥
तद्वाक्य करोनि श्रवण । म्हने मी सोडितो यालागुन ।
परंतु यासि श्राप देइन । जेन्हे शासन घडे थोर ॥३३८॥
म्हने विद्याधराचे कुलि । जरी ध्यानासि असति बलि ।
तरी विद्यासिद्धि निर्मलि । कवने काळि न होइजे ॥३३९॥
ऐसे वदोनिया व्यक्त । नागफाशाहोनि केले मुक्त ।
विद्या छेदोनि समस्त । बलरहित केला त्वरे ॥३४०॥
दिवाकर देवासि वदोनि । वैसोनि स्वकीय विमानी ।
उद्योग धरिला ततक्षणि । निजस्थानि जावयासि ॥३४१॥
तत्कालि तो विद्याधर । फणींद्रापुढे आला सत्वर ।
मस्तक ठेवोनि चरणावर । वदे मी किंकर असे तुझा ॥३४२॥
जे जे म्या अपराध केले । ते त्वा न मोजावे वहिले ।
उदरि पाहिजे साटोपिले । दास आपुले जानोनिया ॥३४३॥

देवा तू आहेसि दयावंत । मद्विज्ञप्ति असे तूत ।
विद्या देवोनि सेवकात । करि अकित आपुले ॥३४४॥
ऐसे वदोनि विद्याधर । मस्तक ठेवोनि पायावर ।
रुदन करिति दीनस्वर । वारवार पाया पडे ॥३४५॥
श्रवन करोनि रंक उक्ति । नागेंद्र वदे करुणचित्ति ।
जरी ऐकसी रे मद्‌उक्ति । तरीऽविद्या प्राप्ति होय तुज ॥३४६॥
या हिमवत पर्वती । संजयत मुनिचि करोनि मूर्ति ।
करीतिल पूर्वी पूजाभक्ति । तऱ्ही विद्या प्राप्त होइल ॥३४७॥
बैसोनि मुनिचे समोरी । ध्यान लाविति नासाग्री ।
विद्यासिद्धि होय सत्वरि । मानवनारि कारणे ॥३४८॥
ऐसे वदोनिया त्यासि । होवोनिया विमानवासी ।
जाता झाला स्वास्पदासि । पद्मिनीसी सौख्य भोगिति ॥३४९॥
तो संजयंत महामुनी । तपमहात्म्य प्रगटोनि जनि ।
झाला अष्ट महागुणी । ते मजलागुनि देइ सपदा ॥३५०॥
उक्तच । इत्युत्कट तपोलक्ष्मीभूतत्कालक्ष्मी च शाश्वती ।
सजयंत मुनिः प्राप्तः सोऽस्माक सत्सुख क्रियात् ॥३५१॥

**इति आराधना कथाकोशे संजयंत मुनि तप महात्म्य कथा संपूर्ण । प्रसंग पांचवा ।**

**इति कथाकोश रत्नकीर्ति विरचिते स्वहस्ते लिखित्वा ।**

○ ● ○

# प्रसंग सहावा

पंचपरमेष्ठीचे चरणि । उत्कृष्ट भाव धरोनि ।
मद्वंदना साष्टाम लोटनि । व्हाव्या लागुनि कार्यसिद्धि ॥१॥

माय माजी वागेश्वरी । सेवकाचे अज्ञानहरि ।
नित्य स्स्मरू हृदयातरि । साह्य करि ग्रथसिद्धि ॥२॥

पूर्वाचार्यादि सद्गुरू । ससारसागरि महातारु ।
तत्पदि मम नमस्कारु । ज्ञानदातारु मज असे ॥३॥

मग गौतम गणधराप्रति । श्रेणिक करोनि विनति ।
पुसता झाला सम्यक्त्वयुक्ति । नाम–गुण–रीति कैसी असे ॥४॥

तत्प्रश्न ऐकोनि गणधर । म्हणे अगा हे मगधेश्वर ।
आइक चित्त करोनि स्थिर । सागीन विचार दर्शनाचा ॥५॥

पूर्व उपसम–सम्यक्त जान । क्षयोपसम दूजे मान ।
क्षायिक तृतीय प्रमान । गुण–लक्षण जुदे जुदे ॥६॥

मिथ्यात आणि सम्याग्मथ्यात । सम्यक्प्रकृति करोनि सहित ।
अनंतचतुष्टय कषाय यात । मिळवोनि सात होय प्रकृति ॥७॥

हे सप्त प्रकृति जान । जिवालागि शुद्धदर्शन ।
कदा न होउ दे उत्पन्न । यथा रत्न वस्त्रे झाकिले ॥८॥

सप्त प्रकृति होता शात । तदा उद्भवे उपसम्यक्त ।
क्षयोपसमे द्वितीय होत । सूर्य आच्छादित अभ्र यथा ॥९॥

सप्त प्रकृतिचा होता क्षय । क्षायिक सम्यक्त प्रगट होय ।
यत्प्रसादे करोनि भव्य । मोक्षासि जाय तद्भवि ॥१०॥
जैसे नदीचे डहूळ जल । पात्रि भरिल्या क्वचि होय निर्मल ।
आदोलिता पुन्हा गादळ । होय सकल पूर्ववत ॥११॥
तैसे उपसमसम्यक्त । गुरूपदेसे होय जिवात ।
पुन्हा सेविति मिथ्यामत । कुगुरूसगत करोनिया ॥१२॥
क्षयोपसम्यक्त होय जरि । प्राणि न सोड तिय केसरी ।
मिश्रधर्माचि प्रीतिकरि । यथामृतावरि विष भक्षिति ॥१३॥
जैसे स्फटिकाचे बासन । अंतर्बाह्य समान ।
तैसे क्षायिक–सम्यक्त जान । निर्मलपण रत्नतुल्य ॥१४॥
अष्टागे करोनि सहित । जाणावे राया सम्यक्त ।
जे पालिति दृढचित्त । ते स्वर्गमोक्षा तद्भवे जाति ॥१५॥
टाळोनि पचविशति दोष । जे पालिति सुद्ध सम्यक्तास ।
तत्पुण्याचा प्रकास । त्रैलोक्यजना सहर्षकारी ॥१६॥
श्रेणिक म्हणे श्रीगुरुराय । अष्ट अगाचे नाव काय ।
ते जुदे जुदे सागावे जेण्हे । नास होय मम अज्ञान ॥१७॥
तत्प्रश्न ऐकोनि गणपति । वदे अगा चेलनापति ।
तू आयिक स्थिर चित्ति । अष्टाग निगुति सागीन ॥१८॥
नि:शकित प्रथमगुण । नि.काक्षित द्वितीय मान ।
निर्विचीकत्सा तृतीय जान । चतुर्थ नाम अमूढता ॥१९॥
उपगूहन अग पाचवा । सुस्थितिकरण जानि सहावा ।
सप्तम वात्सल्यालकृत जाणावा । अग आठवा प्रभावना ॥२०॥
अष्टागे करोनि सहित । पचविशतिदोषरहित ।
जे पाळिति शुद्ध सम्यक्त । ते तद्भवि मोक्षात जातिल ॥२१॥

तदा श्रेणिक म्हणणे हो स्वामी । पचेविस दोष ते कवनि ।
ते वदावे कृपावचनि । जेण्हे भव्यालागुणि कळु येईल ।।२२।।

तत्प्रश्न ऐकोनि गणेश । वदता झाला श्रेणिकास ।
कथितो पचविस दोषा । स्थिरचित्तास करोनि आइक ।।२३।।

मूढत्रय आणि अष्ट मदा । षडायतनष्ट पृथविध ।
शंकादि अष्ट मिलवोनि वृदा । जाणावे भेद पचविस ।।२४।।

उक्तंच । मूढत्रयमदाचाष्टतथानायतनानि षट् ।
अष्टशकादया दोषा दृग्दोषा पंचविशति ।।२५।।

देव आनि शास्त्रमूढ जानि । गुरुमूढ तृतीय मानि ।
अष्टमद जीवालागुनि । दु:खदानि भवभवि ।।२६।।

ज्ञानधनतपबल । सीलिपरूप-जातिकूल ।
हे अष्टमद टाळावे सकल । सम्गक्त निर्मल होय जेण्हे ।।२७।।

मिथ्यादेव तयाचे भक्ता । मिथ्याशास्त्रस्त्रोतारसहित ।
मिथ्यागुरु आणि तत्सेवक । हे जाणावे व्यक्त अनायतन ।।२८।।

नि:शकितादि अष्टगुण । त्याचा निश्चय न धरिति जन ।
तेचि सम्यक्तासि दूषण । भव्यजन जानिजे ।।२९।।

हे पंचेविसदोषयुक्त । जे पालिति सम्यक्त ।
त्याहाकारणे मुक्तिपथ । जन्माधवत् दिसेचिना ।।३०।।

जरि सम्यक्ताचा येक अग । दोषरहित पालिति अभग ।
तरी मुक्तिवल्लभासग । अक्षय भोग भोगितिल ।।३१।।

**इति दर्शन पीठिका**

**अथ सम्यक्त अष्टांगकथा प्रारभ्यते ।**

**नि:शंकितगुणकथा**

तद्वाक्य ऐकोनि चेलनापति । कर जोडोनि करि वीनति ।
स्वामी येक अग पालोनि युक्ति । शाश्वत गति कोन पावले ॥१॥
हे सभाजनासि भले । देवा पाहिजे सागितले ।
श्रवण करिता पाप भंगिले । भवातरि केले ते नास होति ॥२॥
गणेन्द्र वदे नुपाकारण । नि शकित गुणाचे कथन ।
कथितो सभाजनाकारण । करावे श्रवण येकचित्ते ॥३॥
या भरतक्षेत्रामाजि सार । मगधदेश असे थोर ।
त्यामाजि राजगृहनगर । अत्यंत सुदर दिसे जगि ॥४॥
वनोपवने करोनि सोभति । मनोहर वापिका राजति ।
जलभृतसरोवर दीसति । क्रीडा करिति मोर सारस ॥५॥
नग्रावाहीर आम्रवनि । नित्य विहार करिति मुनि ।
उपदेसिति भव्यालागुनि । कर्मापासुनि सोडविति ॥६॥
नग्रापरते प्राकार असे । गोपुरे करोनि राजत असे ।
ध्वजा-तोरणे मनोहर दिसे । साक्षात जैसे स्वर्गपुर ॥७॥
माजि राजधानि हम्र्यावलि । द्रव्यभृत सोभे हट्टावलि ।
धनाढ्य नादति श्रावकमडळि । सदाकाळि सेविति जिनधर्म ॥८॥
जेथे असति जिनमदिर । सिखरवद्ध मनोहर ।
जन पूजा करिति निरतर । दान च्यार नित्य देति ॥९॥
तेथे श्रेष्ठी असे जिनदत्त । नित्य पालिति शुद्ध सम्यक्त ।
आचरिति श्रावकव्रत । करिति स्वहस्तदानपूजा ॥१०॥
उक्तंच । श्रीमज्जिनेद्रपादाब्जसेवनैकमधुव्रता ।
दानपूजाव्रताद्युक्त श्रावकाचारमडिता ॥११॥
मासामाजि च्यार जान । करिति पर्वणि उपोषण ।
मुनि नातरि जाणून । धरिति ध्यान निश्चल ॥१२॥

येकदा कृष्णचतुर्दसि । श्रेष्ठि होता उपवासी ।
स्मशानि जावोनिया निसि । कायोत्सर्ग ध्यानासि होते धरिले १३

ते स्मशान दिसे भयंकर । कितियक प्रेते आनोनि नर ।
करिति दहनसस्कार । नरनारि थोर शोक करिति ॥१४॥

स्वच्छदे नाचति भूतावळ । शब्द करिति कोल शार्दूल ।
जेण्हे गर्जति भूमंडल । दिसे विक्राल प्रेतभूमि ॥१५॥

आता हे कथा येथेच राहो । पुढें सांगतो आइका हो ।
जेण्हे चुके ससारमोह । धराल लाहो धर्माचा ॥१६॥

स्वर्गि येक देव असति । नामे करोनि अमितगति ।
तो असे शुद्ध सम्यक्ति । जिनपदि भक्ति दृढ असे ॥१७॥

तन्मित्र असे येक देव । विद्युत्प्रभ जयाचे नाव ।
सदा चित्ति वसे कुभाव । कुगुरू देव नित्य सेविति ॥१८॥

कवने एके दिवसि जान । दोघे एके ठाइ वसून ।
चित्तोत्से करिति भाषण । प्रीति करोन परस्परे ॥१९॥

अमितगति वदे मित्रात । तू नित्य सेविसि मिथ्यामत ।
जेण्हे जावोनि दुर्गतित । दु ख अगणित भोगसि ॥२०॥

जऱ्ही मम मित्र अससि । तऱ्ही मद्वाक्य ऐकसि ।
आनद होईल मन्मानसि । प्रीति दोघासी थोर चालल ॥२१॥

साडोनी मिथ्यात्वी गुरूदेवा । नित्य अर्हंतदेव पूजावा ।
निर्ग्रंथ गुरूचि करि सेवा । जेण्हे होय ठेवा सुकृताचा ॥२२॥

तदा विद्युत्प्रभ म्हणे सज्जन । वे गुरूदेव असे नग्न ।
क्वचिन्न सेवसनभूषण । लज्जाहीन फिरति वनि ॥२३॥

आमुचा देव लक्ष्मीकात । राहि रुक्मिणिसहित ।
नानाविधभोग भोगित । भक्तजनात सौख्यदायक ॥२४॥

गुरू आमुचे ससीश्वर । पंचाग्नितपसाधिति थोर ।
भक्त कार्यासि धावति सत्वर । वैकुठनगर प्राप्त करिति ॥२५॥
तद्वाक्य ऐकोनि अमितगति । वदतसे मिष्ट वचनोक्ति ।
त्वा चालावे मध्यलोकाप्रति । जेण्हे हरे भ्रांति कुमताचि ॥२६॥
तेथे आपुले असति गुरू । तत्तपाची परीक्षा करूं ।
जे असति ज्ञानसागरू । तद्भक्ति करू दोघेजन ॥२७॥
त्वद्गुरू असे जमदाग्नि । मद्गुरू असति महामुनि ।
वसति गिरिकंदरवनि । मेरुवद्ध्यानि तिष्ठति ॥२८॥
तेथे जावोनि सत्वर । त्याहासि उपसर्ग करू थोर ।
जे ध्यानाहोनि न चलति वीर । तो धर्म्मधुरंधर सेउ गुरू ॥२९॥
ऐसा विचार करोनिया । मध्यलोकि येवोनिया ।
अमितगति वदे तया । आधि कौने ठाया चालतोसि ॥३०॥
तो वदे जेथ असे मद्गुरु । तेथे चालावे सत्वरु ।
तत्तपाची परीक्षा करु । धीर कायरु कळु येईल ॥३१॥
तयासि वदे अमितगति । त्वा करावि एक युक्ति ।
निजनिजरूमपरावृत्ति । कपोतकपोति होउ आपण ॥३२॥
ऐसा विचार करोनि अतरि । कपोतिरूप धरिले सत्वरि ।
होति जालि गरोधरि । शब्द उच्चारि अतिमजुळ ॥३३॥
कपोतासि वदे हो स्वामी । ह्या ऋषीचे कूर्च्चस्थानि ।
मृदु असे रोमसचनि । होईन मी प्रसूत येथे ॥३४॥
ऐसे वदोनि त्वरित । प्रवेस केला कूर्चकात ।
तेथे क्रीडा करिति व्यक्त । बाहिर आंत जाति येति ॥३५॥
अमितगति पक्षि होऊन । वदे कपोतिनिकारण ।
जरि योग्य असे हे स्थान । तरि निर्भयपण येथे राहिजे ॥३६॥

मी जावोनि वनातरासि । प्राप्त करोनि अन्ननुदकासि ।
घेवोनि येइन तुजपासि । त्वा क्वचिद्भ्रयासि न मानावे ॥३७॥
कपोति म्हणे हो मम धनि । जरि तु न येसि फिरोनि ।
तऱ्ही मी येकली या स्थानि । राहू तुझ्यावाचुनि राहू कैसि ॥३८॥
क्वचित्शपथ वाहोनि जावे । अन्नोदक शीघ्र घेवोनि यावे ।
मग येथे राहोनि ममसवे । भोग भोगावे मनविच्छित ॥३९॥
तदा तो वदे कपोतिप्रति । जरि मि न ये तुजप्रति ।
तरि मज या तापसिचि । गति होईल दुर्गति दु:ख थोर ॥४०॥
तद्वाक्य ऐकोनि जमदग्नि । क्रोध व्यापिला अंत कर्णि ।
कूर्च्चं घर्षिति हस्तयुग्मि । गेली उडोनि कपोति तदा ॥४१॥
त्याचे ध्यान करोनि ध्वस । अमितगति वदे मित्रास ।
मद्‌गुरुची परीक्षा पाह्यास । मनोल्हास चाल त्वरा ॥४२॥
बैसोनि विमानि चालतावरि । पावले राजगृह नगरि ।
श्रेष्ठी पाहिला स्मशानातरि । वदे वैखरि मित्राप्रति ॥४३॥
आइक मित्रा मद्वजन । तू काय चालिसि मुनिकारण ।
परतु या श्रेष्ठीचे मन । ध्यानापासोनि सोडवि ॥४४॥
ऐकोनि तयाचे उत्तर । रूप करोनि भयकर ।
उपसर्ग करिता झाला थोर । गर्जिति घोर सिंहगर्जना ॥४५॥
शाकिनि-डाकिनि-वेताल । भूत-राक्षस-महाकाल ।
रूप करिति विक्राल । दीर्घदतालस्थूलकाय ॥४६॥
उपसर्ग करि जव जव । श्रेष्ठी ध्यानारूढ होय तवतव ।
प्रगट करोनि शक्तिभाव । लाविला जीव स्वात्मध्यानि ॥४७॥
उक्तच । तस्योपसर्गं कश्चक्रे कृष्णरात्री महास्तदा ।
स धीरश्चलिते नैवासदृष्टिनिजयोगत: ॥४८॥

निश्चल पाहोनि श्रेष्ठीचे मन । हृदि थोरानद पाहून ।
म्हणे धन्य धन्य हे जिनशासन । हा श्रावक असोन महाशक्ति ४९
प्रात:काल झाल्यावर । मायारूप करोनि दूर ।
तत्पदि करोनि नमस्कार । स्तुतिसार करू लागले ॥५०॥
सम्यक्‌दृष्टिश्रावक जानुनि । थोर आनंद पावोनि मनि ।
विद्या दिधलि आकाशगामिनि । पुण्यसाधिनि श्रेष्ठीप्रति ॥५१॥
तदा वदे तो आमितगति । हे विद्या झालि तुजप्रति ।
जे जे पुण्यक्षेत्र असति । त्या स्थानाप्रति नेईल त्वरा ॥५२॥
तुझिया वचने करोन । जो श्रावक असे भव्यजन ।
सम्यक्त्व दृढ असे ज्या कारण । त्यासि विद्यासाधन होईल ॥५३॥
ऐसे वदोनि निर्जर । स्वस्थानि जावोनि सत्वर ।
सांडोनिया मिथ्याचार । जिनधर्मावर प्रीति धरिलि ॥५४॥
झाली जानोनि विद्याप्राप्त । अकृत्रिम यात्रा करायात
जाउ लागला निसिगुप्त । पुन्हा गृहात यती त्वरा ॥५५॥
नित्य उठोनि पश्चिमनिसि । पूजा द्रव्य घेवोनि हर्ष मानसि ।
जावोनि सिद्धकूटचैत्याल्यासि । जिनपकजासि सदा पूजिति ॥५६॥
ऐसे करिता येक दिनि । सोमदत्त सेवकाने श्रेष्ठी ।
येता पाहिला नयनि । वदे वचनि श्रेष्ठीप्रति ॥५७॥
म्हणे अहो स्वामी दृढसम्यक्ति । नित्य उठोनि पश्चिमराति ।
जात असा कौने कार्या । सेवका निगुति सागिजे ॥५८॥
ऐकोनि सेवकाचे वचन । निष्कपट सरल प्रणाम ।
वदता झाला तयाकारन । करोनिया शुद्धमन ॥५९॥
आकासगामिनि मजप्रति । विद्या जालि असे प्राप्ति ।
तत्प्रसादे करोनि मेरूप्रति । नित्यप्रति जात असो ॥६०॥

तेथे स्वर्णमय जिनालय । रत्नबिंबउन्नतकाय ।
नयनि पाहता आनंद होय । पाप जाय पदं वदेत् ॥६१॥
पचमेरु आणि कुलाचलाद्रिसिखरि । विजयार्धसिद्धकूटावरि ।
सुवर्णमय जिनमदिरि । करितो निरंतर जिनपूजा ॥६२॥
कोटि सूर्यचद्राचे तेज । नखाग्रि दिसे सहज ।
तेथे येवोनि देवराज । साधिति काज पुण्याचे ॥६३॥
तेथे जावोनि नित्यप्रति । करोनिया येतो पूजानुति ।
गुप्त येवोनि गृहाप्रति । वेवहाररीति चालवितो ॥६४॥
ऐकोनि श्रेष्ठीवचन म्हणे । स्वामी तू कृपेचा निधान ।
पोशावरि दया करोन । विद्यादान द्यावे मज ॥६५॥
मज विद्या प्राप्त झाल्यावरि । पूजाद्रव्य घेवोनि करि ।
नित्य येवोनि तुझे बरोबरि । पुण्य थोर मिळवीन ॥६६॥
त्वप्रसादे करोनि मज । पुण्य प्राप्त होईल सहज ।
जेण्हे स्वर्गाचे मिळे राज । मुक्तिभाज अनुक्रमे ॥६७॥
तदुक्त ऐकोनि जिनदत्त । सम्यग्दृष्टि दयावत ।
विद्यासाधनाविधानात । दिल्हा त्याप्रति ॥६८॥
पूर्वि असावे षष्टोपवासि । मग कृष्णचतुर्दशिचे दिवसि ।
श्मशानि जावे महानिसि । भयभीतासि भयदायक ॥६९॥
शताष्टपादाचे जान । दर्भसिकेस करोनि निर्माण ।
वटतरुशाखासि बाधोन । त्यामाजि जावोन बैसजो ॥७०॥
शिक्याखालेतिदुर्धर । छुरिका भल्लका कटियार ।
उर्ध्वमुखे स्थापोनि शस्त्र । यथा वक्त्र यमाचे ॥७१॥
गधाक्षतादि पूजा करोनि । असिपुत्रिका करि घेवोनि ।
पंचनमस्कार उच्चारुनि । छेदिजे तत्क्षणि यक यक पदा ॥७२॥

पस्तीस अक्षराचा सार । जपोनि मंत्र नवकार ।
सिक्याचा एक एक पदर । धरोनि धीर छेदित जावे ॥७३॥
या परिचे विधान । करोनिया दृढमन ।
जर करिसि विद्यासाधन । तुजकारण सिद्धि होईल ॥७४॥
तो सेवक सोमदत्त । श्रेष्ठी वाक्य ऐकोनि व्यक्त ।
आचरिता झाला तद्वत्त । विद्याप्राप्त व्हाव्यास्तव ॥७५॥
कृष्णचतुर्दशिचे रयनि । सर्वसामग्रि मिळवोनि ।
बैसला सिक्यामाजि जाउनि । दृढ करोनि निजमन ॥७६॥
पस्तीस अक्षरि मंत्रसार । स्थिरचित्ते करि उच्चार ।
सिक्याचा यक यक पदर । छेदिति धीर धरोनिया ॥७७॥
ऐसे दहा पाच पाद जान । छेदिले दृढ करोनि मन ।
एकाकि अधोभागे पाहून । भयभीत मन झाले त्वरे ॥७८॥
म्हणे हेऽस्त्र तीक्ष्ण दिसति । श्रेष्ठिने कथिलि युक्ति ।
पडताच विद्या नव्हे प्राप्ति । तरी प्राण जाति फुकाफुकि ॥७९॥
ऐसा करुनि विचार । तरुतलि उतरला गवार ।
म्हणे हा प्राण गेलियावर । विद्या देण्हार काय आहे ॥८०॥
पुन्हा दृढ करोनि चित्ता । जावोनि बैसला शिक्यात ।
मन्त्रोच्चार करोनि त्वरित । एक एक पादा तच्छेदति ॥८१॥
पुन्हा दुच्चित होऊनि मन । करिति चढनोसरन ।
कैचि सिद्धि निश्चयाविन । मूर्खालागुन होयेचिना ॥८२॥
जिनेश्वराची वचनोक्ति । निश्चय नसे ज्या नराप्रति ।
त्यासि कार्यसिद्धिप्राप्ति । त्रिजगति होयच्चिना ॥८३॥
उक्तंच । येषा श्रीमज्जिनेदाणा, स्वर्गमोक्षसुखप्रदे ।
वाक्ये सन्निश्चयो नास्ति, तेषा सिद्धिर्न भूतले ॥८४॥

तो सोमदत्त गवार । चढे उतरे वारंवार ।
तावत्काय झाला विचार । तो आइका चतुर सभाजन ॥८५॥
याचि नगरामाझारि । गणिका असे अंजनसुदरि ।
अजनतस्कर तिचे मदिरि । दिवसरात्र जात असे ॥८६॥
येके दिवसि वसंतमासि । राज्ञिसहित ग्रामनारीसि ।
जावोनि आम्रवनासि । मनोल्हासि करिति क्रीडा ॥८७॥
तदा ते अजनसुदरि । राज्ञीचे कठाभीतरि ।
रत्नहार पाहोनि सत्वरि । हृदइ विचारि दु.खित चित्ते ॥८८॥
जरि मम मदिराप्रति । ऐसि वस्तु नसति ।
तरी धिक्कार असो मजप्रति । वृथा क्षितिभार केला ॥८९॥
शीघ्र स्वगृहासि येउन । पलंगावरि करोनि शयन ।
तळमळ करि दु खित होउन । अन्न पान न आवडे ॥९०॥
तत्क्षणि तो तस्कर । निशामाजि दोन प्रहर ।
येवोनि तिच्या पलगावरि । बैसोनि फार विनोद करिति ॥९१॥
तिजसि पाहोनि व्यग्रचित्त । वाक्य वदे हुदतफुदत ।
म्हणे गे काय व्यथा झालि व्याप्त । ते मज सागि त्वरे ॥९२॥
प्रिये दु खाचे कारण । त्वा वदावे मजलागुन ।
दुर्गम अथवा सुगम । नास करिन क्षणामाजि ॥९३॥
तदा गणिका वदे त्याप्रति । मद्वाक्य आइकावे जी पति ।
या नगरिचा भूपति । ऐसे धर्ममूर्ति प्रजापाल ॥९४॥
कनकमाला त्याची वल्लभा । रूपे जैसि तिलोत्तमारभा ।
नित्य उपार्जित पुण्यलाभा । गृहाचि शोभा फार दिसे ॥९५॥
तिचे कठि नवरत्नहार । म्या पाहिला मनोहर ।
त्या वाचोनि जन्मअसार । मम मंदिर वृथा दिसे ॥९६॥

जरि तो हार आणोनि देसि । तरीच मम भर्तार होसि ।
न तरि येवो न मद्गृहासि । निज वक्त्रासि दाउ नको ।।९७।।
म्हणे प्रिय स्वर्गवस्तुचि इच्छा असे । ते मी आनीन सर्वसे ।
हे कार्य मम नखाग्रि नसे । दुऱ्हावित केसे मजप्रति ।।९८।।
त्वरे निघोनि तेथोनि । जावोनिया राजभुवनि ।
हार घेतला उपाय करोनि । राजमदिरातुनि निघाला ।।९९।।
त्या हाराचा उद्योत । पडता झाला रस्त्यात ।
कोट्टपाल पाहोनि व्यक्त । तस्करास जानितले ।।१००।।
धरा धरा करि पुत्कार । मागे लागले राजकिंकर ।
तदा काढोनिया हार । गांवाबाहिर पळाला ।।१०१।।
श्मशानामाजि गेला तत्क्षणि । सोमदत्त पाहिला नयनि ।
चढनोत्तरन क्षणोक्षणि । काय म्हणोनी करतोसि ।।१०२।।
तो म्हणे जिनदत्त श्रेष्ठीन । आकाशगामिनि विद्याचे विधान ।
मज कथिले मत्रसाधन । ते असाध्य जान दिसे मज ।।१०३।।
अजन पुसे तयासि । मत्रविधि अरे कैसि ।
त्वरित वदावे मजसि । उसिरासि लावू नको ।।१०४।।
तदा मत्र पचनमस्कार । कथिला शुद्ध पस्तीसाक्षर ।
सपूर्ण करोनि उच्चार । छेदिजे पदर युक्त येक येक ।।१०५।।
तदा सोमदत्ताकारण । छुरिका घेतली मागून ।
शिक्यामाजि बैसला जाऊन । जिनदत्तवचन निश्चय हृदि ।।१०६
म्हणे श्रेष्ठीवाक्य निश्चय मज । सत्य असे मत्रराज ।
निःशक होवोनि हृदइ निज । छेदिले सहज सर्वपाद ।।१०७।।
न पडता शस्त्रावरि । विद्या येवोनि क्षणाभीतरि ।
अंजना धरिला वरचेवरि । गेली अवरी घेवोनिया ।।१०८।।

तस्कराकारण विद्या म्हणे । तवातरि असेत वदने ।
देवा मज शीघ्र आज्ञा देणे । तुजकारणे तेथे नेईन ।।१०९।।
मेरुगिरिश्रीजिनमदिरि । जिनदत्त भक्ति करोनि थोरि ।
पूजा करिति जिनाघ्रि । नेइ सत्वरि तेथे मज ।।११०।।
उक्तंच । यत्र मेरौ जिनेन्द्राणा, प्रतिमा· परिपूजयन् ।
श्रेष्ठि सन्तिष्ठते भक्त्या, तत्र मा प्रापय ध्रुवं ।।१११।।
तदाकाशगामिनिविद्येन । अजन चोरासि घेउन ।
श्रेष्ठीपुढे ठेविले नेउन । येकक्षण लागता ।।११२।।
ज्याचा जिनधर्मि असे निश्चय । त्यासि त्रिलोकी उणे काय ।
पद सेविति भक्तिभावे । चतुर्निकायदेवदेवि ।।११३।।
तच्चरण वदोनि सत्वरि । वदता झालाजन तस्कर ।
देवा त्वत्प्रसादे मनोहर । विद्या मज सार प्राप्त झाली ।।११४।।
आता निजसेवकावरि । पूर्ण कृपा करावी सत्वरि ।
जेण्हे प्राप्त होय शिवनारि । चुकति यझारि ससृतिच्या ।।११५।।
परोपकारी तो जिनदत्ता । तयासि घेवोनि त्वरित ।
चारणमुनिचे पकजास । पचागसहित नमविले ।।११६।।
त्रिकर्णे घेवोनि दीक्षाभार । तप करिति दुर्धर ।
कर्माचा करिति सहार । रणी वीर प्रचड यथा ।।११७।।
अनुक्रमे अजनमुनि । कैलासगिरिवरि जाउनि ।
घातिकर्म विनासोनि । केवलज्ञानी झाला त्वरा ।।११८।।
अघाति कर्माचा करोनि घात । पद पावला शाश्वत ।
मुक्तिकाता वर्णिलि त्वरित । सौख्य अनत पावला ।।११९।।
नि.शकित अग पाळोन । अजन झाला निरजन ।
ऐसे जानोनि भव्यजन । शंका टाळून जिनधर्म्माऽचरा ।।१२०।।

जेण्हे नासोनि संसारदु ख । जींवासि होय शाश्वतसुख ।
हा दर्शनाचा प्रथम अग । जिनभाखसत्य माना ॥१२१॥

इति आराधनाकथाकोशे नि शंकितगुण अंजनतिस्कर कथा ॥ प्रसंग सहावा ॥ ॥६॥
इति कथाकोशरत्नकीर्तिविरचिते स्वहस्ते लिखित्वा ॥



# प्रसंग सातवा

## निष्कांक्षितांगे अनंतमतिकथा

छेतालिस गुणाचे सागर । चतुर्विंशति तीर्थंकर ।
तत्पंकजि नमस्कार । वारंवार सेवकाचा ॥१॥

निष्काक्षित गुणाचा उद्योत । अनतमतिने केला जगात ।
तत्कथाकथिन श्रावकाहित । येकचित्त आइकावे ॥२॥

अगदेशामाझारी । नग्र (नगर) असे चपापुरी ।
पंचकल्याणिक झाले तीर्थेश्वरी । त्याचि शोभा थोरी काय वर्णु ।३।

त्यानगरीचा भूपति । असे वसुवर्धन धर्ममूर्त्ति ।
तयाचि राज्ञि लक्ष्मीमति । गुणवति पतिव्रता ॥४॥

प्रियदत्तनामे करोन । त्यानगरी श्रेष्ठी असे जान ।
जिनपकजि असे लीन । पूजा दान नित्य करिति ॥५॥

अगवति त्याचि असे भार्या । प्रवीण असे धर्मकार्या ।
स्वरूपे जैसि शक्र जाया । जिनपकजया थोर भक्ति ॥६॥

त्यादोघा कारणे महासती । पुत्रि असे अनतमति ।
धर्मवता शीलवति । करिति प्रीति ग्रामजन ॥७॥

येकदा वाला घेवोनि स्कधि । प्रियदत्त पिता धर्मवुद्धि ।
नदीश्वराष्टमिदिन शुद्धि । जिनमदिरा मधि प्रवेसला ॥८॥

जिनपंकजि करोनि वदन । मग रगमंडपि येउन ।
धर्मकीर्ति मुनीचे चरण । भाव धरोन वदिले ॥९॥
अष्ठदिनाचे शीलव्रत । घेतले दृढ धरोनि हेत ।
विनोदे अनंतमतीत । ब्रह्मचर्य व्रत देवविले ॥१०॥
उक्तच । गृहित्वाष्टदिनान्युच्चै क्रीडयाग्राहिता सुता ।
सत्यसता विनोदोपि भवेत्सन्मार्गसूचक. ॥११॥
मग कितिक दिन गेल्यावर । कन्या पाहोनि उपवर ।
करायासि मगलाचार । विवाहारंभ थोर माडिला ॥१२॥
आरभ पाहोनि अनतमति । वदति झाली पित्याप्रति ।
अकालि का चिन्निता भीति । ते मजप्रति निवेदिजे ॥१३॥
पिता वदे कन्येलागुन । वाई तू विवाहाकारण ।
पाहुने येतील म्हनोन । सरजाम करन लागते ॥१४॥
तदा कन्या वदे पित्यासी । पूर्वि देवविले ब्रह्मचर्यासि ।
आता करने विवाहासि । भवभवासि दुःखदाइ ॥१५॥
कन्या वाक्य ऐकोनि निके । म्हने मद्वाक्या ऐक कन्यके ।
विनोदे व्रत देवविले साविके । शुद्ध भाविके तुजप्रति ।।१६।।
कन्या मग वदे पित्याप्रति । जे व्रतनेमाचा हास्य करिति ।
ते नर जाती निरयागति । दुख भोगिति भवभवि ॥१७॥
उक्तच । तेनोक्त क्रीडया पुत्रि दायित ते मया व्रत ।
तयोक्तं तात का क्रीडा व्रते धर्मेच शर्मदे ॥१८॥
पुन्हा वदे कन्या कारण । मर्यादा करोन अष्टदिन ।
व्रत देवविले तुजलागुन । वाई सत्य मान मम वैखरि ॥१९॥
कन्या वदे हे जनक । महाज्ञानि भट्टारक ।
मर्यादा वोलले नाही भाख्य । मुनिनायक सत्यवादी ॥२०॥

त्वाहि स्वकिय वचनोक्ति । अष्ट दिन मर्यादा युक्ति ।
नाहि कथिलि मजप्रति । म्या निज श्रुति न आइकिलि ॥२१॥
आता आइक मम वचन । देवगुरुशास्त्र साक्षित करून ।
जन्मपर्यंत मजकारण । असो नेम ब्रह्मचर्य ॥२२॥
जानोनि कन्येचा निश्चय । विवाहारभाचा केला विलय ।
गृही येवोनि जैनोपाध्याय । सर्व शास्त्रार्थान्वय शिकविला ॥२३॥
कवने येकिय दिवसि । वसंत ऋतु चैत्रमासी ।
हिंदोळा बाधोनि वृक्षासि । गृहारामानंदेसि हिंदोळिति ॥२४॥
विजयार्ध पर्वतावरि । दक्षिजादिक् किन्नर नगरि ।
नेत्री पाहाता जैसी इंद्रपुरि । सोभा थोरी काय वर्णू ॥२५॥
तेथीचा भूप कुंडल मडित । सुकेशी भार्या सहित ।
बैसोनिया विमानात । होता जात आकाश मार्गे ॥२६॥
अधोभागे पाहिली बाला । निशाकरसम मुखमडला ।
स्वरूपे जैसी सोभे कमला । बैसोनि हिंदोळा झुलत होती ॥२७॥
पाहोनि झाला कामातुर । म्हने ज्या गृहि नाही ऐसि नार ।
त्याचा जाना व्यर्थ संसार । भूमिवर भार नरजन्म ॥२८॥
ऐसे चित्ति विचारुन । त्वरे निज गृहा जानुन ।
सुकेशि भार्यासि ठेवुन । आला फिरून बालासन्निध ॥२९॥
तिज बैसोनि विमानात । आकाशमार्गे चालिला त्वरित ।
सुकेशि म्हने मज ठेवोनि कात । कौने कार्यात सीघ्र गेला ॥३०॥
निजयानि होवोनि आरूढ । हृदयी कोप धरोनि प्रौढ ।
भ्रतारा मागे धावलि गाढ । वासोनि दाढ यथा राक्षसि ॥३१॥
तदा भार्यांचे भय मानोनि । पर्ण लब्धि विद्या पाचारोनि ।
भीमाटविमाजी दिल्लि टाकुनि । जैसी गगणा होती विद्युल्लत।३२।

अहो जिनधर्म असे थोर । महिमा वर्णावि कोठवर ।
आकाशमार्गे येवोनि मुनिश्वर । थोर उपकार करोनी गेले ॥८१॥

नृपोक्ति ऐकोनि एक जण । वदता झाला नृपाकारण ।
स्वामी आकाशी गमन । मानवाकारण असे काय ॥८२॥

नृप वदे रे सभानायक । जे महामुनि स्वर्मोक्षदायक ।
तपफले चारणवृद्धि सात्विक । मुनींद्र अनेक गच्छति ॥८३॥

जरी संशय असे मनि । तरी पुसावे मंत्रिलागुनि ।
त्यान्हे आनि आम्हि मिळोनि । चारणमुनि प्रत्यक्ष पाहिले ॥८४॥

तदा प्रधानाकारण । कोन्ही एक पुसे कर जोडून ।
तुम्हि थोर असा पुण्यवान । चारणमुनीन दर्शन दीधले ॥८५॥

ऐसे ऐकोनि तदुत्तर । प्रधान वदे सत्वर ।
आकासि चालति मुनीश्वर । कधि आजवर म्या न पाहिल ॥८६॥

ऐसी वदता असत्यवाणी । तत्क्षणि फुटिले नेत्र दोन्हि ।
असत्योक्ति पापे करोनि । धनकीर्ति हानि होतसे ॥८७॥

ऐसे पाहोनि भूपति । वदता झाला मन्त्रिप्रति ।
जिनधर्मांगि करोनि दुर्मति । तव चित्ति का उद्भवली ॥८८॥

भूपोक्ति ऐकोनि प्रधान । पश्चात्ताप करिति जान ॥
कठमुक्त करिति रुदन । म्हने मी अज्ञान महामूर्ख ॥८९॥

चिंतामणि[1] कल्पवृक्ष । प्राप्त झाले द्यावया दान दक्ष ।
ते म्या गमाविले असाक्ष । भरले प्रत्यक्ष सभातरि ॥९०॥

तदा नृप वदे प्रधानासि । अद्यापि जरि सत्य वदसि ।
तरि सद्य नयनि पश्यसि । त्रैलोक्यासि पुण्यबले ॥९१॥

---

१. रत्न.

तदा मंत्रि वदे 'हो सभाजन । सत्य नृपाचे वचन ।
गगनमार्गे मुनि येऊन । केले संबोधन आम्हाप्रति' ॥९२॥
ऐसि वदताचि उक्ति । नेत्रासि आलि माहाज्योति ।
जैसे तिमिररोग नासति । अंजनप्रवृत्ति करोनिया ॥९३॥
सभाजन ऐसे पाहूनि । आश्चर्य करिति निजमनि ।
जय जय वदति वचनि । जिनशासनि दृढ होति ॥९४॥
कोन्ही घेति सजम । कोन्ही अगिकारले दर्शन ।
कोन्ही घेति व्रत नेम । करिति ग्रहण जिनधर्म ॥९५॥
उदय होताचि दिनकर । पळोनि जाति निशाधकार ।
तैसे मिथ्यामति नर । गेले दूर पळोनिया ॥९६॥
जिनधर्माचा अतिशय । नयनि पाहोनिया राय ।
दिक्षा घेवोनि मनवचनकाय । करिति हृदय स्वात्मध्यान ॥९७॥
ऐसे जानोनि भव्यजन । जिनधर्म करावा लोप न ।
महत्पापाचे कारण । केवल निधान दुर्गतीचे ॥९८॥

काव्य : इत्थ श्रीजिनशासनेऽतिविमले देवेंद्रचद्रार्चिते ।
ज्ञात्वा भव्यजनै. प्रभावमतुलं स्वर्गापवर्गप्रदे ।
त्यक्त्वा भ्रांतिमतीव शर्मनिधये कार्यामतिर्निर्मला ।
धर्मे श्रीजिनभाषितेऽतिनितरा सर्वेष्टससाधिनी ॥९९॥

**इति श्री कथाकोशे श्रीधनदत्तनृपसम्यक्त्वमाहात्म्य कथा संपूर्ण ॥ प्रसंग १६॥**

**इति कथाकोश रत्नकीर्तिविरचिते संपूर्ण प्रसंग ॥१६॥**

• • •

# प्रसंग सतरावा

## अथ ब्रह्मदत्त चक्रवर्ति कथा

अर्हंतसिद्धाचार्य मुनि । पाठक साधूचे चरणि ।
नमन मम असे निसिदिनि । काव्यालागुनि कार्यसिद्धि ॥१॥
माय माझी सरस्वति । तव पदि मम नुति ।
अज्ञानासि देइ मति । कथेप्रति करावया ॥२॥
तरनतारण गुरूराय । सदैव सेवू तयाचे पाय ।
जयाचे प्रसादे ज्ञान होय । अज्ञान जाय पळोनिया ॥३॥
आर्यखंडामाजि सार । कंपिला नगरी असे सुदर ।
खातिक प्राकार गोपुर । वेष्टित चौफेर शोभति ॥४॥
तयाचे भवते उद्यान । वृक्ष फळ पुष्प संपूर्ण ।
वापिका वाटिका[1] करोन । सोभायमान फार दिसति ॥५॥
जेथे धनाढ्य लोक नादति । जिनधर्मावरि थोर प्रीति ।
न्हवन पूजन नित्य करिति । दान देती मुनीश्वरा ॥६॥
त्या नगरीचा नृपवर । ब्रह्मरथ नामे असे थोर ।
प्रताप असे पृथ्वीवर । नित्य जिनवरधर्म करिति ॥७॥
रामील्या नामे करोनि । नृपतीचि असे रानि ।
रूपसौभाग्याचि खानि । प्राणाहोनि वल्लभ असे ॥८॥

---

१. वाडी.

पूर्वपुण्यकरोनि भूपति । निर्विघ्न राज्य करिति ।
पुण्याचे भाडार भरिति । भोग भोगिति निशिदिन ॥९॥
भोग भोगिता नृपासवे । ब्रह्मदत्त करोनि नावे ।
पुत्र उद्भविला यथा सूर्य । सेवति पाय नृप सकल ॥१०॥
पूर्वपुण्योदयकरोन । चक्रवर्तिपद पाविला जान ।
नवनिधि चतुर्दशरत्न । षट्विध सैन्य घोर सपदा ॥११॥
सेनापति स्थपति गृहपति । गजाश्वनारीचक्र प्रोहिति ।
छत्रासिदंड चर्मनीति । मणि काकिनि होति चतुर्दश ॥१२॥
उक्त काव्य । सेनापतिहर्म्यपतिद्विपाश्व–।
स्त्रीचर्मचक्रमणिकाकिनिकापुरोध ।
छत्रासिदंडपतय प्रणमति यस्य ।
तस्मै नमस्त्रिभुवनपरमेश्वराय ॥१३॥
निधिनाम–पद्मकाल महाकाल । सर्वरत्न पाडुक निर्मल ।
नैसर्पं मानव संख पिंगल । पुण्य प्रवल पावलि निधि ॥१४॥
उक्तंच – पद्मकालो महाकाल सर्वरत्नश्चपाडुका ।
नैसर्पा मानव शख पिंगलो निधयो नव ॥१५॥
पूर्वपुण्यकरोन । षट्खंडपृथिवी साधून ।
वग्रामापति येऊन । सौख्य निशिदिन भोगिति ॥१६॥
जिनधर्म पालिति निर्मल । परंतु सम्यक्त्वाचे नसे बल ।
यथा कुभीत उज्वल जल । जिनधर्म कस्मल केला असे ॥१७॥
कवने एकिय दिवसि । महत्क्षुधा व्यापिलि नृपासि ।
निरोप जाहला स्वैपाक्यासि । पाकनिष्पत्ती करावया ॥१८
नृपाज्ञा करोनि सत्वर । क्षीरपाक करोनि तयार ।
पुष्कळ घालोनि दुग्धसाखर । सुगंध द्रव्य फार मिसळिले ॥१९॥

## प्रसंग सतरावा

### अथ ब्रह्मदत्त चक्रवर्ति कथा

अर्हंतसिद्धाचार्य मुनि । पाठक साधूचे चरणि ।
नमन मम असे निसिदिनि । काव्यालागुनि कार्यसिद्धि ।।१।।
माय माझी सरस्वति । तव पदि मम नुति ।
अज्ञानासि देइ मति । कथेप्रति करावया ।।२।।
तरनतारण गुरूराय । सदैव सेवू तयाचे पाय ।
जयाचे प्रसादे ज्ञान होय । अज्ञान जाय पळोनिया ।।३।।
आर्यखंडामाजि सार । कपिला नगरी असे सुदर ।
खातिक प्राकार गोपुर । वेष्टित चौफेर शोभति ।।४।।
तयाचे भवते उद्यान । वृक्ष फळ पुष्प संपूर्ण ।
वापिका वाटिका[1] करोन । सोभायमान फार दिसति ।।५।।
जेथे धनाढ्य लोक नादति । जिनधर्मावरि थोर प्रीति ।
न्हवन पूजन नित्य करिति । दान देती मुनीश्वरा ।।६।।
त्या नगरीचा नृपवर । ब्रह्मरथ नामे असे थोर ।
प्रताप असे पृथ्वीवर । नित्य जिनवरधर्म करिति ।।७।।
रामील्या नामे करोनि । नृपतीचि असे रानि ।
रूपसौभाग्याचि खानि । प्राणाहोनि वल्लभ असे ।।८।।

---

१. वाडी.

पूर्वपुण्यकरोनि भूपति । निर्विघ्न राज्य करिति ।
पुण्याचे भांडार भरिति । भोग भोगिति निशिदिन ॥९॥
भोग भोगिता नृपासवे । ब्रह्मदत्त करोनि नावे ।
पुत्र उद्भविला यथा सूर्य । सेवति पाय नृप सकल ॥१०॥
पूर्वपुण्योदयकरोन । चक्रवर्तिपद पाविला जान ।
नवनिधि चतुर्दशरत्न । षट्‌विध सैन्य थोर सपदा ॥११॥
सेनापति स्थपति गृहपति । गजाश्वनारीचक्र प्रोहिति ।
छत्रासिदंड चर्मनीति । मणि काकिनि होति चतुर्दश ॥१२॥
उक्त काव्य । सेनापतिहर्म्यपतिद्विपाश्व–।

स्त्रीचर्मचक्रमणिकाकिनिकापुरोध ।
छत्रासिदडपतय प्रणमति यस्य ।
तस्मै नमस्त्रिभुवनपरमेश्वराय ॥१३॥

निधिनाम–पद्मकाल महाकाल । सर्वरत्न पाडुक निर्मल ।
नैसर्प मानव सख पिंगल । पुण्य प्रवल पावलि निधि ॥१४॥
उक्तच – पद्मकालो महाकाल सर्वरत्नश्चपाडुका ।
नैसर्पा मानव शख पिंगलो निधयो नव ॥१५॥
पूर्वपुण्यकरोन । षट्‌खडपृथिवी साधून ।
वग्रामापति येऊन । सौख्य निशिदिन भोगिति ॥१६॥
जिनधर्म पालिति निर्मल । परतु सम्यक्त्वाचे नसे बल ।
यथा कुभीत उज्वल जल । जिनधर्म कस्मल केला असे ॥१७॥
कवने एकिय दिवसि । महत्क्षुधा व्यापिलि नृपासि ।
निरोप जाहला स्वैपाक्यासि । पाकनिष्पत्ती करावया ॥१८
नृपाज्ञा करोनि सत्वर । क्षीरपाक करोनि तयार ।
पुष्कळ घालोनि दुग्धसाखर । सुगंध द्रव्य फार मिसळिले ॥१९॥

तदा आसनादिक माडून । त्वरे पाचारिले नृपालागुन ।
स्वर्णथालि क्षीर घालून । त्वरे आणून ठेविलि ॥२०॥

चक्रवर्ती होता क्षुधावत । त्वरे क्षीर घालिताचि मुखात ।
असह्य जाहले नृपात । थोर दुःखित झाला भूपति ।॥२१॥

उदरि पेटलि क्षुधा अग्नि । उष्ण पायस[२] जळति वदनि ।
हृदयी प्रजळिला क्रोधाग्नि । तदा अंत करणी विचारिति ॥२२॥

उठोनिया एके सरि । क्षीरभाजन धरोनि करि ।
रिचविलि तयाचे सिरि । रागससापरि[३] उष्ण थोर ॥२३॥

तत्क्षणि तो सूपकार[४] । पंचत्व[५] पावला सत्वर ।
क्षीराब्धिरत्न द्वीपावर । जाहला व्यंतर देवकुळि ॥२४॥

तदा विभंगावधिकरोनि । प्राग्भव दुर्मृत्यु जानुनि ।
हृदयी पेटलि क्रोधाग्नि । म्हने चक्रिने मजलागुनि मारिले ॥२५॥

तेव्हा होतो मी निर्वळ । चक्रवर्ती होता सवळ ।
पद सेविति खगभूपाल । सुर नर सकल निसिदिन ॥२६॥

चौऱ्याशी लक्ष गयवर । तितुकेचि रथ सुदर ।
अष्टादश कोटि तुरग थोर । पाद चार कोटि छाण्णव ॥२७॥

देव विद्याधर करोनि । षड्विध भोगिति आवनि[६] ।
नव निधान नानाविध लक्षुमी । पुण्य करोनि भोगि तो ॥२८॥

हृदयी करोनि विचार । परिव्राजक रूप धरोनि थोर ।
पुष्पफळ घेवोनि प्रचुर । महामधुर सुधातुल्य[७] ॥२९॥

जावोनि चक्रीचिय पुढे । फल ठेविले रसाळ गाढे ।
शीघ्र बोले लाडे कोडे । भाषण गाढे करितसे ॥३०॥

---

२. क्षीर, ३. कथिल, ४. स्वैपाक्या, ५. मृत्यु, ६. पृथ्वी, ७. अमृत.

तत्समयी तो भूपाळ । नेत्री पाहोनि पुष्पफळ ।
थोर हर्षला हृत्कमळ । घेवोनि तात्काळ स्वकरि ॥३१॥
मग घालोनिया वदनि । भक्षण करिता तत्क्षणि ।
महामधुर अमृताहूनि । सतोप मनि फार दाटला ॥३२॥
तदा म्हने वो ब्रह्मचारि । फळ रसाळ महामाधुरि ।
आनिले कोठुनि निर्धारि । वदावे वैखरी मजलागि ॥३३॥
तद्वाक्य ऐकोनि व्यतर । वदता झाला सत्वर ।
म्हने राया सागरी थोर । दीपावर मम मठ असे ॥३४॥
मम मठाच्चिय सन्निध । वाटिका असति शुद्ध ।
पुष्पफले नानाविध । मिष्ट सुगध फार व्यापिला ॥३५॥
जसे स्वर्गीचे कल्पवृक्ष । मन विच्छिदार्पिति दानदक्ष ।
तैसे फळ असति विनावृक्ष । अमृतापेक्षा फार मिष्ट ॥३६॥
जरी फळ भक्षाव्याकारन । प्रवर्त्तले असे तव मन ।
तरी चालावे शीघ्र येथून । मी नेइन तुज त्या स्थळि ॥३७॥
तद्वाक्य ऐकोनि नरेश्वर । जिह्वालपट लालचि थोर ।
चालिला त्याचियावरोवर । नेनति विचार शुभाशुभ ॥३८॥
लवनाब्धि[८] नेत्रोनि चक्रधर । प्रगटला तो व्यंतर ।
नृपासि वदे दुर्वाक्य थोर । स्वरूप भयंकर करोनिया ॥३९॥
रे रे दुष्ट पापीष्टा । आचारहीना व्रतभ्रष्टा ।
क्रोधे करोनि वरीष्टा । मम कष्टात पावविले ॥४०॥
तव मदिरि मी जान । स्वयपाकि होतो विजयसेन ।
उष्ण क्षीर प्रभावे करोन । क्रोधे मज जाळोंन मारिले रे ॥४१॥

---

८. लवण समुद्र.

तदा मरोनि क्षीरसागरि । व्यंतर झालो बलाढ्य थोरि ।
तुजबू डवीन या सागरि । परम वैरी मम तू असे ॥४२॥

ऐसे वदोनि तो देव । करिता झाला महोपद्रव ।
बुडवू लागला दुष्ट भाव । तदा तो राव विचारि हृदयि ॥४३॥

अहो पंच नमस्कार निर्मल । तयाचे मज असे बल ।
काय करील हा कस्मल । त्रैलोक्य बल न पूरति ॥४४॥

मग दृढ करोनि मन । अपराजित मंत्र पुण्यवान ।
मनोवाक्काय दृढ करोन । पंचगुरू स्मरण करितसे ॥४५॥

तदा तो व्यंतर देव । चित्ति धरोनि कुभाव ।
बुडउ पाहे षट्खडराव । परंतु क्वचिदुपाव चालेचि ना ॥४६॥

अहो तो ब्रह्मदत्त भूपाल । त्रिकर्ण मंत्र स्मरि सबल ।
सागराचे अगाध जल । ते स्थलसम[१] जाहाले ॥४७॥

मंत्रराज प्रभावे करोनि । पापिष्ट जीव मरोनि ।
उत्पन्न होय स्वर्गभुवनि । फार वदोनि काय वृथा ॥४८॥

नृप वैरी आनि चौर । सिंहाग्नि आनि गैवर ।
पीडा करिति फार । ते होति दूर मंत्रप्रभावे ॥४९॥

मंत्रप्रभाव पाहोनि ऐसे । म्हने आता करावे कैसे ।
उपाय विचारि मानसे । वचन भासे नृपाप्रति ॥५०॥

जरी आइकसि मद्वचन । तरी सूटसि मजपासून ।
न तरि घेइन तव प्राण । निश्चय करोन जानिजे ॥५१॥

तद्वाक्य एकोनि चक्रि । भयभीत होवोनि थोरी ।
कंप सुटला सर्वशरीरि । महद्भय धरि मरणाचे ॥५२॥

---

१. भूमि.

अहो तो मिथ्यात्वि केवल । सम्यक्त्वाचे नसे बल ।
मंत्राचा विश्वास न धरि अबल । मूर्खासे केवल जिनशास्त्री ॥५३॥
नौकारमत्रे ज्याचा निश्चय । सुर नर त्याचे सेविति पाय ।
क्षुद्र देव् त्याचे करील काय । भव्यजन निश्चय जानिजे ॥५४॥
तद्वाक्य ऐकोनि भूपति । मृत्यूभयास्तव करिति तलाति ।
देवा रक्षावे मजप्रति । दया चित्ति धरोनिया ॥५५॥
जे तू सागसि मजकारण । तैसे करी न आचरण ।
न घेइ जे मम प्राण । तुजकारण कर जोडितो ॥५६॥
तदा वदे तो व्यतर । महामंत्र पच नमस्कार ।
वामपदागुष्ठे लेहे सत्वर । पस्तीसाक्षर पचपद ॥५७॥
उक्त दुहा–पहले अक्षर सात पढो । पाव पढो मन लाय ।
सात सात नव अक्षरा । गणत पाप मिट जाय ॥५८॥
दक्षिणागुष्ठे करोनि जान । पुसोनि टाकि परमपावन ।
तदा नेवोनि तुजकारन । पोवचाविन तव मदिरि ॥५९॥
तद्वाक्य ऐकोनि चक्रधर । मृत्युभय करावया दूर ।
तैसे करिता झाला गवार । मत्रराजावर निश्यय नसे ॥६०॥
वंदनीक जे त्रैलोक्याप्रति । नाना विघ्न दूर होती ।
पादागुष्ठे पुसिलेल्याप्रति । तो चक्रवर्ति नर्कगामि ॥६१॥
तदा निर्जर विचारि मनि । निर्बल जाहाला षट्खडधनि ।
बुडविता झाला सिंधुजीवनि । कुटुबे करोनि सहित ॥६२॥
रौद्रध्याने मरोनि सत्वर । मिथ्यामति पापिष्ट थोर ।
सप्तम नरकि चक्रधर । जन्मला घोर दु खसागरि ॥६३॥
पंचनमस्कार रहित । ताराव्यासि न दिसे समर्थ ।
महत्पापि तिर्यंच जीवात । सौख्याब्धि स्वर्गात प्राप्त करि ॥६४॥

ऐसा विश्वास न धरी जो मनि । तो दुर्गति क्षितिचा धनी ।
भवभवि भोगिति यमजाचनि । फिरे त्रिभुवनिऽनंतभव ॥६५॥
उक्तच । यस्य चित्ते न विश्वासो धर्मे श्री जिनभाषिते ।
तस्य कि कुशल लोके महादु:कर्मकारिण. ॥६६॥
ऐसे जानोनि भव्यजन । मिथ्यात्व न करावे ग्रहण ।
न त्यजावे सम्यग्रत्न । कल्पवृक्षाहून सोख्यदाइ ॥६७॥
अपवित्र पवित्र असता शरीर । हृदयी स्मरावा पंचनमस्कार ।
सौख्य अथवा दुक्ख दुर्धर । पडल्या क्षणभर न सोडिजे ॥६८॥
मिथ्यात्वाबरोबर पातक । दुजे नसे दु.खदायक ।
जिवासि करोनि वराक[10] । फिरविति अथाक भवसागरि ॥६९॥
ऐसे करोनि भव्यजन । नित्याचरावे जिनशासन ।
मोक्षपद प्राप्त होय जेन । जन्ममरण दूर होय ॥७०॥
भव्यजीव जे जिनभक्त । तत्त्वभाषि ज्ञानवत ।
फार काय वदावे त्यात । काय काजवात सूर्यापुढे ॥७१॥
उक्तंच । तस्मात्त दूरस्त्यक्त्वा, मिथ्यात्वं वातिवत्[11] बुधाः ।
स्वर्मोक्षसाधने हेतु सम्यक्त्वं भावयतु वै ॥७२॥
उक्त काव्य । देवोऽर्हन् भुवनत्रयेऽत्र नितरा दोषौघ सगो तो ।
देवेद्रार्कनरेद्रचद्रखचरै. भक्त्या सदाभ्यर्चित: ।
तद्वाक्य भवसागरप्रवहणप्राय महाशर्मद ।
नित्य चेतसि भावित च भवता कुर्यात् वर मगलम् ।७३।

**इति आराधना कोशे ब्रह्मदत्तद्वादशम चक्रवर्ती कथाप्रसंग १७ समाप्त ॥**
**इति कथाकोशे रत्नकीर्तिविरचिते प्रसंग ॥१७॥** 

---

१०. गरीब, ११ वमनवत्.

# प्रसंग अठरावा

श्री देव-शास्त्र-गुरू वंदू । पंचपरमेष्टी-ज्ञान-सिंधू ।
विनाकारण जगद्‌बंधू । त्रिकाळ विवीधू नमोस्तु ते ॥१॥
माय माझी शारदादेवी । कवित्व कला मार्ग दाखवि ।
वरदहस्त मूर्ध्नि ठेंवि । कृपा करावी दीनावरि ॥२॥
प्रसन्न होवोनि सरस्वती । अभय दिधले मजप्रति ।
ग्रंथ करावा हर्षचित्ति । ज्ञानस्फूर्ति भारती माय ॥३॥
दीनदयाळ मम गुरुराय । तरणतारण त्याहाचे पाय ।
त्याहाचे कृपेन ज्ञान होय । दाखवि सोय कवित्वाचि ॥४॥
तत्पदकमळ स्मरूनि । ग्रंथरचना म्हराष्ट्रवानि ।
श्रोते द्यावे अभयपाणी । कथाश्रवणी सादर पैं ॥५॥
जंबूद्वीपात सुदर्शन मेर । त्या दक्षिणदेशि भरतक्षेत्र ।
देशात मागधदेश पवित्र । पुण्यक्षेत्र तीर्थभूमिका ॥६॥
पुरे खेट आनि नगर । धार्मिक वसति मनोहर ।
सर्व सुखी पुण्यानुसार । क्रिया-आचार-विचारादि ॥७॥
ऐसा देश पुण्यपावन । त्यात राजगृही विस्तीर्ण ।
वापि-कूप-तडाग मनोज्ञ । वन उपवन शोभति ॥८॥
दुर्ग खातिका भयकर । ग्रामदुर्ग ज्या अति सुदर ।
हाट-चौहाट-माडया-गोपुर । दुकानि सावकार शोभति ॥९॥
त्याचे मध्यभागी विस्तीर्ण । चैत्यालय शोभे मेरूसमान ।
पताका करिति अवलबन । सम्यक्त्वजनभाविका ॥१०॥

तत्मदिरि रत्नमय बिब । अनुपम सुवर्णमय ।
रूप्यकादि असभाव्य । स्फटिकमय वेदिकाग्रे ।।११।।
पुण्यवंत श्रावक श्राविका । श्रेणिक चेलना भाविका ।
अष्टविधार्चन जिननायका । करिति भाविका जपस्तोस्त्र ।।१२।।
पढति अध्ययन पठन । गुरु वदति शास्त्रश्रवण ।
स्वामिसि पंचागनमन । आसिर्वचन गृहा जाति ।।१३।।
फणिपानि घेवोनिया । द्वारावलोकन करोनिया ।
तुर्यदिशा पाहोनिया । भाव धरोनिया स्वामिभुक्ती ।।१४।।
जैसा भाव ज्याचे मनी । अवधिज्ञान जानोनि मुनि ।
भ्रामरि यति चारण मुनि । आकाशगमनी उर्ध्वदिशा ।।१५।।
मुनिसी पाहाता तय वेळि । आनद झाला हृदयकमळि ।
कळस होता कराजुळि । नमोस्तु भाळि उच्चार ।।१६।।
नमन करोनि तिष्ट तिष्ट । मत्र वदति दीर्घ प्रष्ट ।
त्री:परित्य भक्ति धीट । करसपुट उदकशुद्धी ।।१७।।
मग द्वय कर जोडोनि । पादार्चन पाणि पानी ।
पंचमुद्रा विसर्जुनि । उचासनि बैसविले ।।१८।।
नमो सिधभक्ति उच्चारून । मोकळे केले उदक अन्न ।
स्वाभिभाव आहार घेवोन । आसिर्वाद पुण्य नवविधा ।।१९।।
आहार घेवोनि वना जाति । धर्मध्यान ऋषि करिति ।
नगरलोक पुण्य जोडिति । काळ क्रमिति धर्ममार्गि ।।२०।।
सम्यग्दृष्टि वाई चेलना । नित्य नेम देवदर्शना ।
अष्टद्रव्यपूजार्चना । जिनार्चना शास्त्रयुक्त ।।२१।।
एकदा श्रेणिक नृपति । स्त्रियेसि ज्ञान सागति ।
धर्म श्रेष्ठ त्रिजगति । वैष्णव म्हणति विख्यात ।।२२।।

तो धर्म अंगिकारावा । बौध्य गुरू चीत्ति धरावा ।
उभयता ऐक्यभाव व्हावा । संयोग करावा रतिकामा ॥२३॥
तुम्ही आम्ही सौख्य भोगन । देवगुरुगुणनिधान ।
ऐसे ऐकोनिया वचन । देवि म्हने जिनधर्म श्रेष्ठ ॥२४॥
श्लोकः– नास्ति अर्हंतात्परो देवो । धर्मो नास्ति दयापर. ।
तप नास्ति निर्ग्रंथं एते सम्यक्त्वलक्षणाः ॥२५॥
टीका– अरहतपरता नाही देव । नीःप्रपचि गुरुराव ।
नीर्व्हींसीक शास्त्रवैभव । हे लाघव तुम्हा नेनवे ॥२६॥
ऐकोनि राज्ञिचे उत्तर । नृपा न सुचे प्रत्युत्तर ।
जानोनि चेलना मनोहर । स्वकीय भ्रतार मन रक्षि ॥२७॥
आर्जवगुण जाने राणी । धर्मवैभव दशलक्षणी ।
विष्टगु ज्ञान किंचितकर्नी । त्व गुरुनय निदर्शीन ॥२८॥
तदा एकदा बौध्यगुरु । भोजनार्थ केला आदरू ।
अमत्रन मडपयोरु । भागवेतादरू पचशत ॥२९॥
ते येवोनि मंडपा आतौती । ध्यान धरोनि बसले चित्ति ।
कपटी षड्मिथ्यामति । चेलना म्हणति हे काय ॥३०॥
ते ऐकोनि एक शिष्ये । म्हणे गेले विष्णुसभेस ।
अज एकादसी दिवस । वैकुंठास सर्वहि गेले ॥३१॥
तेव्हा चेलना करि विचार । देहे भस्म करू अपवित्र ।
अग्नि आनिता ते समग्र । पळाले त्वरे वायसापरी ॥३२॥
राव बोले क्रोधे करून । त्यास देवोनि आमत्रण ।
मडपात करिसि दहन । दु ख दारुण मम गुरुसी ॥३३॥
तदा राज्ञी म्हने राया । अपवित्र देहे टाकोनिया ।
विष्णुपदी सुख भोगाया । चिरकाळ त्या ठाया असावे ॥३४॥

तत्मंदिरि रत्नमय बिब । अनुपम सुवर्णमय ।
रूप्यकादि असभाव्य । स्फटिकमय वेदिकाग्रे ।।११।।
पुण्यवत श्रावक श्राविका । श्रेणिक चेलना भाविका ।
अष्टविधार्चन जिननायका । करिति भाविका जपस्तोस्त्र ।।१२।।
पढति अध्ययन पठन । गुरु वदति शास्त्रश्रवण ।
स्वामिसि पंचागनमन । आसिर्वचन गृहा जाति ।।१३।।
फणिपानि घेवोनिया । द्वारावलोकन करोनिया ।
तुर्यदिशा पाहोनिया । भाव धरोनिया स्वामिभुक्ती ।।१४।।
जैसा भाव ज्याचे मनी । अवधिज्ञान जानोनि मुनि ।
भ्रामरि यति चारण मुनि । आकाशगमनी उर्ध्वदिशा ।।१५।।
मुनिसी पाहाता तय वेळि । आनद झाला हृदयकमळि ।
कळस होता कराजुळि । नमोस्तु भाळि उच्चार ।।१६।।
नमन करोनि तिष्ट तिष्ट । मत्र वदति दीर्घ प्रष्ट ।
त्रीःपरित्य भक्ति धीट । करसपुट उदकशुद्धी ।।१७।।
मग द्वय कर जोडोनि । पादार्चन पाणि पानी ।
पंचमुद्रा विसर्जुनि । उचासनि बैसविले ।।१८।।
नमो सिधभक्ति उच्चारून । मोकळे केले उदक अन्न ।
स्वाभिभाव आहार घेवोन । आसिर्वाद पुण्यं नवविधा ।।१९।।
आहार घेवोनि वना जाति । धर्मध्यान ऋषि करिति ।
नगरलोक पुण्य जोडिति । काळ क्रमिति धर्ममार्गि ।।२०।।
सम्यग्दृष्टि बाई चेलना । नित्य नेम देवदर्शना ।
अष्टद्रव्यपूजार्चना । जिनार्चना शास्त्रयुक्त ।।२१।।
एकदा श्रेणिक नृपति । स्त्रियेसि ज्ञान सागति ।
धर्म श्रेष्ठ त्रिजगति । वैष्णव म्हणति विख्यात ।।२२।।

दिन दिन वृद्धी होत । उभयता श्रुतवृत्तान्त ।
कर्मकरणी अघटित । परि वचन सत्य करावे ॥४७॥
उपवर जाली दोघ जन । लग्न केली आनंदान ।
निसीमध्ये पंचदिन । सुखसपन्न भोगिती ॥४८॥
रात्री मनइच्छा सुखभोग । दिवसा होतसे भुजग ।
पेटारीत घालोनि वेग । कर्मसयोग विचरती ॥४९॥
कृतकर्म न सोडि जीवा । पूर्व जन्माचा जैसा ठेवा ।
ऐसे जानोनि धर्म आचरावा । सखा करावा देवगुरू ॥५०॥
एकदा समुद्रदत्तान । कन्या पाहली म्लानवदन ।
हे पुत्री तुजकारण । दुःख दारुण भ्रताराचे ॥५१॥
अरेरे विघातिया नष्टा । काय लिहिले रे अदृष्टा ।
मम कन्यारूप श्रेष्ठा । भोगिति ती कष्टा अनिवार ॥५२॥
माता करितसे रुदन । कन्या धैर्यवत सगुण ।
माय त्वा सोक न करन । धीर धरने जननीय ॥५३॥
माता गेलि स्वगृहासि । सागति जालि भ्रतारासि ।
कन्या दुःखी निजमानसि । गति कैसि करावि वो ॥५४॥
तेव्हा पिता समुद्रदत्त । गेला पाहू ज्यामातात ।
रात्री दिव्यस्वरूप अत्यत । दिवसासि होत विखारी ॥५५॥
ते पाहोनिया नजर । मनामध्ये करि विचार ।
गुरूमुखे ऐकिले शास्त्र । पुण्ये सहार सर्व पाप ॥५६॥
बाई काही नेम घ्यावा । पापाचा नाश होईल तेव्हा ।
देव गुरु हृदयी धरावा । जेणे विसावा जीवासि ॥५७॥
गुरूपासी नेम घेवोन । दर्शनं पापनाशन ।
ऐसे करिता एक दिन । बुद्धि उत्पन्न जाहाली ॥५८॥

नित्य विष्णुपदि असावे । येथे गमन त्याचे न व्हावे ।
इंद्रपदि सुख भोगावे । उपकारास्तव यत्न केला ॥३५॥
यदर्थी राया व्हावे निश्चित । राग न धरावा मनात ।
तुम्हा सागते एक दृष्टांत । कथा हृदयात धरावी ॥३६॥
वत्स देश महाविख्यात । कौसंबि नगरि असे त्यात ।
प्रजापाळ राजा असे तेथ । राज्य करित पूर्वपुण्ये ॥३७॥
त्या ग्रामी एक पुण्यवान । सागरदत्त गुणनिधान ।
तयाची रमणी षड्गुण । असे सपूर्ण शीलवंती ॥३८॥
तेथेचि एक पुण्यश्लोक । समुद्रदत्त असे भाविक ।
सप्तगुणि तो असे श्रावक । नित्यनेमिक गुरुभक्ती ॥३९॥
त्याची भार्या समुद्रदत्ता । रूपलावण्यगुणवता ।
धर्मशील भाग्यवता । सौख्या आतौता काळकर्मी ॥४०॥
एके दिवसि चौघे जन । जिनचर्चा आनदान ।
ते वसईमधे येवोन । करिति भाषण एकमेका ॥४१॥
विनोदपन गोष्टी सागती । तुम्हा आम्हा होय सतति ।
कन्या अथवा पुत्रप्राप्ती । होता जुगति विवाह करू ॥४२॥
ऐसी भाक दोघा जाली । परस्पर प्रीति उपजली ।
कित्येका दिवसा गर्भिणी जालि । सतत वाढली प्रपचाचि ॥४३॥
सागरदत्तासि पुत्र जाला । वसुमित्र नाम तयाला ।
पूर्वकर्माचा भोग त्याला । भोगन आल जन्मताचि ॥४४॥
रात्रौ जन्म जाला पुत्र । दिवसा भुजंग विखार ।
ऐसे राया कर्मसूत्र । जिवासि फेर चौऱ्याशी ॥४५॥
तथा समुद्रदत्तासी । कन्या झालि गुणराशि ।
नागदत्ता नाम तयासी । स्वरूपे जैसी सुरकन्या ॥४६॥

पंचशतस्वानकुर्कुर । निर्दय पापि अतिथोर ।
यशोधरमुनि तपती उर । शात कुर्कुर ते जाहाली ।।७१।।
तीन प्रदक्षणा देवोन । सन्मुख वसली येवोन ।
अधोमुख स्तब्धनयन । ते दुरोन पाहे श्रेणिक ।।७२।।
म्हणे हा बावा कवटाळी । मांझी स्वान सर्व खिळली ।
याची करिन मी रागोळी । बाणजाळि वरसोनी ।।७३।।
दात खातसे कर्करा । क्रोध नेत्र ताम्रधूम्रा ।
बाणभाता घेवोनि त्वरा । धनुष्य करा चढवितसे ।।७४।।
बाण सोडिले अतितीक्ष्ण । अरा चमकति विद्युत्समान ।
बाणामागे सोडि बाण । तत्क्षण काय वर्तले ।।७५।।
बाणामागे बाण येताती । स्वामिवरे पुष्प पडताती ।
पुष्पमाळा गळा शोभति । दशदिशा जाति सुगध ।।७६।।
तत्समयी राया श्रेणिका । गतिबंध झाला सप्तनरका ।
आयु तेहेतीस सागर पक्का । कर्मझोका पापयोगे ।।७७।।
सुतप पुण्य अतिशय । विघ्नवैरि विनाशनाय ।
ते पाहोनि श्रेणिकराय । करि आश्चर्य अतरि ।।७८।।
जवळ येवोनि पाहे तया । अंतरि उद्भवलि पूर्ण दया ।
मेरुसमान धीरवीरा । व्यर्थ म्या पाप केले ।।७९।।
पश्चात्ताप करि मानसि । आता माझी गति कैसी ।
देवा म्या छळिले हे ऋषि । शरण कवनासी जावे म्या ।।८०।।
मी बुद्धिभ्रष्ट कैसा जालो । बौद्ध गुरुच्या मता भुलला ।
तेने पापावर पडा झालो । वाया भुलला कुज्ञाना ।।८१।।
आता म्या काय करावे । शरण कवनासी जावे ।
त्रिभुवनि न दिसे ठाव । कवना पुसावे आत्महित ।।८२।।

पुण्यउदय जाहाल्यावरि । म्हणे हे पतिदेहे पेटारी ।
हे जाळोनिया झडकरि । सुखमदिरि भोग भोगू ॥५९॥
राया ऐका हो त्या राणिन । तिर्यंच देह दग्ध करून ।
भ्रतार केला पुण्यपावन । सुदेवदर्शन पाप गेले ॥६०॥
तैसे करीत होते राया । कुतपि पळाले भेवोनिया ।
कैचा जप कैचि क्रिया । नरदेह वाया गमाविला ॥६१॥
ते ऐकोनि प्रीयोत्तर । राया न सुचे प्रत्युत्तर ।
क्रोधानीळ डौश अंतर । मौन्य वक्त्र राहिला ॥६२॥
यानतरे एके दिवसि । राव गेला वनक्रीडेसि ।
तेथे पाहिले आतापन ऋषी । कायोत्सर्गेसी मौन्य ॥६३॥
पंचाग्नि साधि मुनिराय । कृश जाहालि त्याहाची काय ।
तपतेजे जैसा का सूर्य । मेरुवत् धीर ज्यापरि ॥६४॥
ऐसा यशोधर तो मुनि । दुरोनि देखियला नयनि ।
चेलना गुरू ओळखोनि । हृदयी अग्नि धडाडिला ॥६५॥
क्रोध उद्भवला दारूण । खड्ग सज्ज केले त्यान ।
म्हने ह्यास टाकावे मारोन । मिथ्याधनयन तद्वत ॥६६॥
जे स्वामीचा क्रोध करिति । ते अंत.काळि दु खी होति ।
परजन्मी नर्कप्राप्ती । भोग भोगिती पापाचे ॥६७॥
ऐसे न करावे भव्यजन । स्वामि कृपा संपादून ।
शक्तिसार भक्ति करून । पुण्यपावन भवभवि ॥६८॥
तेव्हा राजा काय करित । स्वान चेतविली पंचशत ।
ते धावली जैसी भुत । वक्त्रविकसित भयंकर ॥६९॥
ते धावत आलि स्वामिपासी । पुण्य अतिशय तयासी ।
वैरभावनिवृत्ती कुकरासी । त्रिपरित्येसी प्रदक्षिणा ॥७०॥

मुनिदर्शन पापदहन । धर्मश्रवण पुण्यपावन ।
नर्क आयु झाले ऊन । किंचित् भोगन येईल ॥९५॥
चौऱ्याशी सहस्त्रवर्षे एके । आयुभोग राजा श्रेणिके ।
भव्य जीवाचा नायक । शुद्ध श्रावक जैन धर्मी ॥९६॥
तदनंतर एके दिनि । चित्रगुप्तें महामुनि ।
तयाचि भक्ति करोनि । सम्यक्त्व मनि जडियेला ॥९७॥
क्षायोपशम सम्यक्त्व । प्राप्त होता राया श्रेणिकात ।
सत्य सत्य आत्मप्रचित । गुरू सत्य जिनमार्गि ॥९८॥
विपुलाचल पर्वतावर । श्री वर्द्धमान महावीर ।
तत्पदाग्रि नमस्कार । सम्यक्त्वात रक्षायिक मोक्षदायक ॥९९॥
स्वीचक्रे तीर्थंकृन्नाम त्र्यैलोक्येशसमर्चित ।
तस्मात्श्री श्रेणिको भूप तीर्थेश. संभविष्यति ॥१००॥
टीका–मुनिदर्शन करोनी । लीन झाले शास्त्रश्रवनी ।
दृढ सम्यक्त्व अत करणी । पापरजनी मालवली ॥१०१॥
तत्पुण्याचेनि आधार । श्रेणिक होईल तीर्थंकर ।
पुढे तुर्यकाळि अवतार । जगदोद्धार भविष्यति ॥१०२॥
काव्य–स जयतु जिनदेव केवळज्ञानदीप ।
सकलसुरनरेंद्रै खेचरेंद्रै. प्रपूज्यः ।
यदुदित वरवाक्यैर्भावितै स्वस्थचित्तै ।
भवति विमललक्ष्मी नायकोऽसौ मनुष्यः ॥१०३॥
ऐसा जिनधर्म जयवत । त्रिभुवनि सदा यशवंत ।
मतिश्रुति अवधि साक्षात । त्रिगुप्तीवत मुनिराज ॥१०४॥
मनप्रिय केवळज्ञानदीप । अनतज्ञान अनंतस्वरूप ।
अनंत बलाढ्याचाधीप । मुक्तिस्वरूप अनंत सौख्य ॥१०५॥

तव हृदयी आठवे विचारु । मम प्रियेचा हाचि गुरू ।
ते म्हणे सुदेव सुगुरू । तरन तारू त्रिभुवनी ॥८३॥
आता यासिच जावे शरण । हेचि तारक त्रिभुवन ।
पचशास्त्री पाहिली खूण । कुगुरू संपूर्ण दीसति ॥८४॥
ऐसे जानोनि अंतरि । जोडोनिया युगलकरी ।
अपनिंदा मुखे उच्चारी । स्वामिराया तारि शरणांगता ॥८५॥
शरण शरण गुरूराया । शरणागता तारी सखया ।
युग्मपानि जोडोनिया । पनम्य पाया भक्तियुक्ती ॥८६॥
मनि म्हने धन्य गुरू । याचा मजसी न कळे पारू ।
आता मी कैसे काय करु । कोन्हाचा आधारू धरू आता ॥८७॥
ऐसा करिता विचारू । मम रमणीचा हा गुरू ।
ते म्हणे हा ससारतारू । यापरता गुरू नोव्हे दुजा ॥८८॥
धन्य धन्य हे गुरूराय । छळ केला म्या पापिया ।
क्षमा कराऽनेक अन्याय । मनवचकाय शरण आलो ॥८९॥
स्वामिचे सन्मुख वैसोनि । म्हने तारावे आशीर्वचनी ।
उपदेश द्यावा मजलागुनि । कृपा करोनि गुरूराया ॥९०॥
ते यशोधर गुरूराय । अवधी जानोनिया हृदय ।
धर्म उपदेश अतिशय । श्रेणिकराय श्रवण करि ॥९१॥
तत्त्व पदार्थ सारासार । त्रेपणक्रिया धर्म विचार ।
सुदेव सुगुरू सुशास्त्र । चित्त एकाग्र श्रवण केले ॥९२॥
पश्चाताप आनि उपसम । सम्यक्त जडल उपशम ।
भाव झाला उत्तमोत्तम । हृदयी प्रेम गुरूसी पाहे ॥९३॥
पुन: पुन करि नमन । दृढ करोनि अत.करण ।
दृढ सम्यक्त्व होताचि पूर्ण । पापखंडन जाहाले त्रो ॥९४॥

# प्रसंग एकोणिसावा

श्री जिनात्रिजगन्नाथासी । समर्चिते अष्ट विश्वासी ।
पुन्हा वंदना करोनी त्यासी । भाव मानसि दृढतर ॥१॥
देव गुरु वंदोनिया । नमन वागेस्वरिमाया ।
वरदहस्त देई मला । कथा करावया प्राकृत ॥२॥
प्रसन्न होवोनी सरस्वती । अभय दिधले मजप्रती ।
गुरुकृपेची झाली स्फूर्ति । कवित्व मति करावया ॥३॥
सज्ञान श्रोते सावधान । जिनगुणकथा करा श्रवण ।
आत्महित होवे जेन । मोक्षगमन अनुक्रमे पै ॥४॥
मागदेशाच्या त्या भीतरी । मिथुळाया महानगरी ।
धर्मवत नादति सहपरि । दानाचारी करिती पूर्ण ॥५॥
नित्यनेम देवदर्शन । दर्शनं पापनाशन ।
श्रावक श्राविका मिळोन । मार्गप्रभावना करितातो ॥६॥
राजाराणी दोघ दंपति । पूर्व पुण्य सुख भोगिती ।
विख्यात जाली त्याची किर्ती । राज्य करीती मुग्ध मानस ॥७॥
एकदा तो वनक्रीडेस । पाप उद्भवले मानस ।
ताकीद केली सकळास । धरोनी स्वापदास आनावे ॥८॥
सैन्य धाविले चहूकडे । खेखाळती चपळ घोडे ।
धावा घेती एकाकी पुढे । धुरोळा उडे आकाशमार्गे ॥९॥
राजा तुरुगमावरी स्वार । चचळ जेसा तो पक्षीद्र ।
पवनवेगे तो राजीद्र । गेला दुस्तर निबिड वनी ॥१०॥

तयासी पूजिति सकळ सुर । खेचर आनि विद्याधर ।
भूचर जे का चक्रधर । राज्यादि नरेंद्र प्रपूज्य ॥१०६॥
ऐसा जो त्रैलोक्यनाथ । तयासि पूजिति भावार्थ ।
देवगुरूशास्त्रार्थसमस्त । पूर्ण मनोरथ तयाचे ॥१०७॥
लक्ष्मी तयासी अखंडित । संसार सदा यशवत ।
पुत्रपौत्र स जयवंत । कीर्ति अद्‌भुत धरातळी ॥१०८॥
श्रोते व्हावे सावधान । जिनधर्मांचे महत्त्व पुण्य ।
सदासर्वदा मनि धरन । क्षमा सपूर्ण पाळावि ॥१०९॥
पुढील अध्यायी निरोपन । पद्मरथ रायाचे वर्णन ।
रसाळ आणि पुण्यपावन । करिता श्रवण सुखप्राप्त ॥११०॥
अहो हे कथा प्रौढ बहुत । मज न कळे ईयेचा अंत ।
जैसा समुद्र अथाकवत । नेत्र फिरत तत्दर्शिताचि ॥१११॥
तैसा हा शास्त्रसमुद्र । अथाक जीवनकथा समग्र ।
मज दिसति भयंकर । अभयदातार गुरूराय ॥११२॥
तत्कृपा तेचि जहाज । त्यामाजि बैसोनिया मज ।
समुद्रतरावो पाय सहज । लाविति मज पैलथडि ॥११३॥
ईति श्री हा कथाकोष । श्रवण करिता पापनाश ।
शुभदायक भव्य जीवास । मोक्ष जावयास हाच मार्ग ॥११४॥

इति आराधना कथाकोशे रत्नकीर्तिविरचिते
श्रेणिकराजा सम्यक्त्वप्राप्तिवर्णनो नाम प्रसंग ॥१८॥ छ

# प्रसंग एकोणिसावा

श्री जिनात्रिजगन्नाथासी । समर्चिते अष्ट विश्वासी ।
पुन्हा वदना करोनी त्यासी । भाव मानसि दृढतर ॥१॥
देव गुरु वंदोनिया । नमन वागेस्वरिमाया ।
वरदहस्त देई मला । कथा करावया प्राकृत ॥२॥
प्रसन्न होवोनी सरस्वती । अभय दिधले मजप्रती ।
गुरुकृपेची झाली स्फूर्ति । कवित्व मति करावया ॥३॥
सज्ञान श्रोते सावधान । जिनगुणकथा करा श्रवण ।
आत्महित होवे जेन । मोक्षगमन अनुक्रमे पैं ॥४॥
मागदेशाच्या त्या भीतरी । मिथुळाया महानगरी ।
धर्मवत नादति सहपरि । दानाचारी करिती पूर्ण ॥५॥
नित्यनेम देवदर्शन । दर्शनं पापनाशन ।
श्रावक श्राविका मिळोन । मार्गप्रभावना करिताती ॥६॥
राजाराणी दोघ दंपति । पूर्व पुण्य सुख भोगिती ।
विख्यात जाली त्याची किर्ती । राज्य करीती मुग्ध मानस ॥७॥
एकदा तो वनक्रीडेस । पाप उद्भवले मानस ।
ताकीद केली सकळास । धरोनी स्वापदास आनावे ॥८॥
सैन्य धाविले चहूकडे । खेखाळती चपळ घोडे ।
धावा घेती एकाकी पुढे । धुरोळा उडे आकाशमार्गे ॥९॥
राजा तुरुंगमावरी स्वार । चचळ जेसा तो पक्षीद्र ।
पवनवेगे तो राजीद्र । गेला दुस्तर निबिड वनी ॥१०॥

देखता झाला शशकनेणी । तया पृष्टे आस्व उडाणी ।
धावत काकीण वनी । काळगुफा लोचनी दृष्टया ॥११॥
तेथे पूर्व पुण्य करोन । मुनीद्र देखीले रायान ।
त्याहाचे होताचि दर्शन । आनंद मन न समाये ॥१२॥
दैदीप्यमान देखोनिया । तपस्वी धारी रत्नत्रया ।
स्फुरकाती सुवर्णमया । जेवी सूर्या अरुणोदयी ॥१३॥
स्वामि पाहोनीया अद्भूत । उतरले आस्वार नालूल ।
वाग्दोर धरोनीया हस्त । वृक्ष मुळाते बाधिला ॥१४॥
राय करकमळ जोडोन । पचाग नमोस्तुस्ति त्रीशुद्धीन ।
त्रिवार मुखे उच्चारुण । आशीर्वचन धर्मवृद्धी ॥१५॥
राजिद्र सन्मुख वैसला । मुनिंद्र कैसा त्याने देखीला ।
जैसा शात लोण्याचा गोळा । त्या पदकमळे पाहतूसे ॥१६॥
धर्म ऐकिला संपूर्ण । क्षमा आदि दशलक्षण ।
तत्व पदार्थ जिनगुण । करीती पूजन शतइंद्र ॥१७॥
ते ऐकोनिया समस्त । राजा विचार करी मनात ।
धन्य मुनिराज गुणवंत । उपदेशवत आनुपमे ॥१८॥
मग करकमर जोडोनिया । पुसता झाला स्वामिराया ।
तुम्ही आले ते कोठोनिया । कवने ठाया गमनार्थ ॥१९॥
भो मुनि जगदोद्धार । जैनधर्म वुधी सागर ।
तुम्हास मान तपस्वी शूर । उत्कृष्ट सूर पुरुषोत्तम ॥२०॥
कोणी या पृथ्वीतळी । सर्वज्ञ जैसा ज्ञानहेळी ।
सदेह मम हृदयकमळी । निवारण वक्त्रकमळी सांगावे ॥२१॥
तत्श्रुत्वा धर्मधीश मुनि । सागते झाले तत्त्ववाणी ।
श्रृणुत्वम भो महिनायधनी । या मेदनी मगधदेश ॥२२॥

चंपापुरी नाम नगर । तेथे वासपूज्य तीर्थंकर ।
जेवी कोटी सूर्यभास्कर । उष्कृट दातार मोक्षदाता ॥२३॥
त्याहासी झाले केवलज्ञान । अनतवीर्य गुण निधान ।
अनंत बळ त्या कारणा । कारण मेरुसमाना पुरुषोत्तम ॥२४॥
तदाग्रकार्ये मुनिवाक्यम् । कृपाहृदयी प्रीतीदायकम् ।
तत्पादवंदने च हारकम् । मुक्तीदायकं तीर्थराज ॥२५॥
तत्मुनीशी करोनी नमन । मम इच्छा वासपूज्य दर्शन ।
मुर्वचन, शीघ्रगमन । अशीर्वचन मुनिगत्वा ॥२६॥
तेव्हा राय अनदभेरी । देवोनी चालला सहपरीवारी ।
चतुरंगसेना छत्र चामरी । सर्व नरनारी तुर्य संग ॥२७॥
तत्समये आकाशमार्गी । चालले होते द्विखग ।
पूर्वजन्माचे मित्र दोघ । भूमिभाग पाहिले त्यानी ॥२८॥
अवधी जानोनी अंतरी । विश्वभूती तो धनवतरी ।
नृपाचे भाव अतरी । कैसापरी तो पाहू आता ॥२९॥
म्हणोनी उतरले खालूते । विक्री अधि झाले करी ते ।
त्याचे पाहावया सम्यक्त । पुढे मार्गात काय केले ॥३०॥
विक्राळरूप भुजंग झाला । रायापुढे अडवा गेला ।
शिरी छत्रासी भग झाला । अग्र लागला ग्रामायका ॥३१॥
वायु सुटला महाधूळी । पाषाण उडती अतराळी ।
मेघवर्षे धारामूसळी । विद्युत तम महितळी कर्दम ॥३२॥
ते देखोनिया समस्ती । प्रधान आणि सेनापती ।
अपशकुन झाला म्हणती । न जावे पुढती राजेश्री ॥३३॥
ते एकाती राजीयान । म्हणे हे ही सत्यची जाणा ।
तीर्थयात्रेस करीता गमन । त्राता तारन तोची तो ॥३४॥

ज्या नरासी नाही निश्चय । त्यासी पुण्यक्षेत्र काय ।
अभव्य जिवासी ऐसे होय । सुपुण्य सोय न लभे त्या ।।३५।।
ज्यासी निश्चयाचे नाही बळ । त्यासी केचे प्राप्त शुभफळ ।
ऐसे वदती शास्त्र सकळ । निश्चय अढळ देवगुरू ।।३६।।
राजा विचारी अतरी । जय जय वासुपूज्य चंपापुरी ।
हस्ती चालला पुढारी । कर्दमाभितरी ।।३७।।
तयाचे धैर्य देखोनिया । खगेश काढी अपुली माया ।
प्रगट मैत्री होउनिया । भेटले तया भूपतीसी ।।३८।।
धन्य धन्य राया भक्ती शूर । धन्य सम्यक्त्व दृढतर ।
निश्चयाचा जेवी का मेरु । प्रशसा थोर करिती ते ।।३९।।
राये सन्मानिले आदरे । बैसोनी सागती भवातर ।
पूर्वजन्मीचे जे समग्र । तेथील मैत्र तुम्ही आम्ही ।।४०।।
रायासी दिव्य अलंकार । आनिक दिधला रत्नहार ।
सर्व रोग निवारणार । योजन भेरु देते झाले ।।४१।।
जैनधर्मा प्रीतीस्तव । देवोनी स्वर्गा गेले देव ।
मग ते तुर्यसग सर्व । चालले देव पाहावया ।।४२।।
जय जय शब्द उच्चारिती । विघ्न बारा वाटा पळती ।
सर्वकार्य सिद्ध होती । मनोरथ पूरती मन इच्छा ।।४३।।
ऐसे भव्य जीव जाणोन । कुळीचा सद्गुरु ओळखून ।
सुदेव परीक्षा करोन । सुशास्त्र श्रवण करावे ।।४४।।
श्लोक । नास्ति अर्हत् परो देवो । धर्मो नास्ति दयापरः ।
तपनास्ति निर्ग्रंथश्च । एते सम्यक्त्वलक्षणा. ।।४५।।
देव जाणावा अरिहत । जो अरिचा करि निःपात ।
अठरा दोषाविरहित । छेताळीस गुणवंत देव ।।४६।।

सर्वभूतासी दयाभाव । प्रीति पाळावे जीव सर्व ।
दशलक्षण धर्म वैभव । दया मार्दव धर्मसत्य ॥४७॥

गुरु जाणावे निग्रंथ । पंचवस्त्राचे विरहित ।
पचाग्नी आतरबाह्यत । प्रपचविरहित तपस्वी ॥४८॥

ऐसा राजा भक्ति प्रवीण । हृदयी संतुष्ट होऊन ।
जै जै शब्द उच्चारोन । विघ्नहरण जैनधर्म ॥४९॥

सिद्धी होताती सर्वकार्य । यासी नाहीच संशय ।
संतुष्ट झाला पद्मराय । हर्ष न माए हृदयातरी ॥५०॥

दुरून देखीली चपापुरी । जेवी इंद्राचीच नगरी ।
वहानाखालुता उतरी । वन्दन करीत परोक्ष ॥५१॥

जै जै शब्द उच्चारोनी । सप्तपाद पुढे जावोनी ।
साष्टाग नमस्कार करोनी । पचगुरु वदनी उच्चार ॥५२॥

मग चरणचाली चालले । चंपापुरीमध्ये आले ।
समवशरण देखते झाले । सतोष पावले मगळीक ॥५३॥

श्लोक । मानस्तंभा सरासि प्रविमल–जल–सत्
खातिका पुष्पवाटी ।
प्राकारो नाटयशाळा द्वितयमुपवन वेदिकातर्ध्वजाद्या
शाल कल्पदृमाना सुपरिवृतवन स्तूपहर्म्यावली च ।
प्राकार. स्फटिकोन्तर्नृत्सुरमुनिसभा पीठिकाग्रे स्वयंभू ॥५४॥

समोसरणी बैसले देव । विमानरूढ आले इद्रराव ।
शत इंद्र धरोनिया भाव । पूजिती देव पदद्वय ॥५५॥

स्वामि त्रैलोक्य पूजनीक । धर्म–तत्त्व–उपदेशक ।
महामिथ्यात्व–विनाशक । मोक्षदायक परमात्मा ॥५६॥

वासुपूज्य जिनेश्वर । द्वादशसभा शत इंद्र ।
दोही बाहि ढाळिती चामर । उपरी छत्र शोभताती ।।५७।।
दिव्यध्वनि मुखोत्पन्न । गणधर करिती व्याख्यान ।
अकरा अग चौदा पूर्वजान । अभीक्ष्ण ज्ञानांग सिद्धांत ।।५८।।
ते ऐकोन रायाचे मन । झालेसे वैराग्य उत्पन्न ।
द्वादश अनुप्रेक्षा चितून । कर जोडोनी विनवीत असे ।।५९।।
स्वामी मी राजकृपा करूनी । दीक्षा द्या मजलागुनी ।
सर्वपापसहारिणी । मोक्षाची दायिनी जैनेंद्री ।।६०।।
तत्समयी सत्पुत्रासी । राज्यपद दिधले तयासी ।
सर्व रोगापहारासी । योजनदुदुभीसी दिधले ।।६१।।
सर्वांसी क्षमाभावोत्तर । दीक्षा घेतली संसारतार ।
ज्ञानाची वृद्धी यतीश्वर । झाले गणधर तुर्यज्ञानी ।।६२।।
अहोहो भव्यप्राणिया । सदा आचरावे धर्मकार्या ।
मिथ्या-मत त्यजुनिया । करावे नरदेहास सार्थक ।।६३।।
जैसे पद्मरथ राज्जान । निश्चय भाव धरोनी मन ।
केले आत्म्याचे साधन । मोक्षाचे कारण साधिले ।।६४।।
श्लोक । यद्भक्ति भुवनत्रयेऽत्र नितरा निर्वाणसंसाधिनी ।
सामान्येन सुरेन्द-खेचर-नराधीशादि शर्मप्रदा ।।
स श्रीमान् शुची जिनपुगव. शुचीतरः सत्केवलोद्योतको
दद्यात् सार-सुखं समस्तजगता पूज्यः सता सेवित. ।।६५।।
अहो भव्य जीव प्राणी । भ्रमण चौऱ्याशी लक्ष-योनी ।
त्यात दुर्लभ मनुष्य योनी । जीवा लागुनी प्राप्त झाली ।।६६।।
त्यात सुकुल दुर्लभ जान । तेथेही दुर्लभ सुधर्म जैन ।
धर्म तोचि दशलक्षण । अरिहत जिन दुर्लभ ।।६७।।

देव अठरा दोषरहित । छेताळीस गुण विराजित ।
नर-सुर-इन्द्र-पूजित । देव तो सत्य त्रिभुवनी ॥६८॥
त्या देवाची दृढ भक्ति । पद्मराय निश्चय चित्ती ।
तेच फळ त्या पुण्यप्राप्ती । मोक्षाची गति तद्भविच ॥६९॥
ऐसे श्रावक जानोनिया । नरदेह जन्म जालिया ।
यातच सुपुण्य आचरोनिया । मोक्षा जावया हाचि मार्ग ॥७०॥

**इति कथाकोशे श्री-जिन-भक्त-पद्मरथमहाराजस्य दृष्टांतकथा समाप्ता शुभं भवतु ।**

## प्रसंग विसावा

**॥ श्री वीतरागाय नम: ॥**

नत्वा पंचगुरून् भक्त्या । पंचवि गति साधावया ।
नमू सरस्वती माया । कवित्व करावया साह्यकारि ॥१॥
अगदेश महाविख्यात । चपापुरि नगरी त्यात ।
जेवि अमरपुरि राजीत । शोभिवत जिनचैत्यालये ॥२॥
तेथे राजा नृवाहन । राणी चंपावती सगुण ।
सुख भोगिति पूर्वपुण्य । धर्मार्जन अधिकारी ॥३॥
तेथे श्रेष्टी वृषभदास । पूर्वपुण्य करूनी तयास ।
संतत सपत बहुवस । सर्वसुखास भोगीत असे ॥४॥
श्लोक । पूर्वदत्ते सूयाधन । पूर्वदत्ते सुया विद्या ।
पूर्वदत्ते सुया भार्या । अग्रे अग्रे च धावति ॥५॥
टीका । पूर्वपुण्य धनप्राप्त । धने करून पुण्य होत ।
पुण्यकर्ता सर्वप्राप्त । मनवांछित मनोरथ ॥६॥
पूर्वी संचित केल पुण्य । त्या पुण्य प्राप्त जालं धन ।
तेन ससार सार सपूर्ण । सप्तक्षेत्री धन खर्चावे ॥७॥
श्लोक : जिनबिंबजिनागारं, जिनयात्राप्रतिष्ठितं ।
दानपूजा च सिद्धान्त, लेखनं धनसप्तक ॥८॥
टीका · जिनबिंब पचवर्ण । सुर्वणादीनेक करोन ।
चैत्यालयेजिननूतन । खर्चावे धन पुण्यमार्गी ॥९॥

चतुर्संघ मेळउनि । यात्रेसी जावे घेवोनि ।
प्रतिष्ठा करावि जिनभुवनी । तुर्यदानी धन खर्चावे ॥१०॥
केवळवाणी सिद्धान्त । शास्त्र पूर्वाचार्यकृत ।
धन खर्चावे मनइच्छित । तेन जीवाते सर्वसुख ॥११॥
ऐसी वृषभदास वाणी । क्रियवंत तो ज्ञानधनी ।
त्रिकाळपूजा देवदर्शनी । दिनरयनी निमग्न पै ॥१२॥
तयाचे गृही एक गोपाळ । सेटि करितसे प्रतिपाळ ।
गाईम्हैसीवच्छसकळ । अरण्यस्थळ नेत असे ॥१३॥
एके दिवसी तया वनात । पश्चिमदिसि दिनकर अस्त ।
चारणमुनि आले तेथ । बैसले ध्यानस्थ दिगवर ॥१४॥
त्याहासी पाहिल गोपाळान । शिळेवरी अधर चरण ।
किंचित् होते पूर्व पुण्य । जवळ येवोन पाहे नयनी ॥१५॥
अहो हे मुनीद्र कैसे पाहि । यासि वस्त्र एकही नाहि ।
आता कैसे करावे काहि । दुसरे नाहि मज वस्त्र ॥१६॥
एक माज्या अंगावरी । आणिक असत देतो तरी ।
मनामध्ये विचार करी । दया अतरी उद्भवली ॥१७॥
तैसाच गेला तो गृहासि । मनि आठवी मुनिरायासी ।
होता दोनप्रहर निशी । चालला वनासी गोपाळ ॥१८॥
शीतकाळात जानोनिया । काष्ठभारा घेवोनिया ।
अग्नि घेतला तापावया । आला लवलासा मुनिपासी ॥१९॥
मुनी पाहिले दिगबर । सीतकाळ महादुर्धर ।
काया वेष्टित तुषार । तो स्वकर त्वर पुसीतसे ॥२०॥
दोहि करि करी मर्दन । सेवा करी भाव धरोन ।
मग प्रदीप्त केला अग्न । उष्ण उष्ण तो हस्त स्पर्शी ॥२१॥

प्रात काळ झालियावरि । मुनी ध्यान विसर्जन करी ।
अवधिज्ञाने पाहे अतरी । देखिला न जरि अस भव्य ॥२२॥

निकटभव्य पुण्यवान । स्वामि वदति तया कारन ।
त्वा काही ऐक नेम घेण । मंत्र तुंजकारण सांगतो ॥२३॥
नमो अरिहतान, इत्यादि पच नमोकारं ।
सागति त्यासि गुरु मंत्रं ।
हा जपावा अहोरात्रं । हृदयात दृढ धरावा ॥२४॥

ऐसा दिधला त्यासि मत्र । जो का स्वर्गमोक्ष देनार ।
ज्या मत्रे सुख अपार । इद्र अमर पदवी प्राप्त ॥२५॥

ज्या मत्रे चक्रवर्ती होती । नारायण पदवी प्राप्ति ।
त्रिखंडराज्यपद भोगिती । तीहि लोकि कीर्ति मत्रयोग ॥२६॥

या मत्राचे ऐक अनुपान । मिथ्यात्वी कोन्हा न सागन ।
अशनि शयनि भोजन । करि मनन हृदयातरी ॥२७॥

मंत्र सांगोम तयासी । नभमार्गे गेले ते ऋषी ।
गोपाळ पाहातसे तयासी । आश्चर्य मानसी करितसे ॥२८॥

धन्य धन्य गुरुराय । आता केव्हा दरशन होय ।
मंत्र धरोनिया हृदय । चालला स्वय मदिरासी ॥२९॥

गोपाळा तदा अतरी । सदैव मंत्रध्यास करी ।
जे जे कार्य करि मंदिरि । तव तव उच्चारी मत्रराज ॥३०॥

एकदा ऐकिले श्रेष्ठिन । नौकारमत्र करिता पठन ।
आरे गोपाळा तुजकारण । मंत्रविधान कोठोनिया ॥३१॥
आम्ही करितो देवपूजा । ते त्वा ऐकोनिया रे सहजा ।
किंवा देखिले गुरूराजा । मत्रकाजा प्रवर्तलासि ॥३२॥

काय आमची मूल पढति । किंवा श्रावक जाप्य करिति ।
श्रावकनीहि मंत्र जपति । तेच चित्ति धरिले काय ॥३३॥
साग साग रे तू गोपाळा । मत्र लाधला रे कवणे स्थळा ।
की कोन्ही मुनिस्वामि भोळा । मत्र शिकविला तुजसी ॥३४॥
हा मंत्र भवाब्धितारक । नृ–सुर–मोक्षाचा दायक ।
मुनिजनादी ह्याचि ज्यपक । सुखदायक अनेकापरी ॥३५॥
याच मत्र तीर्थंकरदेव । याच मत्र इद्रपद व्हाव ।
याच मत्र कामदेव । षट्खडराव चक्रवर्ती ॥३६॥
सर्व सुख भोगोनि । अती पद शीवरमणी ।
ऐसा मत्र तुजलागुनि । कवने ठिकाणी लाधला रे ॥३७॥
सुभग सागे सेटिकारणे । मुनीचा सर्व वर्त्तमान ।
म्हणे हा प्राणी धन्य धन्य । पाहिला नयन चारणमुनी ॥३८॥
श्रेष्ठी वहुत प्रशंसा करी । आहार वस्त्र नानापरी ।
तयाचि बहुत प्रीत करी । गोपाळ अंतरी जपे मत्र ॥३९॥
कवने एकिय अवसरी । गोधन चारिता गगातीरी ।
गाईम्हैंसी पैलतीरी । जाताचि हेरि सांगितले ॥४०॥
घाबरा होवोनिया तोही । त्वरे चालला लवलाहि ।
मंत्र जपतसे हृद्देही । गगेत पाहि झेपावला ॥४१॥
गुप्त काष्ठ वाहात होत । ते पार जाहाले उदरात ।
जैसा शत्रु करी घात । वैर चित्तात स्मरोनिया ॥४२॥
प्राण जातावेळी त्याची मति । वृषभदासा पुत्रोत्पत्ती ।
मी पुत्र होईन ऐसा चित्ती । मति गती तेचि जीवासी ॥४३॥
अत काले च मामेव, स्मरण मुक्ताकलेवर:
अंतर्मुहुर्त उत्पन्न शुभाशुभ भवत्यपि ॥४४॥

टीका–अंतकाले निदानबंधन । वृषभश्रेष्ठीचा पुत्र होईन ।
मत्राचे प्रभावे करोन । गर्भ उत्पन्न अर्हेदासी ॥४५॥
जिनमति पश्चिमरात्री । पंच स्वप्न देखिले नेत्री ।
मेरू कल्पवृक्ष पवित्री । देव विमान न जरी पाहिले ॥४६॥
क्षीर समुद्र निर्धूम अग्नि । हर्ष जाला हृदयभुवनी ।
ते शुचिर्भूत होवोनी । भ्रतारालागोनि सांगत ॥४७॥
रमण म्हणे वो रमणीए । चैत्याले आहेत मुनिराए ।
चाल जाउ तया जिनालये । पाहू पाय तीर्थंकराचे ॥४८॥
न्हवन पूजा अष्टविध्य । करिते झाले भावशुद्ध ।
चरणी आरति गीत प्रबंध । गधोदक शुद्ध वदिले ॥४९॥
मग येवोनि गुरूपासी । पचाग नमोऽस्तु स्वामिसी ।
पादपूजा करोनि त्यासी । स्वप्न फळासि पुसति दोघ ॥५०॥
मुनि वदे मेरूचे फळ । पुत्र धीर गंभीर होईल ।
कल्पवृक्षे लक्ष्मी भोगील । विमान देखील शूर पूजनीक ॥५१॥
समुद्र देखिला त्वा नयनि । पुत्र गुणरत्नाचि खानि ।
निर्द्धूम देखिला जो अग्नि । कर्मकाष्ठाग्नि भस्म करील ॥५२॥
मदनरूपी कामदेव । मोक्षगामी तो पुत्रराव ।
ऐसे वदले मुनीराव । उभयता भाव ऐकिले ॥५३॥
ऐकोन हर्ष जाला चित्ती । दोघही आली गृहाप्रति ।
दिवस–मास–गर्भ–उत्पत्ती । पौष शुद्ध चौति पुत्र जाला ॥५४॥
नाम ठेविले सुदर्शन । प्रौढ झाला चद्रासमान ।
विद्या सिकला पूर्वपुण्य । रूप लावण्य बृहस्पति ॥५५॥
तग्रामी पुरोहित ब्राह्मण । तत्पुत्र कपिला सगुण ।
कपिला अनि सुदर्शन । मित्र जिनगुण पढताति ॥५६॥

त्याही नगरामाजि थोर । सागरदत्त क्षेष्ठी चतुर ।
सागरदत्ता स्त्री सुदर । झाली गरोदर पूर्वपुण्य ॥५७॥
वृषभदास सागरदत्त । सहज गोष्टी करीत होते ।
सुदर्शन पाहिला अवचित । स्वरूपवंत कामदेव ॥५८॥
सागरदत्त म्हणे श्रेष्ठीशी । पुत्री होईल आम्हासी ।
ते देउ तत् आत्मजासी । सत्यवचनासी मानिले ॥५९॥
अनुक्रमे झाली पुत्री । रूपवत इदुगात्री ।
जातकर्म द्वादशसूत्री । गृह पवित्री सर्वहि जाले ॥६०॥
जिनालयासी जावोनी । न्हवन पूजा देवागणी ।
विधीयुक्त सर्व करोनि । नामाभिधानी मनोरमा ॥६१॥
महानदे ते दिनदिन । वृद्धी झाली वय यौवन ।
कपिला आणि सुदर्शन । एक दिन क्रीडा करिती ॥६२॥
मनोरमा तद्दिवसी । जात होति जिनदर्शनासि ।
सन्मुख देखिले सुदर्शनासी । विह्वळ मानसी जाहालि ते ॥६३॥
नैना नैन अवलोकन । हृदय भेदले चक्षुबाण ।
परस्परे मदनोत्पन्न । मूर्च्छा येवोन सावरीती ॥६४॥
सखि सहित गृहासि गेलि । विरहताप विह्वळ झाली ।
सेजेवरि ते पहुडली । सखी समजली अतरात ॥६५॥
माता पिता आले त्वरेन । काय झाली गे झडपन ।
बाई सागावे मजकारन । वारा विंझन घालितातित ॥६६॥
तैसेच झाले सुदर्शना । जावोनिया अपुले सदना ।
विरहतापाची वेदना । मचक शयना पहुडला ॥६७॥
मात पिता पुसतातित । बारे कैसी झाली गती ।
ते सांगावे आम्हा निश्चिती । तैसीच युक्ती करू बाळा ॥६८॥

पुत्र न बोलल ज्यायमान । कपिल सागे वर्त्तमान ।
ते समजले पित्याकारण । चित्ति चिंतवन करितसे ।।६९।।
तव तो सेटि सागरदत्त । सखीन सागितला वृत्तान्त ।
तो म्हणे मम वचनार्थ । जामात सत्य सुदर्शन ।।७०।।
तो आला वृषभदासाघरी । विह्वायासी विनती करी ।
तुमची वागेस्वरी बरी । कराविं खरी विव्हाई आज ।।७१।।
अवश्य म्हणे वृषभदास । बोलाविले पंडितास ।
लग्न नेमावे शुद्ध दिवस । वैशाख मास सुध पचमी ।।७२।।
दोहिकडे आनद जाला । पचदिवस वर मिरवला ।
विधीयुक्त विह्वाव केला । सतोष जाला सकळासी ।।७३।।
रमण रमणी मनोहर । सुख भोगिती न कळे पार ।
पूर्वपुण्य झाला सत्पुत्र । सुदरवक्त्र जै कामदेव ।।७४।।
नाम ठेविले सुकात बाळ । प्रौढ झाला तो सुकुमाळ ।
बाळलीळा खेळे खेळ । कुटुब सकळ हर्ष हृदयी ।।७५।।
ऐसे सुखाचे अवसरि । मुनी आगमन वनातरि ।
समाधिगुप्त आचार्य । सघाष्ट सुपरिवण शोभा ।।७६।।
वनमाळि सागे रायासी । राव निघाला परिवारेसी ।
नगरलोक श्रावकासी । तुर्यवहनासी चालले ।।७७।।
वृषभसेठिचा रथ । सुदर परिवारसहित ।
कपिला ब्राह्मणी पाहे त्यात । विरह विषयासक्त जालि ।।७८।।
म्हणे ऐसा सुदर पुरुष । माता प्रसवली महाहर्ष ।
त्या नारीचे भाग्य विशेष । ऐसा पुरुष भोगिताती ।।७९।।
पुत्र होति रत्नासमान । ऐसा पुरुष मी पाहीन ।
तरिच संसारी जीवेन । मनोरथ मनाचा पुरवीन ।।८०।।

प्रतिज्ञा करोनिया ऐसी । समस्त गेले वनक्रीडेसी ।
पाहोनिया मुनिरायासी । सोडिले वहनासी सर्वांनी ॥८१॥
नीसही नीसही उच्चारोन । त्रीपरित्य प्रदक्षणा करोन ।
श्रीफळद्रव्य पुढे ठेवोन । पचाग नमन गुरूराया ॥८२॥
धर्मवृद्धी आशीर्वचन । सर्वंहि बैसले योग्यस्थान ।
धर्म ऐकति स्थिरमन । अमृतासमान मधुरगिरा ॥८३॥
दर्शनादि ज्ञान भेद । क्षमादि दशलक्षण शुद्ध ।
श्रावकाचार विविध । शास्त्रभेद अनेकापरी ॥८४॥
सप्ततत्त्वज्ञानाभीक्षण । सागार अनागार भेद दोन ।
श्रवण करिता समस्त जन । वृषभदासा मन वैराग्य ॥८५॥
सुदर्शनासी बोलाविले । रायाचे वोसगि घातले ।
सर्वा क्षमाळिगन दिधले । दीक्षित झाले मुनिअग्रे ॥८६॥
जिनमति दीक्षा घेवोन । तीव्र तीव्र तप करोन ।
स्त्रीलिंग छेदोनिया जान । स्वर्गभुवन इंद्रपद प्राप्त ॥८७॥
वृषभकीर्ति मुनिराय । स्वाधीन केली पचेंद्रिय ।
त्रिगुप्ती मनवचनकाय । महान् धैर्य मासोपवासी ॥८८॥
अंतकाळी समाधिमरण । स्वर्गी इद्र पद पावन ।
इद्र इद्राइनी मिळुन । सुख संपन्न भोगिताती ॥८९॥
मग तो राजा नगरलोक । ग्रामात आले सकळीक ।
कपिला ब्राह्मणी विरहदु.ख । सुदर्शन सुख इच्छित ॥९०॥
सखिस म्हणे आगे बाई । सुदर्शन सेटीचे गृहा जाई ।
तुझ्या अगी बहु चतुराई । कोन्ह्याहि उपाई आनावे ॥९१॥
जरी तू त्या घेवोनि येसी । तन्हीच जीवेन जीवेसी ।
सखि म्हणे सखि बाईसी । परपुरुषासी न ईच्छावे ॥९२॥

आ गे महासीळवंत । त्याचा मैत्र तो तुझा कांत ।
जैनधर्मी पुण्यवंत । परनारि संत सहोदर ॥९३॥
सखि म्हणे स्त्रीचरित्र । स्त्रीस भुलले इद्रचंद्र ।
ब्रह्मा विष्णु आणिक रुद्र । महाऋषीद्र तपस्वी ॥९४॥
मानवाचा केवा कोन । तू आहेस गे सर्वज्ञान ।
काही चतुराइ करोन । मम मन मदन शात करी ॥९५॥
तेंव्हा ते सखि मनरंजनी । कपिला गेली कार्यालागुनि ।
तेच सनंद पाहोनी । चालली भुवनी मैत्राचे ॥९६॥
एता देखीळि सुदर्शन । कशास बाई केले येण ।
तुमच्या मैत्रास आल दुखण । निष्ठुर मन बहु तुमचे ॥९७॥
तुम्हास त्यानि बोलाविले । दादा चलावे आत वहिले ।
त्याचा प्राण व्याकुळ होईल । शब्द येईल तुम्हावरी ॥९८॥
सेटि लवलाही निघाला । अतर मदिरात गेला ।
मैत्राचे समीप बैसला । पुसु लागला उठा वेगी ॥९९॥
तव ते उठोनि सत्वर । जोडोनिया दोन्ही कर ।
सेटिस केला नमस्कार । कृपा मजवर करावी ॥१००॥
विरहताप जाली घाबरी । सेटिस तिने धरिले करी ।
तारुण्याचा भर भारी । येति लहरी मदनाच्या ॥१०१॥
सेटि म्हणे काय करावे । आता कैसे शील राखावे ।
कोन्ह्यापरि समजावावे । पाप टाळावे कैसेही ॥१०२॥
तेंव्हा सेटि विचारि मनि । कपाळि पाणि ठेवोनि ।
म्हणे ऐक वो मम भगिनी । जन्मा येवोनि व्यर्थ जीव ॥१०३॥
मी नपुसक ठाईचा जान । भोगविलास मजला कोठोन ।
ऐसे मिळाल्या स्त्रीरत्न । कोण्हाच्यान राहावे पै ॥१०४॥

कपिला म्हणे तुम्हा पुत्र । रूपवत गुण पवित्र ।
सेटि म्हणे हे स्त्रीचरित्र । मज तिळमात्र नसे ठावे ॥१०५॥
बाई तुला सागतो एक । मला तुला स्त्रीला ठाउक ।
कोम्हा सागु नको आनिक । अवगुण झाक माझा बाई ॥१०६॥
ऐसे बोलोनिया त्वरे । गेला आपुल्या स्वमदिरे ।
ज्ञाना सिकतसे नित्य पुत्र । ज्ञानसूत्र आगमसिद्धात ॥१०७॥
एके दिवसी वसत आला । राजा वनक्रीडेस चालला ।
सवे घे अभयमतिला । नरनारि निघाल्या सर्वही ॥१०८॥
कपिला रथावरि बैसोन । मनोरमा सेटि सुदर्शन ।
सुकात पुत्र गुणवान । ते रथी बैसोन चालले ॥१०९॥
त्या मनोरमासि पाहोन । राज्ञी म्हणे हे नारि धन्य ।
भर्त्ता जिएचा सुदर्शन । पुत्ररत्न प्रसवली हे ॥११०॥
कपिला म्हणे बाइ ऐकावे । सुदर्शनाचा पुत्र नोव्हे ।
राज्ञि म्हणे तुज काय ठावे । सर्वही सागावे आम्हासी ॥१११॥
राणीस सर्वही सागोनि । तव ते म्हणे तुम्ही भटनी ।
तुला गेला गे ठकउनी । निश्चय करून भोगीन मी ॥११२॥
सुदर्शना देखती जाली । स्वरूप पाहता भुलली ।
मदनबाण व्याकुळ झाली । मूच्छित पडली धरणीय ॥११३॥
मग सावरोनि आपनात । वरपगि खेळे वसत ।
क्रीडा करोनिया समस्त । आले ग्रामात सर्वही ॥११४॥
राणीहृदयी कामवाण । विरहज्वर ज्वाला उत्पन्न ।
पलगी पहुडे कामीण । दाई येवोन पुसे तीयसी ॥११५॥
हे कन्निके काय जाले । साग मजला तू वहिले ।
कोन्ही तुला काय बोलले । कि दु खी झाले तुझे मन ॥११६॥

तव ते बोले सुदरनारि । माझा मनोरथ पूर्ण करि ।
सुदर्शन भोग मम अतरि । कैशाही परि आनि वाई ॥११७॥
दाई म्हणे हे पाप थोर । आनि तो रायाचा सावकार ।
जैनधर्मी नेमीक फार । शीळवत चतुर ज्ञानी पै ॥११८॥
तो न लागे तुझे हाती । राणि म्हणे तू जाय परती ।
प्राण तजिन हातोहाती । भ्यालि चित्ति तयेची धाय ॥११९॥
म्हणे धीर धरि गे सगुणे । सेटि कैशापरि आणने ।
सप्त दरवाजे रक्षणे । राणि म्हणे काही न सागावी ॥१२०॥
तयासि देवोनि अभय । दासी करीतसे उपाय ।
म्हणे आता करू काय । विचारी धाय मनात ॥१२१॥
कुलाला घरी जावोनिया । सप्त पुतळे करोनिया ।
रगवस्त्र घालोनिया । एक घेवोनिया चालली ॥१२२॥
प्रथमद्वारि म्हणे हे काय । दासी म्हणे पुससी काय ।
राणीच तुला नाही भय । करिशील काय आमचं ॥१२३॥
पुढे चालली धीटपण । पल्लव धरिला तयाने ।
पुतळा दिधला सोडोन । गेला फुटोन रस्त्यामध्ये ॥१२४॥
मग ते रडू लागली । स्त्रियाची जात कवटाळि ।
अरे रे दुष्टा त्वा फोडली । उपासी राहेली बाईजी ॥१२५॥
राणिच्या व्रताचा पुतळा । त्वा फोडला रे चाडाळा ।
आता मरण आले तुला । जाउन बाईला सागते मी ॥१२६॥
तेव्हा त्यासी भय उत्पन्न । पाया पडे दीनवदन ।
जे मनसि ते ऐकेन । भाक घेन माझी वाई गे ॥१२७॥
ऐशापरि तो केला वश । सप्तद्वार सप्तदिवस ।
तव अष्टमीचा दिवस । असे उपास सुदर्शना ॥१२८॥

स्मशानभूमिके जाउनी । कायोत्सर्गी उभा ध्यानी ।
सर्व वस्त्र उतरोनी । दिगबर ध्यानि निर्भय ॥१२९॥
ते दासी त्या ठायासी गेली । स्वरूप देखोनिया भुलली ।
त्यासी विनोद करू लागली । नग्न झालि आपनही ॥१३०॥
नाना उपद्रव करीत । ते लज्जा पावली मनात ।
सावध होवोनि चित्तात । म्हणे मम तात समान ॥१३१॥
मग तिन वस्त्रे घेवोन । सदकी सुदर्शन घालोन ।
पुष्पमाळा वरे सोडोन । सुगध सुमन दशदिशा ॥१३२॥
आनोन दिधला राणिपासी । म्हणे भोगावे तुवा यासी ।
मग ते राणी म्हणे तयासी । सावध चित्तासि व्हावे हो ॥१३३॥
अभयमति नानापरी । विनोद चेष्टा कामविकारी ।
परि तो चळे ना शरीरी । पर्वतगिरि समान तो ॥१३४॥
राणी म्हणे पडितासी । वाहेर टाकावे त्वा यासी ।
ते म्हणे उपाय मजसी । या वेळेसी समजे ना गे ॥१३५॥
दिन उगवल्यावरि । तूच काही तरि करी ।
आपन गेलि बाहेरी घरी । निद्रा करि निश्चित मन ॥१३६॥
राणी विचारि मनात । निशि सरली समस्त ।
नखे विदारी शरीरात । केले वस्त्रात छिन्न भिन्न ॥१३७॥
स्त्रीचरित्र अनिवार । शखध्वनि केला गजर ।
ते ऐकोन धावले हेर । सेटि नजर देखिला ॥१३८॥
राणी म्हणे लोकाकारण । मी पतिव्रता हो कामीन ।
येथे येवोन सुदर्शन । मजकारन झोबू पाहे ॥१३९॥
मी भली झोवली तयाला । आता कैसा ध्यानी बैसला ।
अरेरे सागा रे रायाला । म्याच राखला देह माझा ॥१४०॥

ते रायासी सर्व सागति । क्रोध आला नरेंद्राप्रति ।
अविचार दूता म्हनति । स्मशानाऽति शिर छेदावे ॥१४१॥
दूत धावले जैसे व्याघ्र । सुदर्शन धरला जेवि चोर ।
स्मशानी नेवोनि सत्वर । उपसिली शस्त्र तीक्ष्ण ॥१४२॥
ते पाहोन जनाचा मेळा । अश्रुपात ढळति डोळा ।
अहो हो सुदर्शन भोळा । कैसी वेळा त्याहासी आली ॥१४३॥
रुदन करिति नारी नर । शस्त्र चमके भयकर ।
रायाचा आला समाचार । शिर सत्वर छेदावे वेगी ॥१४४॥
तत्समयी काय वर्तले । जिन यक्षासन कपिनले ।
तया सर्वहि समजले । त्वरित आले भूमडळी ॥१४५॥
दूत जव शस्त्र मारिती । शस्त्राचे पुष्पहार होताती ।
दूत रायासि सागति । राव म्हनति छेदावे सीर ॥१४६॥
अनिक सुर धावविनले । क्रोधे नेत्र वोटारविले ।
तैसेच तेथे खिळले । उभे ठाकले उर्ध्वहस्ते ॥१४७॥
ते ऐकिले रायान कर्ण । आनिक शूर पाठविले त्यान ।
तेही खिळिले यक्षान । सैन्य घेवोन आला राजा ॥१४८॥
यक्षानहि मावकेली । चतुरग सेना सिद्ध जाली ।
निर्बुधी रायान पाहिली । म्हणे कौटाली सुदर्शन ॥१४९॥
हाणा मारा काय पाहाता । सग्राम झाला अगणिता ।
सर्व मूच्छित यक्षकर्ता । रणाआतौता एक राजा ॥१५०॥
राजा मागे पुढे पाहे । मला कोन्ही न दिसे सहाय ।
हृदयी सचरले त्या भय । तत् समय शरण यक्षासी ॥१५१॥
यक्ष म्हणे वधीन तुला । शरण जा सुदर्शनाला ।
मग तो भ्याला मरणाला । पाठी लागला यक्षराय ॥१५२॥

सेटीस आला तो शरण । तारि तारी मजकारण ।
सेटि ध्यान विसर्जून । अभयदान राया देतसे ।।१५३।।
यक्ष उठवि रायसैन्य । ते सर्वही आले धावोन ।
सेटि पुसे काय कारण । यक्षान सर्व निवेदिले ।।१५४।।
रत्नजडित सिंहासन । वर बैसले सुदर्शन ।
यक्षे दिव्यवस्त्राभरण । करि पूजन पुष्पवृष्टी ।।१५५।।
यक्ष नमस्कार करोनि । तो गेला आकाशगमनी ।
ते पाहिले सर्वत्रजनी । आश्चर्य मनि करताती ।।१५६।।
राणीस कळला समाचार । क्रोधबध बाधला वैर ।
त्या पाडळपुर नगर । झाली व्यतर देवता वनी ।।१५७।।
राणीची पडिता जे दासी । तेहि आली पाडळिपुरासी ।
देवदत्ता जे वेश्यापासि । वर्तमान तिसी सर्व सागे ।।१५८।।
तीन करोनिया पन । ते म्हणे राणी काय जाने ।
मी त्याचे तप ढाळीन । मोहोनी घालीन देवाऋषीशी ।।१५९।।
राजा सुदर्शन जेथ । सर्वनगर लोक तेथ ।
धात्रीवाहन जोडि हस्त । विनती करीत सुदर्शना ।।१६०।।
न जानोन उपसर्ग केला । क्षमा करोनि तारा मजला ।
अर्धराज्य देतो तुम्हाला । साभाळा आम्हाला दयाब्धि ।।१६१।।
सेटि म्हणे धिक् ससार । आम्ही घेउ सजमभार ।
बोलाउनि सुकांत पुत्र । रायाचे करे दिधला ।।१६२।।
चैत्याल्ये वनि जावोनी । पूजा विधि स्तुति करोनि ।
तेथे विमळवाहन मुनी । त्रिप्रदक्षिणा नमोऽस्तु ।।१६३।।
आशीर्वाद घेवोनिया । पृच्छा केलि स्वामिराया ।
मनोरमा मम मन.प्रिया । सागावे त्वया भवावळी ।।१६४।।

व्याघ्र भिल्ल होता वनी । कुरंगी स्त्री त्याचि भीलनी ।
पापाश्रय गेली मरोनी । श्वान श्वानि पशु जन्म ।।१६५।।
तेथ मृत्यु पावोनिया । म्हैसा झालि घरि गौळिया ।
त्या शेजारी चैत्यालया । जातिस्मरतया पश्चात्ताप ।।१६६।।
तेथोनि चंपापुर नगरी । जन्म जाला त्या नीचाघरी ।
माता पिता यमपुरी । आपदा भारि मृत्यु झाला ।।१६७।।
तेथेच त्याचा जन्म जाला । सुभग गोवळ नाम त्याला ।
वृषभसेटि घरि राहिला । चारू लागला गोधन तो ।।१६८।।
चारणमुनी त्या भेटले । पाप त्याचे सर्व गेले ।
सेवा करिता पुण्य जडले । सतोषले सद्गुरूराज ।।१६९।।
निकट भव्य जानोनिया । नौकारमत्र सागे तया ।
मंत्र जपता मृत्यु तया । पुत्र त्वया वृषभसेटि ।।१७०।।
नामाभिधान सुदर्शन । मनोरमा पुरवील पुण्य ।
नौकारमत्र महिमान । पुत्रनिधान सर्व प्राप्त ।।१७१।।
मुनीमुख भव ऐकोनि । वैराग्य दुनावले मनी ।
सर्व सग परित्यागुनि । दिगबर मुनी जाहाले ।।१७२।।
राजा धात्रीवाहन नृप । हृदयी करी पश्चात्ताप ।
धिक् स्त्रिया महापाप । चित्ति विकल्प अनृत सर्व ।।१७३।।
राजा जाला दिगबर । राजी बैसविला पुत्र ।
सुकात तो सेटिचा पुत्र । राज्यकारभार तयासी ।।१७४।।
कित्येक राण्या झाल्या अर्जिका । दीक्षा घेति कैक श्राविका ।
उपरति जाली श्रावका । घेती नि:शक सजम ते ।।१७५।।
कित्येक घेति नेमव्रत । तजोनिया मिथ्यामत ।
जिनधर्म हा सत्यसत्य । देव अरिहत एकचि ।।१७६।।

ऐशापरि नेमिक झाले । सर्व अपुल्या गृहा आले ।
सुदर्शन तपस्वी जाले । शास्त्र पढले आगमतत्त्व ॥१७७॥
मम गुरुआज्ञा घेवोन । एकलविहारी होऊन ।
यात्रा तीर्थ सिद्धस्थान । तीर्थाटन करिताती ते ॥१७८॥
ऐसा धर्मोपदेश करीत । पाडळीपुर चैत्यालयात ।
भ्रामरि करोनि जाता ते । दासीन अवचित देखिले ॥१७९॥
पडिता सागे वेश्येसी । पाहाया तू सुदर्शनासी ।
यान हारविले राणिशी । जाला तपस्वी रूपवत ॥१८०॥
देवदत्ता कळवातीन । प्रियगा दासी विचक्षण ।
घेवोनि आलि त्याकारण । पलगी नेवोन बैसवी ॥१८१॥
देवदत्ता म्हने वो स्वामी । रूपवत तरूण तुम्ही ।
भोग भोगावे घराश्रमी । तुम्हायोग्य आम्ही नायिका ॥१८२॥
मुनी म्हने ऐकावे बाई । देह अपवित्र सर्वही ।
याचा भोग करावा काई । दु खदाई जीवाकारण ॥१८३॥
सन्यास घेवोन तप करावे । कर्म खडोन मोक्षा जावे ।
तुम्ही आम्हा न छेडावे । सुखी असावे संसारी ॥१८४॥
वेश्या म्हणे अहो तापमी । आता भोग द्यावा मजसि ।
मग तुम्ही जावे तपासी । न सोडू तुम्हासी भोगाविना ॥१८५॥
मुनी सर्वसंन्यास करी । मौन धरोनि अतरी ।
स्त्रियाचरित्र नानापरी । उपसर्ग करि त्रैनिसि ॥१८६॥
वेश्या जाली ते स्वेदक्षीण । न चळे मेरूसमान ।
स्मशानी ठेवला नेउन । पल्यकासन कार्योत्सर्ग ॥१८७॥
तेथे होती ते व्यतरी । तयासि आला क्रोध भारी ।
म्हणे हा माझा पूर्ववैरी । उपसर्ग करी अनेक ॥१८८॥

जे जे उपसर्ग साहिले । केवळज्ञान प्राप्त जालें ।
लौकातिक देव आले । सिंहासनि केले पूजन ॥१८९॥
पुष्पवृष्टी दुंदुभी नाद । सूर वंदती जै जै शब्द ।
ऐसा पाहोनी आनंद । गामवृंद सर्वहि आले ॥१९०॥
व्यंतरीचा वैर फिटला । दासि पंडिताचा भाव जडला ।
मनोरमादि स्त्रियांचा मेळा । श्रावकी सकळा नरनारी ॥१९१॥
मनोरमा अर्जिका जाली । कित्येकांनी दीक्षा घेतली ।
मोक्षाची वाट पाहियली । पूजा केली देव गेले ॥१९२॥
सुदर्शना केवळज्ञान । भव्यजीवा उपदेशून ।
शुक्ल पंचमी निर्वाण । मोक्षस्त्रीयेन माळ गळा ॥१९३॥
ऐसा श्रेष्ठ नौकारमंत्र । गुरूमुखे घ्यावा पवित्र ।
हृदयी जपा दिनरात्र । मंत्रे पवित्र सर्वकाही ॥१९४॥
श्लोक । यथा भूमि पर नाल्प न महत्गगनात्परं ।
तथा पंचनमस्कारं मन्त्रात्मंत्रो न विद्यते ॥१९५॥
जैसा अणुरेणुसमान । अल्प नाही दुज जान ।
जेवि उंची असे गगन । थोरपन दुजे नाही ॥१९६॥

इति आराधनाकथाकोशे नौकारमंत्रफळ सुदर्शन श्रेष्ठी रत्नकीर्तिविरचिते प्रसंग २० ॥ शुभं भवतु ॥

# प्रसंग एकविसावा

## ॐ नमः सिद्धेभ्यः ।

श्री वीतरागाय नमा । नमू पच पुरुषोत्तमा ।
सरस्वती वर दे आम्हा । गुरूमहिमा वचनोक्त ॥१॥
श्लोक–ससारे खलु कर्मदु खवहुले नानाशरीरात्मके ।
विख्यातो ज्वलकोमल यमश्च मुनि घोरोपसर्गजित् ॥
श्लोकै खडकनामकैरपीविदां किं कथ्यते देहिना ।
धन्योह जिनदेवक. सुचरणस्तस्याप्ततो भूतले ॥१॥
यम मुनी सुज्ञानहीन । दीक्षा घे पश्चात्तापेन ।
सहज आश्चर्य पाहोन । खंडश्लोक तीन केले पै ॥२॥
श्रोते हो ऐंका तत्कथा । सावधान एकच चित्ता ।
भोळे भाव संजम घेता । मोक्षभर्ता तो अनुक्रमे ॥३॥
शने. शनैः पथ गमन । किंचित् किंचित् पुण्य करोन ।
पुन नरदेहासी येवोन । करावे गमन मोक्षासी ॥४॥
तेलगदेश धर्मनगर । राजा यम महासुदर ।
धनमती राणी प्रियंकर । तयासि पुत्र गर्दभाख्ये ॥५॥
ईठी नाम कन्यका जाना । रूपे जैसी ते देवागणा ।
किंवा शेषाचीच कामिना । शशीरमणाते रोहिणी ॥६॥

हे पटराणिची संतत । अनेक स्त्रिया रायात ।
तयासी उत्पत्ति बहुत । पुत्र पंचशत बलज्ञानी ॥७॥
दीर्घ नामा जो का प्रधान । तो रायाची आज्ञा पाळून ।
करितसे राज्यकारण । पूर्वपुण्य सर्वंही सुखी ॥८॥
एके दिवसी राये नैनी । कन्या देखिली रूपखानि ।
उपवर झालिसे नदिनि । वर पाहोनि लग्न करू ॥९॥
ब्राह्मण बोलावोनि त्वरे । त्यासि पुसे प्रष्टण उत्तर ।
तो पाहे पचागाचे सूत्र । कन्यका वर कैसा होई ॥१०॥
निमित्ती म्हणे रायासी । भर्तार होईल कन्येसी ।
तुम्ही कराल विवाहासी । तो राज्यासि घेइल तुझे ॥११॥
ऐकोनि निमित्याचे वचन । राजा चिंतातुर मने ।
सकट पडले येवोन । रात्रदिन चिंता करीत ॥१२॥
श्लोक । चितातुराणां न सुख न निद्रा, क्षुधातुराणा न बल न तेजः ।
अर्थातुराणा न पिता न बधु, कामातुराणा न भय न लज्जा ॥१३॥
कामातुर जे प्राणी असे । माता भगिनी न मानि चित्तास ।
शीलही न व्यसनी त्यास । लज्जा तयास असेचि ना ॥१४॥
अर्थातुर जो नरप्राणी । द्रव्य मागे पित्यालागुनि ।
बंधूस मागे अर्धी वाटणी । क्षोट धरणी करोनिया ॥१४॥
जो नर असे क्षुधातुर । अन्न बहुत भरी उदर ।
अजीर्ण होता रोग फार । त्या मुखावर तेज कैचे ॥१५॥
चिंता पडली राजियासी । निद्रा न लागे त्या सेजेशी ।
विसरला सुखभोगासी । रमणी रायासी पुसत ॥१६॥
अहो हो स्वामी देहधनी । चिंता काय तुमचे मनी ।
ते सांगावी कृपा करोनी । उपाय करणी करीन ॥१७॥

रमण म्हणें रमणीय । चिंतेचा कठीण उपाय ।
तो तुझियान न होय । मनचे सागु नये स्त्रियेसी ।।१८।।
श्लोक–आत्मबुद्धि हितार्थाय, गुरुबुद्धि' विशेषतः ।
परबुद्धि विनाशाय, स्त्रीबुद्धिः प्रलयकरा ।।१९।।
राणी म्हणे स्वामीजी राया । तुझी दुखिस्त झालिया ।
आम्हासी सुख कोठोनिया । दुर्घट उपाया मी करीन ।।२०।।
राजा म्हणे देइ वचन । भाश दिधली राणीन ।
पतिव्रता जे कामीन । भ्रतारवचन न उल्लघी ।।२१।।
राजा म्हणे वो ऐक आता । कन्येचे जरी लग्न करिता ।
तो राज्य घेईल त्वरिता । मरण अवस्था आमची गे ।।२२।।
जरी खोटी बुद्धि करन । बाळहत्या पाप दारुण ।
वनातरि द्यावि टाकून । अपकीर्ति जान जगात ।।२३।।
यास उपाय करि कामिना । मम झाली बुद्धि भ्रमना ।
मम मनाची मनरजना । अभयदाना मज देई गे ।।२४।।
राणी म्हणे हे स्वल्प आहे । तुम्ही असा आता निर्भय ।
याचा सहज मी उपाय । दाखवीन सोय तुम्हासी ।।२५।।
त्या राणीन उपाय केला । तळघरात ठाव दिधला ।
निपुणमति दासीला । सांगितला गुह्यविचार ।।२६।।
तुला मला राजियासी । न सागावे चौथियासी ।
नित्य द्यावे भोजनासी । ज्ञाने तिएसी रजवावे ।।२७।।
ऐसी करोनिया गुप्त । नृप झाला निर्भयवत ।
निरतर राज्य करीत । मिथ्यामत हृदयातरी ।।२८।।
कुगुरू कुशास्त्र कुदेव । कुज्ञान जडला कुभाव ।
कुबुद्धि गर्व नृपराव । ज्ञानगर्व पचमिथ्याती ।।२९।।

एकदा सुधर्माचार्य । पंचशत मुनीराय ।
सिद्धान्तज्ञानी जेवि सूर्य । रोषे धैर्ये पंचमेरूपै ॥३०॥
ते संघाष्टक मिळोनि । आले ग्रामा उद्यानवनी ।
श्रृत झाले श्रावककर्णी । चालले दर्शनी समुदाए ॥३१॥
श्रावक सम्यक्त्वी अपार । वस्त्राभरणी अलकार ।
वाद्यनादाचेनि गजर । हर्षे निर्भर नरनारी ॥३२॥
एक येती एक जाती । राये देखिले अवचिति ।
म्हणे हे कोठे जाताती । कवनाप्रति पूजावया ॥३३॥
तेव्हा मिथ्याति प्रधान । राया सागे बुद्धिहीन ।
याचे गुरू असति नग्न । ज्ञानभान पुण्यप्रतापी ॥३४॥
ऐकोनि प्रधान उत्तर । राजा खोचला अंतर ।
म्हणे मी ज्ञानी अपार । मज समोर कोन दुजा ॥३५॥
ज्ञानगर्व धरोनिया । मान मनी आनोनिया ।
ब्राह्मणमत्री मिळूनिया । चालले तया वनामध्ये ॥३६॥
पाहिले त्यानी दुरून । श्रावक करिती पूजन ।
स्वामी वदति श्रृताख्यान । मानमर्दन मिथ्यातीचा ॥३७॥
अभिमानी चढला मदा । महापुरुषाची करि निंदा ।
नग्न गुरू दरिद्री सदा । बुद्धीमद वस्त्रहीन ॥३८॥
यास न मिळे अन्नपान । उपासी वस्ति अरण्य ।
या कैचे अपरोक्ष ज्ञान । भोळे जन पूजा करिती ॥३९॥
ऐसे म्हणोनि समीप आला । मुनीसी वाद करू ठेला ।
म्हणे लाज नाही तुम्हाला । नग्न वैसला स्त्रियापुढे ॥४०॥
तुमचे देवा वस्त्र नाही । तैसेच दिसता तुम्हीही ।
मूढलोक हे सर्वही । कद मूळ नाही खावयासी ॥४१॥

आमचा देव चक्रधर । ब्रह्मा विष्णु महेश्वर ।
देव देवी अनेक प्रकार । पुत्र पौत्र भाग्यवंत पै ॥४२॥
गुरू जानावे बृहस्पति । सादीपान वेदमूर्ति ।
वैशपायन वेदान्ती । ज्ञान पढती अपरोक्षे ॥४३॥
मार्कंडेय ऋषि जान । साटि खड्याच भोजन ।
शुकमुनी तपप्रवीण । गर्भी जयान तप केलं ॥४४॥
द्वादशवर्षे माते उदरी । शुक मुनी तपस्वी भारी ।
ऐसे अनेक पृथ्वीवरी । पुराणातरी सागितले ॥४५॥
उद्धव अक्रूर विदुर । वगदालभ्य ऋषीश्वर ।
चाऱ्ही वेद मुखोत्तर । गगाधर गणपती ॥४६॥
वाल्मीकी आनि सादिपनि । जान कथिले रामायण ।
वशिष्ठ ऋषि सूर्यासमान । कश्यप महाप्रतापी ॥४७॥
दुसरी सृष्टी करणार । तुमच ज्ञान अम्हा म्होर ।
तुम्ही हिंडता पृथ्वीवर । घरगुहार कैचा मठ ॥४८॥
कैच वस्त्र नाही लंगोटी । द्रव्य कैच तुम्हागाठी ।
सदा वनवासी हिंपुटी । पत्नीपुत्र ललाटी कैचे ॥४९॥
ऐशापरि तो राजेद्र । वाग्जाळ वदतसे फार ।
काही न पाहे मागे म्होर । जैसा गवार बडबडि ॥५०॥
मौन राहले ते मुनी । शिष्या बोले तयालागुनि ।
देव म्हणता अघटित कर्णि । गजवदनि प्रथम देव ॥५१॥
तोही नव्हे शकराचा । पुत्र नव्हे पार्वतीचा ।
आकार केला मळाचा । देव तुमचा तोच्चि जाला ॥५२॥
देव म्हणता हरिहर । ब्रह्मा विष्णु महेश्वर ।
त्यास कलक आहे फार । देव थोर तुमचा की ॥५३॥

राम कृष्ण म्हणता देव । त्याचे तुम्ही घेता नाव ।
त्याचे चरित्र तुम्हा ठाव । काशा म्हणावे निंदाशब्दे ॥५४॥
ऐसे त्रीतीस कोटयवरि । देव खरे परि संसारी ।
ते हिंडति गति चारी । दश अवतारी जन्ममृत्यु ॥५५॥
राया देव म्हणावे कवनासी । हा भेद न कळे तुजसी ।
जो वेगळा अठरादोषाशी । देव तयासी म्हणावे वो ॥५६॥
कुदेव कुगुरू कुशास्त्र । कुधर्म कुकुळी कुमंत्र ।
कुमनुष्य कुबुद्धि अपवित्र । न जाने सूत्र आत्मप्रचीति ॥५७॥
देव अनंतज्ञानी विख्यात । गुरूप्रपचविरहित ।
निर्हिंसक सार्थ अर्थ । आत्मप्रचीति ज्यामध्ये ॥५८॥
गुरू असावा सन्याशी । सुज्ञानासी तो प्रकाशी ।
षड्‌रिपुसी जो नाशी । गुरू तयासी म्हणावे वो ॥५९॥
वेदान्ती सन्याशी समस्त । आटचौसी सहस्र प्रमित ।
तपस्वी म्हणे आपणात । स्त्रीपुत्रसहित वनवासि ॥६०॥
काम-क्रोध-दभ-अहंकार । मद सहावा मत्सर ।
म्हणावे कैसे ऋषीश्वर । तप करिती वनातरि ॥६१॥
न जानति पापपुण्य । कदमूळाचे भक्षण ।
निशि माध्याह्नि भोजन । द्रौपदीन वनातरि ॥६२॥
पुराण सागति अयथार्थ । पाप पुण्य न कळे अर्थ ।
शास्त्रकथा अपहितार्थ । आत्मप्रचीति नाही तया ॥६३॥
अंजनीसी पुत्र जाहाला । कुपिनसहित जन्मला ।
हनुमत नाम तयाला । वान्नर झाला पुच्छसहित ॥६४॥
राया ऐक ऋषीम तत्र । कोन्ही म्हणती वायुपुत्र ।
कोन्ही म्हणति ऋषिमत्र । विपरीत तत्र कलयुगी ॥६५॥

तैसेचि राम लक्ष्मण । भरत आणि ते शत्रुघ्न ।
याचे आहे बहु कथन । निंदावचन बोलू नये ॥६६॥
पाच पांडवाची कथा । वेदशास्त्री तुम्ही ऐकता ।
ते विपरीत समस्ता । निंदा वार्ता बोलू नये ॥६७॥
राया ऐसेचि सर्वमत । यासी नाही आत्मप्रचित ।
पुण्य करिता पाप होत । ते तुम्हाते कळेचिना ॥६८॥
सुदेवाची कळे खून । सुगुरू आनि त्या सुजान ।
सिद्धान्तशास्त्र तीन रत्न । सुधर्म जान दशलक्षणी ॥६९॥
धर्माधर्म जन वदती । धर्माचि वर्म न जानती ।
धर्मासाठी हिसा करिती । कुळधर्म म्हणति त्यासी ॥७०॥
परपीडा पापाय । परोपकार पुण्याय ।
ऐसे वदति ज्ञानीय । न जानति सोय धर्माची ॥७१॥
राय ऐसे ऐकोनि मनि । म्हणे हे सत्यज्ञानधनी ।
ज्ञानमद गेला गळोनि । जेसी रजनी उदयार्क ॥७२॥
मिथ्यात्व अस्त होवोनिया । पूर्वपुण्य आले उदया ।
करकमळ जोडोनिया । सद्‌गुरू पाया नमस्कारी ॥७३॥
स्वामिस करीतसे विनती । मी अन्यायी मूढमती ।
क्षमा करावी मजप्रति । तुम्हाप्रती म्या निंदिले ॥७४॥
अपनिंदा करीतसे फार । जोडोनिया द्वय कर ।
मस्तक ठेवि चरणावर । वारंवार विनवीतसे ॥७५॥
दयावत मुनिराय । जानोनिया आसन्नभव्य ।
मोक्षगामी जीव होय । सागती सोप धर्म मार्ग ॥७६॥
धर्मवृद्धीसी देउनीया । जैन धर्म आईक राया ॥
शुद्ध करी मन वच काया । मोक्षा जावया सावधान ॥७७॥

महावीर जन्मभूमीका । वंदना करि भावनीका ।
शातिनाथ रामटेका । वदु पादुका मुगतागिरि ॥१०२॥

साडे तीन कोडि जेथे । मुनी गेले मोक्ष पथ ।
मेढा उद्धरला तेथ । पुण्यतीर्थ देश वऱ्हाड ॥१०३॥

शिरपुरी पारीखनाथ । अंतरीक्ष आहे तेथ ।
वदुनिया पुण्यतीर्थ । वदु पार्श्वनाथ कोठाळे ॥१०४॥

यरोळिआ कळेस्वर । कसनेरी विघ्नहार ।
मुनिसुव्रत तीर्थंकर । गगातीर पैठनी वदू ॥१०५॥

मानतुगी तो उच गड । मुनी मोक्ष नव्यान्नव कोड ।
राम कृष्ण महाप्रचड । देहे दड दीक्षा वळि मुनी ॥१०६॥

भाव पूजा करोनीया । गजपथ तो वंदुनीया ।
पचशतशे चैत्याल्लया । शत्रुजया पूजा भावभक्ती ॥१०७॥

तेथोन गड गिरिनेर । पंचकल्याण नेमीश्वर ।
पचटोका भयकर । उच फार सप्तकोस पै ॥१०८॥

आरे रे हे मना । त्रिकाळ भावपूजा वदना ।
हृदयी धरी द्वयचरणा । मुक्ति अगना इच्छा करिति ॥१०९॥

तेथोनिया देशातरे । तीर्थयात्रा केल्या फार ।
फिरता आपुले नगर । पाहिले नजर जन्मभूमि ॥११०॥

एकपुरुपे खररथी । बैसोनिया आलेसेति ।
गाढव सोडिता धान्य खाति । लुप्त होति हारितसाळी ॥१११॥

यम मुनी पाहे नयन । किंचित् बुद्धि जालि उत्पन्न ।
खंडश्लोक केला त्यान । श्रोते जन परिसावे पै ॥११२॥

गाथा—कट्टसि पुणु णिरके वसिरे गद्दहा जवं पेच्छसि खादि दुर्मतिः।
बाळभाषा गाथा अर्थ । रे रे कृषी गर्दभ किमर्थ ।
पाप ना पुण्य ना व्यर्थ । निरर्थक मतिहीन रे ॥११३॥

तेथोनि चालला पुढरी । ग्रामलोक पोर सारी ।
खेळ खेळति नानापरि । मार्गाभीतरि ईटीदाडु ॥११४॥
कौनिका पोरे झुगारिली । ते बिलात गुप्त जाली ।
ते मुनीने नेत्र देखिली । पाहु लागली सैरावैरा ॥११५॥
खडश्लोक । अण्णं च किं पलोवह तुम्हे एच्छणि ।
बुद्रिया छिद्दे अच्छइ कोणि आईती ॥११६॥
टीका — मुनी म्हणे बाळकात । ईटी पडली रे भळित ।
ऐसे सांगोनिया त्याने । चालिला त्वरित पुढारी ॥११७॥
मार्गि जाता तया मुनिन । मंडूक सर्प पाहून नैन ।
कमळपत्रात लपून । भय धरोन राहिला तो ॥११८॥
खडश्लोक—गाथा । अम्हादो णत्थि भय् दीहादो भयं तुम्हे ति ।
अर्थ—मुनी म्हणे त्या मेडूकाला । माझे भय नाही तुला ।
सर्प उशासी बैसला । साभाळि त्याला स्वबुद्धि ॥११९॥
हे खडश्लोक तीनकाळ । पाठ करि वाणी रसाळ ।
धर्मनगराचे जवळ । कायवळ ध्यान धरिले ॥१२०॥
ते श्रुत झाले पुत्रासी । पुत्र सागे प्रधानासी ।
प्रधान म्हणे त्व राज्यासी । घ्यावयासी हे मुनी आले ॥१२१॥
विचार केलासे दोघानी । मुनी टाकावा मारोनी ।
खड्गहस्तकी घेवोनी । रात्र माध्याह्नी मुनीपृष्ठे ॥१२२॥
दीर्घ मत्री उपसी शस्त्र । मुनीसी वधावे क्षणमात्र ।
पाहता स्वामिसी द्वयनेत्र । शातिसमुद्र मुनी दिसे ॥१२३॥

प्रथम देवाचे दर्शन । दर्शनान पापनाशन ।
याचे भेद अष्ट जान । ज्ञानाची खून अष्टप्रकार ॥७८॥
दशलक्षणी जैनधर्म । जीवदया त्याचे वर्म ।
दयाचा षट्काय धाम । स्वआत्म्यासम जानावे ॥७९॥
यतिधर्म तेरा प्रकार । त्रीपनक्रिया श्रावकाचार ।
व्रत नेम जे का समग्र । सागती योगीद्र रायासी ॥८०॥
ऐस्यापरि धर्मश्रवण । करिता वैराग्य उत्पन्न ।
संसारि विरक्त होउन । दीक्षाकारणासी सिद्ध जाला ॥८१॥
ज्येष्ट पुत्र बोलाविला । राज्यभार त्यासी दिधला ।
गर्दभ सिहासनि बैसला । दिगबर झाला राजेद्र ॥८२॥
घेवोनिया दीक्षाभार । ते देखोनि पचशत पुत्र ।
संसार जानोनि असार । गुरूसमोर उभे ठेले ॥८३॥
गुरूचा करोनिगा विनय । मोक्षा जावयाचा उपाय ॥
राजपुत्र समुदाय । तरणोपाय आम्हा सागा ॥८४॥
गुरूराय कृपा केली । अवतार दीक्षा दिधली ।
क्रिया सर्व शिकविली । विद्या घोकली आगमपाठ ॥८५॥
पुत्र झाले ज्ञानवत । नमोकार न ये रायात ।
पुण्य नाही पूर्वसचित । विद्या तयात न सुचेची ॥८६॥
यममुनी म्हणे अंतरी । माझे पूर्व कर्म भारी ।
पाठ न बैसे ममातरी । कर्मवैरी मम दुर्द्धर ॥८७॥
कर्म फिटे हे कैसेनी । ते सागिजे गुरूराय मुनी ।
सद्गुरू सागे तयालागुनि । तीर्थाटत्ती कर्म नष्टती ॥८८॥
तेव्हा तो यम मुनीराय । वदुनी सद्गुरूचे पाय ।
एकलविहारी तो होय । पुसोनी जाय श्रीगुरूसी ॥८९॥

गुरूद्वय अक्षर अंतरी । गुरू तारू भवसागरि ।
गुरू गुरू हेच वैखरी । गिरिकदरी तारि गुरू ॥९०॥

प्रथम रुखबदेवा वंदुनी । पाप नाशे देवदर्शनी ।
पुढे चालले तेथोनी । कर्महानी करावयासी ॥९१॥

चालले सम्मेदशिखरा । कर्माची होतसे निर्जरा ।
चुके चौऱ्याशीचा फेरा । भव्यनराते यात्रा होय ॥९२॥

यात्रे जे जीव जातासी । त्याच्या कुगती चुकती ।
नर सुर जन्म पावती । सोख्य भोगिति स्वर्गीचे ॥९३॥

एकूणचाळीस भवात । मोक्ष त्या जीवाशी प्राप्त ।
यममुनी गेला त्वरित । मधुबनात राहेलासे ॥९४॥

तेथे प्रतिमा वंदुनिया । गुरूमंत्र आठवुनिया ।
वीस टोका वदुनीया । कर्मक्षया सहज जाती ॥९५॥

तेथोनि गेले चपापुरी । वासुपूज्य स्वामिमदिरी ।
मोक्षक्षेत्र वदना करी । कर्म अरि नष्टले तेथ ॥९६॥

तेथोनिया पावापुरीसी । वदना करी यमऋषि ।
करीत तीर्थवदनेसी । वाराणसी काशी तीर्थ ॥९७॥

गगाभागिरथीसी स्नान । सुपार्श्व पार्श्व जन्मस्थान ।
भावपूजा भक्ति करोन । कर्मदहन करीतसे ॥९८॥

कौसल्य देश साकेतापुरी । तियसी म्हणती अयोध्यानगरी ।
यममुनी वदना करी । तीर्थंकर जन्मभूमिका ॥९९॥

रुखव–अजित–सभव । सुमति अनत चौदाव ।
पाच तीर्थंकरदेव । वंदना भावे पूजार्चना ॥१००॥

आदिनाथ श्री भगवान । प्रयागात् दीक्षा कल्याण ।
भावपूजा करि नमन । पुढे गमन कुंडलपुरा ॥१०१॥

महावीर जन्मभूमीका । वदना करि भावनीका ।
शातिनाथ रामटेका । वदु पादुका मुगतागिरि ॥१०२॥

साडे तीन कोडि जेथे । मुनी गेले मोक्ष पंथ ।
मेढा उद्धरला तेथ । पुण्यतीर्थ देश वऱ्हाड ॥१०३॥

शिरपुरी पारीखनाथ । अतरीक्ष आहे तेथ ।
वदुनिया पुण्यतीर्थ । वदु पार्श्वनाथ कोठाळे ॥१०४॥

यरोळिआ कळेस्वर । कसनेरी विघ्नहार ।
मुनिसुव्रत तीर्थंकर । गगातीर पैठनी वदू ॥१०५॥

मानतुगी तो उच गड । मुनी मोक्ष नव्यान्नव कोड ।
राम कृष्ण महाप्रचड । देहे दड दीक्षा बळि मुनी ॥१०६॥

भाव पूजा करोनीया । गजपथ तो वदुनीया ।
पचशतशे चैत्याल्लया । शत्रुजया पूजा भावभक्ती ॥१०७॥

तेथोन गड गिरिनेर । पंचकल्याण नेमीश्वर ।
पचटोका भयकर । उंच फार सप्तकोस पै ॥१०८॥

आरे रे हे मना । त्रिकाळ भावपूजा वंदना ।
हृदयी धरी द्वयचरणा । मुक्ति अगना इच्छा करिति ॥१०९॥

तेथोनिया देशातरे । तीर्थयात्रा केल्या फार ।
फिरता आपुले नगर । पाहिले नजर जन्मभूमि ॥११०॥

एकपुरुपे खररथी । बैसोनिया आलेसेति ।
गाढव सोडिता धान्य खाति । लुप्त होति हारितसाळी ॥१११॥

यम मुनी पाहे नयन । किंचित् बुद्धि जालि उत्पन्न ।
खडश्लोक केला त्यान । श्रोते जन परिसावे पै ॥११२॥

गाथा—कट्टसि पुणु णिरके वसिरे गद्दहा जवं पेच्छसि खादि दुर्मति. ।
बाळभाषा गाथा अर्थ । रे रे कृषी गर्दभ किमर्थ ।
पाप ना पुण्य ना व्यर्थ । निरर्थक मतिहीन रे ॥११३॥

तेथोनि चालला पुढरी । ग्रामलोक पोर सारी ।
खेळ खेळति नानापरि । मार्गाभीतरि ईटीदाडु ॥११४॥
कौनिका पोरे झुगारिली । ते विलात गुप्त जाली ।
ते मुनीने नेत्र देखिली । पाहु लागली सैरावैरा ॥११५॥
खडश्लोक । अण्णं च किं पलोवह तुम्हे एच्छणि ।
बुद्रिया छिद्दे अच्छइ कोणि आईती ॥११६॥
टीका — मुनी म्हणे बाळकात । ईटी पडली रे भळित ।
ऐसे सांगोनिया त्याने । चालिला त्वरित पुढारी ॥११७॥
मार्गि जाता तया मुनिन । मडूक सर्प पाहून नैन ।
कमळपत्रात लपून । भय धरोन राहिला तो ॥११८॥
खडश्लोक—गाथा । अम्हादो णत्थि भयं दीहादो भयं तुम्हे ति ।
अर्थ—मुनी म्हणे त्या मेडूकाला । माझे भय नाही तुला ।
सर्प उशासी वैसला । साभाळि त्याला स्वबुद्धि ॥११९॥
हे खडश्लोक तीनकाळ । पाठ करि वाणी रसाळ ।
धर्मनगराचे जवळ । कायबळ ध्यान धरिले ॥१२०॥
ते श्रुत झाले पुत्रासी । पुत्र सागे प्रधानासी ।
प्रधान म्हणे त्व राज्यासी । घ्यावयासी हे मुनी आले ॥१२१॥
विचार केलासे दोघानी । मुनी टाकावा मारोनी ।
खड्गहस्तकी घेवोनी । रात्र माध्याह्नी मुनीपृष्ठे ॥१२२॥
दीर्घ मंत्री उपसी शस्त्र । मुनीसी वधावे क्षणमात्र ।
पाहता स्वामिसी द्वयनेत्र । शातिसमुद्र मुनी दिसे ॥१२३॥

दया उद्भवली अंतरी । गर्दभकसे काही तरी ।
म्यान केलेसे तरवारी । पाप भारी मुनीद्रहत्या ॥१२४॥
गर्दभ काढोनी शस्त्रात । उर्ध्व करोनिया हस्त ।
तव ज्ञानोत्पन्न हृदयात । पितृघातात करू नये ॥१२५॥
मारू न मारू करिति विचार । तव जाला सामाईकावसर ॥
खड श्लोकाचा विचार । स्वाध्याय उच्चार करीतसे ॥१२६॥
प्रथमश्लोक उच्चारिला । गर्दभ मनात समजला ।
बुद्धि शिकवावया मला । तीर्थरूप आला ग्रामासी ॥१२७॥
पाप पुण्य त्या समजल । तव मुनीन कवित्व केल ।
ते उच्चारिले ज्ञान आपुल । श्लोकार्द्ध केले अध्ययन ॥१२८॥
ते पुत्र तो श्रवण करि । कुनिका आहे तळघरि ।
तीसि पाहावया नजरी । मम हितकारि पिता मुनी ॥१२९॥
राव म्हणे प्रधानासी । न वधावे दयाळ ऋषी ।
तव तीसरे खंडश्लोकासी । स्वाध्याय पाठासी सामाईक ॥१३०॥
रे रे मडूक ऐक बोला । मम भय नाहि तुजला ।
उसा सर्प तो बैसला । करि यत्न त्याला बुद्धिबळे ॥१३१॥
खंडश्लोक झाले सपूर्ण । ते समजले दोघे जन ।
मुनीसी करोनिया नमन । विघ्ननिवारण भाव भोळा ॥१३२॥
राजा समजला अंतरी । कुनिका आहे तळघरि ।
तत् भेद मुनी अंतरी । परउपकारी पुण्याय ॥१३३॥
जानोनिया आत्महित । नमोस्तु करिती भावार्थं ।
आसिर्वाद देता त्याहात । ज्ञान उद्योत मुनिरायासी ॥१३४॥
सप्तमऋद्धि प्राप्त जाली । ग्राममध्ये मात गेली ।
विटी आणि तत् माउली । सर्वही आलि दर्शनासी ॥१३५॥

मुनीदर्शन पापाचा नाश । उपदेश करिती सर्वास ।
दशलक्षण धर्मप्रकाश । श्रावकास त्रिपन्न क्रिया ॥१३६॥

धर्म सागे सारासार । सागार अनि अनागार ।
ते ऐकोनिया समग्र । वैराग्य अंतर उद्भविले ॥१३७॥

यमरायाचि जे का राणी । दीक्षा मागे कर जोडोनी ।
स्वामि कृपा करोनि मनि । आम्हालागुनि तारावे ॥१३८॥

कन्या समजली मनात । मम विवाह होता येथ ।
राज्य घेईल मम कात । चिंता उत्पन्न मुनीरायासी ॥१३९॥

ते चिंता निवारण करीन । मनात वैराग्य उत्पन्न ।
सर्व पुरुष पितासमान । मजकारण दीक्षा द्यावी ॥१४०॥

यममुनी ऐसे ऐकिले । मनातील शल्य ते गेले ।
मुड केवळिज्ञान जाले । लौकातिक आले पूजनासी ॥१४१॥

जग उपदेशा कारन । विहार करि केवळज्ञान ।
अष्ट कर्माचे निर्दालन । मोक्षसदन प्राप्ती जाली ॥१४२॥

अंतातीत ज्ञान अनंत । अव्याबाध सुख अनत ॥
निरजन चिद्रूप अमूर्त । बळ अनत ते मोक्षगामी ॥१४३॥

ऐशापरि यम मुनी । श्लोकार्द्धेन श्रुतपठनी ।
त्याने वरिली मोक्षरमणी । कवि अज्ञानी तेचि मागे ॥१४४॥

तैस स्वल्प ज्ञानाराधना । शक्तीसार करि पठना ।
जैन धर्माच्या जाने खुना । मार्गप्रभावना मोक्षाची ॥१४५॥

## प्रसंग बाविसावा

### पंच-नमस्कार-फल- दृढ सुर्प चौर कथा—

अथ पंच-नमस्कार-फल-वर्णन-कथा प्रारभ्यते ।
प्रथम नमु देव अर्हंत । अनतगुणेकरोनि सहित ।
अष्टादश-दोष-विनिर्मुक्त । भव्यजनात सौख्यदाइ ॥१॥
सिद्ध परमेष्टी कारण । नित्य असो मद्वदन ।
चाष्टगुणे विराजमान । हृदयी स्मरण नित्य असो ॥२॥
आचार्योपाध्याय-साधु । ज्याहि परिनिली सिववधु ।
तत्पद कमल नित्य वदु । जगब्दधु सौख्यदायी ॥३॥
माय माझी सरस्वती । जे अज्ञान-तिमिर हरती ।
नित्य स्मरु हृदयाती । ज्ञानदीप्ति प्रकाश व्हाव्या ॥४॥
आता वदु निज गुरु । जो भवसागरि असे तारु ।
पावोनि तत्पदाधारु । प्रारभ करू कवित्वासी ॥५॥
पंच-नमस्कार-माहात्म्य-कथा । आता मी होइन सांगता ।
एकचित्ते ऐकिजे श्रोता । जेह्ने सिद्धि-काता प्राप्त होय ॥६॥
अहो मागधदेशाभीतरि । राजगृह नामे असे नगरि ।
वनोपवने शोभा भारी । अमरपुरीसम तुल्य ॥७॥
तेथे श्रेणिक भूपति । नीतिमार्गे राज्य करिति ।
पुत्रवत्प्रजा पालिति । निर्दालिति वैरिगन ॥८॥

चेलना नावे असे राणी । रूप–सौभाग्याचि खानि ।
जिनधर्माचरि निसिदिनि । शास्त्रश्रवनि थोर प्रीति ।।९।।
श्रेणिक होता बौधमति । सबोधोनि नाना युक्ति ।
जिनधर्मि करविलि स्थिति । तीर्थंकर गोति मिळविले ।।१०।।
महाप्रतापे करोनि थोर । राज्य करिति नरेश्वर ।
दुष्ट जनाचा संहार । करिति सत्वर भुजबले ।।११।।
एकिय दिवसी पुण्यपावन । विपुलाचल नगी जान ।
महावीर समवशरण । सहितागमन केले असे ।।१२।।
नृपे जावोनि सत्वरि । देवविलि आनदभेरि ।
मिळोनि नगर नरनारी । श्रेणिक दल भारी चालला ।।१३।।
समवश्रुति पाहोनि भूप । धरोनिया श्रावकरूप ।
दूर कराव्या त्रिताप । वंदिले निष्पाप वीरपकज ।।१४।।
मिळोनि सर्वे भव्य जन । कृताष्ट द्रव्यपूजन ।
करोनिया स्तुतिस्तवन । पुनरपि चरण वदिले ।।१५।।
मग गौतमादि गणधर । मिळोनि समस्त मुनीश्वर ।
तत्पदि करोनि नमस्कार । जावोनि नरकोष्टी बैसले ।।१६।।
सर्वेहि जोडोनि स्वस्वपाणि । धर्मोपदेश ऐकति श्रवणि ।
जेह्ने पातकाचि होय हानि । जन्ममरणाहुनि रहित करि ।।१७।।
मग उभा राहोनि भूपति । कर जोडोनि करी विनति ।
स्वामिनाथा श्री जिनपति । सर्वोत्कृष्ट जगतितलि कोण असे ।।१८।।
तत्प्रश्न ऐकोनि जिनवर । दिव्यध्वनिवाचे वदे सत्वर ।
द्विषट्सभासहित नृपवर । चित्त स्थिर करोनि आइका ।।१९।।
पंच परमेष्टी परम पुरुष । सर्वोत्कृष्ट वदावे त्याहास ।
भवसागरि तारोनि जनास । मोक्षानंत सौख्यास साधिले ।।२०।।

पंच परमेष्टी पंच पद । मन-वच-काया करोनि शुद्ध ।
स्मरण करिति जेवि बुध । ते अक्षय पद पाविति ॥२१॥
अर्हंत सिद्ध आणि आचार्य । महाज्ञानी उपाध्याय ।
पंचम साधु मुनीराय । स्मरत असावे सदा हृदि ॥२२॥
छत्तालिस गुण करोनि सहित । अष्टादश दोष रहित ।
समवशरण विराजित । वदावे अर्हंत तयाप्रति ॥२३॥
जे त्रैलोक्याचे शिखरी । अष्टगुणासहित थोरी ।
जन्म-जरा-मृत्यु करोनि दूरि । अनंतसौख्य निरन्तर भोगिति ॥२४॥
जे छत्तीस गुणे करोन । नित्य असति विराजमान ।
आचार्यपदे त्याकारण । असे पावन जनतारक ॥२५॥
जे अंगपूर्व नित्यपढति । शिष्यवर्गासि पढविति ।
ते उपाध्याय म्हणविति । भव्यजनाप्रति तारक ॥२६॥
मूलगुण जे अट्ठावीस । नित्य पालिति मुनीश ।
सर्व साधू नाम तयास । तपे सिवसौख्यास साधिति ॥२७॥
हे पच परमेष्टी पंचपद । पस्तीस अक्षरे करोनि शुद्ध ।
नित्य जपति जेवि बुध । ते सौख्य निर्बाध भोगिति ॥२८॥
प्रथमपदाचे सप्ताक्षर । द्वितीय पच मनोहर ।
सप्त सप्त नव प्रकार । भवसागर ताराया समर्थ ॥२९॥
उक्त-दुहा-प्रथम अक्षर सात गणो, पाच गनो मन लाय ।
सात सात नव अक्षरा, गणत पाप मिट जाय ॥३०॥
हा अपराजित महामंत्र । त्रैलोक्यामाजी पवित्र ।
त्रिकर्ण करोनि एकत्र । जपावे सर्वत्र शुद्धभावे ॥३१॥
पवित्रपवित्र असे काया । वा पीडित दुःखे करोनिया ।
घोर कष्ट पडति येवोनिया । तरी न कीजे हृदयावेगळे ॥३२॥

चेलना नावे असे राणी । रूप–सौभाग्याचि खानि ।
जिनधर्माचरि निसिदिनि । शास्त्रश्रवनि थोर प्रीति ।।९।।

श्रेणिक होता बोधमति । सबोधोनि नाना युक्ति ।
जिनधर्मि करविलि स्थिति । तीर्थंकर गोति मिळविले ।।१०।।

महाप्रतापे करोनि थोर । राज्य करिति नरेश्वर ।
दुष्ट जनाचा सहार । करिति सत्वर भुजबले ।।११।।

एकिय दिवसी पुण्यपावन । विपुलाचल नगी जान ।
महावीर समवशरण । सहितागमन केले असे ।।१२।।

नृपे जावोनि सत्वरि । देवविलि आनदभेरि ।
मिळोनि नगर नरनारी । श्रेणिक दल भारी चालला ।।१३।।

समवश्रुति पाहोनि भूप । धरोनिया श्रावकरूप ।
दूर कराव्या त्रिताप । वंदिले निष्पाप वीरपकज ।।१४।।

मिळोनि सर्वे भव्य जन । कृताष्ट द्रव्यपूजन ।
करोनिया स्तुतिस्तवन । पुनरपि चरण वदिले ।।१५।।

मग गौतमादि गणधर । मिळोनि समस्त मुनीश्वर ।
तत्पदि करोनि नमस्कार । जावोनि नरकोष्टी बैसले ।।१६।।

सर्वेहि जोडोनि स्वस्वपाणि । धर्मोपदेश ऐकति श्रवणि ।
जेह्ले पातकाचि होय हानि । जन्ममरणाहुनि रहित करि ।।१७।।

मग उभा राहोनि भूपति । कर जोडोनि करी विनति ।
स्वामिनाथा श्री जिनपति । सर्वोत्कृष्ट जगतितलि कोण असे ।।१८।।

तत्प्रश्न ऐकोनि जिनवर । दिव्यध्वनिवाचे वदे सत्वर ।
द्विपट्सभासहित नृपवर । चित्त स्थिर करोनि आइका ।।१९।।

पंच परमेष्टी परम पुरुष । सर्वोत्कृष्ट वदावे त्याहास ।
भवसागरि तारोनि जनास । मोक्षानत सौख्यास साधिले ।।२०।।

पंच परमेष्टी पंच पद । मन-वच-काया करोनि शुद्ध ।
स्मरण करिति जेवि बुध । ते अक्षय पद पाविति ॥२१॥
अर्हंत सिद्ध आणि आचार्य । महाज्ञानी उपाध्याय ।
पंचम साधु मुनीराय । स्मरत असावे सदा हृदि ॥२२॥
छत्तालिस गुण करोनि सहित । अष्टादश दोष रहित ।
समवशरण विराजित । वदावे अर्हंत तयाप्रति ॥२३॥
जे त्रैलोक्याचे शिखरी । अष्टगुणासहित थोरी ।
जन्म-जरा-मृत्यु करोनि दूरि । अनतसौख्य निरत्तर भोगिति ॥२४॥
जे छत्तीस गुणे करोन । नित्य असति विराजमान ।
आचार्यपदे त्याकारण । असे पावन जनतारक ॥२५॥
जे अंगपूर्व नित्यपढति । शिष्यवर्गासि पढविति ।
ते उपाध्याय म्हणविति । भव्यजनाप्रति तारक ॥२६॥
मूलगुण जे अट्ठावीस । नित्य पालिति मुनीश ।
सर्व साधू नाम तयास । तपे सिवसौख्यास साधिति ॥२७॥
हे पच परमेष्टी पंचपद । पस्तीस अक्षरे करोनि शुद्ध ।
नित्य जपति जेवि बुध । ते सौख्य निर्बाध भोगिति ॥२८॥
प्रथमपदाचे सप्ताक्षर । द्वितीय पच मनोहर ।
सप्त सप्त नव प्रकार । भवसागर ताराया समर्थ ॥२९॥
उक्त-दुहा-प्रथम अक्षर सात गणो, पाच गनो मन लाय ।
सात सात नव अक्षरा, गणत पाप मिट जाय ॥३०॥
हा अपराजित महामन्त्र । त्रैलोक्यामाजी पवित्र ।
त्रिकर्ण करोनि एकत्र । जपावे सर्वत्र शुद्धभावे ॥३१॥
पवित्रपवित्र असे काया । वा पीडित दुःखे करोनिया ।
घोर कष्ट पडति येवोनिया । तरी न कीजे हृदयावेगळे ॥३२॥

जरी जाता वेळे प्राण । मंत्रराजाचे करावे ध्यान ।
पूर्व पापाचि करोनि हान । स्वर्गी जाऊन सौख्य भोगिति ॥३३॥
हा मत्र जपता थोरी । वनी रणी साह्यकारी ।
जलाग्नि बुडता सागरी । सिधु तारी मत्रराज ॥३४॥
व्याघ्रसिहादि क्रूर जीव । सहज पावति शात भाव ।
कदा न गाजिति दुर्जनराव । मत्रप्रभाव करोनिया ॥३५॥
जरी पर्वतावरोनि पडे । शरीरी क्वचित् बाधा न घडे ।
ठग नर जयासि न नाडे । मंत्रराज लडवडे ज्याचे हृदि ॥३६॥
भूत प्रेत वेताळ । चडी मुडी क्षेत्रपाळ ।
राक्षसादि महाकाळ । जयाचे पदकमल वदिति ॥३७॥
ऐसी मत्रराजाचि महिमा । कोण वर्णी तयाचि सीमा ।
पापी जीव उद्धरले नाना । सौख्यधामा पौचविले ॥३८॥
ते महिमा ऐकोनि भूपति । वदता झाला वचनोक्ति ।
या मत्रेकरोनि स्वप्राप्ति । प्रगटच्या क्षिति कोन पावले ॥३९॥
ते कृपा करोनि देवराया । सभाजनासि वदावे त्वया ।
भव्यजन श्रवण करोनिया । मत्रराज जपाया दृढ होति ॥४०॥
तत्प्रश्न ऐकोनि सन्मति । वदे गा श्रेणिक भूपति ।
सभासहित एकचित्ति । मंत्रफलश्रुति आइका ॥४१॥
मालवे देशामाझारी । उज्जयनि नाम असे नगरि ।
वनोपवने शोभा भारी । वागाइत विहिरि मनोहरा ॥४२॥
जवूदाडीम वृक्ष प्रकर । जाव सहतुते मिष्ट फार ।
कम्रख कर्दली मनोहर । असे फार वृक्षावलि ॥४३॥
कपित्य वृक्ष आनि चिचिनि । एरड पोपइ मधुर खिरणी ।
अम्र खर्जूरादि करोनि । वृक्ष उपवनि शोभति ॥४४॥

बागातरि द्राक्षमंडप । इक्षुदंड सोभति अनूप ।
पुष्पवाटिका मनोज्ञरूप । झकारलाप करिति षट्पद ॥४५॥
परते सोभे आम्रवन शीतल छाया असे गहन ।
सरोवरे दिसति भरीत जीवन । पाथिका कारण सौख्यदायी ॥४६॥
त्या सरोवरतिरि हस । क्रीडा करीति मनोल्लास ।
जलक्रीडा करि सारस । दिवस दिवस नित्य प्रति ॥४७॥
माजि कमलवन सोभति । विकस्वरायमान दिसति ।
द्विरेफ झंकार करिति । आनदे डोलति वायुसगे ॥४८॥
आम्रवृक्ष दिसति उन्नत । फलभार करोनि नम्रीभूत ।
पथिकजनाचा पुरविति हेत । देति अमृतवरफल ॥४९॥
जेथे विहार करिति मुनी । दृढ ध्यान धरिति वनि ।
कोह्नि भव्यजनालागुनि । वदति वाणि धर्ममार्ग ॥५०॥
त्या नगराबाहिर जलभरित । खातिका असे शोभिवत ।
कमले करोनि विराजित । नृत्य करीत वायुसगे ॥५१॥
माजी प्राकार उन्नत असे । दुर्जनाप्रति भयकर दिसे ।
गोपुरे करोनि शोभत असे । तेथे धना ठेवसे प्रजा ॥५२॥
मध्यभागि जिनमदिर । शिखरबद्ध उन्नत थोर ।
ध्वजा लहकति वायुप्रहार । नानाप्रकार पंचवर्णी ॥५३॥
माजी शोभे थोर वेदिका । त्याजवरि सुदर त्रिपीठिका ।
तीन सिंहासन छत्र अर्का । निसिनायका समोव्हाला ॥५४॥
मगलमूर्ति सिंहासनि । महाकाति रत्ननिर्मानि ।
बैसले असति पद्मासनि । कोटचद्रुतपनि तेजोधिक ॥५५॥
ढलति चौषष्टि चामर । महावाद्याचा गजर ।
न्हवनपूजन मनोहर । भव्य जैजैकार करिति ॥५६॥

त्या गणिकेसी थोर प्रीति । तयात तस्कराचि होति ।
क्रीडा करिति दिवाराति । उत्कृष्ट देति द्रव्यराशि ॥८०॥
तदा वदे गे हे हे प्रिय । शरीरि दुक्ख प्रवर्तले काय ।
ते मजसि शीघ्र वदावे । करीन उपाय रोगशाति ॥८१॥
तदा गणिका वदे सत्वरि । क्वचिद्रोग नसे शरीरि ।
परि एक व्यथा व्यापिली थोरि । जे न होय दूरि कवनाकुन ।८२।
तदा तस्कर वदे वचनि । प्रिय सागावे झडकुनि ।
जरी औषध असे नागभुवनि । आनीन तेथोनि मी सत्वरि ॥८३॥
दृढ पाहोनि तयाचे चित्त । म्हने ऐकिजेजी मम कात ।
मी गेलि होति नृपासगात । क्रीडा वसत करावया ॥८४॥
तदा राणीचे कठी सार । म्या पाहिला नव-रत्न-हार ।
उद्योत व्यापिला थोर । मनोहर अमोलिक ॥८५॥
तत् हार प्राप्ति विना । जाउ पाहाते मम प्राण ।
जरी देशील शीघ्र आणून । तरीच म्हणीन भ्रतार मम ॥८६॥
जरी हार न आनिसि । तरि न यावे मन्मदिरासि ।
जरी प्रिया मनोरथ पुरविसि । तदा प्रयोजन तुसी काय मज ।८७।
कटुवाक्य वदसि प्रिय । या रत्नहाराचि कथा काय ।
शेषमस्तकी मणि जो आहे । तो मी निर्भयपणे आणीन ॥८८॥
जरी हार देईन आणून । तरीच दाखवीन वदन ।
ना तरी करीन देशाटन । अथवा मरण वरीष्ट ॥८९॥
ऐसा पन वदोनि वेश्यास । नृपमदिरि केला प्रवेश ।
चौर्यकर्म करोनि सावकाश । घेवोनि हारास निघाला ॥९०॥
त्वरे येताचि रस्त्यात । हाराचा पडला उद्योत ।
तराले पाहोनि तयात । तस्करात जानीतले ॥९१॥

मग गुप्तरूपे धाविन्नले । शीघ्र तयासि धरले ।
बांधोनि राजद्वारि नेले । त्वरे योजिले शुक्लकाष्टी ॥९२॥
सप्तव्यसनी होता तस्कर । तयाने पाप जोडिले थोर ।
तेने घडला हा प्रकार । महाघोर दुक्खराशि ॥९३॥
आता अपर जाइका मात । या उज्जयनि नगरात ।
थोर असे लक्ष्मीकात । धनदत्त राजश्रेष्ठी ॥९४॥
तो जिनमार्गि असे निपुण । नित्य जिनमदिरि जाउन ।
करित असे न्हवन पूजन । चारि दान देत असे ॥९५॥
गुणवती प्रियासहीत युक्ति । तपव्रत नेम आचरिति ।
षट्कायजीव रक्षिति । कृपा चित्ति निरंतर ॥९६॥
ज्ञान विज्ञाने महाचतुर । जयाचे चित्त असे उदार ।
याचकजनाप्रति प्रचुर । वसनादि सार–द्रव्य देति ॥९७॥
नृपाची थोर असे प्रीति । देशावरि व्यापिलि कीर्ति ।
सप्तक्षेत्रि द्रव्य खर्चिति । भाडार भरिति पुण्याचे ॥९८॥
ग्रामाबाहेरि नंदनवन । नृपाचे होते गहन ।
वापी कूप शोभायमान । शीतल जीवन मिष्ट फार ॥९९॥
महा रमणीक एके दिनि । श्रेष्ठिने पाहोनि लोचनि ।
विचारिले अंत करणि । करावे या स्थानि जिनमदिर ॥१००॥
तदा श्रेष्ठीने मनोहर । शिखरबद्ध जिनमंदिर ।
शीघ्र करोनि तयार । माजी सुदर बिब स्थापिले ॥१०१॥
मग मिळवोनि चतु:संघ । द्रव्य खर्चिति मनरग ।
कृत प्रतिष्टा जिनोक्तमार्ग । आगोपाग जिनमूर्ति ॥१०२॥
चतु:संघाचा वहुमान । करोनि दिधले चारि दान ।
वस्त्रभूषणादि देऊन । याचकादि मन सतोषविले ॥१०३॥

तेथे धनाढ्य वसति जन । जिनधर्म करिति आचरण ।
नित्य जिनमदिरि जाउन । न्हवनपूजनानंदे करिति ॥५७॥
तया नगरीचा राजा । धनपाल नामे असे वोजा ।
तनुजवत्पालत्ति प्रजा । स्वात्मकाजा प्रवर्तला असे ॥५८॥
देशातरि व्यापला प्रताप । वैरिगणावरि महत्कोप ।
राज्य करिति निष्पाप । मोडिति व्याप अधर्माचा ॥५९॥
तयाचि राज्ञि असे धनवती । रूप लावण्याचि क्षिति ।
महासाध्वी शीलवती । स्वामिसेवाभक्तितत्परा ॥६०॥
नृपासवे करिति धर्म । गृहस्थाचार षट्कर्म ।
भवभवि व्हाव्यालागि शर्म । न वदे मर्म वाक्य कदा ॥६१॥
भोग भोगिति नृपासंग । क्रीडा करिति नाना रंग ।
कदा प्रीतिचा नव्हे भंग । आंगोपाग सहित तर्पिले ॥६२॥
राज्य करिता मनोल्हास । शीघ्र पावला वसतमास ।
थोरानंद मदनभूपास । स्वसंपत्तीस पाहोनिया ॥६३॥
आम्रतरुच्या अग्रकल्पा । भक्षण करिति कोकिळा ।
वचन वदति मंजुला । कर्णमडला प्रीतिदायका ॥६४॥
पुष्पवाटिकामाजि सार । नाना जाति मनोहर ।
पुष्प उगविले सुगंध थोर । करिति झुकार षट्पदे ॥६५॥
थोर संपदासहित वन । सोभति पुष्पफलेकरून ।
वनपाल नृपात जाऊन । निवेदन कृत त्वरे ॥६६॥
या तुझे उद्यानवनि । सर्व संपदासहित येउनि ।
वसतरायाने केली छावणी । आडबरे करोन उतरला ॥६७॥
नानाप्रकारे तरुवर । पुष्पफले पावले नम्र ।
पुष्प उगविले प्रकर । जेथे भ्रमर करिति गायन ॥६८॥

उक्तच–आला वसंत फुलले तरु मोगऱ्याचे ।
जाई जुई बकुलचंपक पाडलीचे ।
पुष्पे फले लवति पादप अंबराई ।
छाया सुशीतल वनि अति सौख्यदाइ ॥६९॥

तद्वाक्य ऐकोनि भूपति । थोर हर्ष पावला चित्ति ।
वनक्रीडा कराया मति । उद्भवली प्रीति वनि जावया ॥७०॥
मग पाचारोनि प्रधानात । वनक्रीडेचि जानविलि मात ।
नगरजन कुटुबसहित । नृपाज्ञांकित वनि चालले ॥७१॥
राज्ञीसहित सत्वरी । नृप चालिला दल भारी ।
प्रधानादि नगर नर नारी । अम्रवनांतरि उतरिले ॥७२॥
कोन्ही पाहति वनसंपत्ति । कोन्ही जलक्रीडा करिति ।
कोन्ही हिंदोलि हिंदोलिति । क्रीडा करिति नानाविध ॥७३॥
राज्ञि कंठि असे हार । नवरत्नाचा मनोहर ।
तेज चंद्रसूर्याकार । दिसे सुदर अमोलिक ॥७४॥
तद्हार पाहोनि गणिका । नामाभिधाने वसंततिलका ।
वदे मम जन्म गेला फुका । या एका हाराविना ॥७५॥
उत्कृष्ट द्रव्य असे मम गृही । याजविना वृथा सर्वही ।
घरातलि ऐसी वस्तु नाही । ममाशा कहि पूर्ण होईल ॥७६॥
गीतनृत्यवाद्यादि हर्ष । सर्वहि पावले नाश ।
त्वरे येवोनि गृहास । उखरासनि कायास योजिले ॥७७॥
गोड न लागे अन्नपानि । निद्रा न ये नयनी ।
विषवत् भासे रयनी । हारावाचोनि फार दु.खित ॥७८॥
तदा माध्याह्न निसि दोप्रहरि । वसंतसेनाचे मंदिरि ।
दृढ–सूर्प–नामे करोनि थोरि । तस्कर सत्वरि पावला ॥७९॥

त्या गणिकेसी थोर प्रीति । तयात तस्कराचि होति ।
क्रीडा करिति दिवाराति । उत्कृष्ट देति द्रव्यराशि ॥८०॥
तदा वदे गे हे हे प्रिय । शरीरि दुक्ख प्रवर्तले काय ।
ते मजसि शीघ्र वदावे । करीन उपाय रोगशाति ॥८१॥
तदा गणिका वदे सत्वरि । क्वचिद्रोग नसे शरीरि ।
परि एक व्यथा व्यापिली थोरि । जे न होय दूरि कवनाकुन ।८२।
तदा तस्कर वदे वचनि । प्रिय सागावे झडकुनि ।
जरी औषध असे नागभुवनि । आनीन तेथोनि मी सत्वरि ॥८३॥
दृढ पाहोनि तयाचे चित्त । म्हने ऐकिजेजी मम कांत ।
मी गेलि होति नृपासगात । क्रीडा वसंत करावया ॥८४॥
तदा राणीचे कठी सार । म्या पाहिला नव-रत्न-हार ।
उद्योत व्यापिला थोर । मनोहर अमोलिक ॥८५॥
तत् हार प्राप्ति विना । जाउ पाहाते मम प्राण ।
जरी देशील शीघ्र आणून । तरीच म्हणीन भ्रतार मम ॥८६॥
जरी हार न आनिसि । तरि न यावे मन्मदिरासि ।
जरी प्रिया मनोरथ पुरविसि । तदा प्रयोजन तुसी काय मज ।८७।
कटुवाक्य वदसि प्रिय । या रत्नहाराचि कथा काय ।
शेषमस्तकी मणि जो आहे । तो मी निर्भयपणे आणीन ॥८८॥
जरी हार देईन आणून । तरीच दाखवीन वदन ।
ना तरी करीन देशाटन । अथवा मरण वरीष्ट ॥८९॥
ऐसा पन वदोनि वेश्यास । नृपमंदिरि केला प्रवेश ।
चौर्यकला करोनि सावकाश । घेवोनि हारास निघाला ॥९०॥
त्वरे येताचि रस्त्यात । हाराचा पडला उद्योत ।
तराले पाहोनि तयात । तस्करात जानीतले ॥९१॥

मग गुप्तरूपे धाविन्नले । शीघ्र तयासि धरले ।
बाधोनि राजद्वारि नेले । त्वरे योजिले शुक्लकाष्टी ॥९२॥
सप्तव्यसनी होता तस्कर । तयाने पाप जोडिले थोर ।
तेने घडला हा प्रकार । महाघोर दुक्खराशि ॥९३॥
आता अपर जाइका मात । या उज्जयनि नगरात ।
थोर असे लक्ष्मीकात । धनदत्त राजश्रेष्ठी ॥९४॥
तो जिनमार्गि असे निपुण । नित्य जिनमदिरि जाउन ।
करित असे न्हवन पूजन । चारि दान देत असे ॥९५॥
गुणवती प्रियासहीत युक्ति । तपव्रत नेम आचरिति ।
षट्कायजीव रक्षिति । कृपा चित्ति निरंतर ॥९६॥
ज्ञान विज्ञाने महाचतुर । जयाचे चित्त असे उदार ।
याचकजनाप्रति प्रचुर । वसनादि सार–द्रव्य देति ॥९७॥
नृपाची थोर असे प्रीति । देशावरि व्यापिलि कीर्ति ।
सप्तक्षेत्रि द्रव्य खर्चिति । भाडार भरिति पुण्याचे ॥९८॥
ग्रामाबाहेरि नदनवन । नृपाचे होते गहन ।
वापी कूप शोभायमान । शीतल जीवन मिष्ट फार ॥९९॥
महा रमणीक एके दिनि । श्रेष्ठिने पाहोनि लोचनि ।
विचारिले अत करणि । करावे या स्थानि जिनमदिर ॥१००॥
तदा श्रेष्ठोने मनोहर । शिखरबद्ध जिनमदिर ।
शीघ्र करोनि तयार । माजी सुदर बिंब स्थापिले ॥१०१॥
मग मिळवोनि चतु सघ । द्रव्य खर्चिति मनरग ।
कृत प्रतिष्टा जिनोक्तमार्ग । आगोपाग जिनमूर्ति ॥१०२॥
चतु सघाचा वहुमान । करोनि दिधले चारि दान ।
वस्त्रभूषणादि देऊन । याचकादि मन संतोषविले ॥१०३॥

मग त्या मनोहर जिनमंदिरि । जावोनि त्रिकाळ वंदना करि ।
निश्चल भावे सामाइक करि । समता अतरि धरोनिया ॥१०४॥
जरी वर्षाकालि मेघजल । वृष्टी होतसे तुबळ ।
तऱ्ही निजनेम सकळ । सामाइकादि त्रिकाळ करित्ति ॥१०५॥
सुख दु.खें समानवृत्ति । हर्षविषाद न मानिति ।
सर्व जीवावरि असे प्रीति । दया निजचित्ति सदा वसे ॥१०६॥
उक्तंच । समता सर्वभूतेषु संयमे शुभभावना ।
आर्त्तरौद्रपरित्यागस्तद्धि सामायिकं व्रत ॥१०७॥
तदा एकिय दिवसि । नृपाज्ञा झालि तरालासि ।
शूलारोपण दुष्टासि । शीघ्र तस्करासि करावे ॥१०८॥
नृपाज्ञा होताचि सत्वर । गर्दभारोह करोनि तस्कर ।
मागे लावोनिया पोर । ग्रामाबाहिर काढिला ॥१०९॥
त्या जिनालयाचे मार्गावरि । शूली दिधला तो दुराचारि ।
प्राणमुक्त जानोनि सत्वरि । गेले स्वमदिरि सर्व जन ॥११०॥
कठगत येवोनिया प्राण । जरी राहिला असे जान ।
तरी प्राशन कराव्या जीवन । हेचि ध्यान हृदि असे ॥१११॥
तदा तो श्रेष्ठि जिनदत्त । प्रातः सभे उठोनि त्वरित ।
जिनमदिरि होता जात । वदन सामाइकात करावया ॥११२॥
श्रेष्टि पाहोनि तस्कर । करसज्ञा बाहिला सत्वर ।
वदे तू दिससि पुण्यवान्नर । मज पाजी सत्वर जल शीतल ॥११३॥
ऐकोनिया चोराची वैखरी । श्रेष्ठी हृदयी विचारि ।
हा नृपाचा असे वैरी । होती कष्ट थोरि या जल पाजिता ॥११४॥
कठगत राहिला येवोनि प्राण । क्षणामाजि जाइल निघोन ।
आर्त्तध्याने मरोन । जलचर होऊन दु ख भोगील ॥११५॥

आता धर्मध्यानि लाउ या प्रति । जेन्हे होय स्वर्ग–गति ।
ऐसे विचारोनि चित्ति । श्रेष्ठी त्याप्रति वदतसे ।।११६।।
गुरुसेवा करिता आज । द्वादश–वत्सर झाले मज ।
तेन्हे प्राप्त झाला मन्त्रराज । जेन्हे मज काज सिद्धि होय ।।११७।।
जरी जाईन जलाकारण । मन्त्र जाईन विसरून ।
पुनः प्राप्त नव्हे जान । सागरि रत्न पडल्या जसे ।।११८।।
मी जल घेवोनि ये जवरि । मन्त्र रक्षिशील वदनातरि ।
मग घेवोनि माघारी । शीतल जल सत्वरि पाजिन ।।११९।।
तस्कर वदे गा दयासागर । मज मन्त्र वदोनि सत्वर ।
आणोनि पाजावे सीतल नीर । तव मन्त्र तुज देइन ।।१२०।।
ऐसे भय दाखवोनि । नौकार मंत्र देउनि ।
जाता झाला जिनभुवनि । कृत जिनचरणी वदना ।।१२१।।
प्रदक्षिणा देवोनि त्रिविध । सामायिक करिति त्रिकरणशुद्ध ।
चउषष्टि दोष निरुद्ध । करोनि विबुध समताभावे ।।१२२।।
उक्तं च– समता सर्वभूतेषु सयमे शुभभावना ।
आर्त्तरौद्रपरित्यागस्तद्धि सामायिक व्रत ।।१२३।।
श्रेष्ठीचे भय मानोनि चित्ति । नौकार स्मरिता दृढभक्ति ।
तत्क्षणि पावला प्राणमुक्ति । विकलचित्ति स्थिरता कैचि ।।१२४।।
तदा नौकारमंत्राचे फळे । सौधर्मस्वर्गि त्याचि वेले ।
अवतरला माजि संपुष्टशिले । पुण्याचे वले महर्द्धिक ।।१२५।।
अहो त्रिलोक्यामाजि सार । सर्व मन्त्रामाजि थोर ।
मंत्र असे पचनमस्कार । वर्णावे कोठवर माहात्म्य ।।१२६।।
तस्कर आनि श्रेष्टीने । एकदा केले जे भाषण ।
ते पाहोनि एक दुष्टजन । नृपासि निवेदन केले त्वरे ।।१२७।।

म्हणे जी स्वामि नृपवरा । शूलारोदकृत ज्या तस्करा ।
धनदत्त तेथे जावोनि त्वरा । त्यासवे विचारा करीत होता ॥१२८॥
आजवरि केली जे चोरी । ते ठेविलि असे श्रेष्ठीचे घरी ।
म्हणोनि धनाढ्य जाल थोर । मम वैखरी सत्य मानि राया १२९
जगि जे वसति दुष्टजन । तयाचा व्यवहार हाचि जान ।
जरी रिक्त जाय एक दिन । तरी जीवासि ऊन मानिति ॥१३०॥
तद्वाक्य ऐकोनि नृप । हृदयि प्रजलला महत्कोप ।
म्हणे हा श्रेष्ठी पापरूप । करिति व्याप पातकाचा ॥१३१॥
तदा पाचारोनि पचदूत । निरोप दिधला त्याहात ।
सीघ्र जावोनि दुष्टात । धनदत्तात धरोनि आना ॥१३२॥
ऐसे वदताचि भूपाल । दूत धाविनले जैसे काळ ।
खड्गहस्ते दिसति विक्राळ । नृपबळ अगी शक्ति असे ॥१३३॥
तदा त्या तस्कराचा जीव । स्वर्गि झाला असे जो देव ।
तदासन होता कपारव । कळला तद्भाव अवधिबले ॥१३४॥
अहो ज्या श्रेष्ठिने मजवर । उपकार केला असे थोर ।
महोपसर्ग त्याजवर । मन्निमित्त होणार या क्षणि ॥१३५॥
कृतोपकार जे न मानिति । ते जानावे दुष्टमति ।
वृथा जन्मले या क्षिति । देवमानवगतीमाजि ॥१३६॥
ऐसे विचारोनि अतरि । स्थूलयष्टिका धरोनि करी ।
द्वारपालाकृति धरोनि सत्वरि । श्रेष्ठिचे गृहद्वारि तिष्टला ॥१३७॥
तत्क्षणि ते राजकिंकर । रौद्ररूपे येवोनि सत्वर ।
देवासि वदति वाक्यरौद्र । मार्ग सोडि पामर नराधम ॥१३८॥
देव वदे रे गर्दभसुता । सारिखे का वरडाविता ।
काय कार्य असे ते आता । वदावे त्वरिता मजपुढे ॥१३९॥

तद्वाक्य ऐकोनि खवळिले । गृहामाजि प्रवेशू लागले ।
तदा त्या निर्जराने भले । बाहिर घातले मारोनिया ।।१४०।।
तदा माया-युद्ध करोनि । मूर्च्छागत पाडिले धरणि ।
ऐसे कळले नृपालागुनि । थोर क्रोधाग्नि हृदि पेटलि ।।१४१।।
तदा फार धाडिले दूत । आज्ञा केलि सर्वांहित ।
धरोनि आना रे त्वरित । धनदत्त श्रेष्ठिप्रति ।।१४२।।
तदा धाविले राजकिंकर । वेढिले श्रेष्ठीचे मदिर ।
द्वारी बैसला पाहोनि नर । सर्वे त्याजवर शस्त्र टाकिति ।।१४३।।
तदा देवाने एकवेळि । सर्वे पाडिले भूमंडळि ।
मायानिद्रा टाकोनि सबळि । कृत निर्बल सर्वे मूछित्त ।।१४४।।
शीघ्र जावोनि राजकिंकर । विनविला नरेश्वर ।
म्हणे जी आपले सुभटनर । सर्वांचा सहार एकेचि केला ।।१४५।।
तद्वाक्य करोनि श्रवण । महत्कोपारूढ होउन ।
चतुरंग सैन्य घेउन । त्वरे आपनचि निघाला ।।१४६।।
सैन्य सहित पाहोनि भूपति । मायायुद्ध करोनि युक्ति ।
सर्वे सुभट पाडिले क्षिति । प्राणमुक्ताकृति दिसे काया ।।१४७।।
एकला उरला असे भूप । देवान कृत महत्कोप ।
कोठी जासी रे पापरूप । मत्प्रताप स्वल्प तुजा निसि ।।१४८।।
नृप ऐकोनि तद्वैखरी । महत्कप सुटला शरीरि ।
राख राख वदने उच्चारी । शीघ्र जिनमदिरि पातला ।।१४९।।
जावोनि श्रेष्ठीचे जवळी । मस्तक ठेवोनि पादकमळी ।
गद्‌गदोक्ति वदे मुख निर्बलि । म्हणे मम कष्ट टाळी कृपाळा ।।
तदा एक नर पाहिला दृष्टि । करी धरोनि स्थूल यष्टि ।
लागला असे नृपाचे पुष्टि । वदे श्रेष्टि तयाप्रति ।।१५१।।

तू होयसि रे कवन । का घेउ पहासि याचा प्राण ।
तवापराध किकृत येन । ते निवेदन करी मज त्वरा ॥१५२॥
गुरूवाक्य ऐकोनि निर्जर । प्रकटरूप कृत सत्वर ।
तत्पदि करोनि नमस्कार । जोडोनि कर वाक्य वदे ॥१५३॥
अहो मम गुरू दीनबधु । कृपानिधि दयासिंधु ।
जनी दिससि महासाधु । जिनधर्माराधु तूचि थोर ॥१५४॥
मी होय स्वामि दृढसूर्पचौर । तव प्रसादे करोनि थोर ।
सौधर्म स्वर्गि झालो निर्जर । मनोहर महर्द्धिक ॥१५५॥
ममासन होताचि कपमान । प्रकट जाहाले अवधिज्ञान ।
तवोपद्रवाचे कारण । आले कळोन मज सर्वथा ॥१५६॥
तदा येवोनि तो सत्वरि । तिष्टलो तव गृहद्वारि ।
नृपासि जीकोनि सत्वरि । तवोपद्रव थोरि निवारिला ॥१५७॥
तूचि मम सद्गुरु एक । मीचि असे तव सेवक ।
तूचि मज सेवनिक । त्वद्गुण जिह्वैक काय वर्णु ॥१५८॥
करोनिया स्तुतिस्तवन । रत्नमालादि आभूषण ।
केले श्रेष्टीचे पूजन । करिति नमन वारवार ॥१५९॥
तदा सर्वे नृकिंकर । पाडिले होते धरणीवर ।
माया–मूर्च्छा करोनि दूर । सुभट सत्वर उठविले ॥१६०॥
णोकार मत्राचे महात्म्य गुण । जनासि प्रसिद्ध करोन ।
स्वकीय स्वर्गासि जावोन । महत्सौख्याकारण भोगिति ॥१६१॥
तदा ग्रामजनानि भूपति । श्रेष्टिचि फार करोनि स्तुति ।
आनि करिति पूजाभक्ति । देशातरि कीर्ति विस्तारिली ॥१६२॥
पापी जीव जो श्वानयोनि । मत्रषट् पडता कर्णी ।
स्वर्गी देव झाला मरोनि । फार कथनी काय वर्णु ॥१६३॥

उक्त–एकीभाव काव्य–प्रापद्देत्व तवनुतिपदेजीवकेनोपदिष्टे: ।
पापाचारी मरणसमये सारमेयोपि सौख्य ॥
क सदेहो यदुपलभते वासवश्रीप्रभुत्व ।
जल्पन् जाप्यैर्मणिभिरमलेस्त्वत्वन्नमस्कारचक्र ॥१६४॥

ऐसे जानोनि भव्यजन । पचनमस्कार निधान ।
नित्य करीतसावे स्मरण । भवभवि कारण सौख्याचे ॥१६५॥

उक्त कथाकोशे–सर्वे ते धनपालभूपति मुखा दृष्ट्वा प्रभाव शुभं ।
श्रीमत्पचनमस्कृतेश्चनितरा सतुष्टसच्चेतस. ॥
श्रीमज्जैनविशुद्धशासनरता भक्त्या श्रिये सर्वदा ।
भव्यैश्चापि परैर्जिनेद्रकथिते धर्मेऽत्र कार्या मति ॥१६६॥

**इति कथाकोशे रत्नकीर्तिविरचिते दृढसूर्पचौराराधित-पंच – नमस्कार – वर्णन – कथा समाप्ता प्रसंग ॥२२॥ बेविसावा–संपूर्ण–छ**

० ● ०

## प्रसंग तेविसावा

### अथ कथाकोशे-यमपाल-मातंग-अहिंसा-व्रत-पालन कथा

प्रापद्दैवं तव नुतिपदैर्जीव के नोपदिष्टै:
प्रथम नमु श्री मुनि जिनपति । छत्तालिस गुण ज्ञानमूर्ति ।
भवसागरि जनाप्रति । तारिति धर्मोक्ति करोनिया ॥१॥
नित्य स्मरू माय शारदा । दूर करोनि अज्ञानापदा ।
अर्पण करोनि ज्ञानसपदा । मोक्षपदा पाठविति ॥२॥
सद्गुरू धर्मधुरंधर । कर्म–भूधर[1]–भेत्तार ।
तत्पदि मम नमस्कार । कथारभ सारसिद्धि व्हाव्या ॥३॥
काशीदेशामाजी सार । वाराणसी नामे असे नगर ।
जन वसति धनाढ्य थोर । जिनधर्म निरतर पालिति ॥४॥
त्या नगरीचा नृप जान । नामे असे पाकशासन ।
प्रजा पाळिति यथा नदन[2] । प्रतापे भानु[3] वैरियासि ॥५॥
नीतिमार्गे राज्य करिति । जिनधर्म नित्यप्रति पालिति ।
दान–पूजा–सद्गुरू–भक्ति । नित्य करिति शास्त्रश्रवण ॥६॥
राज्य करिता उद्यानवनि । महातपस्वी येवोनि मुनि ।
मेरुवत् ध्यान धरोनि । अडोल धरणीवरि तिष्टले ॥७॥

---

१. पर्वत, २. पुत्र, ३. सूर्य.

तंद्वनि एक किरात[४] । दुन्होनि पाहिले मुनीत ।
वाणे वेधिले त्वरित । अपशकुनात मानोनिया ॥८॥
यतीद्र तपाचिय बळे । शुभ मृत्यु साधो नि तद्वेळे ।
अच्युतस्वर्गि पुण्यप्रबळे । जाहाले देव महर्द्धिक ॥९॥
मुनिहत्या करोनि पातकि । कुमरने मरोनि लोकि ।
जावोनिया तृतीय नरकी । महद्दु ख एकाकी भोगिति ॥१०॥
पाहोनिया मुनिवर वध । वनदेवे कृत महत् क्रोध ।
देसासि पीडा माडिलि वृद्ध[५] । न दिसे अबाध क्वचित् प्राणी ॥११॥
तत् रोगाची व्हावया शाति । भूप विचारि निजचित्ति ।
धर्मोषधे विना निवृत्ति । उपाय बहुति होयेचि ना ॥१२॥
निजातरि जानोनि ऐसे । अष्टाह्निका कार्तिक मासे ।
जीववध न करावे सर्वसे । जनी ऐसे सुचविले ॥१३॥
अहो तदा त्या भूपतीन । निज प्रजाचे हिताकारण ।
सर्वत्र घोषणा देऊन । दान-पूजा-नुष्ठान करिति ॥१४॥
तदा एक्या श्रेष्टीचा सुत । सप्तव्यसनी पापयुक्त ।
मद्यमास नित्य भक्षित । भोगाव्यात दु.खराशि ॥१५॥
तद्ग्रामाबाहिर एकात । नृप मेढक होता चरीत ।
तयाचा करोनिया घात । संस्कारोनि गुप्त भक्षिला ॥१६॥
तदस्थि[६] एक्या गारे भीतरि । आच्छादोनि[७] गेला सत्वरि ।
पापिष्टवृत्ति असे यापरि । कवनाचे न धरि भय चित्ति ॥१७॥
संध्यासमयी तद्वनी । तत् कृत्य वनपाल पाहोनि ।
महदाश्चर्य मानुनि मनि । स्वगृहालागोनि आला त्वरे ॥१८॥

---

४. भिल्लाने, ५. मोठी. ६. हाड, ७. लपविले.

तदा संध्यासमयी ऐसे । सेवकाहित भूपति पुसे ।
कारे अद्यापि मेढा न दिसे । रक्षण कैसे करितसा ॥१९॥
ग्रामातरि नगराबाहिर । मेंढा पाहोनि आना सत्वर ।
तो असे मत् प्राणाबरोबर । युद्ध कराया थोर बलिष्ट असे ॥२०॥
ऐकोनि नृपाचि वैखरि⁸ । सेवक धाविले सत्वरि ।
ग्रामातरि आनि बाहिरि । पाहता रात्रि थोर जालि ॥२१॥
ग्रामामाजी फिरता जान । रात्र प्रहर जाहालि दोन ।
तदा क्षतक्षीण होउन । स्थान स्थानि जाउन बैसले ॥२२॥
तदा तो वनाचा वनमाळी । पाहिलेसे जे सध्याकाळी ।
ते सर्वे निज-भार्या-जवळि । वेळोवेळि वदतसे ॥२३॥
तदा एक नृपकिंकर । तद्वाक्य ऐकोनि सत्वर ।
जावोनि विनविला नृपवर । तत् कृत्य जाहिर सर्वं केले ॥२४॥
भूप ऐकानि सेवकोक्ति । क्रोधे प्रजलला थोर चित्ति ।
भृत्याहिसि म्हने तो पापमूर्ति । शीघ्रगति धरोनि आना ॥२५॥
नृपाज्ञा करोनि भृत्यजन । जावोनि धरिला श्रेष्ठिनदन ।
बाधोनिया दृढबधन । आले घेउन भूपसन्निध ॥२६॥
श्रेष्ठिपुत्र पाहिला पापरूप । हृदयी प्रजलला थोर कोप ।
तदा तराळासि वदे भूप । मद्वाक्यलोप कृत दुर्जने ॥२७॥
हा धर्मदत्त श्रेष्टीचा सुत । सप्तव्यसनि पापयुक्त ।
शूलारोपन करावे यात । किंचिदुशीरात न लाविजे ॥२८॥
तदा यमदड कोट्टपाल । तयाचे स्कंधी देवोनि शूल
गोभय⁹-मृत्तिका¹⁰ मारिति वाल । घेवोनि तत् काल तयासि गेले ॥२९॥

---

८. वाणी, ९. शेण, १०. माती.

शूलि फासी देन्हार । नियोगि असे पांढेवार ।
त्यासि आनायालागि किंकर । धाडिले सत्वर कोतवाले ॥३०॥
अहो सकल सभाजन । पूर्वी जाहल जे कारण ।
ते वदतो तुम्हा कारण । चित्त स्थिर करोन आइका ॥३१॥
एके समयी उद्यानवनि । तपी व्रती ध्यानी मौनी ।
सर्वोषधि नामे करोनि । महामुनि विहार केले ॥३२॥
त्रिज्ञानधारि कृपासागर । मेरगिरि समान धीर ।
चारित्रचूडामणि थोर । प्रताप दिनकरसमान असे ॥३३॥
जे त्रितापे[11] करोनि पीडित । भव्य जीव असति अत्यंत ।
वर्षाव करोनि धर्मामृत । संसृतिरहित शीघ्र करिति ॥३४॥
भव्यजनाचे त्रितापनाश । करोनि धाडिति सिद्धिग्रामास ।
म्हनोनि नाम सर्वोषधीश । सार्थक मुनीस जाहाले ॥३५॥
यतीद्र तपाचिय बल । षट्ऋतूचे पुष्पफल ।
उद्भविले एकेचि वेळ । शुष्क वापिका जल भरिल्या ॥३६॥
सर्प नकुल गाइ व्याघ्र । मृगस्वान मूषकमार्जार[12] ।
क्रूरजीव सर्वथा त्यजोनि वैर । होवोनि एकत्र क्रीडति ॥३७॥
तदाश्चर्य पाहोनि नयनि । वनपाल पुष्पफल घेवोनि ।
शीघ्र जावोनि राजभुवनि । जोडोनि पाणि[13] नृप जुहारिला ॥३८॥
पुढे भेटी ठेवोनि सत्वरि । वदता झाला मिष्ट वैखरि[14] ।
देवा त्वत् पुण्यकरोनि थोरि । मुनीद्र वनातरि पातले ॥३९॥
ऐकोनि तयाचे वचन । थोरानदले नृपाचे मन ।
परोक्ष वदना करोन । आनदभेरी जेन देवविलि ॥४०॥

---

११. जन्म, जरा, मृत्यु, १२. उदिर, १३. हात, १४. वाणी.

तदा मुनीद्र वदे त्यासि । मासामध्य युग्म चतुर्दसि ।
थोर पर्वनि तिथि दिवसि । जीवघातासि न कारिजे ॥६५॥
मुनिवाक्य ऐकोनि त्वरा । हृदयी आनद भरला सारा ।
म्हणे हा नियम असे बरा । देइजे त्वरा स्वामिराया ॥६६॥
तद्व्रत तयालागि देउन । म्हने हे सार अनर्घ्यरत्न ।
त्वया निसिदिन करावे यत्न । विस्मृति करून न गमाविजे ॥६७॥
जरी पडे प्राणसंकट । तरी हृदि धरि बळकट ।
येवोनि पडल्या नाना कष्ट । तरी व्रतभ्रष्ट होउ नको ॥६८॥
जे जे व्रतभ्रष्ट होति । ते ते दुर्गतिमाजि जाति ।
नानाप्रकारे दु.ख भोगिति । तयाचि गणति कोण करि ॥६९॥
मुनीने व्रत दिधले सार । ते मातगे केले अगीकार ।
सर्व व्रतामाजी थोर । यथा गजवर गजामाजी ॥७०॥
तदा तद्व्रत घेउन । मुनिपदि करोनि नमन ।
निज गृहालागि जाउन । उदरपोषण करीतसे ॥७१॥
यत्ने करोनि व्रत पालिति । तद्दिवसाचि नव्हे विस्मृति ।
दरिद्रयासि यथा धनप्राप्ति । स्मरण करिति निशिदिन ॥७२॥
ऐका हो सर्व सभामडळी । कथा हे गेलि पूर्वस्थलि ।
तस्कर नेला द्यावया शूलि । पातले तद्वेळि नृपकिंकर ॥७३॥
अहो तो मातंग तत्क्षणि । वैसला होता निजागणि ।
नृपभृत्य पाहिले लोचनि । भयभीत निजमनि थोर झाला ॥७४॥
म्हणे धर्मक श्रेष्टिनंदन । करावया शूलारोपन ।
येति मम न्यावया लागुन । वले घेउन मज जातील ॥७५॥
आज चतुर्दसि पर्वनि । नियम असे मजलागुनि ।
जीवघात न करावे म्हणोनि । सद्गुरूवचन अंगिकारिले ॥७६॥

ऐसे विचारोनि चित्ति । त्वरे उठोनि वदे स्त्रीप्रति ।
तुज सांगितो यथायुक्ति । नृपभृत्याप्रति वदिजे त्वया ॥७७॥
या क्षणि येवोनि किंकर । हाका मारितील थोर ।
कोठे गेला गे तव भ्रतार । वद लौकर आम्हाप्रति ॥७८॥
तदा निर्भय होउन । परग्रामा गेला म्हनोन ।
त्वा वदावे त्याहाकारण । मम व्रतरक्षण व्हाव्याप्रति ॥७९॥
तेचि जानावि उत्तमस्त्रिया । जे तत्पर असे स्वामिकार्या ।
नित्याज्ञाकित राहोनिया । भ्रतारपाया सेविति ॥८०॥
ऐसे वदोनि सत्वरि । जावोनि लपला गृहातरि ।
कपित होवोनि शरीरि । चिंतन करि व्रतरक्षणा ॥८१॥
नृपदूत येवोनि तत्क्षणि । मातंग मातग म्हणोनि ।
हाका मारिति क्रोधवचनि । तदा मातंगिनि वदे त्वरा ॥८२॥
मातगि वदे त्याहासि । साहेबा कालचे दिवसि ।
गेला असे परग्रामासि । एक्या दो दिवसि येइल ॥८३॥
ऐकोनि मातगिचे वचन । दूत वदति तिजकारण ।
पापीष्ट असे दैवहीन । गेला म्हणोन परग्रामि ॥८४॥
धर्मक श्रेष्टिचा पूत । शूलि देवोनि तयात ।
स्वर्णाभूषण बहुत । तयासि प्राप्त झाले असते ॥८५॥
अैसे आइकोनि मातगि । आनद पावलि सर्वांगि ।
परग्रामा गेला जी अभागी । दरिद्रचालागि कैचि धनप्राप्ति ॥८६॥
परग्रामा गेला म्हनोन । वदने वदति वचन ।
करागुलि सज्ञा करोन । भ्रताराकारण दाखविले ॥८७॥
आधीच कपटी असति नारी । स्वर्णलोभ उद्भवला त्यावरि ।
कैसे मन राहिल स्थिरि । मातग सत्वरि दाखविला ॥८८॥

जनसहित नरेश्वर । वनांतरि जावोनि सत्वर ।
उतरोनि पादचार । कृत नमस्कार मुनिपंकजि ।।४१।।
मग सर्वेजन जोडोनि पानि । बैसोनिया योग्यस्थानि ।
धर्मोपदेश करिति मुनि । चित्त स्थिर करोनि ऐकति ।।४२।।
तदा त्याचि अवसरि । यमपाल मातंग थोरी ।
वसत असे त्याचि नगरि । पाढेवारि नियोग असे ।।४३।।
तो रक्षण करीत होता वन । पाहोनिया मुनिनृपजन ।
धर्मोपदेश आइकोन । हरुषले मन तयाचे ।।४४।।
येवोनि मुनीचे समोर । उभे राहोनिया दूर ।
तार शब्द वदोनि थोर । कृत नमस्कार मुनिपदि ।।४५।।
मुनीने जानोनि ज्ञानबुद्धि । भव्यजीव दिसे हा चित्तशुद्धी ।
जानोनि दिधलि धर्मवृद्धि । जेन्हे सौख्यसमृद्धि प्राप्त होय ।।४६।।
उक्तं च । यशः प्रसादादमरेश्वरत्व नागेश्वरत्वं च नरेश्वरत्व ।
तीर्थंकरत्वं च भवति नूनं सद्धर्मवृद्धि भवता सदाऽस्तु ।।४७।।
मग वैसोनिया योग्यस्थानि । उत्कृष्ट भक्ति करोनि ।
धर्मोपदेश ऐकिति श्रवणि । जेन्हे होय हानि पातकाचि ।।४८।।
तदा सार धर्मोपदेश । वदति मुनि श्रावकाहिस ।
श्रवण करिति मनोल्हास । व्रतनेमास अंगिकारिति ।।४९।।
सभेसि वदे मुनिश्वर । सर्वहि व्रतामाजि सार ।
जीवदया व्रत असे थोर । यथा–मेर पर्वतामाजि ।।५०।।
जो नर परजीवाकारण । मानिति स्वयमात्मासमान ।
तो संसृतिसौख्य भोगून । मोक्षालागुन जाय त्वरे ।।५१।।
ज्याचे अंतरि नसे दया । सदा जीवघात करोनिया ।।
कुटुंब पोसिति जो पापिया । नर्कदुःख भोगाया कारणे ।।५२।।

यतीश्वर आनि सद्‌गृहीव्रत । निरोपिले मुनिनाथ ।
पूर्व पालिजे सार सम्यक्त्व । तद्‌व्यतिरिक्त सर्व निष्फळ ॥५३॥
ऐसे ऐकोनिया भावे । वदिति मुनीद्राचे पाय ।
मुखे शब्द वदति जयजय । आनद न मावे निज हृदि ॥५४॥
कितियक दीक्षा अगीकारिति । कितियक गृहस्थ व्रत पालिति ।
कितियक शुद्ध सम्यक्त्व घेति । यथाशक्ति करोनिया ॥५५॥
तदा तो मातंग दुराचारि । मुनिवाक्य ऐकोनि सत्वरि ।
महत्कप सुटला शरीरि । पडला धरावरि मूर्च्छित ॥५६॥
मग सीतवात प्रहारि । सावधान होवोनि सत्वरि ।
मुनिप्रति वदे वैखरि । देवा मी दुराचारि पाताकि ॥५७॥
स्वामि मी करोनि जीवघात । नित्य पोसितो कुटुबात ।
तत्पापाचि नसे गणित । श्वभ्र दु खात भोगावया ॥५८॥
आता कृपा करोनि मजवर । क्वचिन् नियम देवोनि सार ।
जेन्हे तरे भवसागर । पैले पार होइन ॥५९॥
तदा मुनि वदे रे यमपाल । जरी जीवदया पालिसि निर्मल ।
जेन्हे पुण्य होय प्रवल । सौख्य सकल भवभवि ॥६०॥
मग मातग वदे गा गुरूराया । कैसी पालावि जीवदया ।
ते वदावे मज त्वया । सर्व कळोनिया येइल ॥६१॥
मुनि वदे रे पचाणुव्रत । अहिंसादि परिग्रहपर्यंत ।
घेवोनि पालावे सदोदित । जेन्हे भवभवि व्यक्त सौख्य होय ॥६२॥
तद्‌वर्णन ऐकोनि श्रुति । म्हणे मी मातग नीच जाति ।
हे व्रत दुर्घट दिसति । ते कोने रिति पालु स्वामिया ॥६३॥
जे जे व्रत त्याकारण । मुनि वदति स्वल्प पाहून ।
तौ तौ म्हणे कठिन कठिन । नव्हे मजकुन गुरूराय ॥६४॥

जनसहित नरेश्वर । वनांतरि जावोनि सत्वर ।
उतरोनि पादचार । कृत नमस्कार मुनिपकजि ।।४१।।
मग सर्वेजन जोडोनि पानि । बैसोनिया योग्यस्थानि ।
धर्मोपदेश करिति मुनि । चित्त स्थिर करोनि ऐकति ।।४२।।
तदा त्याचि अवसरि । यमपाल मातंग थोरी ।
वसत असे त्याचि नगरि । पाढेवारि नियोग असे ।।४३।।
तो रक्षण करीत होता वन । पाहोनिया मुनिनृपजन ।
धर्मोपदेश आइकोन । हरुषले मन तयाचे ।।४४।।
येवोनि मुनीचे समोर । उभे राहोनिया दूर ।
तार शब्द वदोनि थोर । कृत नमस्कार मुनिपदि ।।४५।।
मुनीने जानोनि ज्ञानबुद्धि । भव्यजीव दिसे हा चित्तशुद्धी ।
जानोनि दिधलि धर्मवृद्धि । जेन्हे सौख्यसमृद्धि प्राप्त होय ।।४६।।
उक्तं च । यशः प्रसादादमरेश्वरत्व नागेश्वरत्वं च नरेश्वरत्वं ।
तीर्थंकरत्वं च भवति नून सद्धर्मवृद्धि भवता सदाऽस्तु ।।४७।।
मग वैसोनिया योग्यस्थानि । उत्कृष्ट भक्ति करोनि ।
धर्मोपदेश ऐकिति श्रवणि । जेन्हे होय हानि पातकाचि ।।४८।।
तदा सार धर्मोपदेश । वदति मुनि श्रावकाहिस ।
श्रवण करिति मनोल्हास । व्रतनेमास अगिकारिति ।।४९।।
सभेसि वदे मुनिश्वर । सर्वहि व्रतामाजि सार ।
जीवदया व्रत असे थोर । यथा-मेर पर्वतामाजि ।।५०।।
जो नर परजीवाकारण । मानिति स्वयमात्मासमान ।
तो संसृतिसौख्य भोगून । मोक्षालागुन जाय त्वरे ।।५१।।
ज्याचे अतरि नसे दया । सदा जीवघात करोनिया ।।
कुटुंब पोसिति जो पापिया । नर्कदुःख भोगाया कारणे ।।५२।।

यतीश्वर आनि सद्‌गृहीव्रत । निरोपिले मुनिनाथ ।
पूर्व पालिजे सार सम्यक्त्व । तद्‌व्यतिरिक्त सर्व निष्फळ ॥५३॥
ऐसे ऐकोनिया भावे । वदिति मुनीद्राचे पाय ।
मुखे शब्द वदति जयजय । आनद न मावे निज हृदि ॥५४॥
कितियक दीक्षा अंगीकारिति । कितियक गृहस्थ व्रत पालिति ।
कितियक शुद्ध सम्यक्त्व घेति । यथाशक्ति करोनिया ॥५५॥
तदा तो मातग दुराचारि । मुनिवाक्य ऐकोनि सत्वरि ।
महत्कंप सुटला शरीरि । पडला धरावरि मूर्च्छित ॥५६॥
मग सीतवात प्रहारि । सावधान होवोनि सत्वरि ।
मुनिप्रति वदे वैखरि । देवा मी दुराचारि पाताकि ॥५७॥
स्वामि मी करोनि जीवघात । नित्य पोसितो कुटुबात ।
तत्पापाचि नसे गणित । श्वभ्र दु खात भोगावया ॥५८॥
आता कृपा करोनि मजवर । क्वचिन् नियम देवोनि सार ।
जेन्हे तरे भवसागर । पैले पार होइन ॥५९॥
तदा मुनि वदे रे यमपाल । जरी जीवदया पालिसि निर्मल ।
जेन्हे पुण्य होय प्रवल । सौख्य सकल भवभवि ॥६०॥
मग मातग वदे गा गुरूराया । कैसी पालावि जीवदया ।
ते वदावे मज त्वया । सर्व कळोनिया येइल ॥६१॥
मुनि वदे रे पचाणुव्रत । अहिंसादि परिग्रहपर्यंत ।
घेवोनि पालावे सदोदित । जेन्हे भवभवि व्यक्त सौख्य होय ॥६२॥
तद्‌वर्णन ऐकोनि श्रुति । म्हणे मी मातग नीच जाति ।
हे व्रत दुर्घट दिसति । ते कोने रिति पालु स्वामिया ॥६३॥
जे जे व्रत त्याकारण । मुनि वदति स्वल्प पाहून ।
तौ तौ म्हणे कठिन कठिन । नव्हे मजकुन गुरूराय ॥६४॥

तदा मुनींद्र वदे त्यासि । मासामध्य युग्म चतुर्दसि ।
थोर पर्वनि तिथि दिवसि । जीवघातासि न करिजे ॥६५॥
मुनिवाक्य ऐकोनि त्वरा । हृदयी आनद भरला सारा ।
म्हणे हा नियम असे बरा । देइजे त्वरा स्वामिराया ॥६६॥
तद्व्रत तयालागि देउन । म्हने हे सार अनर्घ्यरत्न ।
त्वया निसिदिन करावे यत्न । विस्मृति करून न गमाविजे ॥६७॥
जरी पडे प्राणसंकट । तरी हृदि धरि बळकट ।
येवोनि पडल्या नाना कष्ट । तरी व्रतभ्रष्ट होउ नको ॥६८॥
जे जे व्रतभ्रष्ट होति । ते ते दुर्गतिमाजि जाति ।
नानाप्रकारे दु.ख भोगिति । तयाचि गणति कोण करि ॥६९॥
मुनीने व्रत दिधले सार । ते मातगे केले अंगीकार ।
सर्व व्रतामाजी थोर । यथा गजवर गजामाजी ॥७०॥
तदा तद्व्रत घेउन । मुनिपदि करोनि नमन ।
निज गृहालागि जाउन । उदरपोषण करीतसे ॥७१॥
यत्ने करोनि व्रत पालिति । तद्दिवसाचि नव्हे विस्मृति ।
दरिद्र्यासि यथा धनप्राप्ति । स्मरण करिति निशिदिन ॥७२॥
ऐका हो सर्व सभामडळी । कथा हे गेलि पूर्वस्थलि ।
तस्कर नेला द्यावया शूलि । पातले तद्वेळि नृपकिंकर ॥७३॥
अहो तो मातग तत्क्षणि । बैसला होता निजागणि ।
नृपभृत्य पाहिले लोचनि । भयभीत निजमनि थोर झाला ॥७४॥
म्हणे धर्मक श्रेष्टिनदन । करावया शूलारोपन ।
येति मम न्यावया लागुन । वले घेउन मज जातील ॥७५॥
आज चतुर्दसि पर्वनि । नियम असे मजलागुनि ।
जीवघात न करावे म्हणोनि । सद्गुरूवचन अगिकारिले ॥७६॥

ऐसे विचारोनि चित्ति । त्वरे उठोनि वदे स्त्रीप्रति ।
तुज सागितो यथायुक्ति । नृपभृत्याप्रति वदिजे त्वया ।।७७।।
या क्षणि येवोनि किंकर । हाका मारितील थोर ।
कोठे गेला गे तव भ्रतार । वद लौकर आम्हाप्रति ।।७८।।
तदा निर्भय होउन । परग्रामा गेला म्हनोन ।
त्वा वदावे त्याहाकारण । मम व्रतरक्षण व्हाव्याप्रति ।।७९।।
तेचि जानावि उत्तमस्त्रिया । जे तत्पर असे स्वामिकार्या ।
नित्याज्ञाकित राहोनिया । भ्रतारपाया सेविति ।।८०।।
ऐसे वदोनि सत्वरि । जावोनि लपला गृहातरि ।
कपित होवोनि शरीरि । चिंतन करि व्रतरक्षणा ।।८१।।
नृपदूत येवोनि तत्क्षणि । मातंग मातंग म्हणोनि ।
हाका मारिति क्रोधवचनि । तदा मातंगिनि वदे त्वरा ।।८२।।
मातंगि वदे त्याहासि । साहेबा कालचे दिवसि ।
गेला असे परग्रामासि । एक्या दो दिवसि येइल ।।८३।।
ऐकोनि मातगिचे वचन । दूत वदति तिजकारण ।
पापीष्ट असे दैवहीन । गेला म्हणोन परग्रामि ।।८४।।
धर्मक श्रेष्टिचा पूत । शूलि देवोनि तयात ।
स्वर्णभूषण बहुत । तयासि प्राप्त झाले असते ।।८५।।
अैसे आइकोनि मातगि । आनंद पावलि सर्वांगि ।
परग्रामा गेला जी अभागी । दरिद्र्यालागि कैचि धनप्राप्ति ।।८६।।
परग्रामा गेला म्हनोन । वदने वदति वचन ।
करागुलि सज्ञा करोन । भ्रताराकारण दाखविले ।।८७।।
आधीच कपटी असति नारी । स्वर्णलोभ उद्भवला त्यावरि ।
कैसे मन राहिल स्थिरि । मातग सत्वरि दाखविला ।।८८।।

आधीच दारुनाग्नी स्वभाव । त्या माजि सुटला वायव ।
सर्वांगि पावोनि उत्सव । नाना वस्तु सर्व जालिति ॥८९॥

उक्त कथाकोशे : स्त्रीणा स्वभावतो माया, किंपुनर्लोभकारणे ।
प्रज्वलन्नपि दुर्वह्निः, किं वाते वाति दारुणे ॥९०॥

तत् क्षणि नृपकिंकराहिन । मातंग काढिला गृहातून ।
त्वरे चालिले घेऊन । श्रेष्टिनदन द्यावया सूलि ॥९१॥

तदा वदे तो सुभटाहित । जरी कराल मम प्राणात ।
तरी मी न करि जीवघात । असे चित्तात हाचि निश्चय ॥९२॥

तदा धरोनिया त्यासि । घेवोनि गेले नृपापासि ।
स्वामी हा न वधे श्रेष्टिपुत्रासि । ऐसे मृपासि वदु लागले ॥९३॥

तदा नृप वदे त्याकारण । रे मूर्खा श्रेष्टीसुताकारण ।
का न करिसि शूलारोपण । स्वर्णाभूषण मिळता तुज ॥९४॥

देवा चतुर्द्दशीचे दिवसि । न करावे जीवघातासि ।
ऐसे व्रत असे मजसि । सद्गुरूपासि असे घेतले ॥९५॥

तदा होवोनि क्रोधरूप । तयालागि वदे भूप ।
मद्वाक्य नाइकिसि अद्याप । आले त्वत् पाप उदयागत ॥९६॥

देवा हे व्रतनिधान । दु प्राप्य पावले जान ।
सुवर्णलोभे करोन । व्रतालागुन न सोडि मी ॥९७॥

तद्वाक्य ऐकोनि नरेश्वर । हृदि क्रोध प्रजलला थोर ।
कोट्टपालादि किंकर । वाहोनि सत्वर वदे त्याप्रति ॥९८॥

हा मातग आनि श्रेष्टिसुत । दोघासि नेवोनि त्वरित ।
कृताज्ञाभंगदोशयुक्त । शिशुमार डोहात टाकिजे ॥९९॥

तदा नृपाज्ञा करोनि । नग्रजन फार मिळोनि ।
दोघाहिसि चालले घेउनि । मातंग त्या क्षणि विचारि हृदि ॥१००॥

जरी चुकू ह्या विघ्नापासून । तरीच घेउ अन्नपान ।
न तरी सकल मंन्यासग्रहण । मजकारण शुद्ध असो ॥१०१॥

तदा तराळे[15] करोनि युक्ति । वस्त्रामाजि बाधोनि लोथि ।
नेवोनि शिशुमारद्रहांति । दोघाहिप्रति टाकिले ॥१०२॥

टाकिताचि श्रेष्टिकुमर । भक्षण केला मच्छमगर ।
जगामाजी जे पापीष्ट । नर तयाचा सहार होतसे त्वरे ॥१०३॥

दृढ पाहोनि मातंग मन । जलदेवता शीघ्र येउन ।
सिंहासनि बैसऊन । अभिसिंचन[16] करू लागल्या ॥१०४॥

वस्त्राभूषणे करोनिया । पूजिति तयाचि काया ।
मुखी जयजय वदोनिया । पुष्पवृष्टि तयावरि टाकिति ॥१०५॥

तत् प्रभाव पाहुनि जन । नृपासि केले निवेदन ।
सत्वर आला धाऊन । करिति पूजन जनसहित ॥१०६॥

व्रतमाहात्म्य जानोनि ऐसे । मातंग पूजनीक झाला असे ।
भव्यजन पालिजे सर्वसे । पातक नासे भवभवीचे ॥१०७॥

व्रतमाहात्म्यकरोनि । मातग पावला पूजा जनि ।
अंतरि ऐसे जानोनि । न करावे कोन्हि जातिगर्व ॥१०८॥

सर्वहि व्रतामाजि सार । अहिंसा व्रत असे थोर ।
जे पालिति भविक नर । ते मुक्तिचे भ्रतार शीघ्र होति ॥१०९॥

काव्य उक्त—मातगो यमपालको गुणरत्नैर्देवादिभि पूजतो ।
नानावस्त्रसुवर्णरत्नविकसन्पुष्पोत्करै. सादर ।

---

१५. कोतवाल, १६. अभिषेक.

यद् धर्मस्य हि लेशतोऽपि भुवने स श्री जिनः शक्रियात् ।
भक्त्या देवनिकायपूजितपदद्वद्वो महाश्रेयसे ॥११०॥

इति आराधना कथाकोशे अहिंसा-व्रत-माहात्म्य-यमपाल-मातंग-कथा वर्णन प्रसंग २३। कथा रत्नकीर्ति-विरचिते संपूर्ण ॥छ॥



# प्रसंग चोविसावा

## अथ अहिंसा-व्रत-माहात्म्य-धीवर-कथा

जे त्रैलोक्यामाजि श्रेष्ठ । पंचपरमेष्टी पदोत्कृष्ट ।
दूर व्हाव्या ससारकष्ट । मम नुति सदा अष्टागे असे ॥१॥
जे जिनमुखोद्भवा ब्राह्मिनि । इंद्रादिकाचि स्वामिनि ।
नित्य स्मरु अंत:कर्णि । व्हाव्यालागुनि कार्यसिद्धि ॥२॥
मूलोत्तर गुणवर्य । जे नित्य पालिति मुनीराय ।
सदा वंदु त्याहाचे पाय । जेन्हे प्राप्त होय श्रुतज्ञान ॥३॥
देव शास्त्र आनि सद्‌गुरू । पदत्रय हृदयी धरू ।
कथेलागि आरभ करू । थोर आधारू मज असे ॥४॥
उक्त कथाकोशे–इत्यर्हद्‌भारतीसाधूपादस्मरणमगलं ।
कृत्वा करोमि कर्मारिशातये सत्कथाम्यह ॥५॥
जीवघाते स्मरणे करोन । भयभीत होति प्राणीजन ।
त्रिलोकि प्रिय प्राणाहून । न दिसे जान दुजे काही ॥६॥
कोटिंद्र देवानि कौनासि । प्राण मागितल्या त्यासी ।
सहसा न दे मनखुशी । तृणवत् द्रव्या मानिति ॥७॥

राज्यलक्ष्मीगृहभांडार । भार्यापुत्रादि परीवार ।
प्राणाहोनि न दिसति थोर । जानोनि ज्ञानी नर दया किजे ।।८।।

न्हावयासि रोगशाति । न देइजे देवताप्रति ।
पश्वादि जीवाचि आहूति । जीवघाते न होति कार्यसिद्धि ।।९।।

पितृतिथि श्राद्धदिवसि । दया आनोनि मानसि ।
न वधावे पसुजीवासि । पापदुःखासि कारण ।।१०।।

गजाश्व आनि नरमेध । जे दयार्द्र असति मनशुद्ध ।
न करावा तयाचा वध । निरापराध तृणभक्षी ।।११।।

मृगमीन आनि सज्जन । राहाति तृणजल भक्षुण ।
किरात धीवर पिशुन । निष्कारण करिति वध ।।१२।।

उक्तंश्लोक–मृगमीन–सज्जनाना तृणजलसंतोषविहितवृत्तीनाम् ।
लुब्धक[१]–धीवर–[२]–पिशुना[३] निष्कारण–वैरिणो जगति[४] ।।१३।।

जे जिह्वालंपट असति प्राणी । ते निर्दयमन होउनि ।
पशुवध करिति निसिदिनि । नर्कयोनि भोगावया ।।१४।।

दया असे जयाचे चित्ति । ते स्वात्मवत् जीव रक्षिति ।
तयाचि होय स्वर्गगति । सौख्य भोगिति भवभवि ।।१५।।

आता आइका भव्यजन । अहिंसाव्रत पाळिले जेन ।
तत् फलप्राप्तीचे वर्णन । चित्त देउन आइका ।।१६।।

अवंती देशाभीतरि । सिरसग्राम असे नगरि ।
वनोपवन शोभा भारी । इंद्रपुरिसम दिसे ।।१७।।

प्राकार–खातिका–गोपुर । त्रिखने पंचखने मंदिर ।
लोक नांदति थोर थोर । पाळिति निरंतर जिनधर्म ।।१८।।

---

१. पारधि, २. भोई, ३. दुर्जन (नर), ४. पृथ्वीतालि.

त्या नगरीचा भूपाल । नामे असे प्रजापाल ।
दुर्जनासि दिसे काल । असे दयाल जनरक्षणे ॥१९॥
जिनमंदिर असे उन्नत । रत्नबिंब करोनि सहित ।
न्हवन पूजा नित्य होत । तप जप व्रत करिति श्रावक ॥२०॥
कवने एकिय दिनि । त्या ग्रामाचे उद्यानवनि ।
नृपजनाचे पुण्यकरोनि । यशोधर मुनि पावले ॥२१॥
महाज्ञानाचे भांडार । तपतेजे यथा दिनकर ।
कर्माचा करिति संहार । षट्कायजीवावरि कृपा असे ॥२२॥
योग त्रिकाल साधिति । वृक्षातलि नदि पर्वति ।
पृथक् चातुर्मास ध्यान धरिति । दहन करिति कर्मेंधन ॥२३॥
चतुर्निकाय[५] देव सकल । पूजिति त्याचे पादकमल ।
विद्याधर आनि नृपाल । वंदिति सकल तत्पंकज ॥२४॥
षड्ऋतूचे पुष्पफल । उद्भविले एकवेळ ।
शुष्कवापिका भरले जल । सरसि[६] कमल उगविले ॥२५॥
व्याघ्र मृग आनि गाई । वैर सांडोनिया पाहि ।
क्रीडा करिति एके ठाई । प्रीति हृदयी धरोनिया ॥२६॥
मूषक[७] आनि मार्जार । सर्प नकुल आनि मयूर ।
सोडोनिया जातिवैर । परस्पर खेळताति ॥२७॥
टहुकार करिति शिखिगण[८] । केकीकृत[९] मंजुळ भाषण ।
भ्रमर करिति गायन । किंवा मुनीद्रगुण वर्णिति ॥२८॥
ऐसे पाहोनि वनमाली । आश्चर्य मानोनि हृदयकमलि ।
पुष्पफल घेवोनि करतलि । नृपतिजवळे गेला त्वरे ॥२९॥

---

५. कल्पवासि, जोतिर्वासी, व्यतरवासी, भुवनवासी.
६. सरोवर, ७. उदिर, ८. मयूर, ९. कोकिळा.

नृपापुढे भेटी ठेउनि । कृत नमन जोडोनि पाणि[10] ।
वदता झाला हर्षवदनि । मद् विज्ञप्ति कर्णि ऐकिजे ॥३०॥
तव पुण्य उदयागत । राया मनोहर वनात ।
महातपस्वी ज्ञानवत । आगमन केले मुनिराये ॥३१॥
अतिशय ज्याचे असे थोर । मिळोनिया सुरनर ।
वदनि वदति जयजयकार । गजर वाद्याचा होत असे ॥३२॥
मिळोनिया श्रावकजन । धर्मोपदेश करिति श्रवण ।
ऐसे अतिशय पाहून । आलो धाऊन सागाव्या तुज ॥३३॥
तद्वाक्य ऐकोनि भूपति । थोर आनद धरोनि चित्ति ।
मुनि वदना करायाप्रति । उद्भूवलि प्रीति महदतरि ॥३४॥
सकल परिवारे सहित । त्वरे जावोनि वनात ।
त्रिकरणे वंदिता मुनिनाथ । जन समस्त मिळोनिया ॥३५॥
बैसोनिया योग्य स्थानि । धर्मोपदेश ऐकति श्रवणि ।
जेन्हे पातकाचि होय हानि । सौख्यखानि असे भवभवि ॥३६॥
त्याचि ग्रामामाजि सार । मृगसेन नामे असे धीवर ।
जीव वधोनि जलचर । सदैव उदर भरीतसे ॥३७॥
घटा नामे असे तन्नारि । क्रोधे सर्पिणी स्वरे खरी[11] ।
बहु भक्षि स्वरूपे शूकरी । शयने बादरिसम असे ॥३८॥
पूर्वपापे करोनि । प्राप्त होय ऐसी भामिनि ।
भाडन करिति निसिदिनि । तृणासमान मानिति धवा[12] ॥३९॥
तदा तो ढीवर मृगसेन । स्कंधपृष्ठे जाल रोपुन ।
क्षिप्रा नदीलागुण । वेगे करोन जात होता ॥४०॥

---

१० करकमल, ११. गर्दभी, १२. भ्रतार.

तदा त्या वनामाजि प्रबल । श्रवणि ऐकिला कोलाहल ।
म्हने येथे का होतसे खेळ । जाउनि जवळ पाहू बरे ॥४१॥
तदा तेथे जावोनि त्वरित । नृपश्रावकजनसहित ।
मध्यस्थ पाहिले मुनिनाथ । धर्मामृत वर्षाव करिति ॥४२॥
यती श्रावकाचार सकल । मुनींद्र वदति ज्ञानबल ।
पापपुण्याचिय फल । मन निश्चल जन ऐकति ॥४३॥
तदा तो पापिष्ट धीवर । जाल ठेवोनिया दूर ।
तारशब्दे[१३] करोनि थोर । मुनिपदिसार नमोऽस्तु केला ॥४४॥
तदा त्या धीवराकारण । आसन्नभव्य जीव जानुन ।
धर्मवृद्धि तयाकारण । बृहत्स्वरे करोनि दिधलि ॥४५॥
तदा तो वदे जी गुरूस्वामि । मी थोर असे पापकर्मि ।
दुक्खडोहि बुडतसे मी । कृपा करोनि मज उद्धरि ॥४६॥
तदा मुनि वदे रे मच्छबध[१४] । अहिंसाव्रत महाशुद्ध ।
जरी पालिसी मनशुद्ध । तत् फले उर्ध्वगति[१५] पावसि ॥४७॥
ढीवर म्हने " जी मुनीराय । अहिंसाव्रत म्हनिजे काय ।
कैसे परि आचरावे । ते वदावे मजप्रति " ॥४८॥
मुनि वदे रे पंचस्थावर । त्रस मेलउनि षट्प्रकार ।
रक्षण करावे निरतर । दया थोर आनुनि हृदि ॥४९॥
ढीवर म्हने जी गुरूस्वामि । नीच कुळि जन्मलो मी ।
नित्य जलचर जीव वधोनि । पुत्र–कामिनिलागि पोसितो ॥५०॥
स्वामि सुगम सागावे व्रत । जेन्हे जिवाचे होय हित ।
कुटुब पोसिता दिनरात । सदोदित सौख्य होय ॥५१॥

---

१३. लाव शब्द, १४. ढीवरा, १५ स्वर्गगति.

तदा यशोधर ऋषी । चिंतवन करि स्वमानसि ।
काय व्रत द्यावे यासि । हिंसा दिवानिसि करितसे ।।५२।।
आता याचा आयुष्य जान । उरला असे एक दिन ।
निश्चय करावे व्रतबंधन । जेन्हे होय कारण सौख्याचे ।।५३।।
जगि जे असति भव्य प्राणि । पाप करिति निसिदिनि ।
परी अंत:कालि व्रतेदानि । पुण्यसदनि जन्म घेति ।।५४।।
तदा यशोधर यति । वदता झाला त्याप्रति ।
बारे मद्वाक्य धरावे चित्ति । जेन्हे स्वर्गसपत्ति मिळे ।।५५।।
प्रथमारभि जालातरि । मच्छ जो येईल लघुथोरि ।
तो सोडिजे जलाभीतरि । दया अंतरि आनोनिया ।।५६।।
हेचि तवागि असो व्रत । पाळावे मृदु करोनि चित्त ।
त्वया न तजावे प्राणात । महोपसर्ग तूत होय जरी ।।५७।।
प्रथम सोडिसि ज्याकारण । जरी तो येइल दुसऱ्यान ।
शीघ्र देइजे टाकून । चित्ति मानून व्रत भग भय ।।५८।।
जे जन घेवोनि व्रतासि । सकटि तजति तयासि ।
ते भोगिति दु:खराशि । दुर्गतीसि जावोनिया ।।५९।।
अंगिकारि जो जैनव्रत । पालिति दृढ करोनि चित्त ।
जरी सकटि पावति अत । तरी जीवाचे हित होतसे ।।६०।।
ऐसे जानोनि भव्यजन । जैनव्रत चिंतामणिरत्न ।
रक्षण करावे करोनि यत्न । महत्सौख्य सर्वत्र प्राप्त होय ।।६१।।
तदा मुनि वदे रे धीवर । महामत्र पचनमस्कार ।
जपत असावे वारवार । यदगीकार करी त्वरे ।।६२।।
जरी असता सुखि दु:खी । हा मत्र जपावा मुखि ।
अतरी दृढ धरोनि राखि । जेन्हे होसिल सुखि भवभवि ।।६३।।

ऐसे वदोनिया त्यात । णौकार मंत्रासहित ।
दिधले शुद्ध अहिंसाव्रत । जेन्हे आत्महित होय त्वरे ॥६४॥
व्रतरत्न या जगि सार । ढीवरे केले अंगिकार ।
अतरि हृर्ष पावला थोर । केला नमस्कार मुनिपदि ॥६५॥
जे गुरूवाक्य प्रमाण करिति । दृढातरि धरोनि भक्ति ।
तयासि स्वर्ग मोक्ष प्राप्ति । शीघ्र गति होतसे ॥६६॥
व्रत घेवोनि मृगसेन । मुनिपदि करोनि नमन ।
क्षिप्रानदीप्रति जाऊन । स्वकीय उद्यम करू लागल्न ॥६७॥
जाल घालता जलातरि । महामच्छ आला तयाभीतरि ।
तदा व्रत स्मरिले अंतरि । म्हने सत्वरि सोडू याजला ॥६८॥
तद्वलख पुरायालागुनि । तीक्ष्ण छुरिकाकरोनि ।
चिरा घालोनि तत्कर्णी । सोडिला जीव उदकामाजी ॥६९॥
तदा त्या तीरिनितीरि[16] । प्रवाहमुखे जावोनि दूरि ।
जाल क्षपिले सत्वरि । पुन्हा त्याभीतरि तोचि आला[17] ॥७०॥
तदा चित्ति आनोनि दया । पाठीन[18] क्षपिला त्याचि ठाया ।
पुन्हा दूर जावोनिया । मच्छ धराया जाल टाकिले ॥७१॥
ऐसे जलि क्षपिता जाल । तोचि मच्छ आला पचवेळ ।
सोडिता सोडिता वेळोवेळ । शीघ्र संध्याकाळ जाहालि ॥७२॥
स्वव्रत रक्षायासि सार । हृदयी दया आनोनि थोर ।
मच्छ सोडोनि जातसे दूर । तद्दिनि श्रम फार जाहाले ॥७३॥
तदा रवि पावला अस्त । वेवहार राहिला समस्त ।
सर्वत्र जाहाले तम व्याप्त । दुर्जनवत् जगि जानिजे ॥७४॥

---

१६. नदीतीरि, १७. तोचि मच्छ, १८. मच्छ.

तदा धीवर मृगसेन । गुरूवाक्य हृदयी धरोनं ।
कृत शुद्ध व्रतरक्षण । स्वगृहाला गुण आला त्वरे ॥७५॥

तदा घटाख्या कामिनि । बैसलि होति निजांगनि ।
भर्त्तार पाहिला रिक्तपाणि[19] । तदा क्रोधाक्त वचनि बोल्लिलि ॥७६॥

" रे रे दुष्टा ! दुराचारि । जावोनिया नदीतीरि ।
काय केलेसि आतावरि । सेरभर ज्वारि गृही नसे ॥७७॥

मम लागलीसे थोर भूख । कैसे साहावे क्षुधादु.ख ।
आता न दावि निजमुख । अतिमूर्ख तू पापिया " ॥७८॥

" मुनि भेटले दयानाथ । तयाने दिधले मंत्रव्रत ।
कथिला सर्व वृत्तान्त । भयभीत होवोनिया ॥७९॥

लाभ पावलो थोर । म्हनोनि लागिला उशीर ।
क्रोध न करि मजवर । गोधूमादि फार उद्या आनिन " ॥८०॥

कटुकवाक्य वदोनि फार । गृहामाजि जावोनि सत्वर ।
लावोनिया निज द्वार । खट्टिकावरि पसरलि ॥८१॥

अहो ज्या नराचे पदरि । पूर्व पाप असे थोरि ।
तयासि मिले ऐसी नारि । स्वपति मारि विष घालुन ॥८२॥

कापटयरूप स्त्रियास्वभाव । सत्यवाक्यासि नसे ठाव ।
जगी दाखवि शुद्ध भाव । हृदयी जीवदया नसे ॥८३॥

जो धरोनि थोर प्रीति । वसन भूषण सर्व पुरविति ॥
तयाचि आज्ञा न पालिति । तृणवत् मानिति निर्धनि धवा[20] ॥८४॥

तदा मृगसेन ढीवर । तद्वाक्य ऐकोनि दुर्धर ।
शरीर कपत्ति थरथर । करिति फुत्कार सर्पिनिसम ॥८५॥

---

१९. रिक्तहस्ति, २०. दादुला.

तेदा स्वकीय निजांगणि । बहुतक दिवसापासुनि ।
शुष्क काष्ठ होते एक्या स्थानि । देवोनि सिरानि नीजला ॥८६॥
गुरूवाक्य धरोनि अतरि । नौकारमन्त्र स्मरण करि ।
दिवसाचे श्रम होते थोरि । म्हनोनि लौकर झाला निद्रिस्त ॥८७॥
अहो त्या जीर्ण काष्ठात । कृष्ण सर्प होता राहात ।
मध्यरात्रि निघोनि त्वरित । त्या ढीवरात डकिला ॥८८॥
सर्प डकिला जानुन । करू लागला मंत्रचिंतन ।
तत्क्षणि पावला मरण । कौनाकारण न सोडि काल ॥८९॥
रोगि महादरीद्रि । धनाढ्य आनि स्वरूपि थोरि ।
ज्ञानी योगी ब्रह्मचारि । न परि हरि काल कवना ॥९०॥
उक्तं च–न प्रहरति मृत्यु पडितं श्रोत्रियं वा ।
धनकनकसमृद्धि वाहुवीर्यरूप वा ।
तपस्विनि यमयुक्त सुस्थितं दुःस्थितं वा ।
वनगत इव वह्नि सर्वभक्षी कृतान्तः ॥९१॥
तदा ते घटिका नारी । दया आनोनि हृदयातरि ।
तत्समीप जावोनि सत्वरि । मिष्ट वैखरि वदतसे[21] ॥९२॥
स्वामी मी तव असे दासी । अज्ञानेकरोनि तूजसि ।
क्रोधाक्त बोलिलि भलतिसी । ते त्वा मानसि न आनिजे ॥९३॥
स्त्रिया म्हणजे मूर्खजाती । करू नये तेचि करिति ।
वोलू नये तेचि बोलति । न भेति पाप करावया कदा ॥९४॥
स्वामी आता उठावे लौकरि । कृपा करोनि मजवरि ।
महद् अपराध साटोपी उदरि । चालावे गृहातरि स्वामिया ॥९५॥

---

२१ वचन.

म्हने स्वामि सोडोनि मौन । मजसि वदावे मिष्टवचन ।
गृहांतरि चालावे लवकुन । करावे भोजनपान लौकरि ॥९६॥
ऐसे वदोनि धरला हात । स्वकर घालोनि गल्पात ।
उठवित असे तयात । तदा प्राणमुक्त पति पाहिला ॥९७॥
तदा रुदन करिति थोर । निजकरे पीटिति भालउर[22] ।
तद्‌गुण आठवोनि फार । धरणिववर आग टाकिति ॥९८॥
अहो अहो मम स्वामि । कोठे गेलासि मज टाकुनि ।
एकली मी तुजवाचुनि । जैसी हरणी वनामाजि ॥९९॥
स्त्रिया स्वभाव असति असे । जिवंत धवासि गांजीतसे ।
मरण पावल्या दिवसे । शोक करीतसे वहुत ॥१००॥
ज्याचे होनहार उत्तम । तैसीच बुद्धि होय निर्मान ।
साहित्य मिळे त्याप्रमाण । शुभाशुभ येउन मिलतसे ॥१०१॥
तदा वदे ढीवर कामिनि । जे व्रत असे धन्यालागुनि ।
दिधले असे जे सद्‌गुरूस्वामि । तद्व्रत मजलागुनि असो ॥१०२॥
भवातरि हाचि भर्ता । मज होइजे सौख्यकर्ता ।
मी होइजे याचि कांता । असो उभयता फार प्रीति ॥१०३॥
ऐसे करोनि निदान । स्वभ्रतारासहित जान ।
महत्साहासे करोन । अग्निकाष्ठ घेउन मृत्यु पावलि ॥१०४॥
अहो धीवर आनि धीवरि । मृत्यु पावले यापरि ।
जन्म घेतील ज्याचे घरि । पुडिल्याधिकारि श्रवण होइल ॥१०५॥

**इति कथाकोशे रत्नकीर्त्याचार्यविरचिते मृगसेन धीवर अहिंसाव्रत रक्षण माहात्म्य कथा वर्णन प्रसंग पहिला ॥**



२२. कपाळ.

# प्रसंग दुसरा

सावध होवोनि सभाजन । अग्रकथेची मांडन ।
कथितो मी पुण्यपावन । करावे श्रवण एकचित्ते ॥१॥
सार धर्म देशातरि । असे विशालाख्या नगरि ।
तेथें विश्वंभर नृप राज्य करि । तत् प्रताप वैऱ्यावरी असे ॥२॥
विश्वगुणा नामे करोनि । त्या भूपतीचि असे रानि ।
रूपसौभाग्याचि खानि । क्षमा धरणिसम असे ॥३॥
त्या नगरामाजी सबल । श्रेष्टी असे श्रीगुणपाल ।
जनलोक मानिति सकल । जिनधर्म निर्मल पालीतसे ॥४॥
धनश्री नामे असे भार्या । तत्पर असे धर्मकार्या ।
रूपगुणे करोनिया । राम जायासारिखि[1] ॥५॥
त्या दोघाहि प्रति । कन्या असे बधूमति ।
चंद्रवदनि जगति । यौवन सपत्ति असे पावलि ॥६॥
धनश्री आनि गुणपाल सार । भोग भोगिता निरंतर ।
तत् गर्भी धरिला अवतार । धीवर मृगसेनाने ॥७॥
गर्भ वाढिति दिवसमासी । तव तव मानिति महाखुसि ।
न्हवनपूजा दिवसादिवसि । याचकजनासि दान देति ॥८॥

---

१. सीता.

त्या भूपतिचा असे प्रधान । नर्मधर्म करोनि नाम ।
तयाचा पुत्र असे जान । नर्मभवर्म म्हनोन नाम असे ॥९॥

तो पापोदय करोनि थोर । निवटिला महद् गवार ।
नित्य करिति परद्वार । तस्कर जुवार मित्र असति ॥१०॥

परदेसी आनि ग्रामातरि । अपकीर्ति विस्तारिलि थोरि ।
कोन्ही न देति नोवरि । दुराचारि पापियासि ॥११॥

तदा एके दिवसि जान । तो नर्मधर्मप्रधान ।
नृपासि केले निवेदन । कन्यारत्न मागावया ॥१२॥

अहो अहो स्वामिनाथा । गुणपाल श्रेष्टिची दुहिता ।
त्यात पाचारोनि एकाता । मम सुतास्तव मागिजे ॥१३॥

तद्वाक्य ऐकोनि नृपवर । म्हने त्वत् पुत्र अवगुणि थोर ।
ऐसे जानोनि सुता सुदर । बुद्धिवान्नर कैसे देइल ॥१४॥

बरे एके दिवसि । मागुन पाहु तयासि ।
जरी देइल मनखुसि । तरी त्वत्पुत्रासि देवविन ॥१५॥

नृपवाक्य ऐकोनि एक नर । श्रेष्टिसन्निध येवोनि सत्वर ।
श्रेष्टिसि होता मित्राचार । सारासार सर्व कथिले ॥१६॥

आइकोनि तयाचि उक्ति । अत्यत भय पावोनि चित्ति ।
हृत्²कंजि विचार करिति । व्यग्रचित्त³ होवोनिया ॥१७॥

जरी नृपाज्ञा करोनि । कन्या द्यावि तयालागुनि ।
तरी निंदाऽपकीर्ति जनि । व्याप्त होउन मम राहिल ॥१८॥

नृपाज्ञा करिता उल्लंघन । जाउ पाहाते धनप्राण ।
महत् संकट पडले येउन । कैसे निवारण होइल ॥१९॥

---

२. हृदयकमळि, ३. दुचित्त.

तदा विचारि स्वमानसि । म्हने आता जावे दूरदेसि ।
जरी राहाता या ग्रामासि । कन्या दृष्टासि देने येइल ॥२०॥
तदा त्या धनाश्रिय कारण । श्रीदत्तश्रेष्टीचे गृही जान ।
प्रसूत काल समीप जानून । दिधलि ठेऊन तद् गृहि ॥२१॥
गुनपाल आणि श्रीदत्तश्रेष्टि । उभयता फार असे प्रीति ।
वालमित्र म्हनविति । रत असति जिनधर्मि ॥२२॥
भार्या ठेवोन त्याचे घरि । द्रव्य कन्या घेवोनि सत्वरि ।
गूढवृत्ति करोनि चातुरि । देशावरि असे चालिला ॥२३॥
सोडोनि तयाचा देश । जावोनि कौसाबि ग्रामास ।
करिता झाला आवास । धार्मिक नृपास भेटोनिया ॥२४॥
शकट वाजि गजवर । आनि पापिष्ट दुर्जन नर ।
याहापासोनि असावे दूर । न तरि देशावर जाइजे ॥२५॥
उक्तं च । शकटात् पचहस्तेषु, दशहस्तेषु वाजिनः ।
हस्ती हस्तसहस्रेषु, देशत्यागेषु दुर्जनात् ॥२६॥
तो गुणपाल श्रेष्टि भला । जिनधर्मश्रेष्ट करू लागला ।
राजश्रेष्टी पद पावला । वदनिक जाला सर्वजना ॥२७॥
कौने एकिय दिवसि । श्रीदत्त श्रेष्टीचे गृहापासी ।
निर्धन श्रेष्टि वसे गुणरासि । दानपूजाकार्यासि तत्पर असे ॥२८॥
त्याचे पुण्योदय करोनि । मासोपवासी युग्ममुनि ।
शिवगुप्ति गुप्ताचार्य जानि । भावरिलागुनि उतरले ॥२९॥
येता पाहिले मुनीश्वर । मासोपवासी ज्ञानभांडार ।
आनंद मानोनिया थोर । विधिवत् सत्वर पडगाहिले ॥३०॥
नवधा पुण्य करोन । सप्तगुणे सहीत जान ।
शुद्ध प्रासुक मिष्टान्न । आहारदान दिधले ॥३१॥

तदा होवोनि निरंतर । अक्षयदान बोलोनि सत्वर ।
बैसोनि एक क्षणभर । धर्मोपदेश सार करितसे ॥३२॥

तदा श्रेष्टिचे गृहागणि । धनश्री उभी पाहिलि मुनि ।
व्यग्रचित्ति[४] मुखम्लानि । गर्भभारे करोनि पीडित ॥३३॥

अलंकारे करोनि रहित । कुरूपि दिसे बहुत ।
कुटुबवियोगे फार दु:खित । जैसी वनात एकलि[५] मृगि ॥३४॥

उक्तंच–नारकाणां महद्दु:खं, तिर्यंचानां महद्भयं ।
देवाना मानसं दु:खं, मनुष्याणां वियोगत: ॥३५॥

परवासि निराधारि । राहाति दु.ख मानोनि थोरि ।
सत्ता नसे तिलभरि । सौख्य अंतरि न मानिति ॥३६॥

उक्तंच–अभ्रछायातृणंवन्हि, पराधीन च यस्वकं ।
अज्ञान–सुच–वैराग्यं, क्षिप्रमेव विनश्यति ॥३७॥

दु:खित पाहोनि लघु यति । वदे जेष्ट मुनि प्रति ।
स्वामी हे स्त्रिया गर्भवती । फार दिसति दु:खित ॥३८॥

कोन्ही येवोनि पापिष्ट जीव । इचे उदरि धरिला ठाव ।
किंवा वैरी असे परभव । दु.ख व मारीतसे ॥३९॥

तद्वाक्य ऐकोनि सत्वर । वदे जेष्ट मुनिश्वर ।
हा जीव असे पुण्यवान । थोर सौख्य अपार भोगिल ॥४०॥

आनदेकरोनि जन्म होइल । पुण्योदय वृद्धि पावल ।
राजश्रेष्टि पद घेइल । जगी पावल थोर मान्य ॥४१॥

विश्वंभर नृपाचि नदिनि । रूपलावण्याचि खानी ।
परणील हा प्रागपुण्य[६] करोनि । कीर्ति जनि थोर पावल ॥४२॥

---

४. दु.खित, ५. हरणि, ६. पूर्वपुण्य.

राजश्रेष्टि नामे श्रीदत्त । समीपवर्ति असे राहात ।
तेन्हे ऐकिले मात । जे मुनिनाथ कथिलि ।।४३।।

म्हने मुनीश्वराचे वाक्य । कदा न होय लटिके ।
जरी सीतल निघे पावके । तरि मुनिभाख्य नव्हे दुजे ।।४४।।

ज्या कालि हा वृद्धि पावल । तदा मम पद घेइल ।
मुनिवाक्य निश्चय होइल । महत्त्व जाइल सर्व माझे ।।४५।।

जरी उद्भवे विशाकुर । चतुरे छेदावे लवकर ।
वृद्धि बलाढच झाल्यावर । प्राण सत्वर घेत असे ।।४६।।

बालक होताचि उत्पन्न । यासी टाकावे मारून ।
तदा सौख्य होइल मजकारण । ऐसे चिंतन करू लागला ।।४७।।

प्राणी चिंतवन करी सरसे । परीते होय भलतिसे ।
सुभासुभ जे दैवि असे । निश्चय तैसेचि होइल ।।४८।।

उक्त दुहा–मन चित्य मानवा ससा चिंते रान ।
मासा चिंते खोलपानि, कर्त्तार करे सो आन ।।४९।।

तदा धनश्री पूर्णमासी । शुभनक्षत्रे शुभदिवसि ।
सुखे प्रसविलि पुत्रासी । जैसी भानुसि पूर्वदिशा ।।५०।।

तेजरूपे करोनि आगळा । केवळ पुण्याचा पुतळा ।
ऐसा श्रेष्टिने पाहिला । अग्निज्वाला यथा वनि ।।५१।।

द्रव्य देवानिया दाईत । करिता झाला वसीभूत ।
म्हने कौने उपाय त्वरित । बालकात वधावे त्वया ।।५२।।

प्रसूतवेदनाकरोन । बालकमूर्च्छांग होउन ।
राहिला ऐसे एकक्षण । अैसा धाविन पाहिला ।।५३।।

द्रव्यलोभ धरोनि वराक । धनश्रीत वदे बाइ आइक ।
जन्मताचि हे बालक । असे मृत्यक प्रसविले ।।५४।।

अहो पुण्यवान् जीवाप्रति । दुष्ट जन जव जव गाजिति ।
तव तव सौख्यात पाविति । दुर्जन दुर्गति दु:खभोगी ॥७७॥
तदा बालकाचे वर्तमान । श्रीदत्त समजला जान ।
सत्वरि आला धाउन । मीसे करोन भेटिचे ॥७८॥
मग राहोनि दोन दिवस । वदे भगिनि भ्रतारास ।
मम गृहि एक मास । मम भगिनीस पाठवावे ॥७९॥
थोर कापट्य वसे मनि । बोलोनिया अमृतवचनि ।
बालकासहित भगिनि । आला घेवोनि स्वमंदिरि ॥८०॥
मग कितियक दिवसि । पाचारोनि मातगासी ।
द्रव्यलोभ दावोनि त्यासि । बाल वधाव्यासि धाडिला ॥८१॥
बालक घेवोनि सत्वरि । जावोनिया वनातरि ।
अर्भक ठेवोनि नदीतीरि । तद्रूप नेत्रि न्याहाळिति ॥८२॥
पाहताचि तद्रूपसपत्ति । थोर दया उद्भवलि चित्ति ।
बालक ठेवोनि एकांति । स्वगृहाप्रति आला त्वरे ॥८३॥
कुमराचे पुण्य करोनि । धेनू येवोनि तत्क्षणि ।
क्षीर स्रविति तद्वदनि । यथा जननि बालकासी ॥८४॥
ऐसे पाहोनि गौरक्षी । घेवोनि स्वस्व[१७] गोधनासि ।
सध्याकाळि निजग्रामासि । जावोनि मातृपित्यासि कथिले ॥८५॥
सर्व गौलियाचा नाथ । गोविंद नामे असे सात्विक[१८] ।
धनकनाचा नसे थाक । परंतु निपुत्रिक असति ॥८६॥
समस्त जावोनिया गवळि । मात जानविलि सकळि ।
तदा त्वरे जावोनि त्या स्थळि ।उचलोनि[१९] करकमलि घेतला ।८७।

---

१६. बालकाचे, १७. ढोरकि, १८. भला, १९. (बालक)

मग सिघ्र स्वगृहा जाउनि । बोलावोनि स्वभामिनि ।
अति मिष्ट वाक्य वदोनि । तदुत्सगी तत्क्षणी दिधला ॥८८॥
तद्रूप पाहोनि सुदर । हृत्कजि हर्ष पावलि थोर ।
कुमुदनि यथा निशाकर । तेज दिनकरसम दिसे ॥८९॥
ऐसे पाहता वालकाप्रति । हर्ष न मावे सुनदाचित्ति ।
हृदय उद्भविलि थोर प्रीति । यत्न करिति तद्रक्षणे ॥९०॥
धनकीर्ति दिधले नाम । रूपवलगुणे करोन ।
वृद्धि करिति दिनदिन । पुण्योदय करून जानिजे ॥९१॥
तदा एकिय दिवसि । श्रीदत्तश्रेष्टि पापरासि ।
गोविंद गौळियाचे गृहासी । घृत घ्यावयासि आला असे ॥९२॥
त्या कुमाराप्रति पाहून । द्वेषभाव जाहाला उत्पन्न ।
तदा पुसिले गौळियाकारण । आला कळोन सबंध पूर्व ॥९३॥
तदा श्रेष्टि पातकि थोर । हृदइ करे विचार ।
म्हने मत्कुलवृक्षात कुठार । वैरी आजवर असे वाचला ॥९४॥
वदे गोविंद गौळियासी । येक व्यग्रकार्य[२०] असे मजसी ।
पत्रिका घेवोनि मम स्त्रीपासी । स्वकिय पुत्रासि पाठवि ॥९५॥
तदा गोविंद वदे वानी । पत्रिका देइजे लेव्हुनि ।
मम पुत्र सिघ्र जाउनि । कार्य करोनि येइल ॥९६॥
अहो दुष्टाचे दुष्ट चित्त । शुद्धात्मा न जानिति व्यक्त ।
यथागी रोग राहोनि गुप्त । पीडा करित असे प्राणिया ॥९७॥
श्रीमत् श्री उज्जनि नगरि । महाबल पुत्र सुदत्ता नारी ।
मत्पुण्य सौख्य भोगिति थोरि । स्वर्गापरि स्वमदिरे ॥९८॥

२०. सिघ्र.

श्रीदत्तश्रेष्टि तत् क्षणी । वदे धनश्रीलागुनि ।
वाइ हा पापी जीव होता कोन्हि । दुःखदानि कुटुंबवर्गा ॥५५॥
पापीष्ट जीव गर्भी येता । देशातरि दवडिला पिता ।
वियोगदुःखार्ति पाडिलि माता । पुढे काय कर्त्ता कोन जाने ॥५६॥
ऐंसे वदोनि तिजसी । पाचारोनि सेवकासि ।
द्रव्यलोभ दावोनि त्यासि । म्हने वधावे यासी वनि नेऊन ॥५७॥
ऐसे एकात वदोन । भृत्याकरि बालक देवोन ।
त्वरे धाडिले त्याकारण । वधाव्यालागुन बालकासी ॥५८॥
अहो श्रेष्टि दुराचारि । क्वचिद्दया नसे अंतरि ।
बालक देवोनि भृत्याकरि । धाडिला वनातरि वधाव्या ॥५९॥
जो दयावान् नसे धर्ममूर्ति । तो शत्रुलागि न मारिति ।
कैसे वधील अर्भकाप्रति । दुःख दुर्गति भोगावया ॥६०॥

उक्तच–शत्रुजो पि न हतव्यो, बालकः किं पुनर्वृथा ।
हा कष्ट किं न कुर्वन्ति, दुर्जना फणिनो यथा ॥६१॥

मातगे बालकात सत्वरि । नेले एकांत वनातरि ।
ठेविता झाला धरणिवरि । सौख्यकारी बाल पाहिले ॥६२॥
तदंतरि[7] उद्भवलि दया । म्हने श्रेष्टी दुष्ट पापिया ।
बालक दिधले वधावया । कठिन करोनिया हृत्कज ॥६३॥
तदा कोमल करोनि मन । करिता झाला रोदन ।
त्या स्थलि अर्भका[8] ठेउन । स्वगृहाकारण आला त्वरे ॥६४॥
अहो ते तन मनोज्ञ दिसति । माजीं[9] नाना द्रुम सोभति ।
अत्रकक्षादि पुष्पजाति । गगा वहति जल निर्मल ॥६५॥

---

७ त्याने अंतरि, ८. बालक, ९ वनामाजि.

तेथे गोपाल मिळून । चारीत होते गोधन ।
त्याहिने पाहिला नदन । करिति रुदन बुभुक्षया[10] ॥६६॥
तदा करुणा आनोनि अंतरि । वदताति परस्परि ।
ऐसि कोन पापिनि असे नारि । जिन्हे रत्न वनातरि टाकिले ॥६७॥
तदा एक धेनु येउनि । उभी ठाकली बाल रक्षुणि ॥
क्षीर स्रविले तदवदनि । मोह धरोनि तयावरि ॥६८॥
तदा श्रीदत्त भगिनिवर[11] । गोस्थानि[12] पावला सत्वर ।
इंद्रदत्त नामे वणिग्वर । येत होता वेव्हार करावया ॥६९॥
तदा बालक वर्त्तमान । गोपालमुखे कृत श्रवन ।
तत्क्षणि पाहिला येउन । जैसा भान गगनातरि ॥७०॥
त्वरे घेवोनि तयासि । सिघ्र गेला स्वगृहासि ।
सुप्तस्त्रीयेचे गुह्यद्वारासी । बालकासि ठेविले ॥७१॥
मग वदे हे राधिके प्रिये । ऊठ ऊरु लवलाहे[13] ।
पश्य पश्य पुढे काय आहे । प्रसवली काय गूढगर्भिनि ॥७२॥
तदा भ्रताराप्रती बोले । पूर्विच कर्मानि असे गाजिले ।
आता मम हृदइ वहिले[14] । विनोदभाले काय मारिता ॥७३॥
तदा श्रेष्टि म्हने गे भामिनि । पाहिजे नेत्र उद्घाटुनि ।
सत्यासत्य येइल कळोनि । दु खित होउनि काय वदसि ॥७४॥
ऐकोनि[14] धवाचि वैखरि[15] । उठोनि बसलि सत्वरि ।
बालक पाहिला एकेसरि । जानुवाभीतरि अतिसुदर ॥७५॥
तदार्भकाचे[16] पुण्यप्रभाव । करोनि जन्म महोत्सव ।
स्तनधय ठेविले नाव । नर नारि मोह फार करिति ॥७६॥

---

१०. क्षुधातुर, ११ श्रीदत्त, श्रेष्टीचे वहेनिचा नवरा, १२. गोठानावर, १३. लवकर, १४. फिरून. १४. भ्रताराचि, १५. वचम.

अहो पुण्यवान् जीवाप्रति । दुष्ट जन जव जव गाजिति ।
तव तव सौख्यात पाविति । दुर्जन दुर्गति दु खभोगी ॥७७॥

तदा वालकाचे वर्तमान । श्रीदत्त समजला जान ।
सत्वरि आला धाउन । मीसे करोन भेटिचे ॥७८॥

मग राहोनि दोन दिवस । वदे भगिनि भ्रतारास ।
मम गृहि एक मास । मम भगिनीस पाठवावे ॥७९॥

थोर कापटय वसे मनि । वोलोनिया अमृतवचनि ।
वालकासहित भगिनि । आला घेवोनि स्वमंदिरि ॥८०॥

मग कितियक दिवसि । पाचारोनि मातंगासी ।
द्रव्यलोभ दावोनि त्यासि । वाल वधाव्यासि धाडिला ॥८१॥

वालक घेवोनि सत्वरि । जावोनिया वनातरि ।
अर्भक ठेवोनि नदीतीरि । तद्रूप नेत्रि न्याहाळिति ॥८२॥

पाहताचि तद्रूपसपत्ति । थोर दया उद्भवलि चित्ति ।
वालक ठेवोनि एकाति । स्वगृहाप्रति आला त्वरे ॥८३॥

कुमराचे पुण्य करोनि । धेनू येवोनि तत्क्षणि ।
क्षीर स्रविति तद्वदनि । यथा जननि वालकासी ॥८४॥

ऐसे पाहोनि गौरक्षी । घेवोनि स्वस्व[१७] गोधनासि ।
सध्याकाळि निजग्रामासि । जावोनि मातृपित्यासि कथिले ॥८५॥

सर्व गौलियाचा नाथ । गोविंद नामे असे सात्विक[१८] ।
धनकनाचा नसे थाक । परंतु निपुत्रिक असति ॥८६॥

समस्त जावोनिया गवळि । मात जानविलि सकळि ।
तदा त्वरे जावोनि त्या स्थळि ।उचलोनि[१९] करकमलि घेतला ।८७।

---

१६. वालकाचे, १७. दोरकि, १८. भला, १९. (वालक)

मग सिघ्र स्वगृहा जाउनि । बोलावोनि स्वभामिनि ।
अति मिष्ट वाक्य वदोनि । तदुत्संगी तत्क्षणी दिधला ॥८८॥
तद्रूप पाहोनि सुदर । हृत्कजि हर्षं पावलि थोर ।
कुमुदनि यथा निशाकर । तेज दिनकरसम दिसे ॥८९॥
ऐसे पाहता बालकाप्रति । हर्षं न मावे सुनदाचित्ति ।
हृदय उद्भविलि थोर प्रीति । यत्न करिति तद्रक्षणे ॥९०॥
धनकीर्ति दिधले नाम । रूपबलगुणे करोन ।
वृद्धि करिति दिनदिन । पुण्योदय करून जानिजे ॥९१॥
तदा एकिय दिवसि । श्रीदत्तश्रेष्टि पापरासि ।
गोविंद गौळियाचे गृहासी । घृत घ्यावयासि आला असे ॥९२॥
त्या कुमाराप्रति पाहून । द्वेषभाव जाहाला उत्पन्न ।
तदा पुसिले गौळियाकारण । आला कळोन सबध पूर्वं ॥९३॥
तदा श्रेष्टि पातकि थोर । हृदइ करे विचार ।
म्हने मत्कुलवृक्षात कुठार । वैरी आजवर असे वाचला ॥९४॥
वदे गोविंद गौळियासी । येक व्यग्रकार्यं[20] असे मजसी ।
पत्रिका घेवोनि मम स्त्रीपासी । स्वकिय पुत्रासि पाठवि ॥९५॥
तदा गोविंद वदे वानी । पत्रिका देइजे लेव्हुनि ।
मम पुत्र सिघ्र जाउनि । कार्यं करोनि येइल ॥९६॥
अहो दुष्टाचे दुष्ट चित्त । शुद्धात्मा न जानिति व्यक्त ।
यथागी रोग राहोनि गुप्त । पीडा करित असे प्राणिया ॥९७॥
श्रीमत् श्री उज्जनि नगरि । महाबल पुत्र सुदत्ता नारी ।
मत्पुण्य सौख्य भोगिति थोरि । स्वर्गापरि स्वमदिरे ॥९८॥

---

२०. सिघ्र.

कुलदीपक मम नंदन । भार्या पतीव्रता जान ।
लिहिला मजकूर श्रीदत्तश्रेष्टिन । गुप्तरूपे वाचन.मत्सुता ।।९९।।
पत्रहस्ते धाडिला कुमर । त्यासी देवोनि जहर ।
अथवा कौनेहि प्रकार । मारावे सत्वर वैरियासि ।।१००।।
मम कुलद्रुमध्वसी । सत्वरि वधावे यासि ।
दया न आनिजे मानसि । या कार्यासि पुत्रराया ।।१०१।।
ऐसे पत्र लिहोनि सत्वरि । स्वनाममुद्रा करोनि थोरि ।
देवोनि कुमराचे करि । उज्जयनि नगरि धाडिला ।।१०२।।
याचे पुढे वर्त्तमान । होईल जे पुण्यपावन ।
ते अग्रप्रसंगि श्रोतेजन । चित्त देउन ऐकिजे ।।१०३।।

या कथेचा प्रसंग दुसरा.

## प्रसंग तिसरा

तत् पत्र बाधोनि कंठातरि । श्रेष्टि पित्यात पुसोनि सत्वरि ।
कुमार चालिला पादचारि । उज्जनि नगरि सुखे पौचला ॥१॥

मार्ग गमनाचे श्रम । फार पावला गोपनदन ।
ग्रामति[1] पाहोनि अम्रवन । छाया गहन अतिशीतल ॥२॥

तदा त्या तरुवरातलि । प्रौठला कुमर भूमंडलि ।
निद्रा व्यापिलि तयवेलि । जीवासी सकलि सौख्यकारी ॥३॥

अहो तदा त्याचि क्षणि । महाचतुरा असे गायनि ।
निज परिचारिका मिळोनि[2] । क्रीडेलागुनि आलि असे ॥४॥

नाम जिचे अनगसेना । स्वरूपे जैसी देवागना ।
सप्तस्वरे गाति गायना । चातुर्य नानाविध जानति ॥५॥

पूर्वसस्कारे करोनिया । कुमरावरि उद्भवलि दया ।
कठस्थ पत्र सोडोनिया । मुद्रा रक्षोनिया पत्र काढिले ॥६॥

तदा तत् पत्र वाचिले । दुष्टाचे दुष्टत्व कळू आले ।
वाईट वर्ण[3] दूर केले । शुभाक्षर लिहिले त्या स्थळि ॥७॥

---

१ वाहिर, २. दासि, ३. अक्षर.

जगी तेच वरीष्ट नारि । जे स्वामिचे सागितले करि ।
कुलवान् पुत्र पृथ्वीवरी । पितृ आज्ञा निरतर पालिति ॥८॥
या धनकीर्तिपुत्राकारणे । विपया कन्या सिघ्र देने ।
करोनिया मानदाने । न निरीक्षणे मम मारग ॥९॥
लग्न शोधोनि पाठविल्यावर । महोत्सवे करोनि थोर ।
कन्या देइजे सत्वर । विवाह् गजर करोनिया ॥१०॥
स्वज्ञाने ऐसे लिहोनि । त्याच्चि मुद्रामाजि घालुनि ।
तयाचे कठी वाधोनि । स्वकिय स्थानि गेली त्वरे ॥११॥
तदा कुमर धनकीर्ति । त्वरे उठोनि निद्रांति ।
जावोनि श्रेष्ठीचे गृहाप्रति । तत् सुताहाति पत्र दीधले ॥१२॥
लिहिला मजकूर वाचून । मातापुत्राचे हर्षले मन ।
विषया कन्या दिल्ही पर्णुन । थोर करोन महोत्सव ॥१३॥
ज्याचे प्राक्पुण्य असे थोरी । त्यासी काय करिति वैरी ।
कंदुकमृत्तिकापिंडापरि । चतुर निजातरि जानिजे ॥१४॥
उक्तं च : पडोनि उसळे पुन्हा त्वरित ऊर्ध्व चेडू जसा ।
वरीष्ट नर भूतलि पतनभाव लाभे तसा ॥
नुठे[४] च पडल्या पुन्हा, त्वरित मृत्तिकापिंड तो ।
कनिष्ट समजा तसा पतन पावल्या नासतो ॥१५॥
ते मात कळलि श्रीदत्तात । क्रोधे खवळला अद्भुत ।
त्वरे आला धावत । कराव्या घात कुमराचा ॥१६॥
त्यान नग्राचे बाहिर थोर । होते चडिकाचे मदिर ।
माजी वैसविले युग्मनर । कन्यावर वधावया ॥१७॥

---

४. न उठे.

मग निजमंदिरि येउनि । जामात एकात पाचारुनि ।
कापटय धरोनि अत:कर्णि । मिष्ट वाक्य वदनि वदे ॥१८॥

अहो अहो जी जामात । मत् सुता पुण्योदयागत ।
तुजसारिखा वर प्राप्त । दिसति जनात दुर्लभ ॥१९॥

आमचा असे कुलाचार । लग्न लागल्यावर ।
उडिद पिष्टाचे पाखर । कन्यावरहस्ते करविजे ॥२०॥

स्थापोनिया कासभाजनि । गधपुष्पनैवेद्य ठेउनि ।
रक्तवस्त्रे[6] आच्छादुनि[6] । कृष्णवस्त्र[7] तुम्ही पांघरिजे ॥२१॥

तमव्याप्त[8] सध्याकाळि । करी घेवोनिया बळि ।
जावोनि देविचे देउळि । चडिकापत्कमलि अर्चिजे ॥२२॥

मग करोनि नमस्कार । गृहासी याव्य लौकर ।
दुग्धभात भक्षावया भार्यावर । ऐसा कुलाचार असे आमुचा ॥२३॥

आइकोनि सासुऱ्याचे वचन । म्हने जी द्यावे साहित्यकरोन
देवि पुजोनि सिघ्र येइन । जेन्हे कल्यान होय आमुचे ॥२४॥

तदा आरति घेवोनि करताळि । पाघरोनिया कृष्णकमळि ।
चालिला चडिकाचे देउळि । सध्याकाळि लवलाहे[9] ॥२५॥

तदा भेटला भार्याभ्रात । म्हने जी अहो जामात ।
ककन–हारद्रिकासहित । कैसे वनात चालिले ॥२६॥

देवीपूजनाचे कारण । मैथुनासि[10] केले निवेदन ।
तदा तो वदे त्वा जावे पर्त्तुन । मी पूजा करोन सिघ्र येतो ॥२७॥

तदा आरत्ति घेवोनि करि । शामवस्त्र आच्छादिले शरीरि ।
जाताचि देवि देउलातरि । श्रेष्टिभृत्य सत्वरि मारिला ॥२८॥

---

५ खारवा, ६. झाकुन, ७. घोगड, ८ दिवेलागनि, ९. लौकर; १०. साल्यासि.

तदा धनकीर्ति कुमर । पूर्वपुण्यकरोनि प्रचुर ।
स्वश्रूगृहासी आला लौकर । श्रीदत्त सासुर वदे तदा ॥२९॥
त्वरे काहो आलेत करोन । न करीता देवीपूजन ।
हे काय तुमचे शाहानपन । ममाज्ञा भंगुन आला कसा ॥३०॥
तदा वदे सासुऱ्याप्रति । मामाजी मद्वाक्य ऐकावे सृति[11] ।
करी घेवोनि आरति । पूजाया देवात जात होतो ॥३१॥
निघता ग्रामाचे बाहिर । मार्गे भेटला त्वत् कुमार ।
तो क्रोधे प्रजलला मजवर । वाक्य मनोहर वदे ॥३२॥
म्हने अहो हो जामात । संध्यासमइ तमव्याप्त ।
कासिया जाता वनात । सध्या प्राणात होइल ॥३३॥
शरीरि हरिद्रिका चर्चुन । करी बाधिलेसे ककण ।
येकले न जावे आपन । घेतील प्राण भूत राक्षस ॥३४॥
देविपूजनाचि विधि । त्वा नाहि जानितालि कधि ।
त्याजवरि हीनबुद्धि । तो काय सुधी अर्चिल ॥३५॥
यास्तवे त्वया फिरावे माग । मम भाष्य पित्यालाजि साग ।
जरी तुजवरि करील राग । मम नाव साग त्याजपासि ॥३६॥
ऐसे वदोनि कुमर बळि । मम करीचि घेवोनि थाळि ।
पाघरोनि मम काबळि । चडिकादेउळि गेला त्वरे ॥३७॥
मजवरि न करावा रोष । क्वचित् नसे मम दोष ।
सर्व पुसावे कुमरास । जेव्हा गृहास येईल ॥३८॥
तदा तो श्रेष्टी श्रीदत्त । कुमराचि ऐकोनि माता ।
हृदय पावला थोर दुखित । अग्रे कार्यात विचारिति ॥३९॥

---

११. कर्णि.

ज्याचे पूर्वपुण्य असे थोर । त्याचे किं[12] करोति दुष्ट नर ।
सिंहसर्पाग्निसागर । दुष्ट व्यंतर न गांजिति ॥४०॥
प्रागपुण्य करोनि प्राणि । शीतल होय कल्पात वह्नि ।
अब्धि होय स्थलसमानि । प्रताप धरणिवरि व्यापिति ॥४१॥
भुजंग होय पुष्पमाल । महद् विश होय सुधा[13] निर्मल ।
शांत होति पावकज्वाला[14] । व्याघ्र विक्राल होति श्वानवत् ॥४२॥
जलोदरादि नाना व्याधि । निसिदिन जिवालागि बाधि ।
तेन पीडिति कधि । संसृतिवार्द्धि[15] सुख भोगिति ॥४३॥
जे असति दुर्जन नर । ते होवोनि चाकर ।
आज्ञाकित होवोनि निरतर । सेवा भक्ति सार करिति ॥४४॥
ऐसे जानोनि श्रावकजन । नित्य करावे पुण्यपावन ।
दानपूजाव्रतनेम । जीव रक्षण कृपा चित्ति ॥४५॥
ऐसे आचरि जो मानवि । तो सौख्य भोगिति भवभवि ।
स्वप्नातरि दुक्ख न पाही । ऐसे भव्यजन हृदइ जानिजे ॥४६॥
तदा तो श्रेष्टी श्रीदत्त । नेत्री पाहोनि जामात ।
पुत्रशोक उद्भवे चित्तात । म्हने ह्याचा घात करू त्वरे ॥४७॥
स्वकीय विशाखा प्रियाप्रति । पाचारोनि एकाति ।
म्हने मत् कुल छेदि वैन्याप्रति । त्वा वधावे युक्ति करोनिया ॥४८॥
तदा स्त्रीवदे धवाकारण[16] । थोर कापटय करोन ।
सद्य घेईन वैन्याचा प्राण । कपट स्त्रियापासून उद्भवे ॥४९॥
उक्त दुहा : ज्ञानी पडित सुगड नर, स्त्रीवेश्याभटनट्ट ।
इनसु कपट न कीजिए । इनका किया कपट्ट ॥५०॥

---

१२. काय करिति, १३. अमृत, १४ अग्नि, १५. ससारसागर.
१६. भ्रताराकारन.

भ्रतारासि वदे पन । उदयिक यासी न मारिन ।
तरि देईन निजप्राण । स्वामी सत्य मान मद्वैखरि[१७] ॥५१॥

तदा आनोनि समलखार । पीष्ट करोनिया सत्वर ।
मैद्यात मिल्वोनि घृतसाकर । मोदक सुदर केले तदा ॥५२॥

मग द्वितिय दिवसि । वदति झाली कन्यकेसि ।
बाइ मी जाते धुने धुयासि । उसीर मजसि लागल ॥५३॥

गर्भगृहाचे सीक्यावरि । मोदक असति द्विप्रकारी ।
शुभ्र आणि श्याम शर्करि । न्यारि न्यारि असति ठेविले ॥५४॥

उज्वल निज स्वामिकारणे । भक्तिभाव फरालासि देने ।
शाम पित्यास परोसने । न होय जेंव्हे ममापवाद ॥५५॥

ऐसे वदोनि गेली जननी । विषया विचारिति मनि ।
पित्यासम दाता नसे जनि । करिति बोळवनि वस्त्रभूषने ॥५६॥

जे कपटि असे जाया[१८] । ते धवावरि[१९] करे फार माया ।
गोड गोड घालिति जेवाया । देर भासरिया घालि भाकरि ॥५७॥

ऐसा विचार करोनि चित्ति । थोर धरोनिया प्रीति ।
उज्वल वादिले पित्याप्रति । शाम पतीताटि वाढिले ॥५८॥

लाडू भक्षिता श्रेष्टि श्रीदत्त । विषाग्नि पेटला हृदयात ।
तेंन्हे जाळिले श्रीदत्तात । तत् क्षणि अतकाल पावला ॥५९॥

ऐसी ऐकोनिया मात । विशाखा नारी आली धावत ।
थोर करिति आकात । हृदय मस्तकात पीटिति ॥६०॥

म्हने आता काय करू देवा । कैसा उद्भवला पाप ठेवा ।
सताप केला माझिय जीवा । करू प्रस्तावा कवनापुढे ॥६१॥

---

१७. वाक्य, १८. स्त्रिया, १९. भ्रतारावर.

तदा अंगजा[20] वदे जननि । तू काय न पाहसी नयनि ।
सर्व क्षणभंगुर असे जनि । आदिकरोनि जीवधनकन ।।६२।।
वहुत देवोनि दृष्टान्त । समजाविति जननीत ।
जननि वदे कन्यकेत । श्रेष्टीकृत पातक सर्वे ।।६३।।
वाइ वधाव्या त्वत् भ्रतार । श्रेष्टीने उपाय केले फार ।
ज्याचे पुण्य असे वलोत्तर । तो नर थोर त्रिलोकी वलि ।।६४।।
मग वदति झालि कन्याप्रति । वाइ जैत्रत राहो त्वत् पति ।
भोगिजे श्रेष्टिचि सपत्ति । स्त्रीवरप्रीति भोग भोगिजे ।।६५।।
ऐसे वदोनि आशीर्वचन । तोचि विषमोदक भक्षुण ।
त्वरे विर्सजिला प्राण । होमाराप्रमान बुद्धि होतसे ।।६६।।
जगी जे नर पापीष्ट । पारक्यासी चितिति वाइट ।
ते उभयत्र[21] विनष्ट । भोगिति कष्ट नर्कामाजी ।।६७।।
उक्तच परेषा यत्र कुर्वन्ति, विघ्नं दुष्टाशयाः खलाः ।
निश्चय विघ्नमासाद्य, पश्चा यान्त्यवदुर्गतिं ।।६८।।
तदा शालक[22] सासू सासरा । स्वकर्मे गेले यमद्वारा ।
प्राक्पुण्योदय प्राप्त होय धनदारा[23]। धनकीर्ति कुमरा प्राप्त झाले६९
ऐसे जानोनि भव्य जन । परजीवा न किजे विघ्न ।
अतरि दयाभाव आणून । करावे रक्षण जीव षड्विधा ।।७०।।
कथा होइल जे यावरि । ते ऐकिजे अग्रे अधिकारी ।
प्रीति धरोनि हृदयातरि । जेन्हे पुण्य थोर होइल ।।७१।।

**मृगसेन-धीवर-अहिंसा-व्रत-रक्षण-प्रसंग-तिसरा-**



---

२०. कन्या, २१. या भवि परभवि, २२. साला, २३. स्त्रिया.

तदा श्रेष्टी गुणपाल । द्विधा धर्म आइकोनि सकल ।
जोडोनिया करकमल । तमोस्तु निर्मल केले पुन्हा ॥२०॥

म्हने हो स्वामि मत् पुत्राने । प्राग्भवि काय केले पुण्य ।
महद्‌वैभव पावल यान्हे । राज्यमान्यादि करोनिया ॥२१॥

श्रीदत्तश्रेष्टिन बालपनि । उपद्रव केला पचस्थानि ।
सर्व विघ्न निवारोनि । पावला जनि सार सौख्य ॥२२॥

जगी थोर व्यापिलि कीर्त्ति । लक्ष्मी मिळालि आयति ।
भार्या यथा रोहिणी[६] रति[७] । शरीरकातिसम कामदेव ॥२३॥

ज्ञानविज्ञाने करोनि चतुर । दाता भोक्ता दयापर ।
धर्मकार्यासी तत्पर । नाना भोग निरतर भोगिति ॥२४॥

स्वामि श्रवन करायासि । विद्या असे मम मानसी ।
तू योग्य असे वदाव्यासि । सागावे सभेसि ज्ञानबले ॥२५॥

श्रेष्टिप्रश्ना ऐकोनि श्रवणि । वदता झाला महामुनि ।
बारे ऐकावे चित्त देउनि । भवातर काहानि कुमराचि ॥२६॥

मालव देशामाजि सार । सिरसग्रास असे सुदर ।
तेथे वसे मृगसेन धीवर । मच्छबध व्यापार नित्य करि ॥२७॥

प्रातर्उठोनि निरतरि । जावोनिया सरितातीरि ।
जाल घालोनि जलभीतरि । सदैव करि मच्छवेधन ॥२८॥

पेटारा स्थापोनि मच्छात । नेवोनिया बाजारात ।
क्रयविक्रय करोनि नित । उदरपोषनात करितसे ॥२९॥

कवने येकिय दिनि । प्रातकाळि उठोनि ।
जात होता नदिलागुनि । धहु जनानि मुनि वनि पाहिले ॥३०॥

---

६. चद्राचि रोहिणी, ७. सूर्याचि रति.

लोक पाहोनि तुंवळ[८] । सिघ्र येवोनि जवळ ।
नमोस्त केला तीन वेळ । बैसला जाळ दूर ठेउनि ॥३१॥

मुनिराज श्रावकाहिस । करिति धर्मोपदेश ।
पंचानुव्रत सरस । जव सावकासचित्ते[९] ऐकति ॥३२॥

प्रथम पालावे अहिंसाव्रत । परजीवाचा न करावा घात ।
वरीष्ट समस्त व्रतात । भवभवि सौख्य प्राप्त होय ॥३३॥

जो मानव आत्मासमान । परजीवाचे करिति रक्षण ।
तो परभवि भोगि आयु पूर्ण । राज्यनिधान पाविति ॥३४॥

जे जीवघात करोनि प्राणि । आनद मानिति मनि ।
कुटब पोसिति निसिदिनि । ते नर्कयोनि दुःख भोगिति ॥३५॥

भवभवि भोगिति आपदा । स्वप्नि न पाहे संपदा ।
महत् कष्ट भोगिति सदा । पातक वृदापासुनि ॥३६॥

दानपूजा करिति जन । यम नियम ध्यान मौन ।
सर्व वृथा जीवदयाविन । मूळावाचून वृक्ष यथा ॥३७॥

जीवदया करोनि सहित । दृढ पालावे सत्यव्रत ।
कदा न वदावे वाक्य अनृत[१०] । कष्ट बहुत पडलिया ॥३८॥

अचौर्यव्रत पालिजे सदा । जेन्हे भवभवि भोगी सपदा ।
दूर पळोनि जाय आपदा । अनुक्रमे मोक्षपदा पावति ॥३९॥

ब्रम्हचर्य पालिति जे नर । ते संसारसौख्य भोगिनि सार ।
होतील मुक्तिचे भ्रतार । निरतर सौख्य भोगिति ॥४०॥

लोभ मोहासि मारून । करावे परीग्रहप्रमाण ।
जेन्हे जिवाचे होय रक्षण । पुण्यनिधान प्राप्त होय ॥४१॥

---

८. पुष्कळ, ९ स्थिरचित्ते, १०. लटिके.

# प्रसंग चवथा

तदा भार्यासहित धनकीर्ति । नानाविध भोग भोगिति ।
जिनधर्म नित्य पालिति । व्यापिलि कीर्ति थोर जगि ॥१॥
त्या श्रीदत्त श्रेष्टीन । पचेवेळा केले विघ्न ।
निवारिले प्राक्पुण्य करोन । सौख्यनिधान पावला ॥२॥
कवने येकिय दिनि । विश्वभरनृपपुरधनि ।
जात होता क्रीडेलागुनि । श्रीकीर्ति नयनि पाहिला ॥३॥
स्वरूप जैसे कामदेव । पाहोनि उज्जयिनिचा राव ।
चित्ति उद्भवला भाव । थोर प्रभाव पाहोनिया ॥४॥
महा महोत्सवे करोनि । धनकीर्ति कुमरालागुनि ।
स्वकन्या दिधलि पर्नुनि । स्वरूपे इद्रानिसम असे ॥५॥
बहु रत्नाचे आभूषण । जरिवाब अमेल्य वशन[1] ।
देशादि गज रथ धन । कन्यावरा[2] कारण दीधले ॥६॥
हृदइ मानोनि महदानद । मेळवोनि जनवृंद[3] ।
दिधले राजश्रेष्टिपद । सौख्यकद असे वाढला ॥७॥
युग्म[4] भार्याकरोनि कुमर । भोग भोगिति निरतर ।
सोभति यथा स्वर्गी इद्र । कीर्ति देशावरि व्यापिलि ॥८॥

---

१. वस्त्र, २ जावायास, ३. समूह, ४. दोघी.

ऐसे जानोनि भव्य प्राणि । आश्चर्य न करावे मनि ।
जिनधर्मप्रसादे करोनि । क्वचित् त्रिभुवनि दुर्लभ नसे ।।९।।

ऐकोनि पुत्राचि कीर्ति । गुणपाल श्रेष्ठि निजचित्ति ।
थोर हरुष मानिला चित्ति । स्वग्रामाप्रति आले त्वरे ।।१०।।

पितागम ऐकोनि कुमर । नृपजनसहृदलभार ।
पचक्रोश जावोनि समोर । कृत वाद्यगजर पितानिला ।।११।।

तदा मिळोनि युग्मभामिनि । माता पित्याचे चरणि ।
नमन केले भक्ति करूनि । आशिर्वाद देवोनि संतोसविले ।।१२।।

मग सकलहि जनाकारणे । आदरे दिधले पोफळपाने ।
वदोनि क्षेमकुशल भाषणे । निज निज स्थाने गेले जन ।।१३।।

पूर्वपुण्य करोनि श्रीकीर्ति । माता पिता भार्यासंपत्ति ।
निसिदिन सार सौख्य भोगिति । जिनधर्म करिति भक्तिभावे ।।१४।।

सौख्य भोगिता एके दिवसि । उज्जनिग्रामाचे वनासि ।
यशोध्वज महाऋषि । ताराया जनासी कृतागम[५] ।।१५।।

तपजपानि ध्यान मौन । त्रिकाल योग करिति साधन ।
त्रिज्ञानि भव्यजनाकारण । संसार कष्टातून काढिति ।।१६।।

मुनि आगम ऐकोनि सार । जनसहित नृपवर ।
अम्रवनि जावोनि सत्वर । मुनि यशोध्वज वदिला ।।१७।।

धर्मवृद्धि दिधलि मुनि । परत सौख्याचि खानि ।
श्रेष्टि गुणपालादि करोनि । योग्यस्थानि बैसले ।।१८।।

यति-श्रावक-द्विविध । धर्मोपदेश ऐकति शुद्ध ।
जेन्हे तुटति कर्मबध । गती उर्ध्व होय जेन्हे ।।१९।।

---

५. आगम केले.

तदा श्रेष्टी गुणपाल । द्विधा धर्म आइकोनि सकल ।
जोडोनिया करकमल । तमोस्तु निर्मल केले पुन्हा ॥२०॥
म्हने हो स्वामि मत् पुत्राने । प्राग्भवि काय केले पुण्य ।
महद्वैभव पावल यान्हे । राज्यमान्यादि करोनिया ॥२१॥
श्रीदत्तश्रेष्टिन बालपनि । उपद्रव केला पचस्थानि ।
सर्व विघ्न निवारोनि । पावला जनि सार सौख्य ॥२२॥
जगी थोर व्यापिलि कीर्त्ति । लक्ष्मी मिळालि आयति ।
भार्या यथा रोहिणी[6] रति[7] । शरीरकातिसम कामदेव ॥२३॥
ज्ञानविज्ञाने करोनि चतुर । दाता भोक्ता दयापर ।
धर्मकार्यासी तत्पर । नाना भोग निरतर भोगिति ॥२४॥
स्वामि श्रवन करायासि । विद्या असे मम मानसी ।
तू योग्य असे वदाव्यासि । सांगावे सभेसि ज्ञानबले ॥२५॥
श्रेष्टिप्रश्ना ऐकोनि श्रवणि । वदता झाला महामुनि ।
बारे ऐकावे चित्त देउनि । भवातर काहानि कुमराचि ॥२६॥
मालव देशामाजि सार । सिरसग्रास असे सुदर ।
तेथे वसे मृगसेन धीवर । मच्छबध व्यापार नित्य करि ॥२७॥
प्रातउंठोनि निरतरि । जावोनिया सरितातीरि ।
जाल घालोनि जलभीतरि । सदैव करि मच्छवेधन ॥२८॥
पेटारा स्थापोनि मच्छात । नेवोनिया बाजारात ।
क्रयविक्रय करोनि नित । उदरपोषनात करितसे ॥२९॥
कवने येकिय दिनि । प्रातकाळि उठोनि ।
जात होता नदिलागुनि । बहु जनानि मुनि वनि पाहिले ॥३०॥

---

६. चद्राचि, रोहिणी, ७. सूर्याचि रति.

लोक पाहोनि तुंवळ[८] । सिघ्र येवोनि जवळ ।
नमोस्त केला तीन वेळ । वैसला जाळ दूर ठेउनि ॥३१॥
मुनिराज श्रावकाहिस । करिति धर्मोपदेश ।
पंचानुव्रत सरस । जव सावकासचित्ते[९] ऐकति ॥३२॥
प्रथम पालावे अहिंसाव्रत । परजीवाचा न करावा घात ।
वरीष्ट समस्त व्रतात । भवभवि सौख्य प्राप्त होय ॥३३॥
जो मानव आत्मासमान । परजीवाचे करिति रक्षण ।
तो परभवि भोगि आयु पूर्ण । राज्यनिधान पाविति ॥३४॥
जे जीवघात करोनि प्राणि । आनद मानिति मनि ।
कुटब पोसिति निसिर्दिनि । ते नर्कयोनि दुःख भोगिति ॥३५॥
भवभवि भोगिति आपदा । स्वप्नि न पाहे संपदा ।
महत् कष्ट भोगिति सदा । पातक वृंदापासुनि ॥३६॥
दानपूजा करिति जन । यम नियम ध्यान मौन ।
सर्व वृथा जीवदयाविन । मूळावाचून वृक्ष यथा ॥३७॥
जीवदया करोनि सहित । दृढ पालावे सत्यव्रत ।
कदा न वदावे वाक्य अनृत[१०] । कष्ट बहुत पडलिया ॥३८॥
अचौर्यव्रत पालिजे सदा । जेन्हे भवभवि भोगी संपदा ।
दूर पळोनि जाय आपदा । अनुक्रमे मोक्षपदा पावति ॥३९॥
ब्रम्हचर्य पालिति जे नर । ते ससारसौख्य भोगिनि सार ।
होतील मुक्तिचे भ्रतार । निरतर सौख्य भोगिति ॥४०॥
लोभ मोहासि मारून । करावे परीग्रहप्रमाण ।
जेन्हे जिवाचे होय रक्षण । पुण्यनिधान प्राप्त होय ॥४१॥

---

८. पुष्कळ, ९. स्थिरचित्ते, १०. लटिके.

तदा गुरू आज्ञा धरोनि सिरि । ॐ नम सिद्धेभ्यः नामोच्चारि ।
केशपाशोत्पाटन करि । दिक्षा सत्वरि घेतलि ॥६४॥
मग गुरुसेवा सपादून । करिति शास्त्राचे पठन ।
तत्त्वपदार्थादि गहन । कृताध्ययन सहजरूपे ॥६५॥
नित्य पालिति यत्याचार । तप करिति घोरानुघोर ।
त्रिकाल योग साधिति दुर्द्धर । साहति प्रकर परीसह ॥६६॥
मग एकलविहारि होउनि । फिरति देशोदेशि वनि ।
भव्यजनासि धर्मोपदेसुनि । संसारार्णवातुनि काढिति ॥६७॥
यावज्जीव करोनि तप । मोडिति दुष्कर्माचा व्याप ।
मोहावरि धरोनि कोप । भवातर पाप दूर केले ॥६८॥
धनकीर्ति मुनिश्वरान । घोर तप करोन ।
अती साधोन समाधिमरन । सर्वार्थसिद्धि स्थान पावले ॥६९॥
तेथे तेत्तीस सागर । सौख्य भोगोनि निरतर ।
चवोनि मध्यलोकिसार । नृपकुले अवतार घेईल ॥७०॥
मग राज्य भोगोनिया । सजमव्रत घेवोनिया ।
तपाग्नि कर्म जाळोनिया । कैवल्य पावोनिया सिद्ध होइल ॥७१॥
उक्त च श्रेष्टी श्री धनकीर्तिस्तु सन्यासविधिना सुधी ।
सर्वार्थसिद्धिसत्सौख्य प्राप्तवान् भाविकेवलि ॥७२॥
विषया स्त्रिया नि कामसेना । दिक्षा घेवोनिया जाना ।
तपश्चरणकरोनि नाना । सौख्यस्थानि जातिल ॥७३॥
अहिंसा व्रत कथा आइकोनि । वैराग्य पावले भव्य प्रानी ।
दीक्षा घेवोनि तत् क्षणि । तपाचरनि लागले ॥७४॥
कोन्ही घेति नियमव्रत । कितियक घेत सम्यक्त्व ।
संबोधोनि जन बहुत । सुमार्गात लाविले ॥७५॥

अहिंसाव्रताचे फल । सर्व व्रतामाजि असे स्थूल ।
भव्यजन पालावे निर्मल । जेन्हे पद अढळ प्राप्त होय ॥७६।

मृगसेनाने एक दिवस । पाळिले अहिंसाव्रतास ।
सौख्य भोगोनि देवमानुस । सर्वार्थसिद्धिस सौख्य भोगत्ति ॥७७॥

ऐसे जानोनि भव्यजन । मनवचकाया करोन ।
नित्य करावे जीवरक्षण । जेन्हे पद निर्वाण सीघ्र होय ॥७८॥

इत्थ श्री जिनसूव्रतो विरचिताऽहिंसाकथा शर्मणो ।
सक्षेपेन मयाल्पबुद्धिवशिना, धर्मानुरागेन च ।
नानासारसुखप्रमोदजननी विघ्नौघनिर्नाशिनी ।
भव्याना भवशातये भवतु वै, सभाविता मानसे ॥७९॥

**मृगसेन-ढीवर-अहिंसाव्रत-फल वर्णन-प्रसंग-२४ इति कथाकोश रत्नकीर्ति विरचिते संपूर्ण-**



गुणव्रतानि शिक्षाव्रत । उपदेश करिति जनात ।
यथा वृष्टि करोनि जिमूत[११] । वृष्टि धान्यात होत असे ।।४२।।
तथा सर्वे भव्य प्राणि । धर्मामृत ऐकोनि श्रवनि ।
थोर आनद उद्भवे मनि । मेघगर्जनि मयूरे यथा ।।४३।।
तदा तो मृगसेन ढीवर । धर्मोपदेश ऐकोनि सार ।
उभा राहिला जोडोनि कर । पुन्हा नमस्कार केला ।।४४।।
तदा तो वदे सद्गुरूसि । स्वामी मी जन्मलो नीचवसि ।
सदा वधोनि जीवरासी । कुटुबासी पोसितो ।।४५।।
पाप करितो नित्यप्रति । कैसी होईल मम गति ।
भवभवि दुःखसतति । कवने रिति चुके देवा ।।४६।।
क्वचिव्रत देवोनि सत्वरि । मी बुडता भवसागरि ।
कृपा करोनि मजकरि । काढावे वाहेरि धर्महस्ते ।।४७।।
तद्वाक्य आइकोनि मुनि । वदता झाला त्यालागुनि ।
जीवदया व्रत घेउनि । दृढ होउनि पालिजे ।।४८।।
मग ढीवर वदे मुनीत । कोन्हि सुगम सागावे व्रत ।
जेन्हे अतिचार न लागे मत । थोर पुण्य प्राप्त होय ।।४९।।
तदा मुनि वदे ढीवरासि । प्रथम जाळचात येई जे मासि[१२] ।
चित्तोच्छवे सोडिजे तिसि । हेचि व्रत तुजसि असो ।।५०।।
ऐसे व्रत घेवोनि सत्वरि । जावोनिया नदीतीरि ।
जाळ टाकता जलाभीतरि । त्यामाजि थोरि मच्छ एक आला ।।५१।।
तद् व्रताचियफले । तोचि मच्छ त्याचि जाळे ।
टाकिता गवसला पंचवेळे । दुजा न मिळे त्याजप्रति ।।५२।।

---

११. मेघ, १२. मच्छ.

मग होवोनि क्षतक्षीण । रिक्त गेला गृहालागुन ।
घंटाभार्यनि पाहून । गृहातोनि काढून दीधला ॥५३॥
तदा अंगणामाजी[१३] निजला । निद्रामाजी सर्पदश झाला ।
मरोनि तवस्त्रीगर्भि आला । पुत्र जन्मला पुण्यफले ॥५४॥
प्राग्भवि पाळिले अहिंसाव्रत । तत्फले जाहला लक्ष्मीकात ।
श्रेष्टीनृपतिसुती प्राप्त । कीर्ति जनात विस्तारिलि ॥५५॥
जे पूर्वि होति घटाकामिनि । ते निदानसे मरोनि ।
जाहलि श्रीदत्त श्रेष्टिनदिनि[१४] । विषयाभामिनी धनकीर्तिचि ५६
जे मच्छि येतसे जाळ । ढीवरे सोडिलि पचवेळा ।
ते मरोनिया वेश्या बाळा । जाहालि निर्मला कामसेना ॥५७॥
सोडिले होते पचवेलि । त्यास्तव येवोनि अम्राईतलि ।
पर्णविलि विषया वाळि । कृत तत् कालि महोपकार ॥५८॥
तदा तो श्रीकीर्ति कुमर । ऐकोनि स्वभवातर ।
जिनधर्मि दृढ होवोनि सत्वर । कृतनमस्कार मुनिपदि ॥५९॥
म्हने अहो सद्गुरु स्वामि । अनत काल संसार गहनि ।
चतुराशीतिलक्षयोनि । चतु खानि दुख भोगिले ॥६०॥
देवा या ससारसागरात । उम्मज्जन निमज्जन कृत ।
तेन्हे फार जालो दु खित । आता तारी मत सीघ्र स्वामि ॥६१॥
दिक्षा द्यावि मजप्रति । जेन्हे कर्माचि होय निवृत्ति ।
सौख्य भोगोनि नृदेवगति । शाश्वत गति देइ त्वरे ॥६२॥
तद् विज्ञप्ति ऐकोनि मुनि । वदे श्रीकीर्तिलागुनि ।
दिक्षा घेई पुण्यपावनि । आली यत्क्षणि त्वत् काललब्धि ॥६३॥

---

१३ अगणात, १४. कन्या, १५. वनि.

तदा गुरू आज्ञा धरोनि सिरि । ॐ नम. सिद्धेभ्यः नामोच्चारि ।
केशपाशोत्पाटन करि । दिक्षा सत्वरि घेतलि ॥६४॥
मग गुरुसेवा सपादून । करिति शास्त्राचे पठन ।
तत्त्वपदार्थादि गहन । कृताध्ययन सहजरूपे ॥६५॥
नित्य पालिति यत्याचार । तप करिति घोरानुघोर ।
त्रिकाल योग साधिति दुर्द्धर । साहति प्रकर परीसह ॥६६॥
मग एकलविहारि होउनि । फिरति देशोदेशि वनि ।
भव्यजनासि धर्मोपदेसुनि । ससारार्णवातुनि काढिति ॥६७॥
यावज्जीव करोनि तप । मोडिति दुष्कर्माचा व्याप ।
मोहावरि धरोनि कोप । भवातर पाप दूर केले ॥६८॥
धनकीर्ति मुनिश्वरान । घोर तप करोन ।
अती साधोन समाधिमरन । सर्वार्थसिद्धि स्थान पावले ॥६९॥
तेथे तेत्तीस सागर । सौख्य भोगोनि निरतर ।
चवोनि मध्यलोकिसार । नृपकुले अवतार घेईल ॥७०॥
मग राज्य भोगोनिया । सजमव्रत घेवोनिया ।
तपाग्नि कर्म जाळोनिया । कैवल्य पावोनिया सिद्ध होइल ॥७१॥
उक्त च   श्रेष्टी श्री धनकीर्तिस्तु सन्यासविधिना सुधी ।
सर्वार्थसिद्धिसत्सौख्य प्राप्तवान् भाविकेवलि ॥७२॥
विषया स्त्रिया नि कामसेना । दिक्षा घेवोनिया जाना ।
तपश्चरणकरोनि नाना । सौख्यस्थानि जातिल ॥७३॥
अहिसा व्रत कथा आइकोनि । वैराग्य पावले भव्य प्रानी ।
दीक्षा घेवोनि तत् क्षणि । तपाचरनि लागले ॥७४॥
कोण्ही घेति नियमव्रत । कितियक घेत सम्यक्त्व ।
सवोधोनि जन बहुत । सुमार्गात लाविले ॥७५॥

अहिंसाव्रताचे फल । सर्व व्रतामाजि असे स्थूल ।
भव्यजन पालावे निर्मल । जेन्हे पद अढळ प्राप्त होय ॥७६।

मृगसेनाने एक दिवस । पाळिले अहिंसाव्रतास ।
सौख्य भोगोनि देवमानुस । सर्वार्थसिद्धिस सौख्य भोगति ॥७७॥

ऐसे जानोनि भव्यजन । मनवचकाया करोन ।
नित्य करावे जीवरक्षण । जेन्हे पद निर्वाण सीघ्र होय ॥७८॥

इत्थ श्री जिनसूत्रतो विरचिताऽहिंसाकथा शर्मणो ।
सक्षेपेन मयाल्पबुद्धिवशिना, धर्मानुरागेन च ।
नानासारसुखप्रमोदजननी विघ्नौघनिर्नाशिनी ।
भव्याना भवशातये भवतु वै, सभाविता मानसे ॥७९॥

**मृगसेन-ढीवर-अहिंसाव्रत-फल वर्णन-प्रसंग-२४ इति कथाकोश रत्नकीर्ति विरचिते संपूर्ण-**



# प्रसंग पंचवीसवा

## श्री वीतरागाय नमः

नत्वा जिनं श्रीजगत् बधु । अरिहंतसिद्धज्ञानसिंधु ।
आचार्य उपाध्याय-साधू । पचप्रसिधु नमोस्तु ते ॥१॥
वदु सारदा ज्ञानदाता । कवित्व कळा वरदहस्ता ।
सावधान श्रोता वक्ता । धर्मकथा परिसा पै ॥२॥
स्वस्तिकावत्या नाम नगरी । राजा विश्वावसु राज्य करि ।
तद्राज्ञी श्रीमती सुदरी । पुत्र उदरि वसुनामा ॥३॥
क्षीरकदब उपाध्याय । क्षीरवत् निर्मलाशय ।
महाज्ञानी गभीर । विप्रवशा सिरोमणि ॥४॥
तो जैनधर्मी ब्राम्हण । जिनपूजा अध्ययन ।
होम–मत्र–क्रिया–निपुण । अघनाशन शातिकर्त्ता ॥५॥
तद्भार्या नाम स्वस्तिमति । पर्वनाम पुत्रोत्पत्ती ।
तत्पुत्र महादुर्मती । सुखोत्पत्ति न पुण्याविना ॥६॥
तत्कवणे एके दिवसी । नारद ब्राम्हण परदेसी ।
जिनेद्र–पद–पकजासी । दिवानिसि निर्मदयुक्त ॥७॥
सो विद्यापठनार्थ तेथ । राजपुत्र वसु पर्वत ।
तीघे पढति जिनमत । उपाध्याय तयात सीकवि ॥८॥

वसुनारद दोघे जन । शास्त्रज्ञ झाले प्रवीण ।
पर्वतस्य पूर्वपापेन । सरस्वती प्रसन्न न्‍हेची ॥९॥
एकदा स्वपतीकारन । स्त्रिया वदे क्रोध करून ।
विद्या स्वपुत्राकारण । बख्यापन किं न सीक्षते ॥१०॥
क्षीरकदब उपाध्याय । म्हणे ऐेक तू मम प्रिय ।
पापात्मा तव पुत्र होय । हे प्रिय मम किं क्रियते ॥११॥
स्त्रियसी नसे विश्वास । प्रचीति दाखवि तिएस ।
बोलावि त्या स्वपुत्रास । कार्य तयास सागतु ॥१२॥
कवडि-पैका घेवोनि जाई । बाजारि मेवा खावोन येइ ।
पैका गृहात घेवोन येइ । उपासि न राहिचे तुस ॥१३॥
तैसेची त्या दोघा सागत । पैका घ्या जा बाजारात ।
मेवा खावोनिया त्वरित । पैका आम्हास आनोन द्या ॥१४॥
तिघहि निघाले तेथोन । फिरो लागलेति रस्त्यांन ।
पर्वत म्हणे द्यावे फुटाने । पैका घेने तुमि आमचा ॥१५॥
फुटाने खावोन समस्त । कवडया मागतसे-त्यात ।
त्यानी करोनिया फजित । मूर्ख फिरत गृहा आला ॥१६॥
दोघे हलवाया दुकानी । असल मेवा पुसे वचनी ।
पाहु मासला चाखोनि । मग मोजोनि घेउ दोघे ॥१७॥
एक चाखोनि पाहे पेडे । दुजा खातसे रेवडे ।
हे तो नाहि वोसट गोड । तेथोनिया पुढे चालले ॥१८॥
जेथे तेथे मासला पाहति । उदर झाले असे तृप्ती ।
मग ते येवोनि गृहाप्रति । कवडया देति पाणि प्याले ॥१९॥
तिघे सागति वर्त्तमान । माता म्हणे पुत्र बुद्धिहीन ।
किंचित् पाहिजे पूर्वपुण्य । तेने ज्ञान प्राप्त पुरुषा ॥२०॥

श्लोक–पूर्वदत्तेषु या विद्या, पूर्वदत्तेषु यत्धनं ।
पूर्वदत्तेषु या भार्या, अग्रे धावति धावति ॥२१॥
पूर्वी दिधले शास्त्रदान । म्हनोन गुणधरा ज्ञान ।
सदाक्षेत्री खर्चिता धन । लक्ष्मी सपूर्ण स्त्रीसहित ॥२२॥
बरे स्वामि असो काही । यास कार्य सागावे काही ।
स्त्रीय परीक्षा पाहे तुहि । पिष्टपक्षि त्वाहि करावे ॥२३॥
ते तिघाचे हाति द्यावे । तुम्ही त्याचे कर्ण छेदावे ।
कोन्हाचे दृष्टि न पडावे । घेवोनि यावे आम्हापासि ॥२४॥
तिघे गेले अरण्यात । वृक्षाआड बसे पर्वत ।
म्हणे कोन्ही नाहि दिसत । कर्ण छेदित तयाचे ॥२५॥
येवोनिया गृहागनी । सागितली केली करनी ।
ते दोघेजन गेले वनि । विचार मनि करिताति ॥२६॥
श्लोक–अहो सर्वे प्रपश्यन्ति, चद्रार्कग्रहतारका. ।
व्यतराश्चमराधीरा पक्षिणः पशवस्तथा ॥२७॥
टीका–सर्व पाहति द्विजवृद । सूर्य पाहे आनिक चद्र ।
तारागण ते अमरेद्र । व्यतरेद्र पाहातेत की ॥२८॥
कैसे कर्ण छेदावे याचे । परपीडा मूळ पापाचे ।
ऐसे मुनि वदति वाचे । कर्ण याचे न छेदावे पै ॥२९॥
ऐसे म्हणोन दोघे जन । विचार करिति स्वमने ।
मग ते गृहासी येवोन । करिती नमन गुरूसी ॥३०॥
अहो हो श्रीगुरुदेव । कैसे याचे कर्ण छेदावे ।
पाहाती जीव जतु सर्व । पाप न करवे आमुचेनी ॥३१॥
उपाध्याय म्हणे स्त्री ऐक । पाहे पुत्राचे कौतुक ।
निर्बुद्ध तो अविवेक । पापकारक कृतघ्न हा ॥३२॥

एकदा तेन विप्रेण । राजपुत्रविद्यापठन ।
करिता राजमदागाण । अनिष्टवचन बोलला ॥३३॥
क्रोध आला त्या ब्राम्हणासि । कष्टीका घेवोनी तयासी ।
ताडन कराया धावले त्यासी । स्वस्तिमते सीसे रनागत् ॥३४॥
स्त्रिया म्हणे अहो भ्रतार । अन्यायी जाला राजपुत्र ।
क्षमा करावि तत्पुत्र । शात नेत्र करावि स्वामि ॥३५॥
शात झाले ते गुरूराय । वसु बोलला अहो माय ।
त्वा चुकविला माझा घाय । उपकार काय मी फेडु ॥३६॥
जे म्हणसि ते देइन । वर दिला सत्यवचन ।
ते म्हणे भाडारी ठेवन । कार्याकारन मागेन मी ॥३७॥
तेन्हा कित्येका वासर्मनी । क्षीरकदब महाज्ञानी ।
प्रयाण केले नदनवनी । त्रय शीष्यासी घेवोनिया पै ॥३८॥
पाठन करी वेदशास्त्र । एकात पाहोनि ज्ञानसूत्र ।
संस्कृत सिद्धान्त सूत्र । सुद्धवगत्र वदताती ॥३९॥
तत्समइ त्याच वणी । युगल आले चारणमुनि ।
रत्नत्रय धर्मध्यानी । तपतरणी ज्ञानाधीश ॥४०॥
शिष्य पुसे गुरुप्रति । हेतु यज्ञविद्या पढति ।
यासि कोन फळप्राप्ति । हे मजप्रति सागा स्वामी ॥४१॥
गुरू उवाच अवधिज्ञान पाहोनि । वरा प्रश्न केला वचनी ।
उत्तम नर-देह पावोनि । पाप पुण्य दोनि समजति ॥४२॥
कळोन करोनिया पाप । करिती त्यासी नर्कव्याप्त ।
छेदन भेदन सताप । सूलारोप सोसिताति ॥४३॥
नरक-तिर्यंचाचि गति । अगणित दु ख भोगिति ।
पचमकाळि ऐसि गति । न जानति शुभ अशुभ ॥४४॥

चौघ पढति जे का ज्ञान । त्यात सुबुद्धी दोघे जन ।
सुपुण्ये सुगतिपन । होइल जान तयासि पै ॥४५॥
दोघे जन पापी निदक । पापे प्राप्त त्यासीच नर्क ।
ऐकोनि क्षीरकदबक । तयाजवळि आले ते ॥४६॥
पाहोनिया त्या तपस्वीसी । नमन भावे केले त्यासी ।
आज्ञा दिल्ही तिघा शिष्यासी । जावे गृहासी सत्वर ॥४७॥
नमन करोन मुनिसी । प्रश्न पुसता जाला त्यासी ।
सागा आम्हा सुज्ञानासी । जैनमत्तासी वदावे ॥४८॥
ऐकोनि तयाचे उत्तर । मधुरगीरा प्रत्युत्तर ।
धर्माधर्म सारासार । सागार अनगार द्विधा ॥४९॥
दशलक्षण त्रिपनक्रिया । भावना सोळा सागोनिया ।
सप्ततत्त्व जीवादिदया । ऐकोनिया संतोष पै ॥५०॥
मग करद्वय जोडोन । विनति करि स्वामिकारण ।
चौघे करिता अध्ययन । वदले वचन ते सागा ॥५१॥
मुनि वदति कामजीत । त्व जिनभक्तिप्रसादात् ।
नारद तोहि ज्ञानवत । दोघासी प्राप्त स्वर्गसुख ॥५२॥
वसुपर्वत दोघेजन । कुकर्म कर्ता नर्क भुवन ।
ऐसे ऐकता ब्राम्हणे । करि नमन मुनिराया ॥५३॥
पुत्र गति नाहि चागली । मुनिवचन सत्य बोली ।
ब्राम्हन चिता लागली । वाट धरलि ग्रामाचि ॥५४॥
येवोनिया गृहाप्रति । बुद्धि शिकवी पुत्राप्रति ।
परि ते तव मिथ्यामति । सीनला चित्ति ब्राम्हण तो ॥५५॥
विचार करिता ज्ञानवत । मुनिचे वाक्य नव्हे असत्य ।
कल्पकोडि दु.खप्राप्त । सत्यसत्य आगमार्थ ॥५६॥

वीस कोडाकोडि सागर । तेव्हा एक पल्यविस्तार ।
ऐसे कल्पशतवर । भोगने दुर्धर येईल त्यासी ॥५७॥
असो हे बुद्धि ज्यास जेसी । फळ भोगिति जैसी तैसी ।
करावे आत्मसार्थकासी । विचारी मानसी ब्राह्मण ॥५८॥
एकदा विश्वावसु राजाला । श्वेतरोम त्यान पाहिला ।
वैराग्य-विरक्त जाला । बोलाविला वसुपुत्र तो ॥५९॥
त्यास देवोनि राज्यभार । आपण गेला वनातर ।
दिक्षा घेतलि दिगबर । तप दुर्द्धर आत्महित ॥६०॥
वसुराजा राज्य करी । एकदा गेला वनातरी ।
क्रीडा करिता पाहे नेत्री । पळी अधातरि दिसताहे ॥६१॥
विस्मय पाहोनिया मन । म्हणे येथे काही कारण ।
परीक्षार्थ सोडिला बाण । स्तभालागोनि पडे तळि ॥६२॥
तेथे जावोनिया पाहे । स्पटिकस्तभ अदृश्य आहे ।
त्यात घेवोन ये गृहे । गुप्तपाहे त्या ठेवितसे ॥६३॥
त्याचे करोनि सिंहासन । वर बैसलासे आपन ।
लोका सागे सत्यवचन । अधर बैसन अमुचे ॥६४॥
सत्यवचन करोनिया । आकाशात अमची काया ।
ऐस्यापरि तो कपटिया । धूर्त माया जगासि दावि ॥६५॥
मूढ लोक सत्य मानिति । जन सर्व सेवा करिती ।
ऐसे जे का वज्रमिथ्याती । कैसे तरति ससारासी ॥६६॥
क्षीरकदब एके दिने । राज्यकृत्य पाहिले त्याने ।
पर्वतवसू दोघे जन । पापाचरण करितात ॥६७॥
ते पाहोनिया समस्त । ससारि होवोनि विरक्त ।
वैराग्य भावित भक्ति । गेला वनात मुनिपासी ॥६८॥

दीक्षा घेवोनि दिगंबरि । मोक्षसुखाची ते पायरि ।
अत.काळि समाधीवरि । स्वर्गावतारी तो जाला ।।६९।।
पर्वतपुत्र स्वमंदिरात । पंचविषय सुखोत्पन्न ।
मणइच्छा भोग भोगीत । ससारी अनत भ्रमण ।।७०।।
तदा नारद देशातरे । तीर्थयात्रा करि आदरे ।
जिनपदि जैसा भ्रमर । ज्ञान दिवाकर शोभतु ।।७१।।
तो आला फिरत फिरत । राजधामी वसुपर्वत ।
सज्ञान सर्व अलकृत । नारदे पर्वत दृष्टी जाली ।।७२।।
बरे आलेत तुमी स्वामी । यज्ञी होम करावा तुमी ।
सर्व साहित्य केले अमी । मत्रगामी सर्व मेळा ।।७३।।
सर्व मिळाले ब्राह्मण । पर्वत तयासी बोले वचन ।
अजाहोमाचे प्रमाण । तुम्ही सांगण विधियुक्त ।।७४।।
त्याहि आनिला अजापुत्र । नारदे पाहोनिया नेत्र ।
काय पाहिले तुमी शास्त्र । कैसा मत्र ते होमक्रिया ।।७५।।
अजा म्हणजे घृत जान । तूप धान्य एक करून ।
होमाहुती द्यावि सपूर्ण । पाप दारुण जीवहिंसा ।।७६।।
पर्वत म्हणे मम जनक । होम करि त्रिवार्षिक ।
शास्त्र पाहता सकळिक । न्यायनीक मी वदतो ।।७७।।
ऐसा वाद प्रतिवाद । पर्वत प्रतिज्ञा करित ।
वसुराजा सत्यवत । तो बोलेल सत्य तेचि करा ।।७८।।
प्रतिज्ञा माझी हे वैखरा । अजाहोम सत्य खरा ।
यास पडेल काही अतरा । छेद करा मम जिह्वेचा ।।७९।।
तदा स्वस्तिमती बोलताहे । रे रे पर्वत त्वा पाप हे ।
त्वत् पिता त्रिवर्षकर्त्ता हे । व्यर्थ त्वा हे प्रतिज्ञा केली ।।८०।।

मातेन क्रोध केला त्याचा । पुन्हा मोह धरि पुत्राचा ।
राजासी मागु वर आमचा । पुत्र साचा व्हावयासी ॥८१॥
जावोनिया नृपापासी । माझा वर देई मजसी ।
माता मागावे त्वरेसी । जे मागसी ते देईन मी ॥८२॥
तेव्हा सर्व निरोपन । पुत्र वचन सत्यकरण ।
अतरीक्ष सत्य जान । म्हणति जन तुम्हासी ॥८३॥
राव म्हणे जाय वो माते । पर्वत वदे ते सत्य सत्य ।
जऱ्ही होईल प्राणात । वर सत्यार्थ तुज दिधला " ॥८४॥
ऐसे पापी दुष्ट जन । पाप करिति हाटेकरून ।
यथा सर्प दुग्ध पिउन । जना विष डसताची ॥८५॥
तेवि राजा असत्य पापी । तावत् नगरलोकसमीपि ।
येवोन वसले आपोआपी । ब्राह्मण पपि[1] दसऱ्याचे ॥८६॥
नारद म्हणे पाप ठेवा । अजापुत्र न होमावा ।
अज्यधान्य होम करावा । सत्य सांगावा पुण्यमार्ग ॥८७॥
जैन लोक होम करिति । अन्नाहुती अग्नीस देति ।
पुण्यमार्ग चालविति । हिंसा न करिति धर्मवत ॥८८॥
अज्य नाम होय घृत । अजापुत्र होम असत्य ।
पापे धरची फाटत । अर्थाचा अनर्थ न करावा ॥८९॥
पर्वत म्हणे मम शब्द खरा । अजापुत्र होम खरा ।
उपाध्यैक परपरा । साक्ष राजीद्रा तूच देइ ॥९०॥
ऐकोनिया तेच उत्तर । राजा वदतसे प्रत्युत्तर ।
पर्वताचि सत्य वैखर । दीर्घेश्वर वदतसे ॥९१॥

---

१ पक्षि तासडावा घ्यावा तो.

## प्रसंग सव्वीसावा

### अथाराधना-कथाकोशे-विद्युत्चौर-सत्यव्रत-फल-वर्णन-कथा

प्रथम नमु देव अर्हंत । अष्टादश–दोष–रहित ।
छत्तालिस गुणांकित । त्रैलोक्यनाथ जगद्गुरू ॥१॥
जिनमुखोत्पन्न भारती । तत्पदि असो मम नुति ।
आरंभिल्या ग्रंथाप्रति । सिद्धि प्राप्ति देइ त्वरा ॥२॥
जे छत्तीसगुणे श्रीगुरू । भव्यजना ताराया तारु[1] ।
तत्पदि मम नमस्कारु । असे अधारु ग्रंथसिद्धित ॥३॥
मालवदेशाभीतरि । असे उज्जनि नाम नगरि ।
वनोपवने सोभा भारि । ग्रामाबाहेरि फार सोभति ॥४॥
त्रिमेखला करोनि सहित । प्राकार[2] सोभति उन्नत ।
गोपुरे असति बहुत । ध्वजा लहकत पचवर्णि ॥५॥
मध्यभागि राजमंदिर । सोभताहे अतिसुंदर ।
त्रिखिन उन्नत थोर । तत्सोभा फार काय वर्णु ॥६॥
धनाढ्य जन वसति बहुत । द्रव्याचि नसे गनित ।
कोटी ध्वजा लहकत । जन धर्मवत जिनमार्गि ॥७॥

---

१. जहाज, २. दरवाजे.

सुदर दिसति हट्टावलि । पंक्तिबद्ध दुकानवलि ।
स्वर्णरत्न मुक्ताफलि । निरालि निरालि वीकिति ॥८॥
उत्तम करिति वेवहार । कासवटे इकिति कासार ।
स्वर्णरुप्य स्वर्णकार । बाजाज प्रचुर पाघुरणे ॥९॥
त्या नगरीचा पति । प्रजापाल नामे सोभति ।
पुत्रवत् प्रजा पालिति । कालवत् वैऱ्याप्रति दिसे ॥१०॥
त्या भूपतीचि रानि । श्रीमती नामे सुखखानि ।
स्वरूपे जैसी इंद्रानि । जिनधर्मि रत असे ॥११॥
त्या नग्रामाजि थोर । धनमित्र असे सावकार ।
विद्युत्प्रभ नामे कुमर । सप्तव्यसनि चतुर असे ॥१२॥
तस्करकलाचे ज्ञान । कुगुरूसन्निध केले पठन ।
चौर्यकर्मि जाहाला प्रवीण । करिति निसिदिन चौर्यकर्म ॥१३॥
चोरी करिता दिनप्रति । एकदा तराले धरोनि राति ।
बांधोनि नेला भूपाति । नृपाप्रति वदतसे ॥१४॥
स्वामी तुझे ग्रामातरि । रात्री नित्य करिति चोरी ।
यासि राखावे कोठवरि । जन जर्जरी केले यान्हे ॥१५॥
हा धनमित्र श्रेष्टिया पुत । नित्य फिरति ग्रामात ।
सताविति सर्वजनात । भय न मानित कवनाचे ॥१६॥
शासन काय करावे यासि । ते आज्ञा द्यावि मजसि ।
तैसा दड देउ यासि । तस्करीसि न करि पुन्हा ॥१७॥
ऐकोनि तसलाचि वाणि । नृप विचार करिति मणि ।
म्हने पाहा हो दैवकरणि । देवादिकाल्लागुनि न सोडिति ॥१८॥
श्रेष्टीनदन असता तरि । काय उने याचे घरि ।
म्हनोनि करितसे तस्करी । दुःख करि कुटुंबवर्गा ॥१९॥

लोक पाहति समस्त । मेळा मिळाला बहुत ।
जाला अर्थाचा अनर्थ । पृथ्वी फाटत तत्समई ॥९२॥
राजा सिंहासनासहित । गर्क झाला कठपर्यंत ।
जैसा तो अपे अपघात । भ्रमर बैसत कमळाग्रि ॥९३॥
नारद म्हणे आता तरी । सत्य वदावि वैखरी ।
सत्य ते तारी सत्य मारी । पाप पदरि न घ्यावे रे ॥९४॥
तेव्हा कंठ दीर्घ करून । पर्वतवचन सत्य म्हणे ।
तत् गिळिला धरत्रीन । पाप दारुण हिंसेचे पै ॥९५॥
श्लोक · असत्यसहिता हिंसा मिथ्यावचन दृश्यते ।
अष्टाग यत्र सम्यक्त्व दर्शनं तत् हि शुद्धिदं ।।९६।।
टीका–असत्येन हिंसा होति । मिथ्यावचने तेच गति ।
अष्टागे जे का सम्यक्त्वि । त्रिशुद्धि घेताती दर्शन ॥९७॥
हिंसा दोष लागला त्यासी । गेला तो सप्तम नरकासी ।
जय झाला नारदासी । श्रावकजनासी आनद ॥९८॥
पापे करिता क्षय होत । पुण्य कर्ता लक्षुमी प्राप्त ।
देही राया कळत होत । वरद हस्ते भस्म जाला ॥९९॥
तेव्हा ग्रामजनाचा मेळा । बोलविल त्या कुळाळा ।
गर्दभ आनि रे चचळा । मिळाला मेळा ग्रामपोर ॥१००॥
गर्दभारोहण पर्वत । धूळ शेण मार करित ।
ग्रामावाहेर गेला पळत । अरण्यात पापरूपि तो ॥१०१॥
पूजनीक नारद जाला । जैजैकार प्रवर्त्तला ।
राजपुत्र राजि बैसला । जैनधर्माला करिति लोक ॥१०२॥
तस्मात् प्राणक्षय होय । असत्य वचन बोलु नय ।
यश जावोन अपयश । अपकीर्ति होय जगात ॥१०३॥

नारद सुबुधी धीर । जैनधर्म धुरंधर ।
धर्मोपदेशकर्तार । पृथ्वीवर विहार करी ॥१०४॥
दानपूजादि व्रतनेम । श्रावकक्रिया बहु उत्तम ।
निहिंसक दयाधर्म । श्रावकोत्तम पाळितातिं ॥१०५॥
ऐस्यापरि नारद फीरत । सौख्य भोगि मणवाच्छित ।
असार हे ससारकृत्य । जाला विरक्त वैराग्यार्थे ॥१०६॥
तदा तो प्ताडवृक्षवनी । गुप्ताचार्य महामुनी ।
दीक्षा घेता मोक्षदाइनी । जाला मुनी नारदऋषी ॥१०७॥
रत्नत्रय धरधीर । दशलक्षण-धर्म-धर ।
तप श्चर्या करि घोर । भक्तीतत्पर जिनपकजे ॥१०८॥
अंत काळि धर्मध्यान । सर्व सन्यास केला त्यान ।
सर्वार्थसिद्धि जन्मपन । इद्रभुवन मोक्षमार्गं ॥१०९॥
अहो हो श्रोते भव्य प्राणि । सावधान वच तनी ।
जिनमहात्म्ये करोनि । काय प्राणी एण लाभे ॥११०॥
उक्त च-जित्वा सर्व कुवादिनो दृढतर श्रीनारदो निर्मदः ।
श्रीमत्सारजिनेंद्रपदाब्जमहासिद्धौलसच्चद्रमा ।
धृत्वा सार तप प्रसिद्धमहिमा, सर्वार्थसिद्धि श्रितः ।
श्रीमान् द्विजवशमडनमणि , कुर्यात् सदा मगलम् ॥१११॥

इति कथाकोश अनृतदोष असत्यदोष श्रीरत्नकीर्ति-शिष्यविरचिते वसुराज कथा समाप्ता । पंचविंशतिमो अध्याय. प्रसंग पंचविसाव ॥ २५ छ ॥
शुभं भवतु कल्यानस्तु तथास्तु

❀ ❀ ❀

## प्रसंग सव्वीसावा

## अथाराधना-कथाकोशे-विद्युत्चौर-सत्यव्रत-फल-वर्णन-कथा

प्रथम नमु देव अर्हंत । अष्टादश-दोष-रहित ।
छत्तालिस गुणाकित । त्रैलोक्यनाथ जगद्गुरू ॥१॥
जिनमुखोत्पन्न भारती । तत्पदि असो मम नुति ।
आरभिल्या ग्रथाप्रति । सिद्धि प्राप्ति देइ त्वरा ॥२॥
जे छत्तीसगुणे श्रीगुरू । भव्यजना ताराया तारु[1] ।
तत्पदि मम नमस्कारु । असे अधारु ग्रंथसिद्धित ॥३॥
मालवदेशाभीतरि । असे उज्जनि नाम नगरि ।
वनोपवने सोभा भारि । ग्रामाबाहेरि फार सोभति ॥४॥
त्रिमेखला करोनि सहित । प्राकार[2] सोभति उन्नत ।
गोपुरे असति बहुत । ध्वजा लहकत पचवर्णि ॥५॥
मध्यभागि राजमदिर । सोभताहे अतिसुदर ।
त्रिखिन उन्नत थोर । तत्सोभा फार काय वर्णु ॥६॥
धनाढ्य जन वसति बहुत । द्रव्याचि नसे गनित ।
कोटी ध्वजा लहकत । जन धर्मवत जिनमार्गि ॥७॥

---

१. जहाज, २. दरवाजे.

सुंदर दिसति हट्टावलि । पक्तिवद्ध दुकानवलि ।
स्वर्णरत्न मुक्ताफलि । निरालि निरालि वीकिति ॥८॥
उत्तम करिति वेवहार । कासवटे इकिति कासार ।
स्वर्णरुप्य स्वर्णकार । बाजाज प्रचुर पाघुरणे ॥९॥
त्या नगरीचा पति । प्रजापाल नामे सोभति ।
पुत्रवत् प्रजा पालिति । कालवत् वैऱ्याप्रति दिसे ॥१०॥
त्या भूपतीचि रानि । श्रीमती नामे सुखखानि ।
स्वरूपे जैसी इद्रानि । जिनधर्मि रत असे ॥११॥
त्या नग्रामाजि थोर । धनमित्र असे सावकार ।
विद्युत्प्रभ नामे कुमर । सप्तव्यसनि चतुर असे ॥१२॥
तस्करकलाचे ज्ञान । कुगुरूसन्निध केले पठन ।
चौर्यकर्मि जाहाला प्रवीण । करिति निसिदिन चौर्यकर्म ॥१३॥
चोरी करिता दिनप्रति । एकदा तराले धरोनि राति ।
वाधोनि नेला भूपाति । नृपाप्रति वदतसे ॥१४॥
स्वामी तुझे ग्रामातरि । रात्री नित्य करिति चोरी ।
यासि राखावे कोठवरि । जन जर्जरी केले यान्हे ॥१५॥
हा धनमित्र श्रेष्टिया पुत । नित्य फिरति ग्रामात ।
सताविति सर्वजनात । भय न मानित कवनाचे ॥१६॥
शासन काय करावे यासि । ते आज्ञा द्यावि मजसि ।
तैसा दड देउ यासि । तस्करीसि न करि पुन्हा ॥१७॥
ऐकोनि तसलाचि वाणि । नृप विचार करिति मणि ।
म्हने पाहा हो दैवकरणि । देवादिकालागुनि न सोडिति ॥१८॥
श्रेष्टीनदन असता तरि । काय उने याचे घरि ।
म्हनोनि करितसे तस्करी । दु:ख करि कुटुंबवर्गा ॥१९॥

ज्याकाली पुत्रजन्म होती । तदा आनंद मानिति चित्ति ।
नानाविध मगलाचार करिति । शर्कंरा वाटिति घरोघरि ॥२०॥
मातृपिता प्रीति करून । वस्त्रभूशनानि मिष्टभोजन ।
देवोनि करिति प्रतिपालन । वसवृद्धिकारण मानव ॥२१॥
ज्याचे पूर्वो पापोदयागत । त्यासी होय ऐसा सुत ।
सप्तव्यसनि मातृपीतात । दु:खदायक शत्रुतुल्य ॥२२॥
पित्याचे गाव असे थोर । कीर्ति असे देशावर ।
तत्कुलि जन्मला हा कुमर । छेदाया कुठार वंसवृक्ष ॥२३॥
द्वादश जन जगाभीतरि । उद्भवले असति ज्याहाचे घरि ।
बाधोनि टाकावे सागरि । दु ख अतरि न मानिजे ॥२४॥
पूत कपूत कुलछनि नार, लडाख पडोसि, लज्यावनसारो ।
भाइ अदेख, पुरोहित लपट, लालच मीत, अतीत धुतारो ।
साहेब सुभ, चाकर चोर, किसान कठोर, दिवान चकोरो ।
साच कहू अपराध बिना इन वार कुबाध समुदर डारौ ॥२५॥
जरी याज द्यावे सुली फासी । महादु:ख होइल श्रेष्टिसि ।
बलावोनि तयासी । स्वाधिन यासि तयाचे करावे ॥२६॥
तदा तराल पाठवोनि । सीघ्र तयासि आला घेउनि ।
नृपालागि जुहारुनि । कर जोडोनि उभा ठाकला ॥२७॥
तदा श्रेष्टिसि नृपति म्हने । चोरी केलिसे तव पुत्राने ।
यासी शाशन काय करणे । ते मज सागने सीघ्र त्वया ॥२८॥
श्रेष्टि म्हने जी भूपति । जैसे इथे तव चित्ति ।
तो दड द्यावा मजप्रति । प्राणधन तुजप्रति अर्पिले ॥२९॥
भूप म्हने हा तव नंदन । स्वगृहासि जाय घेउन ।
बरव्यापरि करि रक्षण । बर्व्यापरि शाहाणपन सीकवि ॥३०॥

तदा श्रेष्टि कुमरासी । नेवोनिया स्वगृहासी ।
नानापरि सिकवि त्यासि । परंतु न धरि मानसि अनुमात्र ॥३१॥
म्हने मी सुटलो नृपापासुनि । मग कवनाचे भय न मानी ।
फार उद्धत होउनि । करिति निसदिनि चौर्यकर्म ॥३२॥
पुन्हा धरोनि पापकर्मि । तराले नेला राजभुवनि ।
महत्ताडन करोनि । दृढबधनि वाधिला ॥३३॥
दंशमशक महासीत । पीडा होतसे अत्यंत ।
दु.ख न मनि क्वचित । यथा पाउसात गज ॥३४॥
या नरकि नार्किकासि । पीडा भोगिति दिवानिसि ।
कितिक दिवसा सोडिले त्यासी । प्राणसंकटासी प्राप्त करुणि ॥३५॥
मग शरीरबल पावोनि थोर । चोरी करिति निरंतर ।
पुन्हा धरोनि नृप किंकर । नेला सत्वर नृपमदिरि ॥३६॥
तदा नृपाज्ञा करोन । महान् करोनि ताडनबंधन ।
मग रासभि[३] वैसउन । देशातुनि काढोनि दिल्हा ॥३७॥
अहो पापीजन या भवि । दुःख भोगिति नवनवि ।
तद्वर्णन करील कोन कवि । येकिया जिह्वी जानिजे ॥३८॥
अहो कोशल देशातरि । अयोध्याचे वनातरि ।
पर्वतामाजि असे दरि[४] । जावोनि त्याभीतरि राहिला ॥३९॥
नग्रामाजि जावोनि निसि । चोरी करिति दिवस दिवसि ।
नेवोनि स्वर्णरुप्य रासी । गुफातरि द्रव्यासी ठेविति ॥४०॥
ऐसे करिता सदोदित । द्रव्य सचिले अगणित ।
तरी मन नव्हे शात । यथा मृत्तिकात घूस उकरि ॥४१॥

---

३. गर्दभ, ४ गुफा

ज्याचा जैसा वेव्हार असे । तो यत्ने करोनि करीतसे ।
जेंन्हे करोनि प्राण नासे । तो करितसे धरोनि प्रीति ॥४२॥
ऐसे करिता येके दिनि । त्याचि उद्यानवनि ।
ज्ञानसागर नामे करोनि । महामुनि विहार केले ॥४३॥
सायर समान गभीर । मेरगिरीवदसे धीर ।
धरनिसम क्षमा थोर । जीवदया निरतर पाळिति ॥४४॥
आत्मध्यानि त्रिधाज्ञानि । अलकृत रत्नत्रये करोनि ।
कषायवैरियासि वधोनि । जय त्रिभुवनि पावले ॥४५॥
पंचाचार पालिति शुद्ध । षट्काय जीव रक्षिति निर्वाध ।
सजम पालिति सहित वोध । करिति क्रोधाष्टकर्मावरि ॥४६॥
नव नयाचे जानिति वर्म । दृढ पालिति दशधा धर्म ।
जेंन्हे प्राप्त होय अनतशर्म । तद्यतिकर्म आचरिति ॥४७॥
नदीतीरि पर्वति वनि । वृक्षातलि गुफास्थानि ।
त्रिकालयोग धरिति मुनि । भव्यजना लागुनि सबोधिति ॥४८॥
सहकारवनि[५] उतरिले । जानोनिया ग्रामजन आले ।
वदन पूजन करोनि बैसले । पुसु आदरिले द्विधाधर्म ॥४९॥
श्रावक प्रश्न ऐकोन । वदता झाला द्विधाधर्म ।
यत्तिमार्ग पदनिर्वाण । गृहिधर्म स्वर्गदायक ॥५०॥
प्रथम पाळावे पचानुव्रत । अहिंसा सत्यवचनोक्त ।
अचौर्य ब्रह्मचर्यसहित । परीग्रहात प्रमाण कीजे ॥५१॥
गुणव्रत त्रिविध । चतुर्धा सीक्षाव्रत शुद्ध ।
नित्य पालावे त्रिकर्णशुद्ध । गती उर्ध्व प्राप्त व्हाव्या ॥५२॥

---

५. आम्रवन.

सर्व व्रतामाजी सार । जीवदयाव्रत असे थोर ।
नित्य पाळिति जे नर । सेविति सुर तदंघ्रिकमल[६] ॥५३॥

जो नित्य वदे सत्यवानि । तो थोर पुरुष त्रिभुवनि ।
नृपतिआद करोनि । तद्वचनि प्रमाण करिति ॥५४॥

जो स्वप्नातरि न करि चोरि । परधन मानि सर्पपरी ।
तो पूज्य राजमदिरि होय । तन्मंदिरि द्रव्य उत्कृष्ट ॥५५॥

जो नर पाळिति ब्रह्मचर्य । सुर नर सेविति त्याचे पाय ।
त्रिजगि वंदनिक होय । भवभवि पावे सार सौख्य ॥५६॥

जो परीग्रहाचे करि प्रमाण । त्यासि न करे उल्लंघन ।
स्वाधिन करावे निजमन । करावे रक्षण निजव्रत ॥५७॥

गृहीधर्म भव्यजनाप्रति । ज्ञानसागर महायति ।
पृथक् पृथग्व्याख्यान करिति । उच्च गति प्राप्त व्हाव्या ॥५८॥

गुफामाजि होता तस्कर । तेन्हे गडबड एकोनि थोर ।
म्हने काय खेळ खेळति पोर । जावे क्षणभर पाहावया ॥५९॥

तदा निघोनि गुफाबाहेरि । त्या स्थळि जावोनि सत्वरि ।
उभा राहिला दूरि । नमोस्तु वदनांतरि वदे ॥६०॥

स्थिर चित्त करोनि । धर्मोपदेशा ऐकति श्रवनि ।
तदा कुमतिचि जाहालि हानि । प्रीति जिनधर्मि उद्भवलि ॥६१॥

पुढे जावोनि मुनिप्रति । तच्चरनि करोनि नुति ।
कर जोडोनि करि वीनति । स्वामी भवसतति करी दूर ॥६२॥

म्या पाप केले बहुत । नसे त्याचि गनित ।
क्वचित्सुगम देवोनि व्रत । पुण्यमार्गात मिळविजे ॥६३॥

---

६. पादकमल

तदा तयासि वदे मुनि । पंचाणुव्रत गृहस्थाश्रमि ।
जो नर पाळि शुद्ध त्रीकर्णि । तो त्रिभुवनि पुण्यवान्नर ॥६४॥
तदा तस्कर मुनित पुसे । देवा तद्व्रत पालावे कैसे ।
जरी सुगम असे । तरी निर्वाहि भवंसे होइल ॥६५॥
जे जे व्रत वदे यति । कठिन कठिन म्हने त्याप्रति ।
स्वामि मूषक मेरूप्रति । हालविति कैस्यापरि ॥६६॥
स्वामि वदति जे जे व्रत । न येत याचे चित्तात ।
गुरू वदे वेक्सा काय करित । ते ते करावे मत निवेदन ॥६७॥
तदा वदे तो अधर्मि । स्वामि मी असे थोर कुकर्मि ।
चोरी करितो निसिदिनि । द्रव्य संचुनि खुसि मानितो ॥६८॥
मुनिराज वदे रे जरि । तुज न सुटे रे तस्करी ।
करसील तरि सुखकरि । परंतु अगिकारि सत्यव्रत ॥६९॥
चोरि कराया जासिल । तराला हाति सापडसिल ।
कोन रे ऐस पुसतिल । तदा सत्यबोल बोलिजो ॥७०॥
जरी पडे प्राणसकट । तरी न व्हावे व्रतभ्रष्ट ।
सत्यवाक्य दत्तसावे सुष्ट । ऐसे पालिजे प्रष्ट सत्यव्रत ॥७१॥
ऐकोनिया मुनीद्रवचन । स्वामि हे व्रत असे सुगम ।
द्यावे मज कृपा करोन । यत्ने करोन पालीन मी ॥७२॥
तदा मुनीने सत्यव्रत । दिल्हे विद्युच्चर तस्करात ।
यथा धन सापडे दरिद्र्यात । हर्ष चित्तात मनि तैसा ॥७२॥
नमन करोनि मुनिपदि । व्रतस्मरण धरोनि हृदि ।
जावोनिया गुफामधि । म्हने मम पापनदि आटलि ॥७४॥
व्रतमाहात्म्य करोन । अशुभ कर्माचि जाहालि हान ।
शुभकर्म पुण्यपावन । यथा भान प्रकाशिले ॥७५॥

मोहनि कर्माचि जालि शाति । तदा विचारि स्वकियचित्ति ।
म्हने मत्पिताचे गुहांति । द्रव्याप्रति काय उने ॥७६॥
उत्पन्न होवोनि उंचकुलि । यासि लाविलि काजलि ।
गृहि धर्माचि केलि धूलि । किर्त्ति वनस्थलि म्या छेदिले ॥७७॥
सतापिले ग्रामजन । अपहारिले तद्धन ।
सचिले या स्थलि आणून । काय फल यापासून भोगिले ॥७८॥
कृत पापाचा सचय । जेन्हे भवभवि दुःख होय ।
येवोनिया मानवभवे । काहि बरवे नाहि केले ॥७९॥
फार करिति पच्छात्ताप । स्वनिंदा करोनि क्षपिले पाप ।
मोडिला चौर्यकर्माचा व्याप । कृत कोप कुकर्मावरि ॥८०॥
म्हने म्या चोरीकृत आर । स्वर्णरुप्य भरिले भाडार ।
रती एकहि नसे सार । तरि धिक्कार असो मज ॥८१॥
आता एकिय दिवसि । राजमदिरी जावोनि निसि ।
चोरोनि आनावे रत्नासि । स्वर्णरुप्यासि नसे कार्य ॥८२॥
स्वमनोरथ करोनि पूर्ण । सोडोनि द्यावे चौर्यकर्म ।
होत असे महत्पाप कर्म । येइल भोग भवभवि ॥८३॥
ऐसे विचारोनि अतरि । मनवचकाय सोडिलि चोरी ।
अपेक्षा असे रत्नावरि । राजमदिरि जावयाचि ॥८४॥
अगिकारिता सत्यव्रत । अशुभ कर्माचा जाहाला घात ।
जे पालिति दिनरात । ते वद्य इद्रात का न होति ॥८५॥
मग कौने एकिय दिवसि । दोन प्रहर कृष्ण निसि ।
नृपगृहि चोरी करार्यास । धरोनि मानसि सत्यव्रत ॥८६॥
तदा लवलाहे चालिता वाट । आडवा उन्नत असे कोठ ।
दरवाजे लाविले बळकट । तस्करानि दुष्ट काय करिति ॥८७॥

तदा कपाटाचे खालेहुन । महत्प्रयत्ने करोन ।
माजी प्रवेस केला जान । सर्वांग संकोचुन सर्पवत् ।।८८।।
तत्पर्श कपाट वाजे खर्खर । जागृत झाला दर्वानदार ।
धावोनि धरिला तस्कर । पुसे सत्वर त्याप्रति ।।८९।।
तो म्हने तू होयेसि कोन । निसी जाहालि प्रहर दोन ।
तस्कराचिय सारिखा जान । कपाटाखालून आला कसा ।।९०।।
ऐकोनि तयाचि वैखरि[७] । व्रत स्मरिले निजांतरि ।
म्हने मी चोर करावया चोरि । ग्रामातरि जात आहो ।।९१।।
त्याचे वाक्य ऐकोनिया । म्हने रे सत्य वदावे त्वया ।
कोन होयेसी जातोसि कासिया । कवने ठाया काय कार्य ।।९२।।
विद्युच्चर म्हने सत्य मानि । मी तस्कर निश्चय जानि ।
चोरी कराया लागुनि । राजभुवनि चालिलो ।।९३।।
पुनपुन्हा वदे दर्वानदार । सत्य तू न ह्वासि तस्कर ।
परि कोन होय साग सत्वर । विनोद फार काय करिसि ।।९४।।
विद्युच्चर म्हने मी चोर निश्चय । असत्य कासिया वदावे ।
जेन्हे दुर्गति दु ख होय । इहलोकि पावे घोरापमान ।।९५।।
पडिहार[८] म्हने तयासी । जरी तू तस्कर होयसि ।
कौन्या साहुकाराचे गृहासि । चोरी करिसि जावोनिया ।।९६।।
विद्युच्चर वदे राजमदिरि । जावोनिया करावि चोरि ।
अनर्घ्यवस्त घेवोनि सत्वरि । आपुले घरि जाइन ।।९७।।
राजकिकर वदे त्याप्रति । अमोल्य वस्तु लाभे तुजप्रति ।
सत्य वदावि उक्ति । त्यात मजप्रति काय देसिल ।।९८।।

---

७. वाक्य, ८ दर्वानदार.

ऐकोनि तयाचे वचन । म्हने मद्‌वाक्य सत्य मान ।
जे वस्तु येइन घेउन । अर्द्धे त्यातुन देईन तुज ॥९९॥
तदा राजदूत वदे त्यासी । काय नाम असे तूजसि ।
कवने स्थली राहासि । ते सत्य मजसि वदी त्वरे ॥१००॥
विद्युच्चर म्हने नग्राबाहिरि । उद्यानवन असे थोरि ।
उन्नत पर्वतामाझारी । गुफा अधारि भयकर असे ॥१०१॥
त्यामाजि वसतो निसिदिनि । व्याघ्र सिह्वाचे भय न मानि ।
कठिन मन असे वज्राहुनि । वसतो हनोनी भयकर स्थळि १०२
पडिहार वदे तद्‌वेळि । उठोनिया प्रात कालि ।
यवोनि हाक देता प्रबलि । सिघ्र मज जवळि येसिल ॥१०३॥
तू नृपाचा दर्वान्दाज । नाम स्थान कथिले तुज ।
नतर भय कौनाचे मज । येईन सहज त्वद् वाक्य ऐकता ॥१०४॥
तदा पडिहार विचारी मनि । कैंचे सत्य चौरवदनि ।
विनोद करितसे हा प्राणि । सत्य हा कोन्हि ग्रहस्त असे ॥१०५॥
कदा सत्य न वदे चोर । भ्रष्टासि कैंचे सौख्यसार ।
मद्यपातरि कैंचा विचार । त्रय जुवार हृदइ वसे ॥१०६॥
उक्तच–नास्ति सत्य सदा चौरे, न शौच वृषलीपितो[१] ।
मद्यपे हृदय नास्ति, द्यूते च त्रितय नहि ॥१०७॥
ऐसे विचारोनि चित्ति । आज्ञा दिधलि त्याप्रति ।
म्हने त्वा जावे कार्यार्थि । मद्‌वाक्य चित्ति असू द्यावे ॥१०८॥
पाहा हो व्रताचे माहात्म्य कैसे । तस्कर स्वमुखि वदतसे ।
दर्वान्दराचे मनी न भासे । म्हने हा ग्रहस्तसे मानव ॥१०९॥

---

९ अधर्मि

ऐसे जानोनि अतरि । सत्यवाक् निरंतरी ।
बहुमान्य पावोनि धरावरि[10] । भवभवातरि सौख्य पावल ।११०।
मग तो जावोनि सत्वरि । वेघोनि गेला राजमंदिरि ।
प्रवर्ततला कराव्या चोरि । स्वर्णारूप्य करी घरीचना ॥१११॥
पाहता पाहता स्थान स्थानी । रुप्पकरड पाहिला नयनि ।
उघडोनि पाहिला तत्क्षणि । माजि रत्नत्रीनि पाहिले ॥११२॥
रत्न पाहोनि अमोलिक । अतरि करीति विवेक ।
म्हने कवनासि द्यावे येक । युग्म[11] सत्विक घ्यावे कौन ॥११३॥
जरी रत्न असते च्यार । वाटनि होति बरोबर ।
आपन दोन ठेविल्यावर । व्रतासी अतीचार लागला ॥११४॥
जरी त्याज देउ दोन । येकचि घ्यावे आपन ।
तरी स्थिर न होयि मन । लोभकारण उद्भवे ॥११५॥
तदा आठविलि एक बुद्धि । एक ठेवोनि त्यामधि ।
युग्म घेवोनि चालिला सुधि[12] । पडिहारा आधि हाक दीधलि ११६
तो होता तदा जागृत । बैसला होता वाट पाहात ।
एक दिल्हे तयाचे हातात । दुजे त्यात दाखविले ॥११७॥
वदे होते तीन रत्न । डब्यामाजि एक ठेउन ।
घेवोनिया आलो दोन । दिल्हे त्यातुन एक तुज ॥११८॥
रत्न देवोनिया त्यासी । म्हने कार्य उद्भवे तुसि ।
येजो माझिया स्थानासी । बोलने तुसि मसि होइल ॥११९॥
ऐसे वदोनिया त्याला । ग्रामाबाहीर निघाला ।
शीघ्र गुफामाजि गेला । मग दूरि कराव्याला निशास्तम ॥१२०॥

---

१०. पृथ्वीवर, ११. दोन, १२. बुद्धिवत.

मग उगविला दिनमान । गायन करिति बदीजन ।
वाद्य वाजति धुमधुम । ग्रामजन होति जागृत ॥१२१॥
शीघ्र उठोनि भूपति । जिन जिन ऐसे मुखे वदति ।
सामाइक करोनि सुद्धचित्ति । नतरि पश्यति चहुकडे ॥१२२॥
डब्बा पाहिला तत्क्षणि । एक रत्न पाहिले नयनि ।
म्हने म्या ठेविले होते त्रीनि । त्यातोन दोनी काय जाले ॥१२३॥
जरी चोर घेवोनि जाता । तरी एकचि काशा ठेविता ।
रानिप्रति म्हने हे काता । दोन रत्न ता असे ठेविले ॥१२४॥
रानि म्हने काय उने घरि । दो रत्नाचि का करावि चोरी ।
राहोनि सागराभीतरि । वारि हारि कोन मूर्ख ॥१२५॥
मग जावोनि सभास्थानि । भूप बैसला सिहासनि ।
सभा घनवटलि मन्त्र्याद्यकरोनि । स्वर्गभुवनि इद्र जैसा ॥१२६॥
तदा उठोनि दर्वान्दार । हृदइ करिति विचार ।
म्हने हे रत्न अमोल्य थोर । मज देवोनि चोर गेला गृहा ॥१२७॥
पुन्हा कितियका वासरि । जावोनि नृपाचे मदिरि ।
चोरी करता सापडे करि" । न होता मारी सत्य बोलिला ॥१२८॥
तदा मज धरोनि नेइल । कोरडयाचे मार देइल ।
सुलि फासि चढविल । सर्व हरील धन प्राण ॥१२९॥
हे रत्न दिसे मजकारण । महा दुखदाइ सर्प्पाहिन ।
अही घेइल एक प्राण । हरी धन प्रान दु.ख भवभवि ॥१३०॥
ऐसे विचारोनि अतरि । रत्न घेवोनिया करि ।
त्वरे येवोनि सभाभीतरि । नृपासमोरि रत्न ठेविले ॥१३१॥

---

१३. हाती.

तद् रत्न पाहोनि भूपति । कारण पुसे सेवकाप्रति ।
म्हने स्वामि मद्वाक्य चित्ति । धरोनि मदुक्ति आइका ॥१३२॥
दोन प्रहर झालिया निसि । शृंखला लावोनि कपाटासि ।
तत्क्षणि निद्रा आली मसि । आला तद् वेळेसि एक तस्कर ।१३३।
तदा मी होउन जागृत । कोन म्हनोनि पुसिले त्यात ।
मी तस्कर ऐसे वदत । तदा मत आश्चर्य वाटे ॥१३४॥
पुनपुन्हा पुसता त्याकारण । तो एकचि वदे वचन ।
पुनरपि पुसले त्याकारण । चालिलासि कोन कारिया ॥१३५॥
तदा तो म्हने मी राजमदिरि । करायासी जात चोरी ।
सत्य तयाचि वैखरि । ममातरि न वटे राया ॥१३६॥
तो तस्कर न दिसे मजसि । विनोदवाक्य वदिले त्यासि ।
लाभ झाल्या मज काय देसी । तो म्हने तुसि देईन मे ॥१३७॥
जानोनि त्याचा शुद्धभाव । पुसिले स्थान आनि नाव ।
पुढे काय करीतो पाहाव । त्वा शीघ्र जाव कथिले असे ॥१३८॥
मग राजमंदिरि जाउनि । दोन रत्न आला घेउनि ।
एक मजप्रति देउनि । एक स्वस्थानि घेवोनि गेला ॥१३९॥
जैसे वर्तले राती । तैसे कथिले तूजप्रति ।
तद्वाक्य ऐकोनि भूपति । विनोदवाक्य त्याप्रति वदे ॥१४०॥
नृप म्हने रे दुष्ट किंकर । मम रत्न गेलेति फार ।
चोर केलासि सामीलदार । आनावे सत्वर त्याप्रति ॥१४१॥
तदा नृपवाक्य ऐकोनि कर्णि । सर्वांगि भयभीत होउनि ।
नृपाचि आज्ञा घेउनि । तस्करस्थानि गेला त्वरे ।।१४२।।
उभा राहोनि गुफाबाहेरि । मदस्वरे हाका मारी ।
तस्करे ऐकोनि एके सरि । आला बाहेरि सत्वर ॥१४३॥

तदा वदे राजकिंकर । तुज बाहिले नरेस्वर ।
त्वा चालावे लौकर । न तरि मत् सिर जाउ पाहति ॥१४४॥
तदा तस्कर वदे त्याप्रति । क्वचिद् भय न मनि चित्ति ।
मी असता पुढती । तव भूपति करील काये ॥१४५॥
मग जावोनि भूपसदसि[14] । नमिले नृपतिपकजासि[15] ।
नृप वदे तयासि । कोन होयसी काय नाम ॥१४६॥
तो वदे मी होय तस्कर । घेवोनि आला दर्वानदार ।
आलो सत्वरि तव समोर । वदावे लौकर स्वामिकारण ॥१४७॥
तदा नृप वदे रे मम मदिरि । त्वा काय काय केलि चोरी ।
सत्य वदावे लौकरि । न तरि थोरी कष्ट पावसि ॥१४८॥
तदा तो वदे जी नृपवरा । तारा अथवा प्राण हरा ।
मम वाक्य श्रवनि धरा । दड करा यथापराध ॥१४९॥
निशामाजि दोन प्रहरि । जावोनि तव मदिरि ।
त्रीनि रत्न पाहोनि नजरि । चालिलो सत्वरि दोन घेऊन ।१५०।
एक दिधले दर्वान्दारासि । एकचि नेले स्वगृहासि ।
राया मी अन्यथा न भासि । प्राण कठासि आलिया ॥१५१॥
तद् वाक्य ऐकोनि नृपवर । म्हने धन्य धन्य हा तस्कर ।
सत्यवाक् वदति सुदर । भवभवि सार सौख्यदाइ ॥१५२॥
तदा नृप म्हने प्रधान । मम मदिरि शीघ्र जाउन ।
रत्नासि यावे पाहून । सत्यासत्य कळोन येइल ॥१५३॥
मग जावोनि नृपमदिरि । रत्न पाहिले डब्याभीतरि ।
मनसा जाहालि कराया चोरी । पश्चिमपदरि[16] काढोनि बाधिले ।

---

१४ सभातरि, १५. पादकमल, १६. मागील काष्टा.

मग त्वरे नृपसन्निध आला । मुख पसोनि हासू लागला ।
स्वामि हा सत्यवादि भला। ऐसा न पाहिला दुजा जगी ॥१५५॥

तस्कर आनी जुवारी । सत्य वदति क्षणभरि ।
ऐसे नाहि ऐकिले शास्त्री । अग्निभीतरि शैत्य कचे ।।१५६।।

अमोल्य रत्न सापडे जरि । मुनिचे मन न राहे स्थीरी ।
जो नर नित्य करिति चोरि । तो काय परहरि वस्तु ऐसी ।१५७।

व्याघ्रामुखि पडल्या हरण । तो काय देइल सोडून ।
जगी ऐसा मूर्ख कोन । सार रत्न सोडून देइ ॥१५८॥

जावोनि पाहिले त्वरित । डबा पाहिला खडखड रीक्त ।
माघारे फिरोन आलो धावत । सागाव्यात तुज प्रति ।।१५९।।

प्रधानास वदे नरवर । यान्हे चोरिला मम भाडार ।
त्रीणि रत्न अमोल्य सार । त्वा काढावे लौकर यापासून ।।१६०।।

तो मंत्रि नृपाज्ञा करोन । त्यासी करू लागला ताडन ।
तऱ्ही वदे एकचि वचन । स्वामि म्या दोन नेले निश्चय ॥१६१॥

तदा नृप म्हने हा मत्री । आपन करोनि चोरी ।
दुज्यावरि करिति मारि । स्वकृत्य अतरि न विचारिति ।।१६२।।

नृप म्हने रे प्रधानायासि । वृथा ताडन का करिसि ।
जरी असे तुजपासी । तरी द्यावे मजसि हर्षचित्ते ॥१६३॥

नृपवाक्य ऐकोनि प्रधान । म्हने सर्प्पमस्तकिचा मन ।
तयासि हस्त लावल कोन । मूर्खावाचून नृपवरा ।।१६४।।

नृपगृहाचि वस्तुसार । जो करिल अपहार ।
तयाचा प्राण धन भाडार । हरे सत्वर भूपति ।।१६५।।

मायावाक्य[17] ऐकोनि भूपति । सेवकासी वदे क्रोध उक्ति ।
शीघ्र बाधोनि प्रधानाप्रति । मारावे दुर्मति या कारणे ॥१६६॥

नृप आज्ञा होताचि ऐसी । भृत्याहि बाधिले प्रधानासि ।
कोरडे मारिति वेदना जैसि । नर्क्कवासी करिति नार्किक ॥१६७॥

सहन नव्हे बंधताडन । घाबरा होवोनि प्रधान ।
शीघ्र सोडोनि दिधले रत्न । कर जोडून विनविति ॥१६८॥

देवा मजवरि न किजे क्रोध । साटोपि उदरि ममापराध ।
पापोदय उद्भवलि बुद्ध । अनर्घ्य शुद्ध रत्न पाहुनि ॥१६९॥

प्रधानासि भूपति म्हने । दुष्टा तुज काय होते उने ।
मत्सम भोगिसि राजमान्य । देश ग्राम सैन्य असे पुष्कळ ॥१७०॥

रत्न पाहोनिया एक । हरिले होवोनि पाइक ।
वृथा गाजिला वराक[18] । दया विवेक साडोनिया ॥१७१॥

तू होयेसि ब्राह्मण । म्हनोनि रक्षिला तव प्राण ।
त्वा जावे मम देशातुन । न दावि वदन मजकारने ॥१७२॥

सवे देवोनि फार किंकर । काढोनि दिल्हा देशाबाहिर ।
पापाचे फळे करोनि थोर । दुस्कर दुःख भोगिती ॥१७३॥

ऐसे जानोनि भव्यजन । कठगत येईल प्राण ।
तऱ्ही न करावे मृषा[19] भाषण । दु खकारण दुर्गतीचे ॥१७४॥

तस्कराचे पाहोनि साहस । नृपचित्ति उद्भवला हर्ष ।
जनसाक्ष करोनि नरेश । मन्त्रिपद तयास दीधले ॥१७५॥

पाहा पाहा हो भव्यनर । व्रतमहात्म्य करोनि तस्कर ।
प्रधानपद पावला थोर । पुण्यप्रचुर करोनिया ॥१७६॥

---

१७ कपटवाक्य, १८. कगाल तस्कर, १९. असत्य.

गुरूकृपा पुण्य करोन । तस्कर पावला राज्यमान ।
जगी कीर्त्ति व्यापिलि जान । सौख्यनिधान पावला ॥१७७॥
प्रधान करोनिया चोरी । वदताचि असत्य वैखरि ।
पदभ्रष्ट पावला सत्वरि । अपकीर्त्ति थोरी जनि व्यापिलि ।१७८॥
ऐसे जानोनिया भव्य । करितसावे पुण्यसंचय ।
जेन्हे सुख होय भवभवे । पाप जाय पळोनिया ॥१७९॥
गुफामाजि उत्कृष्ट धन । सचिले होते जे तस्करान ।
ते नृपासी केले आर्प्पन । परधन जानोनिया ॥१८०॥
तद्द्रव्य पाहोनि नृपवर । प्रधानासि वदे सत्वर ।
हे परद्रव्य नव्हे सार । दुःख देह्लार भवभवि ॥१८१॥
तदा नृप वदे प्रधानासी । हे द्रव्य दिधले तुजसि ।
त्वा खर्चावे धर्मकार्यासि । जेन्हे सौख्य भोगिसि भवभवे ॥१८२॥
तदा नृपाज्ञाकरोन । सिखरबद्ध जिनभुवन ।
करोनि स्थापिले बिंब नूतन । दिधले दान चतुर्विध ॥१८३॥
द्रव्य खर्चिले पुण्यमार्गि । नृपतिसंगे राज्य भोगि ।
किर्त्ति विस्तारिलि जगि । धर्मरागि परोपकारी ॥१८४॥
राज्य पालिता एके दिनि । नृपाचिय उद्यानवनि ।
येवोनि श्रुतसागर मुनि । कायोत्सर्ग ध्यानि राहिले ॥१८५॥
राजा आणि नग्रजन । जावोनि केले पूजावंदन ।
योग्यस्थानि बैसून । करिति श्रवन धर्मचर्चा ॥१८६॥
द्विधाधर्म ऐकोनि भूपति । असार जानोनि ससारवृत्ति ।
वैराग्य उद्भवला चित्ति । सद्गुरूप्रति विनविले ॥१८७॥
स्वामी हा ससारसागर । केवळ दुःखाचा डोगर ।
दिक्षा देवोनि सत्वर । पैलेपार करावे मज ॥१८८॥

मुनीद्र ऐकोनि तद्वचन । दिक्षा दिधलि परमपावन ।
जेन्हे प्राप्त होय निर्वाण । अचलस्थान सौख्यदाइ ॥१८९॥

नदा नृपाचे पुत्राप्रति । प्रधाने दिधलि राज्यसपत्ति ।
स्वपदि स्थापोनि स्वागजाप्रति[20] । पद निवृत्ति[21] अगिकारिलि ॥

आनीक कितिक भव्यजन । मुनिवाक्य दिक्षा घेउन ।
उग्रोग्र तप करोन । यथायोग्य स्थान पावले ॥१९१॥

ऐसे जानोनि भव्यजन । वदत असा सत्यवचन ।
जरी सकष्ट पडे येउन । तऱ्ही मिथ्यावचन न वदिजे ॥१९२॥

**इति आराधना कथाकोश रत्नकीर्ति विरचिते विद्युत्चौर सत्यव्रतवर्णन प्रसंग २६ ॥छ॥ सव्विसावा ॥२६॥छ॥**



२०. निजपुत्र, २१. दिक्षा.

समुद्रदत्त पुण्यवान । अनेका झाजि बैसउन ।
फिरता नगरपाठन । रत्नाकारण सिंहपुरासी ॥२१॥
तो आला प्रधानापासी । दुरून देखिल तयासी ।
प्रधान रत्नाभिळाशी त्यासी । सज्यनासी सागे खुण ॥२२॥
अहो हो पाहा पैलनर । गहिला' दिसे तो किंकर ।
झाज बुडाले वदे वगत्र । भलते विचित्र मागेल ॥२३॥
ऐसे म्हणता तोचि आला । पचरत्नासी मागु लागला ।
तुम्ही सत्यवादि आम्हाला । साभाळ केला पाहिजे ॥२४॥
लोभ धरोनिया रत्नाचा । पाहा लोकानो शब्द साचा ।
भलतैसच बोल वाचा । चटका जिव्हेचा घ्यावा याचे ॥२५॥
याचे जाहाज बुडाले । धन सर्व गमाविले ।
यास धनपीसे लागले । मागु लागले भलतैसे ॥२६॥
समुद्रदत्त करि नमन । माझी देइ पचरत्न ।
तुम्ही सत्यवादि ब्राह्मण । आमिस ठेवन न करावे ॥२७॥
परद्रव्याचा अभिळाष । करिता होए त्या निर्वंश ।
सत्यवादि म्हणति तुम्हास । सत्यशब्दास भुललो मी ॥२८॥
वारंवार नमन करित । पचरत्न त्वा द्यावि मात ।
पापी जीव जे दयारहित । क्रोध त्यात सचरला पै ॥२९॥
दुष्ट निंदनिक जे प्राणि । पापपुण्य न जाने मनी ।
द्रव्याचा लोभ धरी मनी । खोटी करणी करिताती ॥३०॥
तेव्हा जिनदत्त श्रावका । बाहीर घाला म्हणे सेवका ।
तो म्हणे लोकानो ऐका । पंचरत्न का माझि सत्य ॥३१॥
ऐसे वादति दोघे जन । राजसभे न्यायकारन ।
म्हणे माझी पचच रत्न । तत् प्रधान देइना वो ॥३२॥

राव म्हणे प्रधानासी । जे असेल ते देइ यासी ।
ब्राह्मण वदे रायासी । तत् सेवकासी काय उने ॥३३॥
हा गळापडु दिसे चोर । यास घाला रे बाहेर ।
मग तो नगरितच फिरे । मुखी उच्चार पचरत्न ॥३४॥
म्हणे माझी पंचरत्न । आभिळासिली प्रधानान ।
राजम्हाला खाले बैसोन । रात्र माध्यान काळोकीते ॥३५॥
रामदत्ता राजप्रिया । म्हणे ऐका मम धणिया ।
न्याय केला पिशाश्चतया । परि तो वाया न वदेचि ॥३६॥
षडमासपर्यंत । यकचि वचन हा वदत ।
वेड तरि वहु जल्पत । हा सत्यरत्न सत्य याची ॥३७॥
राया तुम्हि पाहावा न्याय । याचा करीन मी उपाय ।
बुधीयुक्ति पाहे सोय । जाला उदय दिनकर ॥३८॥
त्या वणिका बोलाऊन । त्यास पुसे सत्यवचन ।
तो म्हणे गेल्या जरि प्राण । असत्य वचन न बोलु ॥३९॥
महा दोष असत्याचा । बाई जईन धर्म अमचा ।
विचार याचानी आमचा । घ्यावा यशाचा कीर्तिशब्द ॥४०॥
सर्वत्राचि जालि भोजन । प्रधान आनिला बोलाऊन ।
तयासी पुसे सत्यवचन । काय भोजन तुम्ही केले ॥४१॥
ज्ञानमद करोनिया । बरवे न सागे पापिया ।
तोचि तोचि शब्द जानोनि । करि उपाया सीताप्रीय ॥४२॥
राजा राणी आनी तो भट । तिघे खेळति सारिपाट ।
डाव माडलासे अचाट । फासे कपट स्त्रीचरित्र ॥४३॥
प्रथम जिंतिला तो राजा । मग त्या पाचारि हो द्विजा ।
पैंज बाधली डाव माझा । जिंतिला सहजा ब्राह्मण ॥४४॥

# प्रसंग सत्ताव्वीसावा

## श्री वीतरागाय नमः

प्रथम नमु जिनपति । आदिनाथ त्रैलोक्यपति ।
वर्धमान सन्मति आती । नमू तीर्थंकर मुक्तीगामी ॥१॥
पचगुरूसि नमस्कार । चौदासे बावन् गणधर ।
सरस्वति ज्ञानदातार । हृदए स्फुर कवित्वकळा ॥२॥
कथाकोश ग्रथाब्धी । कैसा तरे न मदबूधी ।
पार्श्वप्रभू करिल सिधी । दाता ज्ञानाब्धी मोक्षदाता ॥३॥
गुरूप्रसादे करोनि । कविसोत्पन्न मम मनी ।
ह्मराष्टभाशा जिनवानी । कथाश्रवनि सावधान ॥४॥
सिंहपुर नगरोत्तम । चैत्यचैत्याले अनुपम ।
फटिकमय निजधाम । शास्त्रागम मुनि पढती ॥५॥
तेथे श्रावक धर्मवत । नेमिवृत्तिक गुणवत ।
श्राविका धार्मिका भाग्यवत । सुखोप्तत पुर्वीच पुण्य ॥६॥
त्या गाविचा राज्यधर । सीव्हसेने प्रतापी थोर ।
रामदत्ता राज्ञी पवित्र । कार्य सर्वत्र विचक्षणा ॥७॥
देव शास्त्र गुरू भक्त । सदाचारि ते व्रतव्युक्त ।
रूपवंत ते सीळवंत । संतत् सपत् पूर्वपुण्य ॥८॥

तत् पुरोहीत श्रीभूती । वेदाध्ययन अहंमती ।
ज्ञानाभिमानी धूर्तमति । अह सत्यार्थी महिमोक्त ।।९।।
ऐसा तो नृप राज्य करित । धर्मध्यानी काळकर्मीत ।
गुरूमुखे शास्त्रयुक्त । कीर्ति जगात दयाधर्म ।।१०।।
तदा कवणे देशातरी । पद्मखंडपुरनगरि ।
समुद्राख्य श्रावकाघरी । सति सुदरी सीलवति ।।११।।
तत् पुत्र समुद्रदत्त । त्या सौख्य संतत संपत ।
एक दिने व्यापारकृत्य । आला फिरत सिंहपुरा ।।१२।।
जवळ होति पचरत्न । पुढे मार्ग आहे कठीन ।
श्रीभूति सत्यार्थी प्रधान । होतील जतन त्यापासी ।।१३।।
रत्न दिली प्रधानहस्ता । कोन्हासि मात न कळता ।
आपण चालला त्वरिता । समुद्रातौत्तारत्नदिया ।।१४।।
तेथे करोनि व्यापार । द्रव्य मेळविले अपार ।
झाजि बैसोनिया सत्वर । चालीले समग्र सिंहपुरा ।।१५।।
काऊर सुटले अद्भुत । झाज बुडाले समुद्रात ।
समुदाए कर्म सर्वा मृत्य । कपट मनात तयाचे ।।१६।।
समुद्रदत्त सावकार । नेमिक धार्मिक तत्पर ।
संध्या करिता बेटावर । गेले समग्र टाकोनिया त्या ।।१७।।
अहो ज्याचे कपट मनी । तो जाय नर्कभुवनि ।
राज्याभिळासे करोनी । कौरवा हानि सोमवसी ।।१८।।
राज्यलोभ तो नारायण । समग्र यादव मिळोन ।
समुदाए कर्म उत्पन्न । गेले मरोन हरिवंसी ।।१९।।
ऐसे नेनो कित्येक नर । सत्यार्थीसी गाजिती फार ।
ज्याच कुड त्याचेच म्होर । काज झाज सग्र बुडाले ।।२०।।

समुद्रदत्त पुण्यवान । अनेका झाजि बैसउन ।
फिरता नगरपाठन । रत्नाकारण सिंहपुरासी ॥२१॥
तो आला प्रधानापासी । दुरून देखिल तयासी ।
प्रधान रत्नाभिळाशी त्यासी । सज्यनासी सागे खुण ॥२२॥
अहो हो पाहा पैलनर । गहिला' दिसे तो किंकर ।
झाज बुडाले वदे वगत्र । भलते विचित्र मागेल ॥२३॥
ऐसे म्हणता तोचि आला । पचरत्नासी मागु लागला ।
तुम्ही सत्यवादि आम्हाला । साभाळ केला पाहिजे ॥२४॥
लोभ धरोनिया रत्नाचा । पाहा लोकानो शब्द साचा ।
भलतैसच बोल वाचा । चटका जिव्हेचा घ्यावा याचे ॥२५॥
याचे जाहाज बुडाले । धन सर्व गमाविले ।
यास धनपीसे लागले । मागु लागले भलतैसे ॥२६॥
समुद्रदत्त करि नमन । माझी देइ पंचरत्न ।
तुम्ही सत्यवादि ब्राह्मण । आमिस ठेवन न करावे ॥२७॥
परद्रव्याचा अभिळाष । करिता होए त्या निर्वंश ।
सत्यवादि म्हणति तुम्हास । सत्यशब्दास भुललो मी ॥२८॥
वारंवार नमन करित । पचरत्न त्वा द्यावि मात ।
पापी जीव जे दयारहित । क्रोध त्यात सचरला पै ॥२९॥
दुष्ट निंदनिक जे प्राणि । पापपुण्य न जाने मनी ।
द्रव्याचा लोभ धरी मनी । खोटी करणी करिताती ॥३०॥
तेव्हा जिनदत्त श्रावका । बाहीर घाला म्हणे सेवका ।
तो म्हणे लोकानो ऐका । पंचरत्न का माझि सत्य ॥३१॥
ऐसे वादति दोघे जन । राजसभे न्यायकारन ।
म्हणे माझी पचच रत्न । तत् प्रधान देइना वो ॥३२॥

राव म्हणे प्रधानासी । जे असेल ते देइ यासी ।
ब्राह्मण वदे रायासी । तत् सेवकासी काय उने ॥३३॥
हा गळापडु दिसे चोर । यास घाला रे बाहेर ।
मग तो नगरितच फिरे । मुखी उच्चार पचरत्न ॥३४॥
म्हणे माझी पंचरत्न । आभिळासिली प्रधानान ।
राजम्हाला खाले बैसोन । रात्र माध्यान काळोकीते ॥३५॥
रामदत्ता राजप्रिया । म्हणे ऐका मम धणिया ।
न्याय केला पिशाश्चतया । परि तो वाया न वदेचि ॥३६॥
षडमासपर्यंत । यकचि वचन हा वदत ।
वेड तरि बहु जल्पत । हा सत्यरत्न सत्य याची ॥३७॥
राया तुम्हि पाहावा न्याय । याचा करीन मी उपाय ।
बुधीयुक्ति पाहे सोय । जाला उदय दिनकर ॥३८॥
त्या वणिका बोलाऊन । त्यास पुसे सत्यवचन ।
तो म्हणे गेल्या जरि प्राण । असत्य वचन न बोलु ॥३९॥
महा दोष असत्याचा । बाई जईन धर्म अमचा ।
विचार याचानी आमचा । घ्यावा यशाचा कीर्तिशब्द ॥४०॥
सर्वत्राचि जालि भोजन । प्रधान आनिला बोलाऊन ।
तयासी पुसे सत्यवचन । काय भोजन तुम्ही केले ॥४१॥
ज्ञानमद करोनिया । बरवे न सागे पापिया ।
तोचि तोचि शब्द जानोनि । करि उपाया सीताप्रीय ॥४२॥
राजा राणी आनी तो भट । तिघे खेळति सारिपाट ।
डाव माडलासे अचाट । फासे कपट स्त्रीचरित्र ॥४३॥
प्रथम जिंतिला तो राजा । मग त्या पाचारि हो द्विजा ।
पैज बाधली डाव माझा । जिंतिला सहजा ब्राह्मण ॥४४॥

घेवोन त्याचे मुद्रिकेसी । बोलावि निपुणमतिदासि ।
गुह्य गोष्ट सागे तियसी । जावे गृहासी प्रधानाचे ।।४५।।
त्याचे स्त्रीयसि बोधुन । पचरत्न यावि घेवोन ।
तत्क्षणि दासी जावोन । पचरत्न मागे तियसी ।।४६।।
ते न दे तिचे हस्तकात । दासी सागे राणीसी गुप्त ।
राज्ञी म्हणे निपुणमतित । खुण तियत दाखवि हे ।।४७।।
धात्री गेली ब्राह्मणिपासी । तेन दाखवी रत्न तिसी ।
येवोन सागे राणीसी । द्रव्यलोभासी जीव गुते ।।४८।।
प्रधान जुवा मांडीयला । यज्ञोपवीत ठेवि डावाला ।
तोही फासा जिंतियला । ब्राह्मण चढला मद गर्व ।।४९।।
यज्ञोपवीत घेवोन । दासीस वदे गुप्त खुण ।
तियसी भय दाखउन । पचरत्न घेउन येन ।।५०।।
क्रोध रूप दासि देखलि । ब्राह्मणी मनामध्ये भ्यालि ।
जानव्याची खुन पाहिली । रत्न दिधलि त्वरेन पै ।।५१।।
मग ते धात्री हर्ष वदने । येता देखिलि ते राणीन ।
कार्यसिद्धी जाली सपूर्ण । डाव तियन राहाविला ।।५२।।
रायासी वर्तमान सर्व । ऐकता म्हणे हे स्त्रीलाघव ।
न कळे पुरूषासि अपूर्व । रत्न स्वयमेव पाहिली ।।५३।।
नृप ते गुप्त ठेविते जाले । समुद्रदत्ता बोलाविले ।
द्रव्य घ्यावे रत्नाबदल । वणिक बोले बोल रायासी ।।५४।।
परद्रव्य विषासमान । न घ्यावे प्राण गेल्यान ।
माझी मला पाच रत्न । दया करोन द्यावी स्वामी ।।५५।।
बोलाविले प्रधानासी । सेठे आणिक महाजनासी ।
पुसता जाला सर्वत्रासी । रत्न चोरासि दंड काय ।।५६।।

चोरासी दंड द्यावे तीन । सर्व धन घ्यावे हिरोन ।
मल्ल मुष्टी तीस देउन । सेनभक्षण कासपात्री ॥५७॥
समुद्रदत्ता बोलाविले । पच-रत्न त्यासी दिधले ।
प्रधान जैस सागीतले । तैसच केले तयासि दड ॥५८॥
तो श्रीभूती पाप पंडित । आर्तध्यान जाला त्या मृत्य ।
तिर्यंच कुगति त्या प्राप्त । कष्ट भोगीत दुर्गतिचे ॥५९॥
ऐसे जानोनि भव्य प्राणी । चोरि दोष द्यावे सोडोनी ।
अभिळास परधनी । अतिचार मनि पाळावे ॥६०॥
महो त्या समुद्रदत्तासी । श्रेष्टिपद दिधले त्यासी ।
जय झाला त्या श्रावकासी । पंचाणुव्रतासी घेति ते ॥६१॥
व्रतनेम पुण्यचि होत । पुण्यलक्षुमी अखडित ।
पुत्र पौत्र सतत प्राप्त । अनुक्रमे जात मोक्षासी ॥६२॥

काव्य–असुरसुरनरेद्रै. खेचरेन्द्रै प्रपूज्यो ।
जिनपतिरिह भक्त्या सर्वसदेहहर्ता ।
तदुदितवरवाणी सारसौख्यस्य खाणी ।
दिशतु मम शिवानि श्री प्रभाचद्रदेव ॥६३॥

जिनपति त्रैलोक्यनाथ । त्रैलोक्येद्र पूजा करित ।
पूर्ण मनचे मनोरथ । सदेह हरत मिथ्यातीचे ॥६४॥
येथे कथा जालि सपूर्ण । श्रोता व्हावे जी सावधान ।
पुढील कथे चित्त देन । सत्तावीस सपूर्ण जाहल्या ॥६५॥
अथ श्री जिननाथस्य, नत्वा पादद्वय हित ।
चतुर्थाणुव्रताख्यान, वक्षे नीलीसमाश्रित ॥६६॥
भरतक्षेत्र लाटदेशी । भृगुकच्छ नाम नगरासी ।
धार्मिक राहाति वस्तीसी । जिनोक्तभासि ज्ञानवत ॥६७॥

तेथील राजा वसुपाळ । प्रजा पाळि जेवि का बाळ ।
देवदर्शन त्रिकाळ । करि साभाळ तुर्यसंघा ।।६८।।
तेथे श्रेष्ठि जिनदत्त । नादे समुदाय सहित ।
रूपवत तो शीळवत । जिनपूजा युक्त कर्तार ।।६९।।
तत् प्रिया ते जिनदत्ता । सत्यशीळ अन्नदाता ।
नीली नाम्नी तयचि सुता । इद्रदुहिता तत्समान ।।७०।।
सुखि नादति पूर्वपुण्य । तत् ग्रामी मिथ्याति जईन ।
नादे सधन पूर्वपुण्य । कुदेव कुगुरू ज्ञान सर्व ।।७१।।
नाम त्याचे समुद्रदत्त । सागरदत्ता स्त्री रूपवत ।
तत् पुत्र सगर सुदत्त । रूपवत मिथ्याति तो ।।७२।।
एकदा जिनेद्रमदिरि । महापूजा वाद्ये गजरि ।
दर्शना आले नरनारी । नीली सुदरि करी पूजा ।।७३।।
अष्टविध करि पूजन । जाप्यमाळा करि घेवोन ।
कायोत्सर्ग करिति ध्यान । गुरुवचन नमोकार ।।७४।।
तत् समई सगर सुदत्त । पूजा पाह्यासि आला तेथ ।
त्यान पाहिली ते रूपवत । विव्हळ चित्तात जाहाला ।।७५।।
काय हे स्वर्गदेवता । किवा फणीद्राचि सुता ।
खेचरी व्यतरी तत्त्वतः । रूपवता गुणमडित ।।७६।।
ते ऐकोन सागरदत्त । मित्र म्हणे नेनसी ईयत ।
श्रेष्टिसुता हे जिनदत्त । जिनदत्ता मात ईयची ।।७७।।
ते ऐकोनि अशक्त जाला । कैसी चढे मम हताला ।
मिथ्याति म्हणति आम्हाला । चिताग्रस्त झाला कामिक ।।७८।।

श्लोक—हरिर्लक्ष्म्या हरो देवो, गगया जडरूपया ।
उर्वश्या खडितो ब्रह्मा, हृता कामेन केन च ।।७९।।

टीका–हरिहर कामे जर्जर । भील्ली वृदा रूपसुदर ।
गगया ऋषि महाथोर । ब्रह्मा किंकर उर्वसीशी ॥८०॥
ऐसे कामे गुतले किती । कोन जाने त्याचि स्थिती ।
समुद्रदत्त जानोनि चित्ती । पुत्राची मति समजली ॥८१॥
भो पुत्र काय तू नेनसी । जिनदत्त जाने सत्यार्थीसी ।
मिथ्यामतिसी ते कन्यासी । कल्पातेसि देईना तो ॥८२॥
पित्याचि ऐकोनिया युक्ती । जिनधर्मी जाले मिथ्याति ।
नित्यदर्शन शास्त्र पढति । करिति भक्ती कामातुर ॥८३॥
मग ते एके वासरमणि । जिनदत्ताचे गृहा जाउनी ।
कन्या मागे स्नेहे करोनि । कपट मनी धरोनिया ॥८४॥
जिनदत्त तो भोळा प्राणी । कन्या दिधलि पाणिग्रहणी ।
महोछाव पचदिनी । जिनभुवनी अभिषेक ॥८५॥
यानतरे ते मिथ्याती । जिनमति जाले कार्यार्थी ।
पुन्हा ते जाले बोधमति । कुर्कुरापति क्षीराजिन ॥८६॥
तथा ते दुर्बुधी मिथ्याती । इच्छाभोज बौधा देति ।
पापि मास आहार घेति । ज्ञान सागताती निर्दोष ॥८७॥
ते पाहोन नीलिबाई । कटाळली स्वहृदयी ।
भ्रतारास सागे उपाई । माझि सोई काई करिता ॥८८॥
मला माहेरी पाठवने । ते वर्ज केले मिथ्यातीने ।
तत् न्यारे घर वाधोन । समाधान राहिली तेथे ॥८९॥
नित्य श्री जिनराजपूजा । कल्याणदाता पापभजा ।
तुर्यदान ते करि वोजा । आत्मकाजा शास्त्रश्रवण ॥९०॥
साधर्मी श्रावक मिळोन । नित्यश न्हवन पूजन ।
कीर्ति वाढली धर्म जैन । ते दुर्जन छिद्र पाहती ॥९१॥

पाप्यानि वर्णील माहेर । तोहि कळला समाचार ।
जिनदत्त दुःखी अतर । परि धुरधर धैर्यवत ॥९२॥
अग्नीत पडोन मरावे । अथवा जळात बुडावे ।
विषहि प्राशन करावे । मिथ्याती नसावे सोयरे ॥९३॥
भोळा श्रावक जिनदत्त । सरळ नामी ज्याचे चित्त ।
जैसी करणी तैस त्या प्राप्त । धर्म करित निसिदिनि ॥९४॥
एकदा नीलीचा सासरा । विचारितसे तो अतरा ।
नीलीबाई ज्ञानि सुदरा । बौद्धासि मदिरा आनावे ॥९५॥
सुगताचार्यांचे ज्ञान । नीलीबाई करिल श्रवण ।
बौद्धधर्मासी घेवोन । समाधान राहिल ते ॥९६॥
नीलीगृहि श्वशुर आला । करद्वय नमस्कारिला ।
हे कन्ये ऐके शब्दाला । अमचे गुरूला भोजन दे ॥९७॥
ते महा अतरज्ञानी । तयासमान नाही कोन्ही ।
त्याचे ज्ञान तुम्ही पाहोनि । उपदेश घेवोनि नादावे ॥९८॥
ऐकोनी तयाचे वचन । तुमचे वचन प्रमाण ।
परि गुरू करावा जानोन । पाणि प्यावे सोधून मन ॥९९॥
देवगुरूशास्त्र त्रिरत्न । हे घ्यावी परीक्षा करून ।
तुमचे गुरूचे पाहीन ज्ञान । सुज्ञान कुज्ञान परीक्षा ॥१००॥
तुम्ही सागावे आमत्रण । सामग्री द्यावि आणोन ।
करीन षट्रसपक्कान्न । द्यावे भोजन सूगतीसी ॥१०१॥
सकळ केलि पाकनिष्पत्ती । बोलाविले बौद्धमति ।
पचशत शिष्यसाघाति । भोजनाप्रति बैसले ॥१०२॥
भोजन करिति नानापरि । गोडि घेतली वैखरी ।
आज्य वाढावे द्रोणभरि । घारि पूरी भिजवावया ॥१०३॥

रायभोग साळिचा भात । दुग्धशर्करा तयावरूत ।
पोळया पातळा पूर्णभरित । शर्कराघृत तयावरि ॥१०४॥
नानापरिच्या कुशबीरी । मेथूनी कडवट अतरी ।
पापड भाजले अरुवारी । फुरका मारि तो बौद्धबावा ॥१०५॥
कढी अत्यत लागे गोड । त्यात भिजले चुबुकवडे ।
तळीव तप्त घृतवडे । केळाचे वडे आरूवार ॥१०६॥
तप्त तक्राचि सुंदर कढी । द्रोण भरोनि नीलि वाढी ।
धोत्र ढिलाविति बुडि । लागली गोडी आत्तासीच ॥१०७॥
वारीक जोर साळिभात । मोकळे पुष्पासुवासित ।
तप्त कढीचा फुर्का घेत । हस्त फिरवित सिखावरि ॥१०८॥
श्लोक वदति वाग्जाळ । गळा तुळसी कठमाळ ।
शिष्य म्हणे दीर्घकपाळ । गौरसाळ लोणकडे पैं ॥१०९॥
रसनाविषय तो भारी । नेम नाहि जया अतरी ।
गोड म्हणे उदरभरि । वरचेवरी मागतसे ॥११०॥
हे मांसआहारी म्हणे दासी । नेमव्रत नाहि यासी ।
आंतरज्ञानी आपणासि । या परीक्षेसी पाहा बाई ॥१११॥
म्हणोनिया त्या दासीन । डाव्या पायाची वाहान ।
वरील वाद्या कातरून । फुटाण्याप्रमाण टुकडे ॥११२॥
ते टाकीत तप्त कढीत । ते मवाळ झाले बहुत ।
ते कढी वाढीता त्यात । गोडी अत्यंत लागली त्या ॥११३॥
एक म्हणे आणाहो कढी । येथे काहो वाढली थोडी ।
ते दासि धावधाव वाढी । चर्मगोडी लागली त्या ॥११४॥
ऐसे जेवोनि तृप्त झाले । अचउनि विडे घेतले ।
नीलिबाईस बोलाविले । ज्ञान आपुले सागावया ॥११५॥

आतुबाई म्हणे नीलीत । नमस्कारि वो या गुरूत ।
आज गुरूमत्र तुम्हात । गुरूवचनात घेई बाई ॥११६॥
गुरू निर्ग्रंथ माझा बाई । व्रतनेम मत्र निश्चियी ।
शीळव्रत घेतले आई । गुरू चतुराइ नेना तुम्ही ॥११७॥
आतु म्हणे हा कुळगुरू । यासी करी नमस्कारू ।
नीली म्हणे हे पापीनरू । मासआहारु करिताती ॥११८॥
या नमस्कारु करिता । पाप बैसेल त्याचे माथा ।
पापे जडेल दुःख व्यथा । शील वृथा जाईल बाई ॥११९॥
न न करावा तोहि गुरू । ज्याला स्त्रीपुत्रसंसारू ।
प्रपचाचा पापभारू । पुण्याचा आधारु नाहि त्या ॥१२०॥
ऐशा ऐकोनि वचनात । बौद्ध म्हणें न कळे तूत ।
याचे ज्ञान आहे बहुत । तुला किंचित् सागतो ॥१२१॥
अनत आकाश संपूर्ण । अणुरेणु जीवगहन ।
अमर जीव जाय निघोन । मासभक्षण पाप नाही ॥१२२॥
पाप पुण्याची जे करणी । आम्ही जानो अंतरज्ञानी ।
बायकाची लटकी गानी । गुरूची करणी अगाध ॥१२३॥
हे ऐकोनिया वचन । नीली म्हणे त्याकारण ।
आताचे जावे येथून । करू द्या भोजन आम्हासी ॥१२४॥
आंतरज्ञान तुम्हा कैस । कळो येईल आम्हास ।
मग ते चाले मठास । भोजनास बैसली नीली ॥१२५॥
ते सर्व वाहेर निघाले । सेटिच्या दुकानी बैसले ।
वाहाना पाहु लागले । पाहता जाले हिंपुटीते ॥१२६॥
सन्याशी म्हणे पुसा तिला । वाहना आमच्या काय जापल्या ।
म्हणे अंतर्ज्ञान तुम्हाला । मग लोकाला काय पुसता ॥१२७॥

तुम्ही पुसा आपल्या गुरूसी । मग सागेन मी तुम्हासी ।
तैसच सागति बौद्धासी । त्या बाबासी क्रोध आला ॥१२८॥
क्रोधे उठला तानताने । आम्ही खादल्या काय म्हने ।
आता वरिक सत्यवचन । अंतर्ज्ञानी ज्ञान जाले तुम्हा ॥१२९॥
ऐकोनि नीलिचा शब्द । बौद्ध झाला मनि स्तब्ध ।
म्हने न कळे गूढ शब्द । दृष्टाताब्द ज्ञान खोली ॥१३०॥
ऐक शिष्यावमन करून । चर्मखंड पाहे नयन ।
मग त्याचा जाला अपमान । गेले उठोन लज्जित ॥१३१॥
सासुसासरा तो दु:खित । अपेश आले मिथ्यातीत ।
दश धरोन हृदयात । चूरी हातात दात खाती ॥१३२॥
काय करावे न करावे । कैसे तरीही पळवावे ।
पाहती हृदयी उपाव । काही तरी डाव द्यावा ईसी ॥१३३॥
नीलीबाई जयवंत ते । रूपवंत शीळवत ते ।
शास्त्राभ्यास करी नित्य । तीचि आत तद्वेश करी ॥१३४॥
नीलीबाईचे मदिरी । नित्य श्रावक येति घरी ।
जिनशास्त्र श्रवण करी । त्या दुराचारी पाहिल ते ॥१३५॥
शब्द ठेविला त्यास तिसी । हे रत झाली परपुरुषी ।
बट्टा लाविला स्वकुळासी । सर्वजनासी प्रगट केले ॥१३६॥
लोक आश्चर्य करिती । सीळवती हे तो सती ।
ईयचि कैसी जालि मती । पापी वदति हे ज्यारनी ॥१३७॥
दुष्ट पापि जे का लोक । सतीसीच लाविति कळंक ।
तिचा साहाकारि निश्चंक । शब्दकळक जाने सती ॥१३८॥
जावोनि जिनमदिरासी । नमन केले जिनेद्रासी ।
निश्चय करिते मानसी । अनशनासी करि नेम ॥१३९॥

हे सत्य जरी का असेल । तरी दरवाजा उघडेल ।
कढई ठेवा तप्त तेल । दग्ध होईल मम देही ॥१६४॥
ऐसे म्हणोनिया पंचारती । नौकार उच्चार स्वचित्ती ।
वेसिसी हस्त ते लाविती । कुलूप पडती आपोआप ॥१६५॥
नीली झाली ते यशवंत । जै जै शब्द राजा वदत ।
देवी येवोनिया पूजित । दिव्य वस्त्रात देती जाली ॥१६६॥
ते पाहोनिया नारीनर । सर्व करिती नमस्कार ।
सत्य सत्य सती हे थोर । जैजैकार सुरपुष्पवृष्टी ॥१६७॥
ते पाहोनिया राजियान । पूजा केली षोडशाभरण ।
कळक लाविला जयान । आनीले धरोन समस्ता ॥१६८॥
गर्दभारोहण सर्वांसी । श्रुत झाले नीलीबाईसी ।
सोडविले समस्तासी । सागे रायासी दयाधर्म ॥१६९॥
श्लोका—जयतु जिननाथस्य चरणाभोज षट्पदी ।
भो मातस्तव शीलस्य, माहात्म्यं केन वर्ण्यते ॥१७०॥
इत्यादिभि: शुभैर्वाक्यै सा सती शीलमडिता।
सर्वे धर्माणुरागेण सस्तुता सज्जनैर्मुदा ॥१७१॥
काव्य—स जयति जिनदेव. सर्वदेवेंद्रवद्यो ।
विमलतरगिरो वै यस्य विश्वोपकार ।
तदुदितवरशील पालित शर्ममूल ।
दिशतु शुचिजनाना स्वर्गमोक्षारूलक्ष्मी ॥१७२॥

**इति कथाकोशे शीलप्रभावर्णनायां नीलीश्राविकाकथा प्रसंग ॥२७॥ छा॥**

● ● ●

# प्रसंग अठ्ठावीसावा

## ।। श्री वीतरागाय नमः ।।

नत्वार्हंत जगत्पूतं भारती गुरुपकजं ।
वक्षे कडारपिंगस्य ब्राह्मदोषकथानकम् ।।१।।
कपिला नाम नगरीत । राजा नरसिंह राज्य करीत ।
पूर्वपुण्य तो धर्मयुक्त । क्रियासंयुत्तपरायण ।।२।।
तयाचा मत्री तो सुमती । प्राणवल्लभा धनमती ।
कडारपिंगाक्षपुत्रोत्पत्ती । महादुर्मती विषयिक ।।३।।
त्याच नगरी एक श्रेष्ठी । दयाधर्मी सम्यग्दृष्टी ।
कुबेरदत्त सदा सतुष्टी । पच परमेष्ठी पूजाभक्त ।।४।।
तयाची भार्या रूपसुदर । पूर्वपुण्यसचित फार ।
प्रियगुसुदरी चतुर । तारुण्यभर शीलवती ।।५।।
एकदा प्रधानपुत्रान । पाहिली ती मृगनयन ।
मदने व्याकुळ होवोन । पाप्याच मन भोगइच्छा ।।६।।
तो जाय अपुल्या गृहासी । पापी पहुडला भूमिसी ।
धनमती पुसे तयासी । दुर्मानसी किं कारणात ।।७।।
माते ऐक ममोत्तर । श्रेष्टी भार्या महासुदर ।
तीसी मजसी प्रीत थोर । हे करशील तर वाचेन मी ।।८।।

हा कळंक होईल दूर । तरीच घेईन अन्न आहार ।
कायोत्सर्ग स्तभ आकार । जाप्य नमोकार दृढत्व ॥१४०॥
शीळाचे प्रभावे करोनि । जानोनिया जिनशासनी ।
बाई सती तू सिरोमणि । प्राणहानि करू नए वो ॥१४१॥
त्वा असावे मनी निर्भय । श्रावक धर्मवंत राय ।
स्वप्न सागोनि मी जाय । तुझाच न्याय उजळमाथा ॥१४२॥
ऐसे सागोनि देवी गुप्त । रायासि ते स्वप्न सागत ।
पौळि कपाट होति गुप्त । सतीचेलनात मुक्तता ॥१४३॥
तद्दिन उगवल्यावरी । कवाड बद वेसी चारी ।
हाहाक्कार जाला नगरी । राजद्वारी जनाचा मेळा ॥१४४॥
रूव सागे स्वप्नभावा । नगरीमध्ये धाडोरा द्यावा ।
सतीने दरजा वोवाळावा । चरण डावा उघडील ॥१४५॥
ऐसा धाडोरा आइकोन । नगरस्त्रिया करिती लेण ।
सोळा सिंगार करोन । करी घेवोन पचारती ॥१४६॥
एकापुढे एक जाताती । पुरुष मिळाले समस्ती ।
राजविभूती सर्व येती । बौद्धमती पाहावयासी ॥१४७॥
एक नेसली पीताबर । पैठनी साडी उच फार ।
पाटाउखा बाईत थोर । बुट्टेदार गुलचादनी ॥१४८॥
सुवर्णळीका रसपूर्ण । हरिद्राकुंकाचे लेपन ।
नयनी घालोनि अजन । गजगामिनी हसगति ॥१४९॥
सर्व मिळोन वेसिपासी । पूजा करिती भावेसी ।
वोवाळिती ते दर्वज्यासी । वामपदासी लाविताती ॥१५०॥
सर्व जाल्या नगरनारी । रायाचिय अत.पुरी ।
राजकन्या सहपरिवारी । आळीकारी देवागणा ॥१५१॥

# प्रसंग अठ्ठावीसावा

## ।। श्री वीतरागाय नमः ।।

नत्वार्हंत जगत्पूतं भारती गुरुपंकजं ।
वक्षे कंडारपिंगस्य ब्राह्मदोषकथानकम् ।।१।।
कपिला नाम नगरीत । राजा नरसिंह राज्य करीत ।
पूर्वपुण्य तो धर्मयुक्त । क्रियासंयुक्तपरायण ।।२।।
तयाचा मन्त्री तो सुमती । प्राणवल्लभा धनमती ।
कडारपिंगाक्षपुत्रोत्पत्ती । महादुर्मती विषयिक ।।३।।
त्याच नगरी एक श्रेष्ठी । दयाधर्मी सम्यग्दृष्टी ।
कुबेरदत्त सदा सतुष्टी । पच परमेष्ठी पूजाभक्त ।।४।।
तयाची भार्या रूपसुदर । पूर्वपुण्यसचित फार ।
प्रियगुसुदरी चतुर । तारुण्यभर शीलवती ।।५।।
एकदा प्रधानपुत्रान । पाहिली ती मृगनयन ।
मदने व्याकुळ होवोन । पाप्याच मन भोगइच्छा ।।६।।
तो जाय अपुल्या गृहासी । पापी पहुडला भूमिसी ।
धनमती पुसे तयासी । दुर्मानसी किं कारणात ।।७।।
माते ऐक ममोत्तर । श्रेष्टी भार्या महासुदर ।
तीसी मजसी प्रीत थोर । हे करशील तर वाचेन मी ।।८।।

दु:श्चेष्टा करि वारंवार । पापि न ऐकति गुरूत्तरं ।
विद्याबळे कैलासगिरिवर । गेला त्वरे मुनिमर्कट ॥६३॥
तापनयोग करि तपासी । विद्याधर येति दर्शनासि ।
ते कथा श्रोता परियेसी । स्थिरमानसी एकचित्त ॥६४॥
विजयार्ध पर्वतावरी । दक्षिणश्रेणि मेघपुरी ।
द्वीतिथ मेघनिचय नग्री । मेघनिनाद तीसरी आसे ॥६५॥
त्रीपुरि राजा महा अद्भुत । कनकरथ नामांकित ।
स्त्रीमनोरमा रूपवत । पुत्र तयात दोघे जन ॥६६॥
प्रथमपुत्र देवदारू । विद्युत्जिव्हा मनोहारू ।
विद्याधर ते धनुर्धरु । राज्यभारु चालविति ते ॥६७॥
एकदा कनकरायासि । त्रिधा वैराग्य जाल त्यासि ।
राजि स्थापिल देवदारुसि । दीक्षा मानसी सुखदायी ॥६८॥
गनधरकीर्ती मुनिनाथ । नमोस्तु केला त्या दीक्षार्थ ।
भव्यप्राणि पुण्यसामर्थ्य । शूरमत्र हस्तमस्तकी ॥६९॥
दोघ बधु राज्य करिता । राज्यलोभ कळहो करिता ।
विद्युत् जिह्वादेशावरुता । कुटुबसहिता वनवासी ॥७०॥
पश्चात्ताप करि फार । गेला कैलासगिरिवर ।
मानभग तो चितातुर । पृथ्वीवर बहुत जन ॥७१॥
तयाच्या आठजनि कन्या । स्वरूपसुदर लावण्या ।
गंगास्नानासि त्या तरुन्या । एकातनग्न्या शुचिर्भूत ॥७२॥
तेथे होता तो रुद्रमुनि । तो पाहेव्या त्या स्वस्थनयनी ।
तटाकि ठेविली वस्त्र त्यानी । नग्न होवोनि स्नान स्वेच्छा ॥७३॥
तदा अवयवसयुक्त । पाहाता जाला कामपीडित ।
विद्याबळ वस्त्र चोरित । कुबुधी त्यात उपजली ॥७४॥

तेव्हा त्या बाहेर येवोनि । वस्त्रपाहाति व्याकुळ नैनि ।
त्यानि देखिला स्वामि मुनी । पीतासमानी पुसति त्या ॥७५॥
आमची वस्त्रे कोन्हे नेली । तुम्ही असतील देखिली ।
सांगा आमची लज्जा गेलि । पापे नेलि त्या दुष्टकर्मं ॥७६॥
ते ऐकोनिया त्यासि बोले । मम ईछा पूर्ण कराल ।
देहे मजसी समर्पाल । सर्व मीळेल वस्त्राळिकार ॥७७॥
कन्या युक्त सागती तया । तुम्ही मागा आमच्या पितिया ।
पूर्ण ईछा करील त्वया । सत्कुळस्त्रिया शब्द वदनी ॥७८॥
ते ऐकोन वस्त्राभरण । समर्पीली तयाकारन ।
त्या पावल्या स्वपितृस्थान । सर्व निरोपन सागितले ॥७९॥
ते ऐकोन विद्याधरासी । आठव झाला हृदयासी ।
पाचारिले स्वप्रधानासी । मम कार्यासी सिद्धि करि ॥८०॥
प्रधान चातुर्य अंतरी । स्वामिराजा नमोस्तु करि ।
विद्युजिव्हा तो बधुवैरि । देवदास हारि राज्यासी ॥८१॥
ते राज्य द्याल जरि त्याला । कन्या अष्ट देउ तुम्हाला ।
राज्यलोभे तो भ्रष्ट जाला । विषयभ्रष्टला मुणि कुबुधी ॥८२॥
ते ऐकोनिया वचन । सर्व सीद्धता मी करीन ।
जे कामिक दुष्ट जे जन । पाप दारुण का न करिती ॥८३॥
तदा विद्याधर मुनिसी । घेवोन गेला त्रिपुरासि ।
विद्याबळे देवदारुसी । जिंतिले त्यासी क्षणमात्रे ॥८४॥
विद्युजिंव्हा राजी स्थापिले । देवदारु प्रधान जाले ।
महोछावासी राजे आले । आनदले रुद्र मुनीद्र ॥८५॥
देवदारु तो विद्याधर । कन्याविवाह मगळाचार ।
सकळ मिळोनि विद्याधर । प्रशसा थोर करिताती ॥८६॥

तथा नेक विद्याधर । कन्या अर्पिल्या शतोत्तर ।
आनद रुद्रा जाला फार । काम तीव्र त्या खवळला ॥८७॥
दुरात्मा तो मुनीद्र भ्रष्ट । विद्याधरासी पीडि कष्ट ।
विद्याबळे हारितो दुष्ट । कामलंपट विषयाध ॥८८॥
विद्याबळे तो कामातुर । भोगविषय निरंतर ।
शताष्टनारि कष्ट फार । रुदितातर निशिदिनी ॥८९॥
हे जानोनि त्या मुनिराया । बुधी पालट जालि तया ।
आपर्निदा ते करोनिया । धिक् वाया हा कामदुष्ट ॥९०॥
याने पिडिले समर्थाला । यानेच जितिले इंद्राला ।
चद्रब्रह्माविष्णुरुद्राला । कळक लाविला यानेच ॥९१॥
विद्या परत जालियासी । कामपरीषह सोशि ऋषी ।
शातता लिंगविषयासी । ध्यानि मानसी वीतराग ॥९२॥
देवा मी जालो होतो भ्रष्ट । आता मला होति नर्क कष्ट ।
तव दर्शनेन दूरप्रष्ट । मार्ग सुभट सुधर्माचा ॥९३॥
ऐसा करिता मनि विचार । एकक्षण पश्चात्ताप थोर ।
क्षणात जाला कामातुर । पाहे नेत्र मुनि स्त्रियासि ॥९४॥
एकही नये त्याचे ध्यानासी । पुसता जाला प्रधानासि ।
वहुसुदर स्त्री आम्हासी । पाहावि त्वरेसि विध्याधरी ॥९५॥
प्रधान म्हणे अहो जी राया । एक आहे सुदरतनया ।
तत् पिता विद्याधर वळिया । कन्या नृपाततत्समान ॥९६॥
तो नये तुमचे हातासि । सीघ्र कोपोत्पन्न रुद्रासी ।
वोलाविले विद्याधरासी । विमानवासि सिद्ध जाले ॥९७॥
महारुद्र त्रिशूळपाणि । कुनेत्र तो तिसरा अग्नी ।
त्वरे वैसोनिया विमानि । शीखरपटनि आले पै ॥९८॥

ग्राम दिसे पर्वतासमान । पर्वतराजा विद्यवान ।
सुधमति राज्ञी सद्‌गुण । रूपलावण्य षड्‌गुणीते ।।९९।।
तया संतत पंचपुत्र । साहावी कन्या गुणपवित्र ।
रूपलावण्यज्ञानसूत्र । विद्या सर्वत्र निपुणते ।।१००।।
रूपगुण ऐकोन कर्णी । विषयांध इछा धरोनि ।
कुविद्याबळे तया स्थानि । प्रधानगुणि प्रेरिला तो ।।१०१।।
तेने जावोनि स्वउपचारे । कन्या मागे बहु आदरे ।
क्रोधे तप्त विद्याधर । बळत्कारे तो सिद्ध जाला ।।१०२।।
दोघाचा संग्राम अद्‌भुत । दोघे विद्याधर बळवंत ।
युद्ध षड्‌मासपर्यंत । नाटोपत एकमेकासी ।।१०३।।
पार्वती कन्या म्हणे ताता । मज आज्ञा द्यावि जी पिता ।
त्या जिंकिन क्षण न लगता । कायसि कथा पुरुषार्थी ।।१०४।।
पिता म्हणे तू धन्य कन्ये । परि महारुद्र बलवान ।
मम शक्ति विद्या द्विगुन । क्षणात जिंकिन तयासी ।।१०५।।
तेव्हा ते पार्वती शक्तीरूप । तेजाद्‌भुत भानुस्वरूप ।
नेकप्रकृति सैन्याधिका । एकानेक पाचारिती ।।१०६।।
विद्याधरि ते विद्याबळे । शस्त्रास्त्र महातुबळ ।
महारुद्र अन्नो कल्लोळ । दोन्ही दळ मिळालि क्रूर ।।१०७।।
वीरासि वीर सुरासुर । युद्ध करिति महाक्रूर ।
पार्वती शक्ती महारुद्र । विद्याभार वाण सोडिती ।।१०८।।
शब्दवाण महातीक्ष्ण । तेनें झाकिले हृदयभुवन ।
प्रत्युत्तर सोडिला वाग्बाण । बाणे बाण निवारिला तो ।।१०९।।
रुद्रे त्रिनेत्र उघडीला । अग्नीबाण धडाडिला ।
तेन हाहाकार जाला । पळू लागला सैन्यभार ।।११०।।

पर्वतकन्या अतिचतुर । मेघबाण सोडिला त्वरे ।
अग्नीशात मोहासी पूर । वाहावला रुद्र तत् समयी ॥१११॥
सावध जाला म्हणे अतरि । विद्याशक्ती बळभारि ।
क्रोधे तप्त तो त्रिपुरारि । त्रिशूळ करी सज्ज केला ॥११२॥
ऊर्ध्व करोनिया हस्त । क्रोधे झुगारि गगनात ।
पार्वति देखोनि तयाते । तुर्यंक खायते सोडि बाण ॥११३॥
तया माघे नयनबाण । पंचबाणाचे सधान ।
रुद्र वेढिला शक्तिबाण । तया निवारन न करवे ॥११४॥
नयनबाण हृदयी लागला । महारुद्र व्याकुळ जाला ।
मानमदन हृदी खोचला । मूर्छित जाला भूमीशयन ॥११५॥
शक्ति जयस्वीते जाहाली । आपुले मदिरासि गेलि ।
पिता माता सतोषली । विद्यवान भलि तू कन्ये ॥११६॥
इकडे रुद्र सावध जाला । मनि पश्चात्ताप केला ।
तत् क्रोध उत्पन्न जाला । म्हणे व्यर्थ गेला मम जन्म ॥११७॥
क्रोधे जाला तो सन्याशी । जटा आपटि भूमिसी ।
तेव्हा तत्समयासी । पुत्र तयासी उत्पन्न जाला ॥११८॥
भस्मासुर नामाभिधान । पित्यासि मागे वरदान ।
वैरियासि भस्म करिन । हस्त ठेविन सिरि त्याचे ॥११९॥
रुद्र सतोसला अतरि । भस्मविद्या पठन करि ।
एकात वनि साधन करि । वरद वैखरि वदयेला ॥१२०॥
पर्वतरायाचे जे दूत । ते सागती पार्वतीत ।
तिन पुसोनि पितियात । चाललि एकांत अरण्यासी ॥१२१॥
तेथे तो पापि भस्मासुर । विद्या साधि तो अघोर ।
मौसादि नरसीर । गळाहार अतरमाळा ॥१२२॥

जटा मोकळ्या सोडोन । कुविद्येचे धरल ध्यान ।
तत्समयी विद्याप्रसन्न । कराग्री येवोन बैसलि ॥१२३॥

ते पार्वति पाहोन । रूपकरनी विद्यानिपुण ।
दोघि स्त्रिया रूपलावण्य । करिति गायन सप्तस्वरि ॥१२४॥

त्यास पाहोनि भस्मासुर । म्हणे तुमच कोन नगर ।
पर्वताख्य आमचे नगर । पर्वतराजा विद्याधर ।
महासुर प्रतापी तो ॥१२५॥

महेशपुत्र म्हणे अतरि । मम पित्याचा तोचि वैरि ।
क्रोधे गेला नगरातरी । प्रळय भारि करितसे ॥१२६॥

ज्याच्या सिरि ठेवि हस्त । भस्म करि तया क्षणात ।
पर्वतराजा विद्यावत । दिवस सप्त युद्ध जाले ॥१२७॥

दोघे क्षेदक्षीण जाहले । स्वस्वस्थळासि पोहचले ।
भस्मासुर मिथ्याबळे । तप योजिले अघोर ॥१२८॥

असो त्याचे वर्णन फार । करिता पापाचा विस्तार ।
पर्वतकन्या महाचतुर । आलि त्वरे त्या ठाया ॥१२९॥

रूपकर्णि विद्या केलि । इंद्र अप्सरा सुदर बाळि ।
गायन सप्तस्वर मजुळी । नेत्रकमळि पाहे शूर ॥१३०॥

म्हणे तू कोन्हाचि गे नार । ते म्हणे मम धनि विद्याधर ।
सुर म्हणे ममातर । पूर्ण कर मनकामना ॥१३१॥

ते म्हणे भस्मासुरासी । तुम्हि नाचा अम्हासरसी ।
हस्त ठेवोनिया कटासि । हृदयासि पाणिस्पर्श ॥१३२॥

स्कधावरि ठेविति कर । तैसेच ठेवि भस्मासुर ।
नृत्य करि महाचतुर । मस्तकि कर ठेविती नारि ॥१३३॥

विषयाध जे कपटिमूढ । याचे कुड त्याचेच पुढ ।
मस्तकि हृस्त ठेविता दृढ । भस्मला मूढ भस्मासुर ॥१३४॥
पार्वती तेवि जई जालि । येवोनि पित्यासि भेटलि ।
सर्व नगरि आनंदलि । विघन गेलि निरसून ॥१३५॥
पार्वती म्हणे पितियासी । महारुद्र तो कुतपस्वी ।
आज्ञा द्यावि ता मजसी । क्षणात तयासि जिंकिन ॥१३६॥
पर्वत म्हणे पार्वती बाळी । तो कुविद्येचा महाबळि ।
त्यासि नको करू कळि । अरण्यस्थळि आसो कैसा ॥१३७॥
पीताजी ऐका माझे वचन । आग्यावृक्ष प्रेरिता प्रयत्न ।
अगा स्पर्शला करिल विघ्न । निर्मूळ करिन त्यास मी ॥१३८॥
म्हनोन निघालि त्वरित । गेलि ते तपोवना तौत ।
रूपकरणि विद्या तेथ । षोडशवर्षांत भिल्लनी ॥१३९॥
गुजा पितळ आळिकार । स्वरूप दिसे गौराकार ।
मृगनयनि मनोहार । गोल पयोधर मन्मोहनी ॥१४०॥
ते ऐकोनि महातपस्वी । नेत्र उघडोन पाहे ऋषि ।
कोन हे अप्सरा वनासी । एकातासि भेटली आम्हा ॥१४१॥
तिचे पाहोनिया वदन । नैनासि न्याहाळि नयन ।
चहुदिसी करि वदन । मुखचुबन करू पाहे ॥१४२॥
कामिक जेका कामातुर । भील्लनि धरली बळात्कार ।
काम नावरे महारुद्र । अहोरात्र सप्तदिन ॥१४३॥
रूपकरनि विद्या भिल्ली । पर्वताचि दरि ते जाली ।
लिंगरेत नदी लोटली । श्रमि जाहालि दोघ जन ॥१४४॥
क्षणेक शात होवोनि । महारुद्र विचारि मनी ।
मम तपाचि जालि हानी । मनि क्रोधाग्नि धडाडिला ॥१४५॥

क्रोध मान माया लोभ । याचा जाला एकचि डोब ।
लिंगावरि करीतो क्षोभ । उपटिला स्तभ ज्यापरी ॥१४६॥
भिर्कविला दूरस्थवनी । क्रोधे जालि शरीरहानी ।
मूर्छित पडला धरनि । विपरीत कर्णी देखोनिया ॥१४७॥
विद्यावळ लिंग ताठले । पृथ्वीवर ते लोटले ।
वज्रमय गडवडले । पर्वत जाले पिष्टवत् ॥१४८॥
विद्याधरासी हाहाक्कार । विमानारूढ आले इंद्र ।
ब्रह्मा विष्णु पुरंदर । पाहाति नजर विपरीत ॥१४९॥
पृथवीचा दिसतो पाटा । लिंगाचा जाला वरवटा ।
विचार पुसती श्रेष्टश्रेष्टा । न्याय उफराटा सागे विष्णु ॥१५०॥
पंचमकाल कलयुगात । कुकवि मिथ्या स्थापितात ।
विद्याधर मिळोनि समस्त । भयाभीत पुसताती ते ॥१५१॥
विष्णु म्हणे मी सागेन । परि न होए तुमचियान ।
जरी कराल सत्यवचन । भाक देन आम्हासी ॥१५२॥
भाशेष गोविलपर्वतासी । मग चालले पार्वतीपासी ।
सर्व मिळोनि ते तयसी । शरणागतासि तारि माय ॥१५३॥
सर्वासी जीवदान द्यावे । आपुल्या बाळकासि रक्षावे ।
तुम्ही पृथविसी तारावे । अभय द्यावे पितियासी ॥१५४॥
पार्वती म्हणे विष्णुदेवा । आमुचा की तुला असे केवा ।
तुम्ही उपाय याचा करावा । स्वर्गदेवा मिटोनि सर्व ॥१५५॥
पर्वत विद्याधराप्रति । कृष्ण सांगे वचन युक्ती ।
पार्वतीस करावि विनती । विष्णु म्हणती ते ऐकावे ॥१५६॥
हरि म्हणे पार्वतीसी । त्रिभुवनशक्ती तुजपासी ।
आम्ही राहातो स्वर्गवासी । तुसी पृथ्वीसी साभाळावे ॥१५७॥

लिंगासि जिती शक्तीवान । पाहाता न दिसे त्रिभुवन ।
महारुद्र लिंगपतन । ते लिंग कोन पत्करील ।।१५८।।
तुम्ही साभाळावे हे आता । हे तुम्हासीच आहे योग्यता ।
बहुत काय सागु वार्ता । यासि साक्षता अंतरि तू ।।१५९।।
ऐसि विष्णु वदे वचनी । पार्वती समजलि अंत कर्णी ।
म्हण हे अशुभकरनी । निदनिक जनी विष्णुदेवा ।।१६०।।
हरि म्हणे ऐकावे माये । याचा करीन मी उपाये ।
पूजनीक सर्वासि होय । कलयुगि समुदाए पुजिती ।।१६१।।
तथास्तु म्हणे पार्वती । हरहर सर्व म्हनती ।
समुदाए अरन्यात जाति । प्रेत पाहति ते रुद्राचे ।।१६२।।
पृथ्वी प्रळयलिंग आले । ते सर्वही देखते जाले ।
भयभीत अवघे पळाले । शात केले ते पार्वतीन ।।१६३।।
विष्णु म्हणे चला समग्र । पूजाविधि घ्यावि त्वर ।
तेथे स्थापोनि प्रेतरुद्र । भस्माकार विभूता आगी ।।१६४।।
धतुरपुष्प बेलपत्र । स्मशानभूमी तप अघोर ।
त्रिशूळ सखडौरचक्र । शैवहरहरमहादेव ।।१६५।।
अहोहो हे मिथ्यासर्वही । म्हणति प्रेता विटाळ नाहि ।
स्त्रियाआदि सर्वकाहि । भसग्राहि सर्व शुद्ध ।।१६६।।
त्याचि नाहि आत्मप्रचित । कळयुगि पाप अद्‌भुत ।
खोटा काळ तो साह्येयात । पचमकाळात विस्तार ।।१६७।।
असो हा मिथ्यातविस्तार । वर्णिता ग्रथ होईल थोर ।
समक्त्वी श्रोता ज्ञानाकार । परीक्षा अतर करतील ।।१६८।।
कुदेव कुगुरू कुशास्त्र । कुज्ञान कुबुधी कुमंत्र ।
कुपुण्य कुकुळि कुपुत्र । सुज्ञान सूत्र सम्यक्ती श्रोता ।।१६९।।

सुदेव सुगुरू सुशास्त्र । सुज्ञान सुबुधी सुमंत्र ।
सुपुण्य सुकुळि सुपुत्र । परीक्षा चतुर त्रिधा हेम[1] ॥१७०॥

श्लोक . देवोर्हन् दोषनिर्मुक्तो देवेंद्राद्यैः प्रपूजितः ।
केवलज्ञानसाम्राज्यो नान्यो रागादिदूषितः ॥१७१॥

काव्यः सकल भुवननाथै : पूजितो भक्तिभारै : ।
विमलतरगुणौघः केवलज्ञानचंद्रः ।
निखिलसुखसुदत्ता सर्वसंतापहर्त्ता ।
स जयतु जगदेकः श्रीजिनो मे प्रशान्त्यै ॥१७२॥

इति आराधनाकथाकोशे सात्यकीरुद्रोः कथा रत्न-कीर्तिचंद्र विरचिते कथा द्वय ३६-३७ छत्तीस सदतीस प्रसंग ३२ संपूर्ण ॥ छ छ छ छ ।



१. सुवर्ण तापन ताडन घसनी.

# प्रसंग तेहतीसावा

## श्री वीतरागाय नमः

नत्वा श्रीजिन जगत्पूज्यं आद्यब्रह्माणमद्‌भुत ।
ब्रह्मेति देवपुत्रोऽसौ, वक्षेहं लौकिकी कथा ॥१॥
मध्यलोकि मिथ्यातमति । अल्पज्ञानी विप्र म्हणती ।
इंद्रपद घेउ तप करीती । वनात जाती ऊर्ध्वबाहु ॥२॥
कंदमुळाचा तो आहार । ऋषिपत्नी ते बरोबर ।
पुत्रपुत्री लहान थोर । करिति ससार वनवासि ॥३॥
वनि करिति तप तीव्र । उभे एकट पदावर ।
उपवासी निराहार । औटसहस्र महातप ॥४॥
पवनयोग तप केले । इंद्रासन कपित जाले ।
तपस्वी ब्रह्माना वोळखिले । पाठविले तिलोत्तमेसी ॥५॥
सप्तस्वर गधर्व गायन । शृंगार-स्वरूप-लावण्य ।
तया समीप ते येवोन । पाहाताचि मदन भ्रष्ट जाला ॥६॥
श्रवन करिताची गायन । ब्रह्मा जाला तपचळन ।
पाहतसे दीर्घनयन । कामबाण व्याकुळ जाला ॥७॥

तत् चित्त जाने तिलोत्तमा । अशक्त जाला भोगकामा ।
वामपद ताडि अधमा । द्विमुखब्रह्मा गर्धभवक्त्र ॥८॥
साडेतीन सहस्त्रे अनेक । तप केले स्वर्गदायक ।
ते सर्व जाले निरर्थक । जाला कामिक मूर्छागत ॥९॥
मनुष्याचे एक वरिस । ब्रह्माचा तो एक दिवस ।
साडेतीन सहस्त्र वर्षे । तपाचा नास मदने मृच्छा ॥१०॥
द्विमुख चतुर नयन । ब्रह्मा जाला उर्ध्ववदन ।
मूर्छना आली कामबाण । तपनाशन नारिलुब्ध ॥११॥
ब्रह्मा तपभ्रष्ट करोनि । तिलोत्तमा स्वर्गी जावोनी ।
इंद्रासी नमन करोनि । सागे वदनी हर्षयुक्त ॥१२॥
म्हणे स्वामी सुखी असावे । स्वईच्छेने सुख भोगावे ।
ब्रह्माचे भय न धरावे । कामवैभवे मूर्छीत जाला ॥१३॥
ते ऐकोनि इंद्राचे मनी । करुणाभाव अंत.कर्णी ।
म्हणे जावे त्वा परतोनी । ईच्छा पुरवोनी येई त्वरा ॥१४॥
तदा ते इद्र आज्ञेन । उर्वसी आलि परतोन ।
स्पर्श करितात या कारण । सावध होवोनि हास्य करि ॥१५॥
करे धरोनिया तयसी । नेता जाला स्वआश्रमासि ।
म्हणे मी जालो स्वर्गवामी । आता सुखासी काय ऊन ॥१६॥
तदा ते उर्वसी ते गृहात । ईच्छा भोग करि नित्य ।
त्याचा लौकिक तो जगात । अनित्य असत्य कलयुग ॥१७॥
अहो त्रिमूढ न जानती । देवदेवस्य कैश्या रीति ।
कुकवित्व जलपताती । आत्पप्रचिती नाहि तया ॥१८॥
भूचर इंद्रपद ईछी मनी । तप सन्यास न कळे ध्यानी ।
खेचरपद बळे करोनि । घेईन म्हणोनी मूर्खत्वं ॥१९॥

ब्रह्मा वंद्य तीन जगासी । तो कुकर्म करील कैसी ।
भव्य जानावे नीतिवेदासि[1] । असत्यासित्य जावे दूर ॥२०॥
नीतिमार्ग जिनआगम । पचज्ञानि ब्रह्मा तो उत्तम ।
आत्मज्ञानी मोक्षधाम । चारित्रोत्तम वृषभदेव ॥२१॥
आदीश्वर म्हणती त्यात । अन्यथा नसे त्रिभुवनात ।
चतुष्कषायासि रहित । षड्रिपु अत करितोचि ॥२२॥
सुखदु:खविनाशक । अष्टकर्मासि विघातक ।
केवळ ज्ञानप्रकाशक । जगे तारक देवाधिदेव ॥२३॥
काव्य–यो जानात्यखिल, जगत्रयमिदं, सत्केवलज्ञानभाक् ।
भव्याभोरूहभास्करो, तिचतुर, संसारनिस्तारक. ।
ब्रह्म श्री वृषभेश्वरो गुणनिधि: स्वर्गापवर्गप्रद: ।
स स्यात्मे भवशातये शुचितरो देवेद्रवर्यै: स्तुत ॥२४॥
कथा अडतीसावी पूर्ण । पुढे ऐका चित्त देवोन ।
द्रव्यसग्रह भयोत्पन्न । दोघे जन बधु सरळ ॥२५॥
विषयारम्य देशातीत । रथाभिधान नगरात ।
श्रेष्टी वसे धनाभिदत्त । धनदत्ता त्यात सुदर स्त्री ॥२६॥
तयासि पुत्र दोघेजन । धनदेव धनमित्र सगुण ।
पुत्री धनमित्रा सज्ञान । रूपलावण्य सीलवंती ॥२७॥
थोडचा दिवसात्पिता मृत्य । बाळक लघु कर्मोदयात ।
धनाचा जाला आस्ति नास्त । दारिद्र प्राप्त पुण्यविना ॥२८॥
दोघे बधु एके दिवसि । गेले कौशाबि नगरासी ।
सर्व वृत्तात मातुळासि । द्वयनेत्रासि अश्रुधारा ॥२९॥

---

१. वेद, अनिति, यजवै–अथर्वन्.

मातृभातृ तो धनवान् । तया दिधले अभयदान ।
आन वस्त्रादि द्रव्यार्पण । अमोल रत्न अष्ट दिल्ही ॥३०॥
मातुळ म्हणे त्या दोघासी । जतन करा रत्नद्रव्यासी ।
समता धरावी मानसी । कुबुधिसी न आचरावे ॥३१॥
एके दिनि मातुळाज्ञेन । चालले स्वगृहमार्गान ।
द्रव्यलोभ दोजनमन । इच्छिति हान न एकमेका ॥३२॥
ऐसे कर्त्ता नग्रपर्यंत । क्षिप्रावती नदीत स्वस्य ।
दोघ करिती पश्चत्तापात । भय–अनर्थ द्रव्यापासी ॥३३॥
युगुळे विचार करोन । नदीत टाकिलि अष्ट रत्न ।
मत्स्ये खाद्य जानोन । गिळिलि रत्न वसुविध ॥३४॥
तेथे तो मत्छारि धीवर । पापिधारिते जळचर ।
त्याचा करिताचि विदार । आष्टकक्कर देखियले ॥३५॥
धीवरि घेवोनि तयासी । धनमित्राचे दुकानासी ।
धनमित्राचा मातेपासि । विक्रीत तिसि कर्मयोगे ॥३६॥
माता पुत्रासि बोलाऊन । हे काय परीक्षा करण ।
तुजसि असेल याचे ज्ञान । सागोन देन आम्हासी ॥३७॥
दोघ सागति सत्यमात । हे अमोल रत्न आहेत ।
त्रिवर्ग लोभ धरि चित्तात । एकमेकाचा घात ईच्छी ॥३८॥
पश्चात्ताप चित्ति करोन । जेष्ठपुत्रा दिधलि रत्न ।
तेनेहि लोभ धरोन । इछी हनन मातृभ्रातृ ॥३९॥
धनापासि महा अनर्थ । राज्यभय दड न करीत ।
चोरभय प्राणहारित । पापि पापात का न करती ॥४०॥
तेव्हा त्यानि स्वयं चित्तात । बहु करिली पश्चात्तापात ।
द्रव्याचे लोभ प्राणघात । एकमेकात सखे बधू ॥४१॥

माता बंधू आनी बहिण । चौघासि वैराग्य उत्पन्न ।
मातुळा देवोन रत्नधन । परिग्रह त्यजुन दीक्षा इच्छा ॥४२॥
गुरूपासि ते जावोनिया । शुद्ध मनवचनकाया ।
नमोस्तु भावे करोनिया । महाविनया करिति ते ॥४३॥
स्वामि तुम्ही तरणतारू । ज्ञानदातार धीरमेरू ।
दीनाचे दयाळसागरू । दीक्षाभारू आम्हासि द्यावा ॥४४॥
दमधराख्य महामुनी । मतिश्रुति अवधीज्ञानी ।
हाळुकर्मि जीव जानोनी । मोक्षदायिनि दीक्षार्पित ॥४५॥
देवपूजानि गुरूभक्ती । स्वाध्यायसंजम यथाशक्ती ।
दानतुर्य तप भक्तीयुक्ती । विधीयुक्ती शास्त्रमार्गान ॥४६॥
घेवोनिया सजमभार । तप करिती घोरतिउर ।
ज्ञानपाठ एकलविहार । तरनतार भव्य जीवा ॥४७॥
उक्तंच श्लोक–मत्वैव भवभूरिदु:खजनक, लोभं महापापदं ।
मातृभातृकुटुंबवचनगृह, त्यक्त्वा त्रिधा धार्मिकै: ।
श्रीमज्जैनमतिजगत्त्रयहिते, धर्मे सुशर्मप्रदे ।
कर्तव्य स्वमनोदृढ प्रतिदिनं, शुद्ध महाश्रेयसे ॥४८॥
एकूणचाळिसावी कथा । सपूर्ण जालि ज्ञानपथा ।
पुढे श्रवन किंचित् अर्था । श्रोता समर्था परीसावे ॥४९॥
श्लोक–प्रणम्य परमात्मानं, श्रीजिनं केवलेक्षण ।
जात भय धनाच्चेति, कथयामि कथानक ॥५०॥
टीका–कौशाबी नगरि विख्यात । धनदत्त श्रेष्ठि धनार्थ ।
राजगृह व्यापार कृत्य । खरिदि समस्त च चालये ॥५१॥
वनिकपुत्र मिळोनिया । चालता निबिड वनठाया ।
तस्करे धन हिरोनिया । हानि पापिया पुण्यविना ॥५२॥

तेव्हा ते सर्व विचारीती । चोरासि मैत्रकी करिती ।
अम्ही तुम्ही मिळोनि प्रीति । करू उत्पत्ति बहु द्रव्य ।।५३।।
ते वनिक् मार्ग धरोन । बैसता आले पाथिकजन ।
ते पापी पुण्यहीन दीन । हरतील धन तयाचे ।।५४।।
ते धन घेवोनि समस्त । चालले वनि आडमार्गात ।
जाता दिनकर जाला अस्त । क्षुधातृषाक्रात जाहाले ते ।।५५।।
भिल्ल भक्षिति कंदमूळ । तत्पत्र अनि सखनाळ ।
वदरादिक अजानफळ । भक्षिता तात्काळ मृत्य होय ।।५६।।
तयामध्ये सागरदत्त । मनि म्हने हा महाअनर्थ ।
अन्नपाणि रात्री भक्षित । पाप अद्भुत धर्माची हानी ।।५७।।
विषप्राशनाते करावे । एकाभविच दु:ख भोगावे ।
क्रियाविरहित भवभवे । दु:ख भोगावे जन्ममृत्यु ।।५८।।
सागरदत्त म्हने मानसी । मज भोजन वर्जलीसि ।
अन्नपाणि अजानफळासी । कल्पातेसि घेणार नाही ।।५९।।
तेव्हा तयाचे ते सागाती । अजानफळ ते भक्षिताती ।
अमृतफळे वाचे वदती । श्रेष्टी म्हनती हे अनुचित ।।६०।।
विष प्राशिता गोड लोभ । तैसाच तोहि बचनाग ।
भक्षिताचि त्या देहभग । तैसाचि प्रयोग घडला त्या ।।६१।।
त्या सर्वासि मृत्य जाहाला । तत् दिनकर उदय जाला ।
सागरदत्त पाहे धनाला । उदित जाला व्रतयोग ।।६२।।
ते धन घेउनि शक्तिसार । गृहासी आला महात्वरे ।
पुत्रपौत्र अनि परिवारे । सज्जेसोयरे धन आस्था ।।६३।।
एकदा श्री सद्गुरूपासी । श्रावकाचार श्रवण त्यासी ।
त्रिपनक्रिया दशधर्मासी । ऐकताचि त्यासि वैराग्य ।।६४।।

म्हणे स्वामि गुणनिधान । म्या पाहिले नेत्र करून ।
अखाद्यवस्तु फळ अजान । भक्षिता मरन द्रव्य भय ॥६५॥
आता धिक् धिक् संसार । कृपा करावि दयासागर ।
मज द्यावा जी दीक्षाभार । अष्टकर्म दूर करावया ॥६६॥
महान् विनय द्वयपाणि । दीक्षायाचना करि वचनी ।
भव्य जीव जानोनि मनि । दीक्षाग्रहणि विधायुक्त ॥६७॥
अब्धिकीर्ती त्या अधान । गुरूपासि पठन पाठन ।
एकलविहारि होऊन । भव्यजनमन उपदेशी ॥६८॥
समाधिमरण अंत:काळी । पंचनौकार हृदयकमळी ।
मोक्षगामि तो जीवबळि । त्रैलौक्य मंडळि अनुक्रमे ॥६९॥
अहो हो सम्यक्ती भव्यप्राणी । व्रतकथा सत्य जिनवाणि ।
रात्रीभुक्ती व्रत्येक तजोनि । त्यासि निधानि मोक्षमार्ग ॥७०॥
चौऱ्यासि लक्ष यौनि अत । नरदेह अवचट प्राप्त ।
धनयोवन जीविन्वते । धर्मस्य त्वरित जीवमना ॥७१॥
काव्यश्लोक:-एकेनापि[२] जिनेद्रदेवकथिते, नाच्चैव्रतेन स्वय ।
ज्ञात्वा संश्रुतिचेष्टित च हृदयं विद्युच्चल जीवित ।
त्यक्त्वा तच्चधनं विशिष्टचरणो[३] जातो मुनिः शुद्धधीः ।
स श्रीसागरदत्त वाग्गुणनिधी कुर्यात्सता मंगल ॥७२॥

इति श्री (चंद्र) गुरूस्वामिं रत्नकीर्तीजी आराधना-कथाकोशे धनदत्तहेतो चौराणामभवत् भयमित्ति कथाविरचिते कथा ३८-३९-४०-चाळिसाव्री पूर्णः प्रसंग ॥३३॥ ॥छ छ॥

२ एकव्रतेन, ३ निर्मम चारित्र आचरावे

## प्रसंग चवतीसावा

### श्री पार्श्वनाथ मुक्तागिरीधीश प्रसन्नवरदाः भवंतु ।

### ॥ श्री वीतरागाय नमः ॥

श्रीजिन जगत्पूज्यं भारती भुवनोत्तमा ।
नम' स्तुत्यगुरू भक्त्या वक्षे संगकथानक' ॥१॥
ॐ नमू श्री जिनराय । मुखोत्पन्न सारजा माय ।
ज्ञानदाता श्री गुरूमाय । दाखवि सोय कवित्वाचि ॥२॥
जंबुद्वीपात सुदर्शन । मेरु दिशा आहे दक्षिण ।
भरतक्षेत्री देश गहन । अभिधान मणिवत देश ॥३॥
मणिरत्नापुर नगर । मणिवत राजा ज्ञानसूर ।
रानी मणिमय सुदर । गुणाकर पृथवीमति ॥४॥
मनिचद्राख्य तया पुत्र । सूर धीर गुणगभीर ।
राजनीती जाने चतुर । पुण्य आधार पूर्वीचे ॥५॥
राज्य करिती स्वईछेन । धर्मकर्म श्रीजिनगुण ।
सुपात्रासी चतुर्थदान । नवविधा पुण्य संचित ॥६॥

---

१ द्रव्यपरिग्रह

एकदा देवी पृथ्वीमती । केश कुरळे वाळवीती ।
राय देखिली अवचिति । केश उत्पत्ति शुभ्रवर्ण ॥७॥
राजा विचार करि मनी । शुभ्र रोम यमनिशानि ।
देहे क्षणभगुर जानोनी । परीक्षा मनि द्वादशादि ॥८॥
त्रिधा वैराग्य त्या उत्पन्न । स्वपुत्रासी राजि स्थापून ।
नमोस्तु त्रिकर्म गुरूराया । गुरूसन्निध जावोन ॥९॥
दीक्षा द्यावि कृपा करोन । मी दीन तुम्हासी शरन ।
गुरूराज दीनोद्धारन । अभयवचन दिल्हे त्यासी ॥१०॥
देवपूजा ते विधियुक्त । अन्नदानादी यथाशक्त ।
परोपकार पुण्याइभूत । झाले तृप्त तुर्य सघादी ॥११॥
त्रिगुप्ताचार्य मुनिराज । दीक्षा दिधली मोक्षबीज ।
भव्य जीवाचे आत्मकाज । ज्ञानबीज सिद्धातशास्त्र ॥१२॥
अकरा अग चौदापूर्व । श्रुतज्ञान पठन सर्व ।
त्रिगुप्ती वैभव । गुरूकृपा संपादिली ॥१३॥
एकदा गुरुआज्ञा घेवोन । एकलविहारी होऊन ।
ज्ञानकीर्ति ज्ञानाभिज्ञान । करिता गमन प्राप्त उज्जनी ॥१४॥
नगरप्रदेशी स्मशानी । योगधारण मडासनी ।
परमात्मा चिद्रूप चितनी । त्रिगुप्ती मनी आचरितो ॥१५॥
तथा तेथे एक कुजोगी । कुविद्यासी साधना लागी ।
दोन सीर काढोनी वेगी । मुनिप्रेता लागी पाहिले ॥१६॥
त्रिमस्तक चूल करोनि । खिचडी हाडीवर ठेवोन ।
अग्नि प्रदीप्त करोन । विद्यासाधन वेताळी ते ॥१७॥
पद्मासनी तेथे वैसला । मत्र वेताळी जाप्य केला ।
हांडीत क्षीरभात शिजला । घ्यावया गेला भक्षणार्थ ॥१८॥

मुनि मेरूसमान धीर । कायागुप्ती धरी स्थिर ।
तव वम्हाडाचे तुटली सीर । चरणकर उभारले ॥१९॥
चूल खचली हाडी पडली । पापी जोगी विद्या चळली ।
म्हणे भूतप्रेत उठली । प्रेत पाहिली भयंकर ॥२०॥
जोगी तेथोनिया पळाला । मुनि पाहे त्रिगुप्तीला ।
मेरूसमान धीर धरला । दिनकर झाला उद्योत ॥२१॥
एक्यापुरुषे पाहिला मुनि । जिनदत्तासी सागे कर्णी ।
तुमचे गुरू त्या स्मशानि । मस्तक वन्ही दग्ध झाले ॥२२॥
ते ऐकोनिया श्रावक । सर्व गेले स्मशान भूमिक ।
हाहा:कार केला सकळीक । आनिला पालक तत्समई ॥२३॥
वहुत शिण्टाइ करोन । स्वगृहासि आले घेवोन ।
वैद्यासी त्वरे बोलाऊन । करावा प्रयत्न औषधाचा ॥२४॥
वैद्य म्हणे जिनदत्तासी । सोमश्रमा व्राम्हणापासी ।
लक्षपाकतेल त्यापासि । औषधासि आनावे त्वरे ॥२५॥
श्रेष्टिन तै ऐकोन कर्ण । त्वरे गेला द्विजसदन ।
तद्भार्या तुकारि सगुण । तेल देन लक्षमूळिचे ॥२६॥
तुकारि म्हणे औषध घेई । औषधदानाचे पुण्य देई ।
कायकूपिका तत् समई । दिधलि पाहि जिनदत्ता ॥२७॥
ते घेवोन उठला त्वरे । घट पडला भूमीवरे ।
व्यर्थ गेले तेल सारे । चिंतातुर श्रावक जाला ॥२८॥
म्हणे सुवर्णतोला तेल । ते अवघे व्यर्थ गेले ।
ते तुकारिने पाहिले । अभय दिधले श्रेष्टिसी ॥२९॥
तुर्यदानाचे देणार । दाता विरळा दानशूर ।
कल्पवृक्षसमान धीर । पुण्यानुसार धर्म्मवृद्धी ॥३०॥

द्वितीय घट दिल्हा त्यासी । घेवोन चालला गृहासी ।
मार्गी झगटला पसुसी । पडता भूमिसी कुपिभग ।।३१।।
तया तुकारिने देखिले । त्वरित तयासि पाचारीले ।
संचितासि ठेवि बोल । न पोहोचे तेल मुनिराया ।।३२।।
तृतीय कुपि न्यावि त्वरेन । स्वामिसी द्या औषधदान ।
जे लागल ते देईन । चतुर्थदान पुण्यप्राप्त ।।३३।।
श्रेष्टि कूपिका घेवोनी । स्थिर चालले यत्न करोनी ।
सद्गुरू समीप येवोनी । वैद्यवचनी तेलस्पर्श ।।३४।।
त्रय वासरा करि लेप । मुनीद्र झाले सुखरूप ।
कायोत्सर्ग महान् तप । करिती जप पचगुरू ।।३५।।
जिनदत्त म्हणे अंतरि । परोपकारि ते सुदरी ।
उत्तीर्ण व्हावे झडकरी । काही तरी शक्तीनुसार ।।३६।।
घेवोनि सौभाग्य आळिकार । गेला तुकारिचे मंदीर ।
यावे हो दादा म्हणे सुदर । जाले मुनीद्र सुखीकाय ।।३७।।
श्रेष्टि म्हणे धन्य तू धने । बाई तुझे अगाधपुण्ये ।
स्वामी जाले सुखसंपन्न । द्रव्य घेण सुवर्ण काही ।।३८।।
ब्राम्हणी वदे वचन सत्य । दादा नेघे रत्नधनाते ।
तुर्यदानाचे पुण्यमात । धनकंकरात काशा घेउ ।।३९।।
ऐकोनि तुकारिचे वचन । जिनदत्त म्हणे तू धन्य ।
मम वचन मान्य करन । धर्मवहिण मम कन्या ।।४०।।
आळिकार पुढे ठेविला । दोन कुपिका व्यर्थ गेल्या ।
क्रोध नष्टि तुजसी आला । उपकार केला मजलागी ।।४१।।
दादा क्रोधाचि भोगिली फळ । एकचित्त ऐक निर्मळ ।
आनदपूर ते विशाळ । विप्रकुळ मम उत्पन्न ।।४२।।

तो शिवशर्मा मम पिता । कमळावती माझी जनिता ।
अष्टपुत्र उपराता । मीच दुहिता रूपवंती ॥४३॥
मम जेष्टा नामाभिधान । विराजित सौभाग्यमान ।
तुकार देता क्रोधोत्पन्न । भयभीत मन सर्वांचे ॥४४॥
राजमान्य मम पिता । पूर्वपुण्य सतत सपता ।
एकदा राज्ये सभातौता । गेले मी पितासमागमे ॥४५॥
राजा वदे तू वो कवन । तुकार देता क्रोधोत्पन्न ।
मे तुकारि नामाभिधान । राज्यवचन अढळ पै ॥४६॥
तुकार माझ्यान सोसवेना । नोवरा माते मिळेचिना ।
सोमश्रमा ज्वारि ब्राम्हण । कन्यादाना गृहजामात ॥४७॥
कित्येक दिन उज्जनीत । सुखभोग तुकारसहित ।
एके दिनि मम प्रिय एकांत । नाटक नृत्य पाहू गेले ॥४८॥
निशि झाले दोन प्रहर । क्रोधोत्पन्न मम आतर ।
तत्समयी आले भ्रतार । उघडा त्वरे कपाटासी ॥४९॥
मया क्रोधे मौन्य धरिले । त्याने बहुत मज विनविले ।
क्रोधे तुकार मज बोलले । म्या ताडन केले कुशब्द ॥५०॥
अर्गळा घेवोनि स्वकरि । कपाट उघडोनि हस्त मारि ।
कात गेला पळोनि दूरि । धरिले तस्करी मज बापा ॥५१॥
आळिकार घेतले काढोन । भिल्लासि केले समर्पण ।
स्वरूप लावण्य देखोन । शीलखंडन करू पाहे ॥५२॥
नेक उपसर्ग करिता । म्या स्मरिलि कुळदेवता ।
मूर्छना आलि त्या त्वरिता । म्हणे तू माता क्षमा करी ॥५३॥
त्याने विकिले वाणियासी । विव्हळ जाला पाहे मजसी ।
म्या स्मरिले कुळदेवतेसी । उपसर्गासि निवारिले ॥५४॥

ममोपरि क्रोध करोन । दूरदेशा मज नेवोन ।
रक्तकावळी रंगाऱ्याने । विक्रीत त्याने घेतले मज ॥५५॥

जळा लावोनि आंगासि । रुधिर काढि दिवानिसि ।
क्रीमि कीटकरगासी । रेशिम्बनातिसि रंगवित ॥५६॥

अहो क्रोधपापे जिवाला । दु खभोगरोग त्याला ।
ओहो श्रेष्टि म्या भोग भोगिला । पुण्याविना गेला व्यर्थ जन्म ॥

ताता उज्जनिचा तो राव । बनातखरि दियायास्तव ।
मम भ्राता तो धनदेव । देखिला बंधव शुभोदय ॥५८॥

मम काया देखिलि जर्जर । बंधु हृदय गहिवर ।
कठ कवळोनिया कर । नारिनर रुदन करि ॥५९॥

मम कठ सद्गदित । माया ममता जालि शात ।
सर्व निरोपिला वृत्तान्त । सोडविला माते बधूने ॥६०॥

घेवोन आला स्वगृहासि । त्वरा आनिले त्या वैद्यासि ।
लक्षपाक त्या औषधासी । करोन तेलासि काढीले ॥६१॥

विद्रूप जाले मम सरीर । तेले जाले महासुदर ।
तत् समयी आले मुनीद्र । धर्म समग्र ऐकिला म्या ॥६२॥

तेथे घेतले सम्यक्त्वव्रत । अनतानुबधी क्रोध त्यक्त ।
त्रिपनक्रिया शास्त्रयुक्त । पुण्य अद्भुत मोक्षमार्ग ॥६३॥

अहो हो श्रेष्टि धर्मतात । तुर्यदानाचे पुण्य मात ।
स्वामिराया त्रिकाळनमोस्त । पुण्यउपार्जित शातिक्षमाद्या ॥६४॥

ततः क्षेम आलगन । करोन श्रेष्टि गृहागमन ।
स्वामिराया विनय करोन । चातुर्यमास स्थापुन ।
ऐकावे पुराण जिनालयी ॥६५॥

सप्तव्यसनी श्रेष्टीपुत्र । धन संग्रहिले सर्वत्र ।
घट भरोनि पूर्णवगत्र । स्वामी सन्मुख धात्रे ठेवि ॥६६॥
पुरान नित्य ऐकताती । सतोष होतात सम्यक्ती ।
तीन रत्न हृदयी धरिती । क्रिया पाळिति तिरोपन ॥६७॥
श्रेष्टिपुत्र कुबेरदत्त । पिताधन ठेवि कउत ।
पिताचे नेत्र धरि धूत । पापपडित व्यसनी ते ॥६८॥
जानोनि नेत्राचि त्या खुण । असनासमि पखानोन ।
स्वामी बैसले ध्यान धरोन । नले काढोन धनघटा ॥६९॥
श्लोक–मुनिर्विशुद्धचारित्रो जानं पश्यन्नपि ध्रुव ।
तदा मध्यस्थभावेन संस्थितो मेरुवत्तरा ॥७०॥
सर्वत्र भावरि करिती । नवविधा पुण्य जोडिति ।
धर्मद्रव्य मेळविती । भावना भाविती पुण्यवंत ॥७१॥
पूर्ण योग तुर्यमास जाला । समस्तानि ममोस्तु केला ।
आशिर्वाद सर्वा दिधला । श्रेष्टी गेला चैत्यालयात ॥७२॥
श्रेष्टि कुंभ पाहे नयनी । रिक्त जागा तेथे देखोनि ।
हृदयी भयाभीत मनि । विचित्र करनी कर्माची ॥७३॥
अरे देवा काय जाले । संसार जिवित्व माझे नेले ।
म्या मुनि देखता ठेविले । नाहि देखिले दुसऱ्याने ॥७४॥
ऐसे चिंतोनि हृदयात । त्वरा गेला तो स्वामि जेथ ।
महाविनये करि तेथ । मम मनोरथ पूर्ण करा ॥७५॥
माझे मन स्थिर करोन । त्वरित यावे या मार्गान ।
यति समजले अत कर्ण । मेरुसमान धैर्यवंत ॥७६॥
घेवोन आत्मा चैत्यालयात । गादि बैसविले महंत ।
सर्वाहिनी केला नमोस्त । मम मन स्वस्थ कथा सागा ॥७७॥

मुनि म्हणे ऐक सखया । तव मन स्थिर व्हावया ।
जे आवडेल त्वं हृदया । सागावि त्वया रसिककथा ॥७८॥
श्रेष्टि सागे कर जोडोन । कथा ऐका चित्त देवोन ।
पद्मरथपुर विस्तीर्ण । राजा वळवान वसुपाळ ॥७९॥
तयाचा जितशत्रुदूत । कार्यासी पाठवि देशात ।
मार्गी जाता घोर वनात । तृषा तयात लागली ॥८०॥
पाणि न मिळे तयाला । तहाने प्राण व्याकुळ जाला ।
एक्या वानेर पाहिसा । दयाळु आला तयापासी ॥८१॥
उदक आनोन शिंपले । सावध होवोनि वैसले ।
वानरे हस्तकी धरीले । तोए दाखविले जीवित ॥८२॥
पाणी पिऊनि धीट झाला । कपिचा त्याने घात केला ।
तो भयाभीता जाला भला । त्वरे गेला वृक्षावरीता ॥८३॥
पापी इच्छा करी मन । या वानरासी मारोन ।
याचेच चर्म काढोन । थैलि करोनी पाणी नेऊ ॥८४॥
किम स्वामी ऐसे करावे काय । प्राण वाचविला ते माय ।
तयासि घालोनय घाय । उपकार हृदये समजावा ॥८५॥ कथा १॥
ऐकोनी मुनि वदे त्यासी । उपकार न जाणे श्वभ्रवासी ।
ज्ञानाधन जाणे कर्मासि । त्याचीविषयी कथा ऐकावी ॥८६॥
अहोहो श्रोते सावधान । एक कौशंवी नगरोत्तम ।
विप्रशिवशर्माऽभिधान । स्त्री कपिलाहीन पुत्रनास्ति ॥८७॥
एकदा त्या ब्राह्मणासी । मुगसवाळ सापडे त्यासी ।
ते आणोन दिल्हे स्त्रीपाशी । पुत्र स्नेहासी पाळी गे ॥८८॥
कित्येक दिन जाल्यावरी । पुत्र प्रसवही ते नारी ।
नकुळास वैसवी त्याशेजारी । जतन करीले बघुसी ॥८९॥

तो राखी मार्जारकुकर । पलगी निजला कुवर ।
कांडन घातले बाहेर । स्वर मधुर साळीकाडी ॥९०॥
अहो श्रेष्टी कर्ममहन । जैसे छेडि तैसे भोगन ।
त्या बाळासी सर्प येवोन । डकिता मुगसान मारिला ॥९१॥
भुजंगाचे तुकडे केले । मुख रक्ते लिपित झाले ।
मुगस मातेपासी आले । ते पाहिले कपिलेनेत्री ॥९२॥
हाहा.कार तिने केला । म्हणे पुत्र याने मारीला ।
लहानाचा म्या गे थोर केला । बाळ खाल्ला एकुलता एक ॥९३॥
बाळ अपला न पाहोन । क्रोधे भ्रमले तिचे मन ।
मुगसा मुसळ घात करोन । दु'खी होवोन रण्यवासी ॥९४॥
अविवेकी गेली गृहासी । खेळिता देखिले बाळासी ।
भुजंगे पाहिला नेत्रेसी । पश्चात्तापासि करती दोघ ॥९५॥
श्लोक:–भो श्रेष्टिन् सर्पदोशोऽया किं तस्या विप्रयोषिता. ।
युक्तं निरापराधस्य न कुळस्यैव मारणं ॥९६॥ कथा ॥२॥
ते ऐकोन श्रेष्टी म्हने । कथा ऐका मम रसने ।
वाराणसी ग्रामि पुण्य । विचक्षण जितशत्रुशे ॥९७॥
तेथे वैद्य धनदत्त । धनदत्ता नारी शोभत ।
धनचंद्र धनमीत्रस्त । पुत्रे शोभत दोघे जन ॥९८॥
राजवैद्य शास्त्रपठन । पिता पावला तो निधन ।
राय तयासि बोलाउन । सभामान्य अभय दिल्हे ॥९९॥
एकदा चपापुरधीशे । रोगव्याप्त बोलावि त्यासे ।
जाता वनमार्गें तयास । व्याघ्र दृष्टीस पाहिला ॥१००॥
माथा शूळ अंधनयन । महाव्याधी दु खी मन ।
ते पाहोन लघुभ्रातान । भैषज नयनसू दिले ॥१०१॥

पाहेलि औषध प्रचीत । निरोग होवोनि पाहे त्यात
त्या व्याघ्राने केला घात । औषधदानात करोनिया ।१०२।कथा३॥
श्रेष्टिचे वाक्य ऐकोनिया । मुनि वदे ऐक सखया ।
व्याघ्र पापि सत्य त्वया । स्वभाव देह्या त्या तिर्यंच ॥१०३॥
भो श्रेष्ठि त्व ज्ञानधीर । शास्त्र धार्मिक चतुर ।
चपापुर सोम द्विजवर । स्त्रिया सुदर युगुळ त्या ॥१०४॥
शर्मा सोमल्या नारि । कनिष्टा पुत्रोत्पन्नोदरि ।
वृषभ त्या ग्रामाभीतरी । घरोघरि फीरे मीस्कीन ॥१०५॥
बाळा लेकुरे पडे पाया । पुष्टि स्वार होउनिया ।
ग्रास चारा पाणि दे तया । करिति माया नदिची ते ॥१०६॥
एकदा सोतश्रमा ब्राह्मणी । सौत्त मत्सर धरि मनि ।
सोमल्या गेली आनु पाणि । नदि आगनि उभा होता ॥१०७॥
त्याचे सीगी बाळ घातला । वृषभ बाहेर पिटला ।
त्याचे पृष्टि सखघ्वनिला । धावा मारला पुत्र माझा ॥१०८॥
जन धावे चहुकडोन । बाळ काढिले सिंगाहून ।
बाळ कंठगत प्राण । माता येवोन उरस्फोट ॥१०९॥
पुत्र घेवोन वोसगासी । स्तनपान केले तयासी ।
जन मारिती त्या नदिसि । न देता ग्रासासि कृश जाला ॥११०॥
श्रेष्टि शृणु सावधचित्त । मातापुत्रनदि दु खिस्त ।
तत् ग्रामी ज्ञाता जिनदत्त । स्त्री शीलवत जिनमति ॥१११॥
पायि दोष लाविति त्यासि । व्यभिचार शब्द सतीसि ।
दिव्य द्यावया जनासि । लोखडगोळयासि तप्ताग्नी ॥११२॥
सतीने उचलिला करि । निर्दोष म्हणति नरनारि ।
माते ठेवि भूमिकेवरि । तृणावरि तिने टाकिला ॥११३॥

तेथे होता वृषभनंदि । त्यान धरिला मुखामदि ।
सासनदेवी गुप्तशब्दि । खोटि बुधी जन मत्सर ।।११४।।
जन वदति दोघ सत्य । पुष्पवृष्टि देवी करित ।
पापि पाहोनि प्रस्तावत । सावधचित्ते भो श्रेष्ठि ।११५। कथा ४।।
जिनदत्त लोभि मनात । कथा सागे चित् भ्रमित ।
गंगातीरासि हस्ती येत । जळ प्रासित समुदाए ।।११६।।
त्यात एक हस्तीबाळ । कर्दमी रुतला निर्बळ ।
तापस विश्वभूति दयाळ । करि प्रतिपाळ काढोनिया ।।११७।।
दिवस दिवस प्रौढ जाला । महागज नामाथिला ।
श्रेणिकरायाने देखिला । गज घेतला बहुमोले ।।११८।।
वधन अकुशादि घात । तदुळादि खाद्य बहुत ।
ते न माने ऐरावताते । तोडि समस्त येता परगृही ।।११९।।
बावाने हस्त फिरवोन । म्हणे तेथे तुमचे कल्यान ।
गज न मानि ते वचन । सोड फिर्वोन मारि त्यासि ।।१२०।।
भिक्षुक पाळिला तो हस्ती । घात केला येवोन मस्ती ।
तैसे करावे काय वो जति । न जानति उपकारार्थ ।।१२१।। कथा५।।
मुनि म्हणे ऐक सखया । तिर्यंचाचि बुधि वाया ।
कथा श्रवण करावि त्वया । पुत्रस्त्रियासमवेत ।।१२२।।
हस्थिनागपुर विख्यात । विश्वषेण राज्य करित ।
पूर्वदिशेसी बागाईत । अम्रफळ शोभत पुण्यादि ।।१२३।।
तया आम्रवृक्षावरौत । गृध्रपक्षि सर्प भक्षित ।
सर्पविष फळ लिपित । पक्व बहुत माळि पाहे ।।१२४।।
ते अमृतफळ घेवोनि । रायासी दिधले आनोनी ।
धर्मसेना रायाचि रानि । प्रीति करोनि तीस दिल्हे ।।१२५।।

तिने विचारिले मानसी । तिने दिले जेष्टपुत्रासि ।
पुत्राने दिधले पित्यासी । तीर्थरूपासी अमर व्हावे ॥१२६॥
नृप वदे हे स्त्रीवेल्हाळे । त्वा भक्षावे अमृतफळे ।
प्रीत पाहोन सकुमाळे । भक्षिले फळ जिनस्मरणे ॥१२७॥
भक्षिता विष व्यापतअगी । व्याकुळ जालि सुदरागि ।
कोल्हाळ जाला पर्वारसगि । धनवतरि वेगि वैद्य आले ॥१२८॥
वदति विषफळ सत्य । क्रोधोत्पन्न जाला रायात ।
अविचार छेदि वृक्षात । स्त्रीसावध मत्र युक्त ।
वृक्ष दु:खिस्थ जाहाला ॥१२९॥
भो श्रेष्टि तैसि राययुक्ती । क्रोध न करावा सम्यक्ती ।
मुनिराय वचनगुप्ती । कुबेरदत्ताप्रती सूचन ॥१३०॥ कथा ६ ॥
तैस न करावे रायान । कथा ऐका चित्त देवोन ।
कोन्ही नर बुद्धीवान । महा अरण्य गेला कृत्यासी ॥१३१॥
सिंह देखिला भयानक । त्वरे चढला वृक्ष एक ।
प्राण वाचला जाल शुष्क । उतरला भूमिके तो नर ॥१३२॥
त्याने पाहोन त्या वृक्षासी । म्हने तोडोन न्यावे यासि ।
फत्तर घेवोनिया त्यासी । तोडि मूळासि दुष्टबुधी ॥१३३॥
ज्यान वाचविला देहे प्राण । त्याचे करावे काय हनन ।
उपकार न मानि तो दुर्जन । त्याचें वदन न पाहावे ॥१३४॥
अहो स्वामि ऐसे त्याने करावे । हे मजला तुम्ही सागावे ।
जेथे वाचला त्याचा जीव । त्याते दुखवावे योग्य नोव्हे१३५कथा७।
स्वामि म्हने भले श्रावक । कथा केलि दु खदायक ।
मूर्ख न जाने जो विवेक । तयाचे मुख पाहो नये ॥१३६॥

या अर्थी श्रेष्टिराया । कथा ऐक ऐक सखया ।
शब्दबाण न मारि वाया । करावी दया सर्वजीवासी ॥१३७॥
कौशंबी नगर विस्तीर्ण । राजा तेथे अधमादन।
सर्व सुखी पूर्वपुण्य । पुत्रवत् पाळन रयतेचे ॥१३८॥
तेथे जैनधर्मी सोनार । नाम तयाचे देवागार।
स्त्रिया शीळवंति सुदर । पुत्र पौत्र सर्व सुख त्या ॥१३९॥
एकदा राय मुद्रिकाहस्ते । रत्नजडीत करि तेथे ।
रत्न ठेवि न्याहावरीते । मुनि अवचित पाहिले ॥१४०॥
ते स्वामी उदडि अहार । मासोपवासी तप शूर ।
रत्नत्रय दी धरधीर । पचप्रकार मंत्रमुद्रा ॥१४१॥
प्रथमगृहि मंत्र न ये । द्वितीय धामि धूम्र होये ।
युगुळागुळि मुनिराये । सोडोनी पाहे तृतीयधाम ॥१४२॥
तेथे नसे भक्त सागार । पुढे पाहे तुर्य मदिर ।
तेथे श्रावक धरोनि धीर । पढगावि मत्र त्रिविध ॥१४३॥
तेथे तिष्टले मुनिराये । पुढे विधी श्रावक न ये ।
अनागारा तुर्य अतराये । आगोळि हृदय पचमी ॥१४४॥
मुनिराये धीर धरोनि । कर्मपरीक्षा पाहु ध्यानि ।
याच देहि कर्म फेडोनि । मोक्षसदनि सुख भोगु ॥१४५॥
नीट चालले रस्त्यान । दूर उभे श्रावकजन ।
दूरस्थ देखिले सोनारान । करि नमन घाबरा तो ॥१४६॥
रत्न ठेविले न्याहावरि । सूचना करि त्रिमदिरी ।
स्त्री म्हणे बोलावा लोकरि । कळस करि घ्या त्वरेन ॥१४७॥
पाणिपानि नमोस्तु स्वामी । तिष्ट तिष्ट ममग्रधामी ।
त्रिवार उदक सुद्ध पद्मी । प्रक्षाळ पध्नि उच्चासन ॥१४८॥

आपन गेला पाकगृहात । स्वामि बैसले दुकानात ।
नृपमोर आला चरत । अमोल्य रत्नात देखिले ॥१४९॥
भक्ष मनोन गिळिले त्याने । ते घसा बैसले दाटोन ।
सोनार पाहे राज्यरत्न । म्हणे कवने नेले काय ॥१५०॥
मुनिराज होता येथे । दुजा कोन्ही नव्हता सत्य ।
मुनिराज सागा सत्य । रत्न तुम्हात कास्या व्हावे ॥१५१॥
तुम्हासि अगत्य असेल । तरि मी देतो दुज चांगले ।
राजा माझे घर लुटिल । क्षय करिल कुटुबाचा ॥१५२॥
आता द्यावे हो शीघ्र रत्न । न देता अस्त माझा प्राण ।
मुनिराया दया करोन । भ्रामरिकारन उशीर ॥१५३॥
यति जानोन मौन्य धरि । वचन गुप्ती मनांतरि ।
कायागुप्ती बाह्यात्कारि । मन आतरि विचारित ॥१५४॥
कर्माबरा धरला द्वंद्व । फोडोन घेई आपला बध ।
याच देह्यासि व्हावे शुद्ध । वैर समध जिताबे वेगी ॥१५५॥
देहावरि क्रोध केला । क्षमा सैन्यक पाचारिला ।
शातिभाला हाति घेतला । कर्मसैन्याला जितावया ॥१५६॥
रत्न द्यावे म्हणे सोनार । कोने नेले सागा सत्वर ।
न देता मैद खरेखुरे । बोला सत्वर अता वेगी ॥१५७॥
पुत्त मुकुंदा म्हणे स्वामी । देहो सकल्प करितो मी ।
परिवा स्त्री म्हणे द्या स्वामी । अळिकार मी सर्व देते ॥१५८॥
राज्य क्रोधाचे भयात । कोल्हाळ करिती समस्त ।
जन मिळाले बहुत । म्हनति समस्त द्या स्वामी ॥१५९॥
धैर्यगजासि स्वार जाले । क्षमावोडन करि घेतले ।
कर्म्मवैरि सन्मुख आले । त्याने विंधीले शब्दबाण ॥१६०॥

न बोले न चाले न हाले । जन म्हणे हे मंद भले ।
यासि द्यावे वरवे टोले । सत जाहाले त्रिगुप्तीत ॥१६१॥

सोनारासि क्रोध आला । पितापुत्रे काष्ट घेतला ।
याहाटिला मुनिमस्तकि ॥१६२॥

काष्ट मोडोन जाल चूर । लागले पक्षि मानेवर ।
रत्नवमन जाले त्वरे । प्रकाश साऱ्या रस्त्यात ॥१६३॥

ते पाहोनि जन समस्त । म्हणति मुनि सत्य सत्य ।
कर्मसेना जिती समस्त । विजयी जाले मुनिनाथ ।
मोक्षपंथ धरिला त्वरे ॥१६४॥

भो भो श्रेष्टी धीर गंभीर । सावधान पितापुत्र ।
लज्जायमान जाले थोर । धिक् ससार वृथा जन्म ॥१६५॥

पश्चात्ताप करिति मनि । त्रिधा वैराग्य अत:कर्णि ।
मुकुंदालीन मुनिचरणी । दीक्षा घेवोनि कर्म खंडि ॥१६६॥

सोनाराचा नाहि अन्याय । ज्ञानी असोनि न जाने मोय ।
आम्हासि असे पूर्वांतराय । धर्मसोय जीवन जाने ॥१६७॥

अहो श्रेष्टि तैसे न करावे । दयाधर्मी सावध व्हावे ।
कुबेरदत्ता त्वा ऐकावे । श्रोता व्हावे त्वं सावधान ॥१६८॥

कथा जाल्या चार चाराष्टं । आता आम्हास मौन स्पष्ट ।
ज परीषह कर्मं श्रेष्ट । परीक्षा द्रीष्ट पाहु आता ॥१६९॥

तदा कुबेरदत्तपुत्र । हृदय कपित पापसूत्र ।
ज्ञानोदय शुद्ध पवित्र । पित्यासि वगत्र वदतु ॥१७०॥

बाबा मुनिराय महान् धीर । त्रिगुप्तीपालक यतीश्वर ।
द्रव्यघट घ्यावा सत्वर । पूर्णवगत्र रत्ना अमोल ॥१७१॥

तेव्हा श्रेष्टि लज्जान्वित । हृदी पश्चात्ताप करित ।
श्रोत्यासि जाले आश्चर्यवत । करिती नमोस्त स्वामिसी ॥१७२॥
धन्य मुनीद्र तपोनिधी । आम्ही अन्यायी हीन बुधी ।
क्षमा करावि कृपानिधी । ससार अब्धी तारा स्वामि ॥१७३॥
दीक्षा द्यावि मम अनाथा । शरण मी त्व स्वामिनाथ ।
शूरमत्र कुबेरदत्ता । विधीयुक्तता पूजा आदि ॥१७४॥
पुत्र जाला पित्यासि वद्ये । सर्वामनि जाला आनद ।
जिनदत्ता वैराग्यबुध । दीक्षाविध गुरू दातार ॥१७५॥
कित्येक नेमधर्म घेताती । कित्येक जाले सम्यक्ती ।
ग्यारा प्रतिमा पाळिताती । सार्थक करित्ति नरदेही ॥१७६॥
दीक्षा घेवोन श्रेष्टिन । जपतप अनुष्ठान ।
करिती कर्माचे खंडन । सुर नर पूजन करिती ॥१७७॥

काव्यः–जात· श्रीमति मूळसघतिलके श्रीकुंदकुदान्वये ।
विद्यानंदी गुरूप्रपट्टकमळोल्लासप्रदो भास्करः ।
श्री भट्टारक मल्लिभूषण गुरू रत्नत्रयलंकृत· ।
कुर्यात्सूरिमतल्लिकागुणनिध्रिः नित्य सता मगलं ॥१७८॥

इति कथाकोशे गुरूरत्नकीर्तिचंद्रविरचिते संगभयाधिकारे मणिव्रत मुणितुंकारी कथा। दर्शन ज्ञान वर्णनो नाम कथा ॥४१॥ प्रसंग ॥३४॥ संपूर्ण–शुंभ भवतु । तथाऽस्तु ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥

• • •

## प्रसंग पस्तीसावा

### श्री वीतरागाय नमः

श्लोक :–प्रणम्य त्रिजगन्नाथं । श्री जिनं सारशर्मदं ।
वक्षे पिण्याकगंधस्य । चरित्र धनलोभिनः ॥१॥
कपिला नगरी विस्तीर्ण । रत्नाख्य राजा पुण्यवान ।
राणी विद्युत्प्रभा षट्गुण । ऐश्वर्य संपूर्ण मंडित ॥२॥
तेथे श्रावक जिनदत्त । जिनपदि षट्पदवत ।
राजादी जिनधर्मीरत । बुधिवत श्रावकचारी ॥३॥
त्याच ग्रामीं असे एक । पिण्याकगध तो श्रावक ।
ते हे तीसक्रोड द्रव्येक । परि लोभ अधिक त्या मनि ॥४॥
न देव न धर्म न खाय । गुरू शास्त्र तीर्था न जाय ।
न खाए न पीए न दिए । पुढती होए दु खपाप ॥५॥
तस्य स्त्रिया सुदर खानि । विष्णुदत्त पुत्र सद्गुणी ।
धन पुष्कळ असोनि । धर्मालागोनि साभाळिता ॥६॥
एकदा राजा तडागास्तव । खानिता अज्ञान एक.जीव ।
पेटारी देखजि त्याठाव । सुवर्ण अधवकाबिका ॥७॥

पेटारी पाहे उघडोन । जंगित काळिमा पाहोनें ।
त्यातील एक घेवोन । जिनदत्त दुकान देखिले ॥८॥
जिनदत्ता हस्तकि दिल्ल । सावजी याचे द्यावे मोल ।
त्या दुकानात ठेवल । मोल दिल न पाहता ॥९॥
सेटि म्हणे नोव्हे लोखंड । बहु दिसत भारि जड ।
वजन करित प्रचड । हेमदंड समजला त्या ॥१०॥
म्हणे नेम आहे आम्हास । भोळ घेता कुचला दोस ।
लोह म्हणोनि सुवर्णास । परद्रव्यास घेवो नये ॥११॥
मंजुरी होता दुकानि । त्यास दिधले परतोनि ।
पिण्याकगंधाच्या दुकानी । लोखड म्हणोनि दिधले ॥१२॥
लोभ धरोनि हृदयात । टका दिधला एक त्यात ।
मजूरि म्हणे घ्याल नित्य । आनोनि तुम्हा देईन ॥१३॥
कित्येक दिवस तयान । आठ्यान्नव काबि सुवर्ण ।
परद्रव्यलोभ त्या मने । पाप न जाने द्रव्यलुब्धी ॥१४॥
बहिण आली एके दिनि । लग्ना नेला भिड खर्चोनि ।
काबि घ्या म्हणोनि । लोखडाचे मोलानी सागे त्या ॥१५॥
भाच्याच्या लग्नास गेला । दुकानास मजुरि आला ।
विष्णुदत्त पाहे तयाला । परद्रव्याला घेऊ नये ॥१६॥
तेव्हा राज्याचा कारभारी । माणूस पाहिला स्वनेत्री ।
अक्षर वाचिता वग्नी । शत ठगन्नी पेटारीत ॥१७॥
ते रिक्त देखोनि नयनि । रायासी सागे जावोनी ।
राय म्हणे त्या लागोनी । मानस घेवोनि या सर्व ॥१८॥
मंजुरि आदि करोन । बोलाविले सर्व जन ।
त्यासि राजा बोले वचन । द्यावे सागोन सत्य सत्य ॥१९॥

मंजुरि म्हणे जिनदत्तासी । एक दिली होती तयासी ।
द्रव्य दिधले त्यान मजसी । परतोनी विटेसी दिले मज ।।२०।।
मग पिण्याकगधाचे दुकानी । नित्य दिधल्या नेवोनी ।
अठयान्नव झालि गनती । सर्व मिळोन राव साहेब ।।२१।।
ऐकोनिया ते सत्योत्तर । भूप सतोषला अंतर ।
जिनदत्तासि पच वस्त्र । सन्मान आदर केला त्या ।।२३।।
पिण्याकगंधाचे गृहधन । सर्व केले नि:संतान ।
परद्रव्य भोळ गृहात । घेता नागवन पूर्व पुण्य ।।२३।।
पापे कुटुब दु:खी झाले । कारागरा क्रोधे बोले ।
तृष्णेन धनलोभी बुडाले । अनहित झाले जिवाचे ।।२४।।
विवाह झाल्यानंतर । पिण्याकगध निघे सत्वर ।
मार्गी येता समाचार । सांगती हेर तयासी ते ।।२५।।
अहो सेठ तुमचे घर । रायाने लुटले समग्र ।
सुवर्णकांबी वित्त फार । हे सर्वत्र पाहिले आम्ही ।।२६।।
ऐकोन तयाचे वचन । क्रोध उत्पन्न त्या कारण ।
त्वरित गृहासी येवोन । आर्तध्यान द्रव्यलाभिसी ।।२७।।
म्हणे मम पाद दुराचारी । सर्व लक्ष्मी क्षयकारी ।
पाषाण घेवोन द्वयकरी । पदावरि ताहाटिले ।।२८।।
पद मोडोन घात झाला । आर्त्तध्यानि प्राण गेला ।
धन लोभी जाति नर्काला । चौऱ्यासि झाला पापियासी ।।२९।।
ऐसे जानोनिया सम्यक्ती । धनलोभ न धरावा चित्ती ।
पूर्व पुण्य धनप्राप्ति । क्षेत्रसप्ती खर्च करावा ।।३०।।
न्यायिक द्रव्य मेळवावे । अन्यायद्रव्य ते नसावे ।
धर्मद्रव्य संचय करावे । सुखी असावे ससारी ।।३१।।

परद्रव्य पराव्य अन्न । परस्त्रीचा दोष दारुण ।
अनत भवाचे बंधन । विवेकी बुधजन त्यागावे ॥३२॥

श्लोक:–संजयतु जिननाथ: सर्व देवेन्द्रवंद्य: ।
सकळगुणसमुद्रो विश्वचैकप्रदीप: ।
विगतनिखिलदोषो दत्तदव्यप्रलक्ष्मी– ।
विमल तर गिरीशो बोधसिंधु: सता वै ॥३३॥

**इति कथाकोशे पिण्याकगंध कथा समाप्ता**

श्लोक : प्रोल्लसत्केवलज्ञानं । श्रीजिनंत्रिजगद्गुरूं ।
प्रणम्य परया भक्त्या । वक्ष्ये लुब्धकथानक ।
टीका : श्रीजिनराज जगद्गुरू । पंचज्ञानी दिवाकरू ।
तया साष्टाग नमस्कारू । कथा उच्चारू लुब्धश्रेष्ठीची ॥३४॥

चंपापुरीचा महाराज । अभयवाहन हारि आत्मज ।
पुडरीका गुणज्ञ भाज षडगुण साज ऐश्वर्य ॥३५॥

तत्ग्रामी लुब्ध नामा सेठ । पापिया तो धनलंपट ।
श्रेष्ठिनी नागकन्या नीट । रोहिणी प्रष्टचंद्रकाती ॥३६॥

गरूड दत्ताख्य तत्पुत्र । नागदत्तौ मना प्रीय थोर ।
ऐसा श्रेष्ठि ऐश्वर्यसार । द्रव्य भांडार परिपूर्ण ॥३७॥

यक्ष यक्षी तुरग हत्ती । रथ सोकासन नैकभाति ।
दासदासी नाहि गणति । रत्न जाति हिरे माणिक ॥३८॥

सुवर्णादि सपूर्ण धन । वस्त्रा भरणी दिव्य दुकान ।
ससार सुखी पूर्वपूण्य । परि तृप्ती मन नाही त्याचे ॥३९॥

वृषभादि अश्वस्थ । सुवर्णमय निर्माण करित ।
मन इच्छेने हिरेजडित । शृंग पुछात खुरादिक ॥४०॥

नाना रत्न माणिकजडित । स्वात्मखुशी छेद बहुत ।
अधिक मोले विक्रीत । घेत देत मनइच्छेन ॥४१॥
नेकष्टशत्र निर्मापीत । सप्त आहोरात्र भ्रमता ।
द्रव्यलोभी चित्तात । चिंता । कर्मयोगता काय सुचले ॥४२॥
गगाप्रवाहात काष्ठासी । देखोनी तसे तयासी ।
विक्रीत करावया त्यासी । लोभ मानसी फार त्याचे ॥४३॥
पुडरीका तदाराजपत्नी । माडि वऱ्होन पाहे नयनी ।
लुब्धकश्रेष्ठी कष्ट करोनि । काष्ठपाणी आहात असे ॥४४॥
राणी आतरी दयार्णव । मम प्रिय स्वामी ऐकाव ।
आपुले नगरि दरिद्री टाव । हे नसावे प्राणवल्लभ ॥४५॥
एक प्राणि काष्टसीरी । रात्र दिवस कष्टकारी ।
धन तया नसे घरी । दया अंतरी काही द्यावे ॥४६॥
ससारी या द्यावे धन । आपणासि अन्नदान ।
पर उपकारी जीवदान । तुर्यदान मुनीश्वरासी ॥४७॥
तदा ऐकोनि क्षितिपति । दया उद्भवली से चित्ती ।
काष्ट वाहे त्यासी त्वरिती । पाचारिती हेर तयासी ॥४८॥
राजा पुसे तया कारण । कष्टविक्रय तया कारण ।
द्रव्यर्थीनि द्रव्य घेत । सुखी राहत ससारात ॥४९॥
तेव्हा तो लुब्धको वदत । राया ऐकावि मम मात ।
वली वर्द विक्रय करित । सुखी राहातो प्रसादे ॥५०॥
अहो हो ऐका महिपती । आम्ही दरिद्री मूढमती ।
आम्हा घरी वृषभ असति । आनिक नसति पृथ्वीत ॥५१॥
महा अमोल ममोहर । इंद्रादिका न कळे पार ।
म्या वर्णावे कोठवर । त्रैलोक्यसार वृषपति ॥५२॥

# प्रसंग छत्तीसावा

## श्री वीतरागाय नमः

नत्वाष्टादशभिदोर्षैर्निर्मुक्त जिननायकं ।
वशिष्ठतापस्योच्चैश्चरित्रं रचयाम्यह ॥१॥

टीका–मथुरा नगरी विख्यात । उग्रसेन राजा पुण्यवत ।
षड्गुण भार्या गुणवंत । प्रीतीवत रेवती राज्ञी ॥२॥

जिनदत्त श्रेष्ठी त्या नगरी । जिनपदी भ्रमरापरी ।
संतत सपत पूर्ण घरी । तदासी मंदीरी प्रियगा ॥३॥

नदी यमुना एके दिवशी । वशिष्ठ मुनी आले तापसी ।
स्नानानतरे तडागासी । पचाग्नीसी साधताती ॥४॥

जग मूढ त्रय जे जन । लघु प्रौढ मेळा अज्ञान ।
तयाचि भावभक्ती करोन । प्रशंसावचन करिताती ॥५॥

कोन्ही करिताती पूजन । कित्येक करिताती नमन ।
त्यासी करिती प्रदक्षण । षड्रस पक्वान्न ठेविताती ॥६॥

जिनदत्त श्रेष्ठीची दासी । प्रियंगु नामे गुणराशी ।
सखीसहित तडागासी । कुतपस्वी देखिला तियेन ॥७॥

सर्व करिती नमस्कार । न नमि ते प्रियंगा नार ।
सर्वी मिळोन बळत्कार । चरनावर लोटले तीसी ॥८॥
श्रावक सगति करोन । तयासी ठावे सुकुज्ञान ।
म्हणे हा कुतपस्वी कुज्ञान । कुळहीन धीवरनाथ ॥९॥
यासी नमन न करावे । याचे साधन पाप अवघे ।
पुण्यपाप काशा म्हणावे । नसेचि ठावे पापिष्ठाशी ॥१०॥
ते ऐकोन सर्व हासती । ते पाहोनी तापसचित्ती ।
हृदयी कोधाची उत्पत्ती । सन्यसयुक्ती न जानेचि ॥११॥
राजसभेसी जावोनिया । मम फिर्याद ऐक राया ।
जिनदत्त श्रेष्ठीची जाया । आम्हास वाया जलपती ते ॥१२॥
आम्ही सन्यासी गोसावी । अतीतासी कलक लावी ।
तुम्ही तियची खबर घ्यावी । शिक्षा करावी क्षितिपति ॥१३॥
ते रायाने सर्व ऐकिले । जिनदत्तासी पाचारिले ।
दासीसहित येते झाले । नमस्कारिले राया सर्व ॥१४॥
राजा वदे हो श्रावक । तुमची भानोसीनी ऐका ।
सन्याशामी धीवरनायक । शब्दकलक लावि त्यासी ॥१५॥
श्रेष्ठी म्हणे प्रियंगा मति । सत्य वदावे निर्भयचित्ती ।
सभाधीट ते जनमति । राजीयाप्रति वदतसे ॥१६॥
अहो तात ऐकावे सत्य । देवा तापसाचे प्रमित ।
वश करावे पचेन्द्रियात । षड्रिपु जिकावे हो ॥१७॥
साहा गोविल तो गोसावी । साहा नाशी सन्याशी म्हणवी ।
पचेन्द्रियाची मन गोवी । सुतपे तपवि काया हे वो ॥१८॥
तैसा नोव्हे हा धीवर । मया दृष्ट्वा गगातीर ।
मत्स्याचा करीतो आहार । दया अतर नाही याचे ॥१९॥

लुब्धक प्रसंसा करित । वृषभ घ्या म्हणे रायात ।
राजा म्हणे दावि ह्याते । पाहु तयात कैसा ग्राहे ॥५३॥
तेव्हा त्या लुब्धकरायासी । घेवोनि गेला स्वगृहासी ।
आदरमान बहु त्यासी । लोभ मानसी द्रव्याचा ॥५४॥
वृषभ दाविला तयान । सुवर्णाचा तो पीतवर्ण ।
हिरेजडित दिव्यमान । महायत्न निर्माण केला ॥५५॥
साहेब हे अमोल वस्तु । तुम्हा घरी असावी वस्तु ।
द्रव्य द्यावे आम्हा त्वरितु । लोभ मनात द्रव्याचा ॥५६॥
राजा समजला अतरी । द्रव्यलोभी हे महादरिद्री ।
तव तयाचिच स्वस्त्री । ज्ञानचतुर स्त्री षड्गुणी ॥५७॥
रत्न भरोनिया तबक । त्वरे आनी राया सन्मुख ।
ते पाहुनि या लुब्धक । फण अंगोळिक सवज्ञानं ॥५८॥
तबक दिधले श्रेष्टीपासी । नजर करावी धन्यासी ।
ह्यदय स्फोट झाला त्यासी । धनलोभासी न देववे ॥५९॥
देव धर्म कधी करीना । गुरुशास्त्र काही जानेना ।
धन लोभ्याच्या पाहे खुणा । भूपती मनी कटाळले ॥६०॥
दुष्ट नष्ट हा अपवित्र । तयाचे पाहोनी चरीत्र ।
मुख न पाहावे याचे नेत्र । वेगे वगत्र गृहागता तो ॥६१॥
या नतर कितीक दिनि । लुब्धदत्त विचारि मनी ।
द्रव्याचा लोभ धरोनी मनी । वृषभ घेवोनी सुवर्णाचा ॥६२॥
चालला तो सिंहलद्वीपासी । विक्रीत केला वृषभासी ।
कोटी सुवर्ण धनासी । महाकष्टेसी मेळवीले ॥६३॥
व्यापारी भरोनिया तेन । जहाजी बैसला तो जैन ।
चालले वायोच्या सुतान । मनात म्हणे मेळऊ द्रव्य ॥६४॥

द्रव्यलोभ धरील मनी । भाग्य फुटले तत्क्षणी ।
मृत्य जाला आर्तध्यानी । तिर्यंच योनि सर्प झाला ॥६५॥
धनापासी गृही बैसला । द्रव्य घेउ नेदि पुत्राला ।
जेष्ठपुत्र क्रोधावला । मारोनि टाकला सर्प तो ॥६६॥
तदा तो चतुर्थं नरकात । भोग भोगी दु.खाचे पर्वत ।
आयुष्याती तिर्यंचात । पुन. नरकात पापयोग ॥६७॥
एवं धर्मविना प्राणी । भोगिति चौऱ्यासि लक्षयोनी ।
ऐसे जाणोनिया प्राणी । सुपुण्य करणी करावि वो ॥६८॥
सुदेव सुगुरू सुशास्त्र । सुपुण्य सुबुधी सुमंत्र।
सुशब्द बोलावा वगत्र । सुधर्म सूत्र दश लक्षण ॥६९॥
त्रेपन क्रिया सोळा कारण । जीवासी हे मोक्षकारण ।
जिनधर्म तरण तारण । पुण्यावाचोन सापडेना ॥७०॥
एव धर्मविना जंतुसी । नाना लोभे वचित त्यासी ।
पापास्तव होय तयासी । सेवटी त्यासी दु.खसागर ॥७१॥
श्लोक : ज्ञात्वेच्छ भवकोटिदु:खजनकं दु.क्रोधलोभादिकं ।
त्यक्त्वा दूरतर विशुद्धमनसा त्रेधा सदा चेतसि ॥७२॥
श्रीमत्सारजिनेन्द्रदेवगदित धर्मं सुशर्मप्रद ।
शक्त्या भक्तिभरेण शांतिनिलय सतोपजतुश्रियः ॥७३॥

इति कथाकोशे लुब्धश्रेष्टि कथा ॥१॥ पिण्याकगंध कथा ॥४२॥ प्रसंग उत्तरार्ध गुरुरत्नचंद्रकीर्तिविरचिते ॥ प्रसंग ॥३५॥

## प्रसंग छत्तीसावा

### श्री वीतरागाय नमः

नत्त्वाष्टादशभिदोषैर्निर्मुक्त जिननायकं ।
वशिष्ठतापस्योच्चैश्चरित्र रचयाम्यह ॥१॥

टीका–मथुरा नगरी विख्यात । उग्रसेन राजा पुण्यवत ।
षड्गुण भार्या गुणवत । प्रीतीवत रेवती राज्ञी ॥२॥

जिनदत्त श्रेष्ठी त्या नगरी । जिनपदी भ्रमरापरी ।
संतत सपत पूर्ण घरी । तदासी मदीरी प्रियगा ॥३॥

नदी यमुना एके दिवशी । वशिष्ठ मुनी आले तापसी ।
स्नानानतरे तडागासी । पंचाग्नीसी साधताती ॥४॥

जग मूढ त्रय जे जन । लघु प्रौढ मेळा अज्ञान ।
तयाचि भावभक्ती करोन । प्रशसावचन करिताती ॥५॥

कोन्ही करिताती पूजन । कित्येक करिताती नमन ।
त्यासी करिती प्रदक्षण । षड्रस पक्वान्न ठेविताती ॥६॥

जिनदत्त श्रेष्ठीची दासी । प्रियंगु नामे गुणराशी ।
सखीसहित तडागासी । कुतपस्वी देखिला तियेन ॥७॥

सर्व करिती नमस्कार । न नमि ते प्रियंगा नार ।
सर्वी मिळोन बळत्कार । चरनावर लोटले तीसी ।।८।।
श्रावक सगति करोन । तयासी ठावे सुकुज्ञान ।
म्हणे हा कुतपस्वी कुज्ञान । कुळहीन धीवरनाथ ।।९।।
यासी नमन न करावे । याचे साधन पाप अवघे ।
पुण्यपाप काशा म्हणावे । नसेचि ठावे पापिष्ठाशी ।।१०।।
ते ऐकोन सर्व हासती । ते पाहोनी तापसचित्ती ।
हृदयी कोधाची उत्पत्ती । सन्यसयुक्ती न जानेचि ।।११।।
राजसभेसी जावोनिया । मम फिर्याद ऐक राया ।
जिनदत्त श्रेष्ठीची जाया । आम्हास वाया जल्पती ते ।।१२।।
आम्ही सन्यासी गोसावी । अतीतासी कलक लावी ।
तुम्ही तियची खबर घ्यावी । शिक्षा करावी क्षितिपति ।।१३।।
ते रायाने सर्व ऐकिले । जिनदत्तासी पाचारिले ।
दासीसहित येते झाले । नमस्कारिले राया सर्व ।।१४।।
राजा वदे हो श्रावक । तुमची भानोसीनी ऐका ।
सन्याशामी धीवरनायक । शब्दकलक लावि त्यासी ।।१५।।
श्रेष्ठी म्हणे प्रियगा मति । सत्य वदावे निर्भयचित्ती ।
सभाधीट ते जनमति । राजीयाप्रति वदतसे ।।१६।।
अहो तात ऐकावे सत्य । देवा तापसाचे प्रमित ।
वश करावे पचेन्द्रियात । षड्रिपु जिकावे हो ।।१७।।
साहा गोविल तो गोसावी । साहा नाशी संन्याशी म्हणवी ।
पचेन्द्रियाची मन गोवी । सुतपे तपवि काया हे वो ।।१८।।
तैसा नोव्हे हा धीवर । मया दृष्ट्वा गगातीर ।
मत्स्याचा करीतो आहार । दया अतर नाही याचे ।।१९।।

तप्त ऐकोनिया तो तापस । क्रोधे बोले भानोसिनीस ।
आम्ही तपेसि चडौश । वायो आहारा करीतो गे ॥२०॥
आगे रंडे हं विप्रपुत्र । तू काय वदसी गे वगत्र ।
कोठे त्वा पाहिले गे नेत्रे । मम सूत्र पापिनी गे त्वा ॥२१॥
तेव्हा ते प्रियगा भानुसीनी । रायासी सागे निर्भयमती ।
धीवरकन्या नाव निशानी । पुत्र जननी गंगातीरे ॥२२॥
माता धीवर मत्स्य मारी । जिह्वालपट मांस आहारी ।
कुतपस्वी भ्रष्ट आतरी । पापाचारी मिथ्याती हिंसक ॥२३॥
जटा शीरि जीव उत्पन्न । क्रोधाग्नी जाने टानटोन ।
भूतप्रेताते आह्वानून । भुलती जन चमत्कारासी ॥२४॥
ज्याचा निश्चय धर्मावरी । भेति कुविद्या त्यासामोरी ।
तप करीती महा अघोरी । सुतप परि नाही राया ॥२५॥
परीक्षार्थं तो मुनीश्वर । फाडिता जाला तो जटाभार ।
जळमासुळी पडली म्होर । ते नजर सर्व पाहाती ॥२६॥
तापसाचा मानभग जाला । खाले पाहोन दूर गेला ।
गगायमुना सगमाला । गधवतीला पाहातसे ॥२७॥
तेथे पंचाग्नीसाधन । करीत बैसला अज्ञान ।
तत्समयी त्याच मार्गान । मुनीद्र सुज्ञान सुतपस्वी ॥२८॥
पचशत शिष्यासहित । जैनधर्मी ज्ञान सिद्धान्त ।
वीरभद्र महामहंत । पाहिले तयाते सर्वानी ॥२९॥
एक शिष्य म्हणे गुरूशी । अघोरतप करी ऋषी ।
येणे काय हो प्राप्त यासी । सांगा आम्हासी गुरूराया ॥३०॥
तेव्हा श्रीपूज्ये ऐकोनिया । अवधिज्ञाने पाहोनिया ।
बोलते झाले ऐक सखया । मिथ्याती यासी ज्ञान कैचे ॥३१॥

कायाकष्ट तप करीति । दयाहीन कुतप करिती ।
अशुभप्राप्ती श्वभ्रठाव । तयासी नाही शुभगती ॥३२॥
तदा क्रोधे बोले तयासी । आम्ही ज्ञानी महातपस्वी ।
अज्ञानी म्हणता आम्हासी । सागा ज्ञानासी तुमचिया ॥३३॥
आचार्य तयासी वदत । तुम्ही ज्ञानी सत्य यथार्थ ।
आता कोठे जाता प्रस्तुत । तव तो वदत कुतपस्वी ॥३४॥
तपबळे मी स्वर्गवासी । घेईन त्या इद्रपदासी ।
तव आचार्य म्हणती त्यासी । आत्मज्ञानासी जाणता तुम्ही ॥३५॥
ज्ञान दृष्टी तुम्हा कारण । काष्ठी सर्प होतो दहन ।
या तपाने नर्कभुवन । स्वर्ग पे न कैच पाप्यासी ॥३६॥
तेव्हा तो खिजला तापस । काष्ठ आपटीले भूमीस ।
सर्प जळता पडे भूमीस । देखिले त्यास सर्वांनी वो ॥३७॥
हा कष्ट त्व मूढ अज्ञानी । कुसाधन पाप पचाग्नी ।
अनत जीवहिंसा करोनी । नर्कभुवनी जन्म त्यासी ॥३८॥
ते पाहोन तापसचित्ती । म्हणे धन्य ज्ञानी हे जिनमती ।
यासी शरण जावोनी चित्ती । गर्वाची भ्राति सोडोनिया ॥३९॥
युगुळ पाणि जोडोनिया । शरणागता तारी सखया ।
कृपा करावी गुरूराया । धर्म जीवदया सागा स्वामी ॥४०॥
सुदेव सुगुरू सुशास्त्र । सुधर्म सुबुधी पवित्र ।
सुज्ञान सुतप पवित्र । धर्मसूत्र दशलक्षणी ॥४१॥
जैनधर्म सारासार । सर्व जीवदयेचा प्रकार ।
ऐकोन झाला दिगबर । वशिष्ठ मुनीद्र तपस्वी ॥४२॥
एकदा गोवर्धन पर्वती । वशिष्ठ कीर्ति मुनि यती ।
मथुरासमीप ध्यान धरिती । तप करिती मासोपमास ॥४३॥

तेव्हा सुविद्या सीधी देवता । साधुशी करी विनयता ।
तुम्हावरी अमुची ममता । कार्यसिद्धता करू तुमची ।।४४।।
ते ऐकोन लोभभावेन । काही पडेल प्रयोजन ।
तेव्हा तुम्ही साह्य होऊन । दासत्व करा कार्यसिद्धी ।।४५।।
त्या देवता गुणमडिता । स्वस्थानाशी गेल्या त्वरिता ।
मासोपवास झाला पूर्णता । भावरी करिता उद्योगी ।।४६।।
तयाचे भावरी कारण । श्रावका वर्जि उग्रसेन ।
मम गृही हो उद्या पारण । तुम्ही करणे सावकास ।।४७।।
तेव्हा ते वशिष्ठ गुरूराय । पारण्या चालले लवलाहे ।
पंचमुद्रा धरी हृदय । जतु पाहे ईर्यापथ ।।४८।।
तव रायाचा हस्ती सुटला । नग्रामाजी कोल्हाळ जाला ।
स्वामीसी अतराय पडला । परतोनी गेला गिरीवरी ।।४९।।
क्षुधाक्रात तो मुनीराय । उग्रसेना स्मरन नोव्हये ।
श्रावक म्हणती बरे नोह्ये । जाला अतराय गुरूसी ।।५०।।
दो महिन्याचा उपास जाला । स्वामी चालले भावरीला ।
उग्रसेनाच्या वाडयाला । आग्न चेतला समीप ।।५१।।
तृतीयमास पर्वतावरी । शुक्लध्यान धरीले भारी ।
कायोत्सर्ग ते शिळेवरी । जेवि गिरी अचेळ पै ।।५२।।
राज्यमद जे का भुलले । मगनमस्त अध जाले ।
देवगुरूशी विसरले । गमाविले पुण्यसचित ।।५३।।
विस्मृती झाली रायासी । तीन मास मुनी उपवासी ।
मुद्रा धरि दक्षिणभुजेशी । चाले भ्रामरिसी मदगति ।।५४।।
उग्रसेन मूढत्नय । भावरीची न जाने सोय ।
पुण्याविना मानवदेहे । सिद्धी न होय पुण्याची त्या ।।५५।।

चतुर्थ मासाची गणित । भावरी मंत्र जाला चलित ।
आगोळी सोडोनिया तेथ । द्वितीय गृहात न्याहाळी ॥५६॥
तिथे राज्य भय करीता । पाणि पाणि न धरी हस्ता ।
आतराय गुरूसी होता । तृतीयपंथासी चालले ॥५७॥
भ्रमण करिता नगरात । क्ष्वेदक्षीण जाहाले तेथ ।
रिक्तहस्त श्रावकात । पाहाता चतुर्थ अतराय ॥५८॥
एक आगोळी भुजेवरी । कमंडलुपिच्छी वाम करी ।
हिंडोनिया सर्व नगरी । पंचप्रकारी अतराय ॥५९॥
ग्रामातून बाहेर येती । मूर्च्छना येवोनी लोक जाती ।
धर्मवत गावातून येती । श्रावक करिती नमोस्तु ॥६०॥
एकमेका बोलती स्पष्ट । हा हा स्वामीशी महाकष्ट ।
राजा अज्ञानी महानष्ट । भावरी प्रष्ट आम्हा करू नेदी ॥६१॥
तेव्हा बोले वृद्ध श्रावक । गुरूराज ज्ञानदीपक ।
चारित्राब्धि मुनीनायक । पुण्यदायक भव्यजीव ॥६२॥
ऐसे मुनीराय ऐकोनी । हृदयी उसळला कोपाग्नी ।
गोवर्धनगिरी जावोनी । देवता आह्वानी समीप ॥६३॥
आम्ही सागतो ते करावे । उग्रसेनासी तुम्ही मारावे ।
देवता म्हणे हो गुरूदेव । सम्यक्त्वी राव जिनधर्मी ॥६४॥
मनी म्हणे देव्या ऐकावे । वचन त्वा खरे करावे ।
पुढील जन्मी साह्य व्हावे । वचन द्यावे सत्यभाक ॥६५॥
राया उग्रसेनासी त्याने । वैरबंध जाला निदान ।
क्रोधाने गमविले पुण्य । तपासी विघ्न क्रोध करिता ॥६६॥
शुक्लध्यानाचा आला समय । केवळज्ञान जेन होय ।
ते गमविले मुनीराये । पापउदय कुतपाचे ॥६७॥

मारोनी रेवतीचे उदरी । गर्भी उग्रसेन वैरी ।
पात्रजन्माचे वैरपरी । सावध अंतरी सम्यक्त्वीजन ||६८||
क्रोध लोभ मान माया । त्याग करा चतुष्कषाया ।
जीव मोक्षासी जावया । त्रिगुप्ती सखया पाळाव्या ||६९||
असो त्या रेवतीच्या उदरी । डोहळे होती नानापरी ।
राणी कृश जाली शरीरी । ककन कोपरी चालली ||७०||
रमण रमणी महाप्रीती । उग्रसेन म्हणे वो रेवती ।
तुमचे शरीर प्रकृती । दुर्बळ दिसती किंकारण ||७१||
लज्जायमान अधोमुख । हर्षवदने बोले कौतुक ।
मज न वदवे देहनायक । देहे कौतुक असो काही ||७२||
पुनरपि आग्रह करोनी । मज साग तू मनरजनी ।
काय इच्छा असेल मनी । नि शक होवोनी सागावे ||७३||
अहो हो स्वामी ऐका वचन । उदरी गर्भ झाला उत्पन्न ।
दुष्ट डोहाळे मज कारण । तुमचे हनन करावे ||७४||
अशुद्ध तुमचे प्रासावे । तुम्हासी बधन करावे ।
नष्ट ह्या गर्भाचे स्वभाव । मज न सागवे राया तुम्हासी ||७५||
तेव्हा त्या राय उग्रसेन । स्त्रियची प्रीती चित्ती धरोन ।
डोहाळा मी पूर्ण करीन । सावधमने असावे तुम्ही ||७६||
राय आपले चित्र केले । दाळिबीरसान भरियले ।
पलंगासमीप ठेवियले । राणीस उठविले सुद्रीहस्ते ||७७||
जागृत होवोनीया पाही । क्रोध उत्पन्न जाला देही ।
तया धरोनी लवलाही । हा कष्ट देही पापरूपात्मा ||७८||
ते पाहोनी दृष्टि रायाने । म्हणे हे दिसत महाविघ्न ।
कर्मरेखा विधातियाने । भोगल्यावाचोन न चुकेची ||७९||

असो जाहले नवमास । जन्मला कुपुत्र कुळनाश ।
जैसा वेळुत अग्नीप्रकाश । करी दहनास वृक्षकुळी ॥८०॥
असो राजा एके दिवसी । पुत्रमुख आला पाह्यासी ।
पाहता क्रोधदृष्टीसी । वळल्या मुष्टीशी पाहे राजा ॥८१॥
राय विचार करोनी । कास्यपेटारीत आणोनी ।
पुत्र पापी त्यात ठेवोनी । केली वेष्टनी रत्नकाबळा ॥८२॥
स्वनामपत्र ठेवि त्यात । मादुस सोडिला यमुनेत ।
तो चालला वाहत वाहत । कासी देशात कौशांबी नगरी ॥८३॥
तेथ कोतवालाची स्त्रिया । गेली उदक आनावया ।
कासमादुस पाहोनीया । घेवोनीया आली गृहासी ॥८४॥
पेटारी पाहे उघडोन । पुत्र देखिला तिन नयन ।
म्हने मला दिला गगेन । वांझपण फेडल माझे ॥८५॥
सांगोनिया भ्रतारासी । पुत्र जाला बहुदिवसी ।
शिरनी वाटा नगरासी । आनंदासी वाद्यगजरे ॥८६॥
बाळ कासपेटारीत । कंस नाम ठेविले त्यात ।
माता पिता खेळवीत । पुत्र वाढत दिन दिन ॥८७॥
यानतरे ऐकावी कथा । नमस्करोनी जिननाथा ।
जिनवाणी सरस्वती माता । वरदहस्ता कवित्वा देई ॥८८॥
बाळ दिन दिन वृद्धी करी । बीज चद्राचे परी ।
अष्टवरुषे जाल्यावरी । परपोर मारी क्रोधान ॥८९॥
नगरजन पिटाविला । महाक्रोधान कस गेला ।
सौरपुरी यादवा भेटला । स्थिर राहिला वसुदेवापासी ॥९०॥
तेथे करी विद्या अभ्यास । महाप्रतापी बलाढ्य दिसे ।
यानतरे कासी देश । नगरी असे कौशाबी ॥९१॥

तेथ सिंहरथ राव । महाबलाढ्य वैभव ।
जरासंधासी वैरभाव । अजिक्य सर्व जिकवेना ॥९२॥
जरासंध उपाय केला । कन्येचा विवाह मांडला ।
स्वयंवर मंडप दिधला । पाचारिला राज्यभार ॥९३॥
रायान पन केला तेथ । जो जिकील सिंहरथात ।
कन्या देईन मी तयात । देशग्रामात देईन ॥९४॥
ते ऐकोनि यादवराय । वसुदेव समुद्रविजय ।
ज्येष्ठबधुस करोनी विनय । केला समुदाय वसुदेव ॥९५॥
पोदनपुरीचे सर्व सैन्य । सामंतभद्र सर्व मिळोन ।
चतुरग सेना घेवोन । सिंहरथ ग्राम उद्यान वनी ॥९६॥
सग्राम जाला उभयतासी । सिंहरथ जिंकिले सैन्यासी ।
ते पाहोनी वसुदेवासी । क्रोध मानसी वीरश्रिय ॥९७॥
सारथी बोलाविला कंस । पाचारिले सिंहरथास ।
बाण लावोनिया सीतास । रणागणास उभे ठेले ॥९८॥
बाण बाणाशी ते जुळती । रथ रथासी पाचारीती ।
घोरांदर युद्धे भीडती । नाटोपती एकमेका ॥९९॥
महाबलाढ्य कसवीर । वसुदेव रणरगधीर ।
सिंहरथ जिंकिला वीर । कस सामोर धाविन्नला ॥१००॥
धरिला तो जरासध वैरी । बंधहास्त तत् रथावरी ।
येवोनी वसुदेवासामोरी । नमस्कार करी कसवीरा ॥१०१॥
सैन्यात जाला जैजैकार । शत्रु जिंकिला यादववीर ।
जरासंधा संतोष फार । विजयी थोरे मम कन्या ॥१०२॥
मंडपात सर्वही मिळाले । जरासध तेथे अवलोकिले ।
वसुदेवासी त्यान पाहिले । बोलते जाले बधाजुळी ॥१०३॥

मम कन्या अंगीकार करा । चालवावे ह्या राज्यभारा ।
वसुदेव विचारी अंतरा । नवरी नोवरा घटित नाही ॥१०४॥
यादव म्हणे ऐका वचन । वैरी जितिला यादवान ।
कसवीर महा वलवान । आनिला बाधोन रथावरी ॥१०५॥
वचन प्रमाण करा आता । कंसवीर महा ज्ञाता ।
कन्या द्यावी तुम्ही त्वरिता । केला भर्ता जीवजसेसी ॥१०६॥
घोर समुदाय मिळाला । स्वयवरा मंडप दिधला ।
कन्या देवोनी कुळाला । विचारी त्याला राजिंद्र तो ॥१०७॥
अहो हो महावीर कंस । सागा तुमचा कोन वंस ।
माता पिता ग्राम वास । सत्य आम्हास सागावे ॥१०८॥
कंस ह्मणे माझी माय । कौसंबी नगरामध्ये आहे ।
प्रधान पाठविले लवलाहे । कोटपाल स्त्रिय पुसती ॥१०९॥
कस पुत्र तुझा सत्य । हे सागावे यथातथ्य ।
ते होवोनी भयाभीत । कास मादुसात दाखवी ॥११०॥
पेटारी पाहे तो प्रधान । नाममुद्रा देखिली त्यान ।
उग्रसेन पुत्र पुण्यवान । विख्यात जैन राज्यकुळी ॥१११॥
तेव्हा ते घेवोनी पेटारी । घेवोन आले राजमदिरी ।
उग्रसेन सभेभीतरी । नमन करी प्रधान त्या ॥११२॥
कासमंजूस पाहोनिया । रत्नकाबळा उघडोनिया ।
नाममुद्रिका घेवोनिया । पाहिले तया पत्रिकेसी ॥११३॥
मथुरे राजा उग्रसेन । तत् मुद्रिका पुत्र सगुण ।
जरासध संतोष मन । पाणिग्रहण महोत्साव ॥११४॥
विवाहविधि पचदिवस । अन्नदान सुपात्रास ।
यति अर्जिका श्रावकास । याचकास यथाविधि ॥११५॥

जीवंजसा कंस परनिली । दासदासी आदन दिली ।
आळिकारादि वस्त्र केली । ग्राम दिधली देशादिक ॥११६॥
चतुरग सेना घेवोन । ग्राम देश पाहे चक्षुन ।
पूर्व वैर संवधे करून । मथुरा उद्यान उतरले ॥११७॥
उग्रसेन भेटीस वाहिला । न येता संग्रामासी आला ।
तेथे सग्राम फार जाला । जिवंत धरिला उग्रसेन ॥११८॥
महा कष्ट स्वत' पुत्र । उदरी जन्मोनी साधि वैर ।
कुळाचा करीतो सहार । जगी कुपुत्र पूर्ववैरी ॥११९॥
सप्त दरवाजाचे वरे । पितृ बंधखान्यात त्वरे ।
चतुर्दिशी चौकी प्रहरे । सुभट शूर नग्नशस्त्री ॥१२०॥
लोह्याचा पिजरा करोनीया । ठाव नसे त्यात फिराया ।
काजि कण्या त्या खाया पिया । एके ठाया एकेचि वेळे ॥१२१॥
राज्य करी मथुरेचे । राजे भेटी येति देशाचे ।
क्रोधनेत्र पाहोनिया त्याचे । लोक ग्रामीचे भयाभीत ॥१२२॥
तदा कसाचा लघुभ्राता । अतिमुक्ती महान् ज्ञाता ।
विपरीत पाहोनी भयाभीता । गेला वनातौत दीक्षा ग्रहे ॥१२३॥
तत् सद्भक्ती कसरायान । मुनीसी नमोस्तु विधीन ।
प्रार्थना करी विनयान । समीप राहोन गुरूवर्या ॥१२४॥
राजा घातला बधखानि । महादु:खी रेवती राणी ।
रयित प्रजा सर्व मिळोनी । अत.करणी दु:खी समस्त ॥१२५॥
असो दुसरे कथातर । अमृतकावत्या ग्राम सुदर ।
देवक राजा महाचतुर । राणी मनोहर धनदेवी ॥१२६॥
कन्या जन्मली देवकी बाळा । पचवरुपाची वेल्हाळा ।
पूर्ववैरी हारिली बाळा । मथुरा जवळ वनवासी ॥१२७॥

त्या कन्येचे पूर्वसुकृत । मुनिराय होते त्या वनात ।
उग्रसेन गेले दर्शनात । पचाग नमोस्तु भावयुक्त ।
कन्या तेथे अवलोकिली ॥१२८॥

पृच्छा केली मुनिराया । भवातर सागीतल तया ।
इथे पालन करी सखया । जीवाची दया युक्तीसार ॥१२९॥

गृहास आला घेवोनी । ते पाहिली कसनयनी ।
उपवर देखिली गजगामिनी । विचारी मनी लग्न करू ॥१३०॥

कुरूवसी कन्या होय । यादवासी द्यावी निश्चय ।
विनवुनी वसुदेवराय । केला महोत्सव यथाविधी ॥१३१॥

लग्न झाले कित्येका दिनी । पुष्पवती झाली कामिनी ।
जीवजसा रायभामिनी । उछाहजनी विधीयुक्त ॥१३२॥

तत्समयी अतिमुक्ती । भाव आहारा गृहा येती ।
दीर म्हणोन विनोदती । हासोनी बोलली जीवजसा ॥१३३॥

तुमची भगिनी पुत्रवती । तुम्ही कैसे जाला यती ।
तुम्हा न कळे ससारयुक्ती । सतत सपत कैचि तुम्हा ॥१३४॥

हास्य चेष्टा करी मुनीसी । अतराय जाला भावरीसी ।
हे पापिनी काय वदसी । न जानसी तू पापपुण्य ॥१३५॥

देवकीपुत्र उत्पन्न । तो करील कसाच हनन ।
ऐकोन जाली क्रोधाग्न । दाखवी नैन रक्तवस्त्र ॥१३६॥

ते चुरले दोही करे । यति म्हणे होईल सहार ।
तव तीन फाडिल चीर । हास्याचा नीकुर जाहला ॥१३७॥

द्विधा केल त्वा वस्त्रासी । तेचि गती तव पित्यासी ।
असे ऐकताचि मानसी । गेली गृहासी अधोदृष्टी ॥१३८॥

मदिरी आला कंसराय । अश्रुनयन का गे स्त्रिय ।
पृच्छा करितो सांग काय । मम हृदय तव प्रीती ॥१३९॥
अतिमुक्ती मुनिवचन । सर्व केले निरोपन ।
ऐकता रायाचे अंतःकरण । भयभीत मन जाहला ॥१४०॥
म्हणे स्वामिवचन सत्य । का गे छेडिले त्वा तयात ।
विचार करोनी मनात । उपाय त्यात करीन मी पै ॥१४१॥
देहे लोभ धरोनी प्राणी । कूड कपट कधी मनी ।
यादवापासी जावोनी । वसुदेव धनी विनविला ॥१४२॥
स्वामी मी तुमचा अंकिला । तुमचा उपकार मजला ।
तो न जायचि फिटला । ऐकावे बोला माझिया ॥१४३॥
मम भगिनी रूपवत । तुम्हा दिली वचन सत्य ।
यादवे मान्य केले समस्त । केला विधियुक्त विवाह ॥१४४॥
कित्येक दिवसाउपरी । देवकी पुष्पवती मदिरी ।
कंस मोहोछाय करी । यादवा पाचारी समुदाये ॥१४५॥
फळशोभन यथायुक्त । वस्त्रभूषण भावयुक्त ।
अवघे गेले स्वस्थळात । वसुदेवात विनविले ॥१४६॥
तुम्ही येथेचि राहणे । मम मनोरथ पूर्ण करणे ।
मनात कपट धरोन । केले रक्षण वसुदेवा ॥१४७॥
यादवाचे सरळचित्त । देवगुरूसी वदना नित्य ।
कस कपट जाले श्रुत । गेले वनात स्वामीपासी ॥१४८॥
त्रय प्रदक्षिणा देवोन । पचाग नमोस्तु त्रिकरण ।
उभयता कर जोडोन । केले श्रवण धर्मशास्त्र ॥१४९॥
वसुदेव कर जोडोन । पृच्छा करी स्वामीकारण ।
ममोदरी पुत्र उत्पन्न । कसहनन जरासधा ॥१५०॥

देवकी म्हणे अहो मुनी । स्वप्न देखिल म्या रयनी ।
आम्रशाखा करी धरोनी । फळ नयनी देखिली अष्ट ।।१५१।।
जुग्म फळ देखिली त्रय । एक पाहिले आकाशात ।
अष्टम फळे पक्व होय । वरत जाय मागुति ते ।।१५२।।
ऐसे देखिले स्वामि नयनी । ते सागावे कृपा करोनी ।
ऐक भो वसुदेव ज्ञानी । भव्य शिरोमणी वसुदेव ।।१५३।।
मोक्षगामी सहा पुत्र । सशय नसे वो तिळमात्र ।
सातवा जो जलदनेत्र । पुण्यपवित्र नारायण ।।१५४।।
तोही उर्ध्वगामी जीव । आठवा जो बळरामदेव ।
मोक्षासी ज्ञानवैभव । याचि भवे मुडकेवळी ।।१५५।।
ते ऐकोनिया मुनीयुक्त । परमानद हृदयात ।
विचार करी स्वमनात । गुरूवचन सत्य सत्यची ।।१५६।।
नमोस्तु केला मुनिराया । संतोषे गेली आपुले ठाया ।
देवधर्म गुरू पूजाया । विश्वास हृदया सुखोत्फळ ।।१५७।।
एकदा सती देवकीबाळा । गर्भ उत्पन्न सुकुमाळा ।
नेक सोहाळा पूर्ण डोहाळा । पुत्रयुगुळा जन्मरात्री ।।१५८।।
तया क्षणी पुण्ययोगेन । देवताद्वय स्वर्गीहून ।
बाळक दोन्ही करे घेवोन । चालले त्वरेन पुण्य ठाया ।।१५९।।
भद्रिलाख्यपुरी नगर । तेथे श्रेष्ठी श्री श्रुतसागर ।
आळकाख्या प्रिया सुदर । मृतपुत्र युगुळोत्पत्ती ।।१६०।।
देवकीपुत्र तेथे ठेविले । मृत बाळक घेवोनि आले ।
देवकीपुढे निजविले । गुप्तची गेले स्वर्गासी ।।१६१।।
आहो हो पुण्याचे कारण । स्वर्गीचे देव करिती रक्षण ।
तस्मात् प्राणी पुण्य आचरण । सौख्य उत्पन्न जैनधर्मी ।।१६२।।

चेपून टाकी नासिकासी । विद्रूप केले ते बाळेसी ।
दुःख जाल देवकीमातेसी । समजावी कन्येसी तेधवा ॥१८७॥
गोकुळी वाढे कृष्णनाथ । बाळक्रीडा खेळ खेळत ।
येरीकडे मथुरा नगरात । उल्कापात होत दिवसा ॥१८८॥
तदा पाचारिला सकुनी । विपरीत कायद्या सांगोनी ।
वैरी वाढे गोकुळभुवनी । तुमची हानी दिसताहे ॥१९८॥
ते ऐकता कंसरायान । तया जाल जातिस्मरण ।
पूर्वभवी देवता प्रसन्न । केले आह्वान त्या देवताचे ॥१९०॥
त्या येवोन त्वरित तेथ । कसराव सागे तयात ।
वैरी वाढतो गोकुळात । वधावे त्यात प्रयत्नान ॥१९१॥
तत् श्रुत्वा देवता कर्णं । पूतना वेश धरिला तीन ।
विषदुग्ध भरोन थन । केले प्रयाण गोकुळासी ॥१९२॥
यशोदापुत्र वासुदेव । प्रथम देवता करी माव ।
पूतना सोखिली कृष्णदेव । पळाली भय धरोनिया ॥१९३॥
द्वितीया देवी कागासुर । पक्ष लुचिता पळाली दूर ।
विमळार्जुवि वदे क्रूर । उखळ प्रहर पळविले ॥१९४॥
तुर्यं देवी विद्यानिर्जिता । शकटवेषधारी क्रूरता ।
लत्ताप्रहार गाडा मोडिता । होवोनी लज्जित पळाली ॥१९५॥
पचमी देवी माबळभट । पीढे दान जाहाला कूट ।
श्रेष्ठी अश्वदेवता नीट । पीटिता कष्ट पळाली ते ॥१९६॥
मेघविद्या देवी तनय । मुसळधारा सप्तदिन ।
गोवर्धन धरिला त्यान । लज्जायमान सप्तमी ते ॥१९७॥
काळिया नाग आठवी देवता । यमुना डोही हारि हंता ।
मुरलीधर जयवता । कंसासी वार्ता समजली ते ॥१९८॥

कंस करी नेक उपाय । तत. चाणूरमल्लादि द्वय ।
सुभट आदि वसुदेवराय । केला क्षय सर्वांचाही हो ।।१९९।।
उग्रसेन राज्यी स्थापोनी । जरासंध तो रणागणी ।
चतुरग सैन्य आठ अक्षोहिणी । हिंसा वदनी न वदावी ।।२००।।
जरासंध रणी जिंतिला । द्विधा करोनी टाकिला ।
हरिवशी जय पावला । नवम झाला नारायण ।।२०१।।
आयुधशाळेसी निर्माण । आपरसा जाली ते उत्पन्न ।
नागसेनादि सप्तरत्न । नारायण तो अर्द्धचक्री ।।२०२।।
आर्यखड ते वश केले । म्लेछखड द्वय जिंतिले ।
त्रिखडाधीश पद पावले । राज्य भोगिले द्वारकेचे ।।२०३।।
श्रीमन्महापुराणे कथा । विस्तार बहुत जानावे श्रोता ।
तीर्थंकर वाणी सत्यर्था । धर्मशास्त्रार्थ विचक्षणै ।।२०४।।
श्लोक–इत्युच्चै बहुराग–रोष–वशत:, के के न नष्टा. स्वयं ।
लोके धर्मपरामुखा जडधियो, दुष्कर्मजालाश्रिता· ।
ज्ञात्वेव बुधसत्तमै शुचितमैर्धर्मो जिनेंद्रोदित. ।
संसेव्यो भव–सिंधु–तारण–पर:, स्वर्गापवर्गप्रद ।।२०५।।

**इति कथाकोशे–वशिष्ट मुनी कथा–गुरू रत्नचंद्रकीर्ति विरचिते कृष्णजन्मवर्णनो नाम प्रसंग ।।३६।। कथा ४४ संपूर्ण–शुभं भवतु ।।जै । जै । छ छ छ छ।।**

● ● ●

सुपुण्य सुदेव पूजन । सुगुरू सुशास्त्र करा श्रवण ।
सुपात्रासी द्या तुर्यदान । पाप न करन जानोनिया ॥१६३॥
पापी कसासी श्रुत जाहाले । बाळ शीळेसी व्राहाटिले ।
धिग् नरदेहासी आले । पापी ते गेले कुगतिसी ॥१६४॥
एवं देवकी षट्पुत्र । त्रयवेळा जुग्म पवित्र ।
स्वर्गवासी जे व्यंतरेंद्र । पुण्यसूत्र रक्षिती तयासी ॥१६५॥
भद्रिलाख्यपुरग्रामी । पट्पुत्र ते ज्ञान आगमी ।
चेर मागधारि सुखधामी । देवकी सुखी स्वे आश्रमी पैं ॥१६६॥
एके दिवसी पुण्यप्रसग । सप्तमास गर्भ प्रयोग ।
अष्टमी रोहणी शुभयोग । निशि प्रसग माध्याह्नवेळा ॥१६७॥
कृष्णजन्म मथुरेसी जाला । शत्रुविध्वंस रवि उदेला ।
नववा नारायण उपजला । अर्धचक्री जाला त्रिखडपती ॥१६८॥
दुष्टाचे करील तो दडन । साधुसताचे प्रतिपाळन ।
मात पिता आणि उग्रसेन । राजि स्थापोन यशस्वी होईल ॥१६९॥
तेव्हा रात्राध ते माध्याह्नी । तुषार गगनीहूनी ।
वसुदेवे पुत्र मुखनयनी । हृदयभुवनी सतोष जाला ॥१७०॥
तत् रक्षण करावयासी । पाचारिले बळिभद्रासी ।
छत्र धरिले बाळकाशीरी । गोकुळवासी गमनमार्ग ॥१७१॥
बाळक घेवोनिया पोटसी । दोघे निघाले तमनिसी ।
मार्ग न दिसेच तयासी । विचार मानसी करिताती ॥१७२॥
तेव्हा पूर्वपुण्य योगेन । देवता आलासे धावोन ।
शीघ्र वृषभरूप धरोन । दीपिका दोन शृगाच्या ॥१७३॥
त्याचे वैक्रियिक शरीर । प्रकाश करीत चाले म्होर ।
नगर कपाट कुलूप दृढतर । कैसे बाहेर जावे आता ॥१७४॥

वासुदेवाचे पदागुष्ट । लाविता उघडली कपाट ।
यमुना नदी भरोनी पाट । दिधली वाट पूर्वपुण्य ॥१७५॥
गोकुळाबाहेर यक्षदेवी । घुमारि तेथे असे लाघवी ।
नद यशोदा पुत्र भावी । भाक द्यावि देवता माय ॥१७६॥
पुत्र होईल जे तुजसी । अनुक्रमे कन्या जालि तिसी ।
क्रोधे बोलाविले धवासी । देवतेपासी कन्या टाका ॥१७७॥
नद आला कन्या घेवोन । देवतेसी बोले क्रोधान ।
पुत्र नाही मज कारण । तुझे वचन असत्य जाले ॥१७८॥
वसुदेव मनी समजला । पुत्र देवीपुढे ठेवला ।
कन्या घेवोनी निघता जाला । तव बोलला घुमारी तो ॥१७९॥
पुत्र घेई नद गोवळा । देइ देइ यशोदे बाळा ।
पुत्र पाहोनी नेत्रयुगुळा । हृदयकमळा संतुष्ट ॥१८०॥
त्वरा येवोनिया गृहासी । पुत्र दिधला यशोदेसी ।
येरीकडे मथुरेवासी । वसुदेव गृहासी स्वस्थ ॥१८१॥
रक्षपाळ जाले जागृत । कंसासी जानविती मात ।
पापी धावला तो त्वरित । सप्तम बाळा घातावया ॥१८२॥
देवकी वदे करुण वचन । एक राहू दे माय वहीण ।
नको रे वधू कन्यारत्न । पाप दारुण बधुराया ॥१८३॥
बापा मी पसरिते पदर । जीवदान देइ रे सहोदर ।
विनवीतसे जोडोनी कर । पदी नमस्कार करीते मी ॥१८४॥
दुष्टबुद्धी पापी निर्दय । कन्या ही रति लीहस्तद्वय ।
वदन पाहे कंसराय । सुदरतनये रूपवती ॥ १८५ ॥
कसान मनी विचारील । ईसी भ्रतार जो होईल ।
तोच माझ वैर साधील । कोन्ही न वरील तैस करू ॥१८६॥

चेपून टाकी नासिकासी । विद्रूप केले ते बाळेसी ।
दुःख जाल देवकीमातेसी । समजावी कन्येसी तेधवा ॥१८७॥
गोकुळी वाढे कृष्णनाथ । बाळक्रीडा खेळ खेळत ।
येरीकडे मथुरा नगरात । उल्कापात होत दिवसा ॥१८८॥
तदा पाचारिला सकुनी । विपरीत कायद्या सागोनी ।
वैरी वाढे गोकुळभुवनी । तुमची हानी दिसताहे ॥१९८॥
ते ऐकता कंसरायान । तया जाल जातिस्मरण ।
पूर्वभवी देवता प्रसन्न । केले आह्वान त्या देवताचे ॥१९०॥
त्या येवोन त्वरित तेथ । कसराव सागे तयात ।
वैरी वाढतो गोकुळात । वधावे त्यात प्रयत्नान ॥१९१॥
तत् श्रृत्वा देवता कर्ण । पूतना वेश धरिला तीन ।
विषदुग्ध भरोन थन । केले प्रयाण गोकुळासी ॥१९२॥
यशोदापुत्र वासुदेव । प्रथम देवता करी माव ।
पूतना सोखिली कृष्णदेव । पळाली भय धरोनिया ॥१९३॥
द्वितीया देवी कागासुर । पक्ष लुचिता पळाली दूर ।
विमळार्जुवि वदे क्रूर । उखळ प्रहर पळविले ॥१९४॥
तुर्य देवी विद्यानिर्जिता । शकटवेषधारी क्रूरता ।
लत्ताप्रहार गाडा मोडिता । होवोनी लज्जित पळाली ॥१९५॥
पचमी देवी मावळभट । पीढे दान जाहाला कूट ।
श्रेष्ठी अश्वदेवता नीट । पीटिता कष्ट पळाली ते ॥१९६॥
मेघविद्या देवी तनय । मुसळधारा सप्तदिन ।
गोवर्धन धरिला त्यान । लज्जायमान सप्तमी ते ॥१९७॥
काळिया नाग आठवी देवता । यमुना डोही हारि हंता ।
मुरलीधर जयवंता । कंसासी वार्ता समजली ते ॥१९८॥

कंस करी नेक उपाय । तत. चाणूरमल्लादि द्वय ।
सुभट आदि वसुदेवराय । केला क्षय सर्वांचाही हो ॥१९९॥
उग्रसेन राज्यी स्थापोनी । जरासंध तो रणागणी ।
चतुरंग सैन्य आठ अक्षोहिणी । हिंसा वदनी न वदावी ॥२००॥
जरासध रणी जिंतिला । द्विधा करोनी टाकिला ।
हरिवशी जय पावला । नवम झाला नारायण ॥२०१॥
आयुधशाळेसी निर्माण । आपरसा जाली ते उत्पन्न ।
नागसेनादि सप्तरत्न । नारायण तो अर्द्धचक्री ॥२०२॥
आर्यंखड ते वश केले । म्लेछखड द्वय जिंतिले ।
त्रिखडाधीश पद पावले । राज्य भोगिले द्वारकेचे ॥२०३॥
श्रीमन्महापुराणे कथा । विस्तार बहुत जानावे श्रोता ।
तीर्थंकर वाणी सत्यर्था । धर्मशास्त्रार्थ विचक्षणै ॥२०४॥
श्लोक–इत्युच्चै बहुराग–रोष–वशतः, के के न नष्टाः स्वयं ।
लोके धर्मपरामुखा जडधियो, दुष्कर्मजालाश्रिता. ।
ज्ञात्वेव बुधसत्तमै शुचितमैर्धर्मो जिनेद्रोदित· ।
ससेव्यो भव–सिंधु–तारण–परः, स्वर्गापवर्गप्रद ॥२०५॥

**इति कथाकोशे–वशिष्ट मुनी कथा–गुरू रत्नचंद्रकीर्ति विरचिते कृष्णजन्मवर्णनो नाम प्रसंग ॥३६॥ कथा ४४ संपूर्ण–शुभं भवतु ॥जै । जै । छ छ छ छ॥**

• • •

# प्रसंग सदतीसावा

## श्री वीतरागाय नमः

यस्य ज्ञान जगद्‌बंधोर्लोकालोकप्रकाशक ।
श्रेयसे त जिनं नत्वा वक्षे मानकथानक ॥१॥
मागध देश तो विख्यात । लक्ष्मीग्राम ते शोभिवत ।
सोमदेव द्विज तो नादत । रूपवत लक्ष्मी स्त्रिया ॥२॥
रूप मद आणि तारुण्य । यौवन मद गर्व मान ।
लक्ष्मी मद उन्मत्तपन । सदा दर्पण मुखात पाहे ॥३॥
एकदा सोमदेव विप्र । जैनधर्मी हो पवित्र ।
पक्षमासोपवास मुनींद्र । पाहिले नेत्र द्विजवरे ॥४॥
समाधीगुप्त मुनीराय । त्रिगुप्त धी आचार्य ।
क्षमादिशाति धीर वीर । आहारकार्य ईर्यापथ ॥५॥
मध्याह्न ऋषि भोजनार्थ । औट हस्त भूमी शोधीत ।
येते जाले ते नगरात । पाहिले अवचित सोमान ॥६॥
मुनी रत्नत्रय धीर । त्रिगुप्ती आचार्य दिगबर ।
दर्शन पाप जाय दूर । नमोस्तु त्रिवार तिष्ठ तिष्ठ ॥७॥
पढगाविले ज्ञान मुनि । बैसविले ते उचस्थानी ।
रमण म्हणे ऐक रमणी । आहारदानी पुण्य जोडा ॥८॥
ऐसे सागोनि स्नानासी गेला । मान गर्व त्या ब्राम्हणीला ।
दर्पण घेवोन पाहे मुखाला । गुरू देखिला सन्मुख पै ॥९॥

पाहोनचि कुत्छा करि मनी । म्हणे कुत्छळ नग्न मुनी ।
काय आले गृह आगनी । मुखवचनी निंदनीक ॥१०॥
दोन्ही कपाट लाऊन । स्वामिसी बोले अनिष्ट वचन ।
तारुण्यमद ते पापीन । केला तियन अंतराये ॥११॥
मुनीराज तो जगद्वंद्य । रत्नत्रयचारित्र शुद्ध ।
वना जात्रोन ज्ञान भेद । द्वादश भेद तपश्चरण ॥१२॥
तत्पापास्तव ते नरकासी । जाईल सातवे भूमीसी ।
सध्या कुष्ट व्यापला तीसी । दुर्गंधासी ते पापीन वो ॥१३॥
ते जन्मली रजक योनि । जन्मताचि गेली मरोनि ।
तिर्यंच गर्दभीचे योनि । पापखानि ते मृत्यु पावे ॥१४॥
शूकरी जन्म जन्म पावोनिया । जन्मताचि ते गेलि वाया ।
कुर्कुरी क्रूर जन्मोनिया । पुनरपि तया जन्म तोचि ॥१५॥
एकदा कुर्कुरी अग्नीत । दग्ध जाली ते पापकृत्य ।
भोग सरला तिर्यंचात । राहला किंचित् पापभोग ॥१६॥
ते भृगुकच्छाख्य नगरी । नर्मदा नदीचे तीरी ।
धीवरगृही जालि पुत्री । दुर्गंध शरीरी अतिक्लिष्ट ॥१७॥
अहो नरदेहा येवोन । मदगर्वाष्ट न करन ।
षड्रिपुते धिक्कारून । धर्म आचरने ज्ञानीये ॥१८॥
तेव्हा ते धीवरी नित्य नित्य । नाव चालवी नर्मदेत ।
जनमेळा नारीनरात । उतरी तात पिता कळत्री ॥१९॥
एकदा देखिले तिने मुनी । जातिस्मरण अत करणी ।
पापात मूर्च्छना येवोनी । सावध होवोनी नमस्कारी ॥२०॥
अहो हो स्वामी मुनीराया । मम जन्म व्यर्थ सखया ।
पापकर्म पूर्वीच मया । सागा स्वामीया दयानिधी ॥२१॥

अवधी मुनी गुणवंत । सांगती भवातर गणित ।
सोमा ब्राह्मण तुझा कात । लक्षुमीवंत जैनधर्मी ॥२२॥

तुझे नाव लक्षुमी मती । मान गर्व तुझिया चित्ती ।
तारुण्यमद पडली भ्राति । निंदा करिती साधुसंता ॥२३॥

निंदेचे पाप दारुण । कुष्ट दुर्गंधी अगी उत्पन्न ।
अग्नीपात रजकजनन । गर्दभी जन्मोन शूकरी तू ॥२४॥

कुर्कुरी कुकरी जन्म जाला । तो त्या घडीच वाया गेला ।
धीवरकुळी जन्म जाला । दुर्गंध दाटला तव अगी ॥२५॥

ते ऐकोनिया भवातर । पापास भ्याली ते सुदर ।
जेन कर्म फिटे दुर्धर । सागा मुनिवर दयाब्धी ॥२६॥

तेव्हा समाधीगुप्त ऋषी । भव्यप्राणी जानोनी तीसी ।
व्रतनेम तया उपदेसी । क्षुल्लिकानेमासी दिधले ॥२७॥

तप जप शक्तीनुसार । निंदाकर्म जाल दूर ।
आयुष्याती स्वर्गमदिर । पुन. अवतार नरदेही ॥२८॥

भीमरथ राजा कुडाख्यनगरी । यशोमती तयाची अस्तुरी ।
तया वशी जाहाली पुत्री । रूपिणी सुदरी मडिता ॥२९॥

ते परनीली नारायण । जैनधर्म शुद्ध पुण्य ।
जपतप अनुष्ठान । पूर्वपुण्यात सर्वसुख ॥३०॥

तस्मात् कारण भव्यप्राणी । धर्म दृढ दशलक्षणी ।
देव गुरू सेवा करोनी । सुखसदनी मोक्षमार्ग ॥३१॥

काव्य—सुकुलजन्म—यशो-वर—सपदा, सकलशास्त्रमतिर्बुधसंगती ।
सुगतिरद्भुतशर्मशिवोद्भव भवति जैनमतोत्तमसेवनात् ॥३२॥

इति मानकथा लक्ष्मीमती—पंचेताळासावी ॥४५॥

प्रणम्य त्रिजगन्नाथं । श्रीजिनं शर्मकोटिदं ।
मायाशल्यकथा मायाविनाशाय गदाम्यदं ॥३३॥
जितार्त ग्राम ते पत्तन । पुष्पचूळ राजा सज्ञान ।
पुष्पदता प्रिया षड्गुण । पूर्वपुण्य सुखी नादती ॥३४॥
एकदा राजा सभे आत । सभे बैसला अमरनाथ ।
पार्श्व मुनीद्र आले तेथ । केला नमोस्तु पचाग पै ॥३५॥
धर्म उपदेश व्याख्यान । स्वर्गमोक्षाचे कारण ।
रायासी वैराग्य उत्पन्न । दीक्षा कल्याण विधियुक्त ॥३६॥
राजस्त्रिया जे पुष्पदत्ता । अर्जिका ब्रह्मला ख्याता ।
दीक्षा क्षुल्लका मदगर्विता । पुष्पदत्ता मिथ्यातीनीते ॥३७॥
आनिक अर्जिका येतात । नमन न करीच तयात ।
तयाची कुचेष्टा करीत । धिक् जीवित मूढाभिमानी ॥३८॥
तथा तेची अर्जिकाबाई । सुगध चर्चि अपुले देही ।
देहसस्कार ग्रानबोई । दु खदायी सन्यासमार्गा ॥३९॥
तेव्हा गुरू अर्जिका म्हणे । हे नोव्हे दीक्षेचे लक्षण ।
शास्त्रयुक्त नोव्हे ज्ञान । लागे दूपण जिनमार्गासी ॥४०॥
ते ऐकता चित्तमानस । जे आवडे माझे चित्तास ।
तेचि करीन सावकाश । गुरूउपदेश आयकेना ॥४१॥
नानापरी बाई शिकवी । परि मन तिचे न भावी ।
जैन मार्ग अर्जिका दावी । तरी ते न ठेवी अतरात ॥४२॥
ऐसे जे का दुष्टदुर्जन । तयासी उपदेश न करणे ।
करिता ज्ञानिया येईल शीण । अधर्मी जन नायकती ॥४३॥
एव शरीराची माया । दीक्षा घेवोन गेले वाया ।
आयुष्यान्ती जन्म तया । चम्पापुरीया श्रेष्ठीगृही ॥४४॥

पापे दरिद्र जाला व्याप । अन्नाविना दिसे कुरूप ।
दु.ख भोगिती पूर्वपाप । दरिद्रभावना आचार यासी ॥४५॥
अन्नासाठी ते जाली दासी । सागरदत्ताचे गृहासी ।
भावरीस येता अर्जिकेसी । पाहता तीसी जातिस्मर ॥४६॥

पूर्वी देहे लोभ धरिला । राजमद अनाचार केला ।
दीक्षा घेवोन गमाविला । धर्म बुडविला जीव पापी ॥४७॥

धिक् धिक् ते तारुण्यपण । जळो जळो रूप मदन ।
आपनिंदा तिन करोन । पापदहन बाईस पाहता ॥४८॥

नेम घेतला बाईपासी । तीव्र तप भावि मानसी ।
खंडोनी अष्टकर्मासी । मोक्षमार्गासी जाईल ते ॥४९॥

ऐसे जानोनी भव्य नर । लोभमाया करावी दूर ।
साधावे मोक्षाचे माहेर । देवगुरूशास्त्र रत्नत्रय ॥५०॥

श्लोकः मायैऽषा पशुयोनि दु'खजननी माया कुळध्वसिनी ।
माया रूपयशोमहत्त्वसुगती श्रीशर्मनिर्नाशिनी ।
ज्ञात्वेत्थं जिनधर्मकर्मनिरतै सत्पडितैर्दूरत' ।
त्यक्त्वा ता भवसागरस्य लतिका धर्मेऽच कार्या मतिः ॥५१॥

**इति श्री मायाशल्य–पुण्यदत्ता कथा ४६ छेचाळिसावी ।**

शर्मसस्यांबुदं नत्त्वा, श्रीजिनाघ्रिद्वय मुदा ।
वक्षे मरीचिवृत्तान्तं, पूर्वसूत्रानुसारत ॥५२॥

अयोध्या नगरी आदिनाथ । भरत चक्री पुत्र त्यात ।
तत्पुत्र मरीचि ज्ञानवत । सम्यक्दृष्टी जाहला ॥५३॥
इद्र नागेद्र चद्र सूर्य । शतइद्र पूजिती पाय ।
श्रीमदादि जिनेश्वर राय । समश्रुती होय कैलासी ॥५४॥

ते श्रुत जाल भरतासी । वंदने चालले परिवारेसी ।
प्रदक्षिणा तीन तयासी । साष्टांगेसी नमस्कारिले ॥५५॥
धर्मोपदेश ऐकोनिया । भरत हस्त जोडोनिया ।
पृच्छा केली जिनराया । सांगा स्वामिया मम प्रश्न ॥५६॥
आपला समस्त परिवार । यामध्ये कोणी तीर्थंकर ।
होईल काय वदा उत्तर । कृपासागर गुरुराया ॥५७॥
भरतोत्तर ते ऐकोनी । श्री तीर्थंकर पंचज्ञानी ।
वदते जाले केवळवाणी । समवशरणी बारसभा ॥५८॥
भरतपुत्र मरीची जीव । अंतिम तीर्थेश वैभव ।
होइल पचज्ञानदेव । सृतिसमवशरणाधिकारी ॥५९॥
हे ऐकोनि भरतेश्वर । हर्ष जाला हृदयांतर ।
मरिची म्हणे सत्य वैखर । निश्चयातर संशय नसे ॥६०॥
आता काश्या करावे श्रम । मूढबुधी लोभी अधम ।
त्यक्त्वा व्रत सम्यक्त्वधाम । मिथ्या कुधर्म अगीकारी ॥६१॥
सांख्य मतादि अनेक । कुबुधी आणि अभाविक ।
जनाचार आणि सात्विक । दु खदायक भवभवी ॥६२॥
सोडोनिया अत्याचार । पंचविषय घराचार ।
जीवासी अनंत संसार । वारंवार त्या जन्ममृत्यू ॥६३॥
नाना जन्म लक्ष चौऱ्याशी । जीव सोशी सुखदु.खासी ।
धर्मे विना भ्रांति जीवासी । लोभ मानसी न धरावा ॥६४॥
प्रमाद माया इच्छा अंतरी । आळस कुटुबाचा वैरी ।
भोग भोगवी गती च्यारी । भव्य अंतरी समजावे ॥६५॥
असो धर्म त्वरितागता । यमनियम धरावा चित्ता ।
भव्य प्राणी सावध आता । पुढील कथा चित्त द्यावे ॥६६॥

काळातर कष्ट करोनि । भोग भोगिलया दु:खखानी ।
प्रथम तीर्थंकरापासोनी । तेवीस भेदनी तीर्थेश ॥६७॥

पाप जीवाचे सर्व सरले । पूर्व पुण्य उदयासी आले ।
राजकुळीसी जन्म जाले । दीक्षित जाले तप उत्कृष्ट ॥६८॥

रत्नत्रय सोळाकारण । तीर्थंकर गोत्र बाधोन ।
अर्हमिद्र स्वर्गी होवोन । सुखसपन्न पुण्ययोगे ॥६९॥

चोवीसावे तीर्थंकर । कुडलगिरि पुण्यनगर ।
सिद्धार्थ राजा धीर वीर । राज्ञी सुदर त्रिशळादेवी ॥७०॥

तत् उदरी तीर्थनाथ । वर्धमान श्री भगवत ।
पंचकल्याण शतेंद्रार्चित । मुक्तीकात श्री महावीर ॥७१॥

सावधान हो भव्यप्राणी । केवळभाषित सत्यवाणी ।
जिनधर्म निश्चय धरा ध्यानी । मोक्षसदनी सुखनिद्रा ॥७२॥

श्लोक– स जयतु शुभकर्ता वर्धमानो जिनेद्र: ।
सकळभुवननाथै: पूजितो बोधसांद्र: ।
सुर–नर–खचरेंद्रोत्कृष्टसौख्य प्रदद्यात् ।
फलति परमलक्ष्मी शाश्वती यस्य भक्ती: ॥७३॥

इति मरिची कथा ४७॥

श्लोक : नत्वाऽनंतगुणाधीशं श्रीजिन त्रिजगत्हितं ।
घ्राणेद्रियकथां गंधमित्रस्य रचयाम्यहं ॥७४॥

श्री अनंत देवासी नमन । अनत गुण अनंत ज्ञान ।
त्रिभुवनेश्वर त्रिनयन । त्रिकाळ नमन ग्रथार्थी ॥७५॥

अनुपम अयोध्या नगरी । विजयराजा राज्याधिकारी ।
विजयमती स्त्री सुदरी । पुत्रोदरी सौभाग्यवती ॥७६॥

जेष्ठपुत्र तो जयसेन । द्वितीय गंधमित्र सगुण ।
सुगधामी लंपटमन । जैसा कमलीनी भृंग लुब्ध ॥७७॥
एकदा मुनीराज येती । भावरी राजा पुण्ययुक्ती ।
नवविधा पुण्यउत्पत्ती । उपदेश ऐकती द्विधा पैं ॥७८॥
उपदेश ऐकोनी रायासी । त्रिधा वैराग्योत्पत्ती त्यासी ।
गधमित्र लघुपुत्रासी । युवराज्यासि स्थापिले ॥७९॥
जेष्ठपुत्रा स्वराज्य दिल्हे । सिंहासनी अभिषेकिले ।
सागरसेन मुनी पाहिले । त्यासी विनविले भावार्थ ॥८०॥
दीक्षा घेवोनी जैनेंद्री । दमन करितो पचेंद्री ।
समाधी धर्मध्यान धरी । स्वमोक्षपायरी तयासी ॥८१॥
गंधमित्र प्रधानपदी । अविचारी तो मंदबुद्धी ।
जेष्ठबंधुसि वैर साधी । करोनी उपाधि पिटला ॥८२॥
पुण्याविना कैसे सुख । पापे भोगिताती दु:खात ।
सख्या बंधुसि इच्छी मृत्यु । पाप अद्भुत त्या जीवासि ॥८३॥
गधमित्र स्त्रीलपट । जळक्रीडे विषयभ्रष्ट ।
घ्राणेंद्रिय सुगंध अष्ट । महाधीट तो मग्न सदा ॥८४॥
तदा तो राया जयसेन । दु खी जाला राज्याविन ।
मला दिल्ह त्यान काढोन । नाहीस करीन मी त्यासि ॥८५॥
नेकलोभ धरोनी प्राणी । घात इच्छिती अत:करणी ।
त्या शरयू नदीत जावोनी । सुवासग्रानि जळक्रीडा ॥८६॥
तेव्हा तो राजा जयसेन । तया क्रोध जाला उत्पन्न ।
विषवास पुष्प आणोन । टाकिली त्या नदीमाजी ॥८७॥
पुष्प आली वाहात वाहात । गधमित्र धरी तो हस्त ।
घाणेंद्रिय सुवास घेत । जाला मृत्यू विषप्राशनी ॥८८॥

आयुष्यांती त्या दोघासि । दु:ख भोगिती नरकवासि ।
अनत ससारी जीवासि । शेवटी त्यासि तारू गुरू ॥८९॥
हे जानीया भव्यप्राणी । चतुष्कषाय द्यावे टाकोनी ।
चुकवाव्या दुर्गति योनि । धर्मे करोनी मोक्षमार्ग ॥९०॥
श्लोक : एकेनापि वशीकृतोऽत्र विषयेनोचैर्नरेद्रात्मज ।
संप्राप्तो नरकं च दु:खकलित हा गधमित्र: कुधी: ।
मूढायोऽतु समस्तभोगनिरत: कष्ट न किं यास्यति ।
सोप्येवं सुविचार्य पडितजन' श्रीजैनधर्मं स्तुवे ॥९१॥
सर्वसौख्यप्रदं नत्वा पादद्वैतं जिनेशिन: ।
वक्षे गंधर्वसेनाया चरित्रं मूढचेतस: ॥९२॥
श्री जिनेद्रपद वंदोनी । सर्व सौख्याची ते खानी ।
तयाचे प्रसादे करोनी । कवित्व करनी करू आता ॥९३॥
पाडळिपुर ते विख्यात । गधर्वराजा पुण्यवंत ।
राज्ञी गांधारी रूपवंत । पुत्रीवंत गधर्वसेना ॥९४॥
यौवनभरा येवोनिया । गंधर्वकला शिकोनिया ।
शास्त्रज्ञान जालेसे त्वया । गंधर्वविद्या निपुन ते ॥९५॥
ज्ञानगर्व धरोनी चित्ति । प्रतिज्ञा बोले वचनोक्ती ।
ज्ञाने गायने मज जिती । भ्रतार निश्चिति तोचि माझा ॥९६॥
अनेक क्षेत्री कलावत । वीणा मृदंग वाद्ये सहित ।
ते तुच्छ केले समस्त । जिंकिले समस्त क्षणामाजी ॥९७॥
पोदनपुराख्य श्रीमान । पाचाळराजा कलाप्रवीण ।
तद्वार्ता श्रृत स्वकर्ण । शिष्य पचशत घेवोनी ॥९८॥
उपाध्याय समागत्य । वादार्थी ते आले समस्त ।
पाटलीपुरी उद्यानात । राहले तेथ समुदाय ॥९९॥

कोणी एक चतुर नर । शुचनीकत्वं ग्रामांतर ।
गंधर्वसेनेसी समाचार । श्रृत समग्र समुदाय ॥१००॥
करोनी षोडशाभरण । सखी समुदाय घेवोन ।
करीती जाली ते प्रयाण । सज्जन गुणीजन सागाते ॥१०१॥
येरीकडे महंतमंडळी । सर्व निद्रिस्त वृक्षातळी ।
वीणावाद्य समूह जवळी । तव तयास्थळी गेली ते ॥१०२॥
तेथे देखीला समुदाय । अशोकवृक्षी निद्रिस्त ।
आहे शिष्याशी पुसे नाम काय । सागावी सोय तयाची ॥१०३॥
ऐकोनिया तयाची कीर्ति । वीणावाद्यादि सर्व स्थिति ।
गंधपुष्प सामग्री होती । ते ठेविती पादपस्थळी ॥१०४॥
तेथे अरुची देखोनिया । त्वरा गेली ते स्वठाया ।
पाळ अशोकवृक्षच्छया । पाहोन हृदया समजला ॥१०५॥
तत्प्रतिज्ञा ऐके श्रवणी । म्हणे धन्य धन्य कामिनी ।
आम्ही ज्ञानहीन म्हणोनी । गेली परतोनी ग्रामात ॥१०६॥
ते समजोनीया त्वरेन । राजसभे शीघ्रगमन ।
रायसन्मान आदरेन । दिधले स्थान यथायोग्य ॥१०७॥
कन्येचे मदिरासमीप । ठाव दिधला रायभूप ।
सर्व राहिले गुप्तरूप । दिनसमीप पश्चिमरात्री ॥१०८॥
वीणानाद मंजुळे स्वर । गीतगायन सप्त स्वर ।
कठ दीर्घ मनोहार । कोकिळस्वर प्रियकर्ण ॥१०९॥
गंधर्वसेनेन ऐकोन । नादलुब्ध कर्ण विषयान ।
मृगप्राय ते देहभान । गेली विसरोन पदभूमी ॥११०॥
नादसन्मुख ते भ्रमत । माडीवरोन खाली पपात ।
पद्मशरीरी दुःखित । जाला घात कर्णेंद्रियाने ॥१११॥

अहो हो एका विषयान । दुःखित जाली गंधर्वसेना ।
आयुष्यांती घोरपतन । श्रोते सावधान धर्मकर्मी ।।११२।।

श्लोक–कन्या कर्णरसेन लंपटमति गंधर्वसेना कुधी । 
संप्राप्ता भवसागरेऽतिविषमे दुष्कर्मणमज्जनं ।।
चित्ते चेति विचार्य दु खजनक पचेंद्रियाणां सुखं ।
सत. श्रीजिनधर्मशर्मनिलय नित्य श्रयतु श्रिये ।।११३।।

**इति गंधर्वसेना कथा समाप्ता ।।४९।।**

श्लोक–नत्वाह केवळज्ञानलोचन श्री जिनेश्वर ।
वक्षे भीमनृपाख्यान, सता वैराग्यकारणम् ।।११४।।

टीका–श्री जिनेश्वर केवळज्ञानी । नमस्कार तयाचे चरणी ।
कथाव्याख्यान स्वरसनी । वैराग्य उत्पन्न मनी पै ।।११५।।

कपिला नगर बहु विस्तीर्ण । राजा भीम तो बुद्धीहीन ।
सोमश्री तयाचे ते भामीन । तत्कुळी उत्पन्न सुपुत्र ।।११६।।

देवगुरू सुधर्मशास्त्र । स्निपनक्रिया तत्त्वसूत्र ।
व्याकरणादी णमोकारमत्र । धर्मसूत्र सिद्धान्तज्ञानी ।।११७।।

पिता व्यसनी जाल मग्न । मद्य–मास–लपट रसन ।
धर्मभ्रष्ट स्वक्रियाहीन । अपवित्र भक्षण जीवहिंसा ।।११८।।

भीमसेन पुत्रे ऐकोनिया । कटाळला तो स्वहृदया ।
प्रधान प्रजा मिळोनिया । विचार हृदया करीताती ।।११९।।

दोंडी दिधली नगरात । न करावा रे जीवघात ।
मांस आहारी लपटात । दूरदेशात पिटऊ आम्ही ।।१२०।।
हिंसा वर्ज केली नगरी । पिता लपट मासाहारी ।
राधवन्या सूचना करी । कैसे तरी मज आहार देई ।।१२१।।

तव तो विचारी मनात । स्मशाना जावोन आनी प्रेत ।
बाळा मकोळ सद्ये होत । संस्कार त्यात करी पापी ॥१२२॥
भक्षिता तदा भीमराव । स्वाद जिव्हालपट होय ।
सूपकारा पुसे तो सोय । अनिले काय बहुत गोड ॥१२३॥
ऐसेच नित्य सख्या आनी । मम रसनेची पुरवी धनी ।
मग तो सुपकार नित्य आनी । जाता म्हसनी मिळे न मिळे ।१२४।
मासआहारी तो चाडाळ । एके दिवसी तो कस्मळ ।
गुळखोबर देवोन बाळ । आनिले राउळ आपुल्या ॥१२५॥
दयाहीन पापी तयासी । वध केला पाकशाळेसी ।
राजा आपण एकात भक्षी । ते प्रधानासी श्रुत जाहाले ॥१२६॥
ग्रामात जाला कोल्हाळ । म्हणतो कोण्हे नेले बाळ ।
आमुचे फुटके कपाळ । रयतेचा पाळ कोन करी ॥१२७॥
ते समजले महाजनासी । भीमसेन प्रधानासी ।
केला विचार मानसी । पापियासी द्यावे काढोन ॥१२८॥
वनवासा लाविले युक्तीने । राजी स्थापिला भीमसेन ।
देव गुरू पूजा करोन । प्राचित सर्वांनी घेतले ॥१२९॥
नित्य देवपूजा करीती । स्तवनस्तोत्र पढताती ।
गुरूउपदेश शास्त्रयुक्ती । दान करीती तप षड्विध ॥१३०॥
दशविध धर्माचा प्रकाश । सप्त तत्त्वार्थ नित्य ध्यास ।
सोळाकारण उपदेश । श्रावकास मोक्षमार्ग ॥१३१॥
पापी वनवासी ते द्वय । क्षुधापीडित जाला क्षय ।
आर्त रौद्रे नरकासी जाय । शास्त्रनिर्णय आत्मप्रचीत ॥१३२॥
ऐसे जानोनी भव्यप्राणी । त्रिपनक्रिया धरा ध्यानी ।
सदा श्रवन जिनवानी । मोक्षमार्गानी जावयासी ॥१३३॥

श्लोक-विगत-धर्म-मतिर्भवसागरे ।
पतति कर्म-कलक-वशीकृत. ।
बुधजना ततो वरशर्मणा ।
शुभकरं जिनधर्मं भजतु वै ।।१३४।।
टीका-अधर्मी प्राणी भवसागरे । भोगिती दुःख नाना घोर ।
कर्मकळंक चौऱ्याशी फरे । अनतससारे पापयोनी ।।१३५।।
पापी अधम महादु.ख । जैनधर्मी त्या सर्वसुख ।
जानोनी देवाचे सन्मुख । मागावे सौख्य जिनसंपदा ।।१३६।।
इति आराधना कथाकोश । तुर्यज्ञानाचा प्रकाश ।
दर्शन-ज्ञान-चरित्राश । तप प्रकाशे पंचज्ञान ।।१३७।।
श्री सद्गुरू स्वामी रत्नकीर्ती । तत् पदरज चंद्रकीर्ती ।
गुरू वरदहस्ते स्फूर्ती । ज्ञान-कीर्ती-प्रकाश दाता तो ।।१३८।।

**इति गुरू रत्नचंद्रकीर्ती विरचिते मानकथा ४५ मायाकथा ४६ लोभकथा ४७ घाणेंद्रिय कथा ४८ कर्णेंद्रिय कथा ४९ रसनेंद्रिय कथा ५० षड्कथावर्णनो नाम प्रसंग ३७ सदतिसावा श्रीजिनार्पणमस्तु । शुभ भवतु ।। जय जय जय छ ।।**

● ● ●

# प्रसंग अडतीसावा

## ।। श्री वीतराग प्रसन्न ।।

श्रीजिन त्रिजगत्स्वामिं, समर्चित–पद–द्वयं ।
नत्वाहं नागदत्तायाः ; चरित्रं रचयामि च ।।१।।

आभिराख्य महादेशात । नासिक नाम नगरात ।
वसति गृह सागरदत्त । नागदत्ता गुणवंत प्रिया ।।२।।

श्रीकुमार तत्कुळी पुत्र । श्रीषेणा जन्मली कलत्र ।
इहि जन्मी पापाचे सूत्र । कुबुधी गात्र विकाईक ।।३।।

नंद गुराखी गृहीचा । नागदत्तेसी छंद त्याचा ।
रत जाली लोभ विषयाचा । स्पर्शेंद्रियाचा मद भारी ।।४।।

रोग दुःख त्या दोघासी । न जाय गुरे चारायासी ।
सागरदत्त ते दिवसी । गोधन वनासी पश्चिमरात्री ।।५।।

नंद गोप खड्ग घेवोनी । गेला निविड तृणवनी ।
देखिला निद्रिस्त अरण्यी । यमसदनी धाडिला तो ।।६।।

परस्त्री विषय लंपट । पापी हिंसक महादुष्ट ।
तदा ते नागदत्ता धीट । गोवळासी स्पष्ट विनोदती ।।७।।

श्रीकुमार म्हणे मातेसी । पाप वसे गे तुझे मानसी ।
पित्याची गती जाली कैसी । लज्जायमानसी गोवळ ती ॥८॥
नानिन तयासी क्रोध करी । पापीन म्हने पुत्रासी मारी ।
परपुरुषी लंपट भारी । जातील द्वारी नरकाचे ॥९॥
तथा गोवळ राहिला घरी । पापी लंपट पर नारी ।
श्रीषेणा पित्याचे दु ख धरी । केली मारीया गोवळान ॥१०॥
माता नोव्हे हे डखीन । तव गोधन सोडली बधून ।
भगिनी म्हने तया कारण । सावथान त्वा राहावे बधू ॥११॥
पिता नाहीसा केला । तुझाही घात बा इच्छिला ।
आता जीव रक्षी आपुला । शब्द ऐकिला वहिनीचा ॥१२॥
पशु नेले वनातरे । स्तभ झाकिला आपुले वस्त्रे ।
गुप्त राहिला नदीतीरे । पाहीन चरित्र दुष्टाचे ॥१३॥
तेव्हा तो गोपाळ येवोनी । खड्‍ग हस्त पापी हानी ।
कुमार पुष्टासी येवोनी । यमसदनी धाडिला वो ॥१४॥
गोधन घेवोन गृहासी आला क्षीर काढायासी ।
माता पुसतसे पुत्रासी । नद गोवळासी बोलवी ॥१५॥
तुझ्यामागे तो आला होता । कोठे राहिला साग पुता ।
पुत्र म्हणे वनाअतौता । देखिला होता पापरूपी ॥१६॥
मी काय सागु काय जाला । किंवा सावजान तो नेला ।
त्याचा सेला होता पडला । तो दाखविला मातेसी पै ॥१७॥
ते ऐकता क्रोध उत्पन्न । धावली मुसळ घेवोन ।
ते पाहोनिया त्या कन्येन । हस्त धरी दोन्ही मातेचे ॥१८॥
अहो हो माय पुढे पाहे । पुत्राचा घात करू नये ।
समजाविता समज न ये । काकुळती ये श्रीकुमार ॥१९॥

पुत्र म्हणे माय गे माये । म्या तुझे वो केले ग काय ।
माझा काही नाही अन्याय । ज्याचा उपाय त्यास फळला ॥२०॥

पापिनी क्रोध आवरेना । मस्तक आपटिले पाषाणा ।
जीवघात यमसदना । नरकभुवना शीलहीन ॥२१॥

धिक्कार काम–दुराचार । परपुरुषी लंपट नार ।
दुःखभोग चौऱ्याशी फेर । वारंवार शीलही नासी ॥२२॥

श्लोक.–तस्मात् भव्यै. जिनेंद्रप्रोक्त, शील–शर्म–शत–प्रदं ।
पालनीयं जगच्चेतो, रंजनं धर्महेतवे ॥२३॥

हे जानोनिया भव्यप्राणी । शील पाळावे यत्न करोनी ।
सदा असावे धर्मध्यानी । मोक्षसदनी जावयासी ॥२४॥

श्लोक शील श्रीजिनभाषितं शुचितर, देवेद्रवृदैस्तुत ।
शीलं दु खकलकपकसलिलं, शीलं जगन्मोहनं ॥
ये भव्या प्रतिपालयन्ति नितरा, नित्य सुशर्मप्रद ।
भुक्त्वा ते त्रिदशादिसौख्यमतुल, शुद्ध लभन्ते सुख ॥२५॥

**इति नागदत्त कथा ॥५२॥**

प्रणम्य त्रिजगत् पूज्य श्रीजिन शर्मकोटिद ।
द्वीपायनस्य सवक्षे चरित्र मुनिभाषित ॥२६॥

श्रीजिनेद्र सुखदातार । त्यासी प्रणाम वारवार ।
द्वीपायन मुनीचे चरित्र । वदेन वगत्र श्रोतियासी ॥२७॥

द्वारकापुरी ते विख्यात । मोरट देश पुण्यवत ।
जन्मभूमी नेमिनाथ । हरिवशात यादवकुळी ॥२८॥

तत्र श्री बळीभद्र देव । नव नारायण कृष्णराव ।
छप्पन कोडि ते यादव । श्रेष्ठ बाधव समुद्रविजय ॥२९॥

एकदा तो श्री नेमिनाथ । जगत्पूज्य दयाब्धिवंत ।
समवशरणी ज्ञानवंत । ऋद्धिवत द्वादशसभा ॥३०॥
यादव सर्वेही मिळोन । गिरिनारी श्री नेमीजिन ।
अष्टविध पूजा करोन । नवविधा पुण्य जोडिती ॥३१॥
धर्मश्रवण यथास्थित । यादव ऐकती समस्त ।
मग पृच्छा करिती देवात । त्रिजगन्नाथ ऐका स्वामी ॥३२॥
द्वारकाराज्य श्रीकृष्णासी । आयु किती द्वारकेसी ।
किंवा चिरकाळ अक्षयेसी । सांगा आम्हासी गुरूराया ॥३३॥
द्वादशवर्षेपर्यंत । यादव नांदती समस्त ।
मद्यपान क्षय होय त्यात । जिनवानी सत्य सशय नाही ॥३४॥
द्वारावतीचे दहन । द्वीपायन मुनी येवोन ।
जरत्कुमाराचे हातोन । हरिमरण वनवासी ॥३५॥
ते ऐकोनी वासुदेव । मद्यघट घेवोनी सर्व ।
उजतगिरी टाकी वरवे । मरण उपाव करितातो ॥३६॥
द्वीपायन मुनी मनी भ्याला । पूर्वदिशी दूरतर गेला ।
होणार कर्म न चुके त्याला । मूढचित्ताला न जानती ॥३७॥
वळिभद्र हातच शस्त्र । नारायण मरण यंत्र ।
ते वाळदेव घासोनी सर्वत्र । उरल तत्र अब्धिक्षिप्त ॥३८॥
ते झगमगीत जळात । भक्ष्य म्हणोन मत्स्ये गिळीत ।
धीवरा मच्छे जाला प्राप्त । देखिले उदरात वाणफळ ॥३९॥
जरत्कुमार ते घेवोनी । लावी नेमस्त वाणमूर्ध्नी ।
भाताडा वाण ठेवोनी । पारधी वनी पापकर्मिया ॥४०॥
तेव्हा द्वादशवर्ष जाली । थोडमासाची भूल पडली ।
द्वीपायना वुद्धी सुचली । द्वारका पाहिली पाहिजे ॥४१॥

गडगिरिनेरी येवोन । आतापयोग करी साधन ।
होणार कर्माचे लक्षण । न चुके जान भूतळे ॥४२॥
तत् समयी यादवकुमार । क्रीडानिमित्त गिरिवर ।
खेळता जाले तृषातुर । प्राशिती नीर पर्वताचे ॥४३॥
परतोनी जाता द्वारकेत । मद्यप्राशनी ते भ्रमिष्ट ।
एकमेका द्वद करीत । पाहिला तेथ द्वीपायन ॥४४॥
त्याचे रक्षण करावया । नमोस्तु केला गुरूराया ।
हाळि म्हणे कृष्णराया । योवो दे दया स्वामीची वो ॥४५॥
छप्पन कोडि यादवेंद्र । उपसर्ग होतील थोर ।
देऊळाकार करावा त्वर । पाषाण समोर लावियले ॥४६॥
मोघोनिया जे येताती । एक एक धोडा ठेविती ।
मदारी उपसर्ग करिती । पापाचरती देखावेखी ॥४७॥
मद्यप्राशोनी ते मातले । आपआपना विसरले ।
एकमेकासी सहारिले । ते श्रुत जाले नारायणा ॥४८॥
मुनिसी उपसर्ग जाला । कृष्णराम धावोनी आला ।
द्वीपायन मुनी देखिला । प्राण उरला कठगत ॥४९॥
उपसर्ग साहिले सपूर्ण । समीप येता केवळज्ञान ।
तत् समयी क्रोध उत्पन्न । इच्छिले दहन द्वारकेचे ॥५०॥
भुजातून अग्नी कल्लोळ । द्वारका भस्म जाली सकळ ।
समुदाय कर्म प्रबळ । राहले जुगुळ रामकृष्ण ॥५१॥
हे जानोनी भव्य प्राणी । क्रोध द्यावा तुम्ही टाकोनी ।
सदा असावे धर्मध्यानी । गुरूचरणी निशिदिन ॥५२॥
बळिदेव नारायण । दोघे जाले क्षीदक्षीण ।
पापपरिपाके अरण्य । वनवास भोगन जीवासी ॥५३॥

श्लोकद्वय—पुण्योदय सुखी प्राणी, भवेत् दु खी स्वपापतः ।
तस्मात् पापं परित्यज्य, पुण्यं कुर्वन्तु धीधनाः ॥५४॥
पुण्यं पात्राश्रित दानं, पुण्यं श्रीजिनपूजन ।
पुण्यः शीलोपवासाद्यैः, भाषितं पूर्वसूरीभि. ॥५५॥
वनवासी बळी नारायण । जरत्कुमार तेथे येवोन ।
पारधी निमित्य भ्रमण । देखिले दुरून श्वापद ॥५६॥
तृषाक्रान्त तो कृष्णनाथ । बळी गेला आणू जळात ।
वृक्षातळी कृष्ण निद्रिस्त । गुढग्यावरीत सव्यपद्म ॥५७॥
पद्मीपद्म जैसा नयन । जरत्कुमार पाहे दुरून ।
श्वापदार्थी बाण काढोन । विंधिला सत्रान पापिष्टे ॥५८॥
जवळ येवोनिया पाहे । वोळखिला यादवराय ।
बळिराम आला तत् समय । कृष्णासी पाहे निद्रिस्त ॥५९॥
दु खे होवोनिया भ्रमित । कोड मास सग्रह ते प्रेत ।
पूर्वमैत्र येवोनी तेथ । प्रतिबोधे त्यात ज्ञान जाले ॥६०॥
तत् चंदनाद्यै मेळउन । कोरी भूमिका पाहोन ॥
मान पर्वत विस्तीर्ण । नारायण दहनक्रिया ॥६१॥
त्रिधा वैराग्य बलिदेवासी । दीक्षा घेतली स्वामिपासी ।
तीव्र उग्र तप तपस्वी । मानतुगीसी समाधिगुप्त ॥६२॥
देह झाला विसर्जन । महेद्रस्वर्गी तो उत्पन्न ।
दिव्यवस्त्र भोग संपन्न । अप्सरा नूतन देवंगना ॥६३॥
विमानारूढ स्त्रीसमेत । मेरू कैलास यात्रा करीत ।
जावोनी विदेहक्षेत्रात । तीर्थकरात पूजाविधीन ॥६४॥
जिनधर्मे विमानप्राप्त । सर्व सौख्य भोग भोगीत ।
पुढती नरदेही दीक्षित । मोक्षमार्गात पाहतील ॥६५॥

काव्य– स श्रीमान् बलभद्रदेवसुमुनी, रत्नत्रयाळंकृत: ।
श्रीमत् जैनपदाब्जयुग्ममधुलिट् चारित्रचूडामणि ॥
शातिकातिमन:प्रसत्तीसहित नित्य महामंगल ।
दद्यान् मे गुणरत्नरंजितमति: सद्बोधसिंधु सुखं ॥६६॥

**अथ द्वीपायन द्वारका कथा ॥ ५२ ॥**

श्लोक–श्रीमत्सर्वज्ञमानम्य, वक्षे सपद्विधायक ।
जनाना प्रतिबोधाय, मद्य–दोष–कथानक ॥६७॥

एक्या चक्रपुरा ग्रामात । गगाभट असे नादत ।
वेद वेदाग असे पडित । विष्णुभक्त चरणभृग ॥६८॥

एकदा दैवयोगे करून । निघाला तो दैवहीन ।
विंध्याचल वनी येवोन । मन इच्छेन मद्यपानि तो ॥६९॥

सप्तव्यसनी विषयिक । कैफी आणि मासलुब्धक ।
न जाने विवेकाविवेक । स्त्रिया कामीक रातला तो ॥७०॥

ते मातगी नीच तरुणी । भोग भोगी इच्छेकरूनी ।
द्विजामध्ये मिसळोनी । पाहता त्यानी दुन्हाविला ॥७१॥

मार्ग धरोनिया तयासी । ज्ञानशब्द बोले द्विजासी ।
मद्य मास दोष सकळासी । किती मजसी किंचित् ॥७२॥

सर्वंही करिती ते कर्म । हा परपरा इद्रियधर्म ।
आनिक तापसी उत्तम । वेदागम आचारवत ॥७३॥

रे रे भ्रष्ट तू ब्राह्मण । ज्ञान सपादन करोन ।
मांस आहारी गगाजीवन । कामाध नैन मूढ मानसा ॥७४॥

मागुता तो त्यासी भाषला । किंचित् दोष लाविता मला ।
तुम्ही ज्ञानी अमच्या बोला । सभाळ केला पाहिजे ॥७५॥

उक्तंच- तिलसर्षपमात्रे च मास खादन्ति ये द्विजाः ।
तिष्ठन्ति नरके तावत् यावत् चद्रदिवाकरौ ॥७६॥
चाडाळी सगम द्विजासी । कुळलाछन तो अपेसी ।
प्रायश्चित्त देहे अंतेसी । अग्नीकाष्ठासी घ्यावे पै ॥७७॥
धातकी पिष्ट उदकेन । गुढादै मक्षीके मुगेन ।
कैफी करिती मद्यपान । दोष दारुण मासआहारी ॥७८॥
ते न करावे महापाप । जीव भोगी चौऱ्यांसी माप ।
हे न जाने मूढाचा बाप । दुर्दोष व्याप मूढबुधी ॥७९॥
आपमत्त दुष्ट दुर्जन । विषयाध भ्रष्ट होऊन ।
मदोन्मत्त कुसगतीन । सुकुळनाशन पापीष्ट ॥८०॥
स्त्रीवियोग जाला तयासी । क्षुधाक्रान्त तो स्वमानसी ।
कर्मोदय इच्छी मानसी । कामिनी मासासी लपट ॥८१॥
हे जानोनिया भव्यजन । मिथ्यात्व दोष द्यावे टाकून ।
सदा सुधर्म ध्याइजे मन । मन-वचन-काय-त्रिशुद्ध ॥८२॥
काव्य- नित्यं स्नानविधायको हरि-पद-द्वंदेसु सेवापरो ।
वेदज्ञोपि कीलैकपातु स्मृतिमतीर्नष्ट. परिव्राजक' ॥
अज्ञानार्दिह हेतु शुद्धिचलितो मुक्तास्वकीलततो ।
ज्ञात्त्वेवं बुधसत्तमै' जिनपते सज्ञानमासेव्यता ॥८३॥
श्लोक:-सप्रणम्य जिनाधीश सुराधीशै. समर्चितं ।
श्रीमत् द्वितीयचक्रेशः चरित्र रचयाम्यह ॥८४॥
जंबूद्वीप महासुन्दर । त्या दक्षिणभागी पुण्यक्षेत्र ।
विहार करिती तीर्थकर । विदेह क्षेत्र अनुपम ॥८५॥
सीता नदी वत्स देशे । पृथ्वी नाम नगरी असे ।
जयसेन राजा नरेशे । जयवती दिसे इद्रप्रिया ॥८६॥

ततपुत्र रतिषेण सगुण । जैसा शोभे दुजा मदन ।
द्वितीय पुत्र धृतिषेण । पुण्यवान सौभाग्यवत ॥८७॥
एंकदा रतिषेण पुत्र । आयु पूर्ण पूर्व यंत्र ।
दुःख शोक शातता मित्र । केळी सर्व मिळोनिया ॥८८॥
जयसेन विरक्त मानसी । पाही द्वादश अनुप्रेक्षेशी ।
स्वराज्य धृतिषेण पुत्रासी । विधी युक्तीसी जिनपूजा ॥८९॥
शत स्त्रियासी क्षमा कर । राजे एकशत बरोबर ।
गुरुराज यशोधरा । दीक्षा सत्वर विधियुक्त ॥९०॥
दीर्घ तीव्र तप करिती । अष्ट कर्म संहारिती ।
समाधिमरण साधिती । जन्म घेती अच्युतस्वर्गी ॥९१॥
मणिकेतु इंद्रराव देव । राज्य भोगी स्वर्गवैभव ।
देवीसहित पूजी जिनदेव । हृदयी भाव भक्ती युक्ती ॥९२॥
स्वर्गलक्ष्मी भोगोनिया । पुण्ये पुण्यच जोडोनिया ।
आयु पूर्ण करोनिया । तेथोनिया राजकुळी जन्म ॥९३॥
पुनरपि ज्ञानयोगेन । दीक्षा प्राप्त भवाब्धि तारण ।
विहारादि सबोधन । आयु पूर्ण समाधीध्यानी ॥९४॥
पुन स्वर्ग अच्युतातरी । जन्म पुण्ययोगानुसारी ।
भोग भोगी नानापरी । दिव्य शरीरी पूर्ण आयुष्य ॥९५॥
तेथून साकेता पुरीसी । महाबळ रायाचे वशी ।
समुद्रविजयाचे कुशी । सुबळाराणिसी पुत्र जाला ॥९६॥
द्वितीय सगर चक्रवर्ती । नामाभिधान पुण्यकीर्ति ।
राज सहा खडाचा पति । आयु गनती सप्तलक्ष ॥९७॥
सव्वाचारशे धनुष्य काया । काचनवर्ण देह तया ।
रूप लावण्य जेवि सूर्या । आब्धि धीरा शाति व्योममणि ॥९८॥

चौदा रत्न आपत्स्योत्पन्न । शांनौ सहस्त्रा स्त्रिया सगुणं ।
साठ हजार पुत्र भान । पुण्योदयान सर्व सुखी ।।९९।।
पूर्वदत्ते सुजन्म प्राप्त । पूर्वपुण्यसुविधा होत ।
पूर्व सुकृत भार्या येत । सुपुत्र प्राप्त पूर्वदत्ते ।।१००।।
तदा सिद्धक्षेत्रवनात । चतुर्मुख चैत्यालयात ।
महामुनि ज्ञानवत । केवळज्ञान प्राप्त तयासी ।।१०१।।
देवेद्र खगेद्र मिळोनी । पूजार्थी विमानी वैसोनी ।
सहपरिवारे येवोनी । जिनार्चनी जय जय शब्द ।।१०२।।
ते ऐकोनिया सर्व युक्ती । सगरराजा चक्रवर्ती ।
समवशरणी पूजायुक्ती । धर्मस्थिती उपदेशक ।।१०३।।
मणिकेतु खगेद्रदेव । चक्रवर्ती बैसले भाव ।
धर्मचर्चा जिनवैभव । सागती सर्व जिनभाषित ।।१०४।।
जीव अनंत संसारी । सुख दु ख चौऱ्याशी घरी ।
पुनरपि जन्म वेरझारी । षड्‍रिपु वैरी न सोडिती ।।१०५।।
देव म्हणे भूमीदेवराय । बहुत सागु आता काय ।
आत्मप्रचीत धरा सोय । पुण्य उदये सुखप्राप्ती ।।१०६।।
अच्युतस्वर्गी पुण्य केले । चक्रवर्ती पद पावले ।
सर्वही सुख पूर्ण भोगिले । राज्यही केले चिरकाळ ।।१०७।।
आता श्रीजिनेद्रभाषित । तप दीक्षा घ्यावी त्वरित ।
सावधान करोनी चित्त । करावी प्रीत सिव स्त्रियची ।।१०८।।
इति श्री सगररायासी । विरक्तता न होय तयासी ।
लोभ सतत सपत्तीसी । महामोहेसी मूर्च्छित तो ।।१०९।।
तयाचे मानस जानोन । सूर गेला तो निजस्थान ।
विना पुण्यलब्धी वाचोन । दीक्षाकल्याण कैंच जीवा ।।११०।।

कित्येक दिवसपर्यंत । चक्रवर्ती राज्य करीत ।
सूर विचारी मनात । मणिकेत स्वर्ग स्वर्गेन्द्र देव ॥१११॥
येवोनी अयोध्यानगरी । चारणमुनी रूप धरी ।
बैसोन चैत्यालयाभीतरी । उपदेश करी रायासी ॥११२॥
दीक्षा सयम जे घेतात । स्वर्ग मोक्ष तयासी प्राप्त ।
सगर चक्री विस्मय मनात । पाहोनी मुनीत पृच्छा करी ॥११३॥
अहो स्वामी रूपतारुण्य । दीक्षा घ्यावया किंकारण ।
मुनिराजानी ते ऐकोन । प्रतिवचन मधुरगिरा ॥११४॥
यौवन वनिता सता । स्थिर न राहे हो समर्था ।
संसाराब्धि घोर चिंता । मम चित्तासी सहावेना ॥११५॥
म्हणोनिया तरणोपाय । दीक्षाजहाज अब्धि होय ।
याने संसारात उपाय । जिवान सोय पहात जावी ॥११६॥
इत्यादिक त्या शुभज्ञान । सबोधिता न फिरे मन ।
देव जाला क्षीदक्षीण । स्वर्गभुवन तो गेला ॥११७॥
अथैकदा चक्रवर्ती । सिंहासनी स्वस्थचित्ती ।
नेक राजे भेटिसी येताती । ऐका भूपती मुनिवाक्य ॥११८॥
पुत्र संतत आनि संपत । पूर्वदत्ते सर्व प्राप्त ।
जीवा असाध्य तो मोक्षपंथ । दीक्षाविरहित न साधे ॥११९॥
त्याविना जीव भटकती । नाना उपाय करिताती ।
वाजवृक्षा फळ उत्पत्ती । नोव्हे कल्पांती पुण्यविना ॥१२०॥
ते ऐकोनिया चक्रधर । मधुर वचन प्रियकर ।
मम पुत्र साठसहस्र । अत.पुर सहस्र छान्नव ॥१२१॥
पट्खड पृथ्वी ऐश्वर्य । बत्तीस हजार नृपवर्य ।
नित्य सेविताती पाय । पाहोन हृदय संतुष्ट ॥१२२॥

भरतेश चक्रवर्तीन । पुण्य केले पूर्वजान ।
तैसेच मम इच्छितमन । पुण्याचे कारण तुम्ही करा ॥१२३॥
भगीरथादि पुत्र सर्व । सप्तक्षेत्री द्रव्य खर्चाव ।
जन्म सार्थक कराव । पुण्य जोडावे कीर्तिवंत ॥१२४॥
भूपतीवाक्य ऐकोनिया । वचन नुल्लघेचि तया ।
नमन मौन धरोनिया । आशका हृदया स्वस्थते ॥१२५॥
तथा ते पुत्रपरिवार । पित्यासी करोनी नमस्कार ।
म्हणे काय इच्छा अंतर । सागावे प्रकर दयानिधी ॥१२६॥
प्रतिज्ञावचन द्यावे मजसी । तेव्हाच करीन भोजनासी ।
सर्वही दिधले भाकेसी । सागे आम्हासी हितकार्य ॥१२७॥
अहो पुत्रा तुम्ही करन । धर्मकार्य मनी धरोन ।
कैलासगिरिसी जावोम । पूजाविधान विधियुक्त ॥१२८॥
श्रीमत् चक्री भरतेश्वर । चतुर्विशति तीर्थंकर ।
रत्नमय बिंबप्रकर । जिनागार सुवर्णाचे ॥१२९॥
पुढति पचमकाळात । होतील पापाचे पर्वत ।
पुण्यविना दरिद्रप्राप्त । देवगुरूत न जानती ॥१३०॥
सर्वही नेतील सुवर्ण । यासाठी करावा प्रयत्न ।
कैलासगिरिसी जावोन । योजनप्रमाण सोपानीक ॥१३१॥
अष्टापद तो गिरिवर । खातिका तैसीच चौफेर ।
गगानदी महादुस्तर । भयकर भूचे रानराशी ॥१३२॥
भगीरथादी सर्वबधू । महायोद्धे प्रतापसिधू ।
सर्वांसी मान्य उपदेश बोधू । महा अगाधु पुण्यकार्य ॥१३३॥
परमानद त्या मानसी । घेवोन सर्व सामग्रीसी ।
गेले कैलास गिरिपासी । करी सायासी अष्टपद ॥१३४॥

खातिका भयंकर विस्तीर्ण । गंगा ओघ चहुकडोन ।
जळ चंचळ गरगर नयन । पाहिल्यान न पहावे ॥१३५॥
तत् समयी तो स्वर्गेंद्र । मनिकेतु तो खगसूर ।
सबोध करावया त्वर । राजा सगर सिंहासनी ॥१३६॥
मायावेश तो ऐरावत । पाहता पाहता तन्मृत्यू ।
राजा विस्मय करी मनात । पश्चात्तापार्थ न जानेची ॥१३७॥
तदा देव जाला ब्राम्हण । सभेमाजी करी रूदन ।
अहो चक्रेश माझा नंदन । नेतो वोढोन काळ त्यासी ॥१३८॥
तुम्ही दयावत हो राव । मम पुत्रासी सोडवाव ।
स्वपुत्र ऐसे त्वा भावाव । पुत्रदान द्याव मजलागी ॥१३९॥
द्विजवचन ऐकोनिया । किंचित् हास्य आले राया ।
रे रे मूढ वोलसी वाया । काळ कर्म माया कोन वारि ॥१४०॥
जीव सिद्धपदवी धरी । तरी काळभय नीवारी ।
नरदेही दीक्षा स्वीकारी । अष्टकर्मारि स्वात्महित ॥१४१॥
हे ऐकोनि द्विज बोलले । राया हे सत्य सागितले ।
आम्हागरी वाहे न चाले । तुम्हीचं केले पाहिजे ॥१४२॥
सर्व परिवार समस्त । यम नेईल त्वपुत्रात ।
धन यौवन त्रय सतत । ससार अनृत सर्वही ॥१४३॥
तत् बोध कर्णी जाला श्रवण । पापबाधा मूर्छना येवोन ।
न धरत पृथ्वी दडाससन । तदा प्रधान सीतोपचार ॥१४४॥
गुरूवाक्य अमृतवाणी । सज्जन मैत्रे समजाउनी ।
तत् त्रिधा वैराग्य मनी । चिंतवी मनी अनुप्रेक्षा ॥१४५॥
पाचारी भगीरथ पुत्रासी । स्वराज्य दिधले तयासी ।
आपन गेले गुरूपासी । त्रिपरीत्य नमोस्तु ते ॥१४६॥

चरणी ठेवोनी मस्तक । दीक्षा द्यावी भवतारक ।
मस्तकी ठेवोनी हस्तक । सुखदायक मोक्षमार्ग ॥१४७॥
गुरूराय कृपा केली । विधियुक्त दीक्षा दिधली ।
सर्व क्रिया त्या सांगितली । विद्या घोकली सगरकीर्तीने ॥१४८॥
तदा तो खगेंद्र त्वरित । कैलासगिरीवरी जात ।
सगरपुत्र ते समस्त । त्या दाखवीत मायामृत्यु ॥१४९॥
अहो पुत्र तुमची वार्ता । ऐकोनिया तुमचा पिता ।
दीक्षा घेवोन वनांतीता । तप करिता जाला तो ॥१५०॥
ते सांगावया तुम्हासी । क्षणभंगुर या देहासी ।
तुम्ही करावे आत्महितासी । जेन चौऱ्याशी दूर होय ॥१५१॥
ते ऐकोन हितवचन । साठ सहस्र बंधुजन ।
संसृति विरक्त होऊन । दीक्षा घेवोन तप करिती ॥१५२॥
भगीरथासी शृत्यजाले । पितापुत्र स्वहित केले ।
अवडवरे दर्शना आले । मुनी वंदिले यथायुक्ती ॥१५३॥
धर्मवृद्धी धर्मकथा । ऐकताति स्वहितार्था ।
श्रावकधर्म भगीरथा । सप्ततत्त्वार्था श्रवण केले ॥१५४॥
तदा तो मणिकेतु देव । प्रकट रूप दाखवी भाव ।
सगरकीर्ति मुनीराव । नमिला भाव त्रिकरणेसी ॥१५५॥
तप दृढ करावयासी । विनय करी सद्‌गुरूपासी ।
क्षमा करावी स्वामी मजसी । म्या तुम्हासी छेडिले फार ॥१५६॥
तो अपराध करावा क्षमा । आशीर्वाद द्यावा अधमा ।
स्वामी म्हणे उत्तमोत्तमा । उपकार आम्हा तुम्ही केला ॥१५७॥
तुम्ही पूर्व मैत्र आम्हात । धर्मे तुम्हासी स्वर्ग प्राप्त ।
आम्ही बुडता भवसागरात । उपदेश हस्त काढिले ॥१५८॥

ते ऐकोनी यादवराय । नमस्कारिले पदद्वय ।
हर्षं हृदयी न समाय । सिद्ध कार्य स्वर्गगमन ॥१५९॥
ते सर्वही मुनीश्वर । तप करिती महादुर्धर ।
निर्वाण सम्मेद शिखर । मोक्षाधिकार शिवपदी ॥१६०॥
ते भगीरथाने ऐकोनी । वरदत्त पुत्रा बोलाउनी ।
तयासी राजी स्थापोनी । आलिंगोनी सर्वा क्षमातव्य ॥१६१॥
कैलासगिरिसी जावोनी । वदिले सिवगुप्तमुनी ।
दीक्षा घेतली मोक्षदायिनी । तप तरनी कायोत्सर्गे ॥१६२॥
क्रूर परीसह साहिले । केवळज्ञान प्रगटले ।
चतुनिकाय देव आले । जळ आनिले क्षीराब्धिघट ॥१६३॥
श्रीसत् भगीरथकीर्ती । अभिषेक करिती युक्ती ।
तेथोनी गगानदी कीर्ती । भागीरथी नामाभिधान ॥१६४॥
मुड केवळज्ञान जाले । शिवपद साधू साधिले ।
अनतसुखासी पावले । ते म्या वंदिले भाव धरोनी ॥१६५॥

काव्य.स जयतु सगराख्य केवळज्ञानचक्षु· ।
सकलसुरसमर्च्यं मुक्तिकातासुकात ॥
विदित–परम–तत्त्वा: ते मुनीद्रा च नित्य ।
मम विशद–मुख–श्री–कारण सन्तु सन्त ॥१६६॥

**इति कथाकोशे नागदत्त ५१, द्वीपायन द्वारका कथा ५२, मद्यदोष कथा ५३, सगरचक्रवर्ती कथा ५४, गुरू रत्नकिर्ती–शिष्यचंद्र–विरचिते प्रसग ३८, अडतीसावा श्री जिनार्पणमस्तु शुभं भवतु ॥ जय जय जय ॥ छ छ छ ॥**

● ● ●

श्लोक:-सश्रीकेवळलोचनोऽतिचतुरो भव्यौघनिस्तारको ।
देवेंद्रादिसमर्चितो हितकरो धीरो मृगादिध्वज. ।।
नानाशर्मयश: प्रबोधजनको भक्त्या समाराधितो ।
दद्यात् मे भवता च निवृत्तिपदं नित्य महामंगलं ॥१९॥

**इति मृगध्वज कथा**

श्लोक.-नमस्कृत्य जिनाधीशं संसाराबोधितारणं ।
श्वेतरामस्य संवच्मि, चरित्रं चित्तकारणं ॥२०॥

अयोध्या नगरीत राजा । कीर्तिवीर्य कीर्तिची ध्वजा ।
पद्मावती गुणज्ञ भाजा । प्रीत वोजा प्राणवल्लभ ॥२१॥

नगरप्रदेशी अरण्यात । तापसी राहती गुफेत ।
रेणुका कामिनी स्वनाथ । जमदग्नि तेथे तपाचरती ॥२२॥

तयासी पुत्र प्रथम जाला । स्वेतराम नाम त्याला ।
महेंद्रराम द्वितीय भला । प्रियकर जाला सर्वासी ॥२३॥

एकदा रेणुकेचा बधु । समीपवस्ती ज्ञानसिंधु ।
वरदत्त नामे प्रबोधु । वृक्ष आधुकाळ कर्मिती ॥२४॥

तेथे रेणुका प्रीति करोन । बंधुसी म्हणे सागा पुराण ।
मग तो म्हणे सावधान । चित्त देवोन ऐकावे वाई ॥२५॥

जैनधर्म सर्वासी श्रेष्ठ । सम्यक्त्व व्रत घ्यावे स्पष्ट ।
जीवदया पाळावी सुभट । सर्व कष्ट ते दूर होती ॥२६॥

धर्म भवसागरी जहाज । जीवा उतरी तो सहज ।
मोक्षमार्गाच हेच बीज । देव गुरूराज ओळखावा ॥२७॥

देव तो जाना अरिहंत । अष्टादश दोषारहित ।
गुरू जानावा तो निर्ग्रंथ । हिसाविरहित तो धर्म ॥२८॥

या नावे सम्यक्त्व लक्षण । संसारी जीव श्रावकजन ।
व्रती अष्ट मूळगुण । क्रिया तिरुपण पाळताती ॥२९॥
जिनभाषित शास्त्रयुक्ती । श्रावक धर्म आचरती ।
गुरूपासी नेम घेताती । चालविती शक्तिसारते ॥३०॥
दयादीधर्म ब्रह्मचर्य । शीलव्रती तत्पर होय ।
ज्ञानध्यानाची जाने सोय । काळाध्यय सिद्धान्तमार्ग ॥३१॥
गुरू जानावा तो निर्ग्रंथ । भार्यादि ग्रथी विवर्जित ।
कुमडल सौचविधीत । पिछी धरित जीवाची दया ॥३२॥
जग उपदेशाकारण । शास्त्रसंग्रह करिती जान ।
तप तीव्र पच ते आग्न । करिति साधन मुनीराय ॥३३॥
उष्ण शीत पर्जन्यआग्न । हे बाह्यात्कारा तीन आग्न ।
आतरी ते क्षुधातृषाग्न । करिती साधन साधूते ॥३४॥
इत्यादी धर्म समस्त । रेणुका ऐकोनिया स्वस्थ ।
आनद जाला हृदयात । लागली प्रीत जैनधर्मी ॥३५॥
म्हणे दादा हे सत्यसत्य । सागीतले जीवाचे हित ।
तयन घेवोन सम्यक्त्व । केला बधुत नमस्कार ॥३६॥
बधुसी जाला हर्ष फार । प्रज्ञप्ति विद्या महाथोर ।
देता जाला मन उदार । दयाकर मुनीराज ते ॥३७॥
कामधेनु देवोनी तीसी । सुखी असावे वनवासी ।
गेली आपुले स्थानकासी । जमदग्नीमी सर्वसुखी ॥३८॥
देव गुरू शास्त्रसपन्न । नित्य नित्य त्या धर्मध्यान ।
कामधेनुसदृश पक्वान । सतोशमन धर्म करिती ॥३९॥
एकदा अयोध्येचा पती । कार्तवीर्य तो भूपती ।
वनक्रीडा करायाप्रती । धरावया हत्ती आला तेथे ॥४०॥

# प्रसंग एकोणचाळिसावा

## श्री वीतरागाय नमः

श्लोक–नत्वा जिन महाभक्त्या, त्रैलोक्यप्रभुपूजितं ।
वक्ष्ये मृगध्वजाख्यानं, पूर्वाचार्यैः प्रभाषितं ॥१॥

अयोध्या नगरी विख्यात । गड मंदिर शोभिवंत ।
जिनमंदिर रत्नखचित । जैसी शोभत इंद्रपुरी ॥२॥

राजा नामे श्रीमंदर । जितसेना स्त्रिया सुंदर ।
पुत्रोदर मृगध्वज शूर । ह्मैसासुर तो पशुजन्म ॥३॥

संगती मूढ मिळोनी । गेले वनक्रीडेलागुनी ।
पुष्करणी नदी उद्यानवनी । क्रीडाखेळनी मृगध्वज तो ॥४॥

तेथे पाहोन मृग महिषा । राजपुत्रा झाली मनशा ।
कुंवर मंत्री श्रेष्ठी आशा । मृगध्वज मासलब्ध तिघे ॥५॥

राजपुत्र स्वसेवकासी । पश्चिम चरण द्या वेगसी ।
कुबुधी धरोनी तयासी । महाकष्टेसी पदघात ॥६॥

त्रिपद तो मृग पलायन । राजिया सन्मुख येवोन ।
करी नमन कंठी प्राण । तो राजियान पाहिला दृष्टी ॥७॥

राजा धार्मिक श्रीमंदर । जैनधर्मी तो धुरंधर ।
सारमंत्र पंचनमस्कार । कर्णद्वार सन्यासयुक्त ॥८॥

परोपकार सम्यक्त्वी । जेविका कल्पवृक्ष क्षिती ।
मंत्रप्रसादे स्वर्गप्राप्ती । देव होती स्वधर्मस्वर्गी ॥९॥

श्रीमद्‌जैनेंद्र वर्द्धमान । सम्यक्त्व जीवा हितकारण ।
ऐसे जानोन ज्ञाते जन । करावे पालन सुधर्माचे ॥१०॥

पुत्रवृत्तान्त ऐकोनिया । क्रोध उत्पन्न जाला राया ।
सिद्धार्थ मंत्री पाचारूनिया । सांगे तया त्या त्रीनि हन्त्वा ॥११॥

तं वार्ता श्रवन तिघासी । मंत्री श्रेष्ठी नृपात्मजासी ।
पलायन केले वनासी । करि मानसि पश्चात्ताप ॥१२॥

आम्ही जैनधर्मी शुद्ध । हृदयी सुचली कुबुद्ध ।
रसनाविषयी जालो लुब्ध । धिक् जन्मान्ध संसार हा ॥१३॥

ऐसा पश्चात्ताप करिता । मुनी पाहिले अवचिता ।
दर्शन शुद्ध करी त्वरीता । मन शुद्धता जाली त्याची ॥१४॥

मुनीदत्त गुरूसी पाहोन । दीक्षा घेतली भाव धरोन ।
घोर दुःसह तप करोन । धर्मध्यान मार्ग मोक्षाचा ॥१५॥

घातिकर्म ते चतुष्टय । मुनीराज केला क्षय ।
केवळज्ञानाचा उदय । चतुर्निकाय देव आले ॥१६॥

पूजाभक्ती करोनिया । स्तवन करिती तया ठाया ।
ते श्रुत जाले श्रीमद्रराया । गेले पूजावया स्वामीसी ॥१७॥

महत् पाप करिती प्राणी । जिनधर्म निश्चयता मनी ।
होति त्रैलोक्य ते पूजनी । धर्म करोनी किं किं नोव्हे ॥१८॥

श्लोक:–सश्रीकेवळलोचनोऽतिचतुरो भव्यौघनिस्तारको ।
देवेद्रादिसमर्चितो हितकरो धीरो मृगादिध्वज. ।।
नानाशर्मयशः प्रबोधजनको भक्त्या समाराधितो ।
दद्यात् मे भवता च निवृत्तिपदं नित्य महामंगलं ।।१९।।

**इति मृगध्वज कथा**

श्लोक.–नमस्कृत्य जिनाधीश ससाराबोधितारणं ।
श्वेतरामस्य संवच्मि, चरित्र चित्तकारण ।।२०।।

अयोध्या नगरीत राजा । कीर्तिवीर्य कीर्तिची ध्वजा ।
पद्मावती गुणज्ञ भाजा । प्रीत वोजा प्राणवल्लभ ।।२१।।

नगरप्रदेशी अरण्यात । तापसी राहती गुफेत ।
रेणुका कामिनी स्वनाथ । जमदग्नि तेथे तपाचरती ।।२२।।

तयासी पुत्र प्रथम जाला । स्वेतराम नाम त्याला ।
महेद्रराम द्वितीय भला । प्रियकर जाला सर्वासी ।।२३।।

एकदा रेणुकेचा बधु । समीपवस्ती ज्ञानसिंधु ।
वरदत्त नामे प्रबोधु । वृक्ष आधुकाळ कमिती ।।२४।।

तेथे रेणुका प्रीति करोन । बधुसी म्हणे सागा पुराण ।
मग तो म्हणे सावधान । चित्त देवोन ऐकावे वाई ।।२५।।

जैनधर्म सर्वासी श्रेष्ठ । सम्यक्त्व व्रत घ्यावे स्पष्ट ।
जीवदया पाळावी सुभट । सर्व कष्ट ते दूर होती ।।२६।।

धर्म भवसागरी जहाज । जीवा उतरी तो सहज ।
मोक्षमार्गाच हेच वीज । देव गुरूराज ओळखावा ।।२७।।

देव तो जाना अरिहंत । अष्टादश दोषारहित ।
गुरू जानावा तो निर्ग्रंथ । हिसाविरहित तो धर्म ।।२८।।

या नावे सम्यक्त्व लक्षण । ससारी जीव श्रावकजन ।
व्रती अष्ट मूळगुण । क्रिया तिरुपण पाळताती ॥२९॥
जिनभाषित शास्त्रयुक्ती । श्रावक धर्म आचरती ।
गुरूपासी नेम घेताती । चालविती शक्तिसारते ॥३०॥
दयादीधर्म ब्रह्मचर्य । शीलव्रती तत्पर होय ।
ज्ञानध्यानाची जाने सोय । काळाध्यय सिद्धान्तमार्ग ॥३१॥
गुरू जानावा तो निर्ग्रंथ । भार्यादि ग्रथी विर्वर्जित ।
कुमडल सौचविधीत । पिछी धरित जीवाची दया ॥३२॥
जग उपदेशाकारण । शास्त्रसंग्रह करिती जान ।
तप तीव्र पच ते आग्न । करिति साधन मुनीराय ॥३३॥
उष्ण शीत पर्जन्यआग्न । हे बाह्यात्कारा तीन आग्न ।
आतरी ते क्षुधातृपाग्न । करिती साधन साधूते ॥३४॥
इत्यादी धर्म समस्त । रेणुका ऐकोनिया स्वस्थ ।
आनद जाला हृदयात । लागली प्रीत जैनधर्मी ॥३५॥
म्हणे दादा हे सत्यसत्य । सागीतले जीवाचें हित ।
तयन घेवोन सम्यक्त्व । केला बधुत नमस्कार ॥३६॥
बधुसी जाला हर्ष फार । प्रज्ञप्ति विद्या महाथोर ।
देता जाला मन उदार । दयाकर मुनीराज ते ॥३७॥
कामधेनु देवोनी तीसी । सुखी असावे वनवासी ।
गेली आपुले स्थानकासी । जमदग्नीसी सर्वसुखी ॥३८॥
देव गुरू शास्त्रसपन्न । नित्य नित्य त्या धर्मध्यान ।
कामधेनुसदृश पक्वान । सतोशमन धर्म करिती ॥३९॥
एकदा अयोध्येचा पती । कार्तवीर्य तो भूपती ।
वनक्रीडा करायाप्रती । धरावया हत्ती आला तेथे ॥४०॥

तेन ऋषी गुफा पाहती । कामधेनु त्यास देखीली ।
षड्रस पक्वान्नीपजलि । भोजन कैली सर्वांनी ।।४१।।
लोभ धरोनिया मनात । राजा पापी इच्छिला घात ।
कामधेनु धरिता त्यात । क्रोधवत तो जमदग्नि ।।४२।।
दोघ युद्धा प्रवर्तले । तापसासी राय जितीले ।
कामधेनु घेवोन गेले । पापीन केले महत्पाप ।।४३।।
रेणुकापुत्र दोघे जन । पुष्प आणु गेले ते वन ।
येता समजले संपूर्ण । हृदयी क्रोधाग्न पेटला ।।४४।।
पित्यासी प्रतिज्ञा करोनी । रायासी आनीन बाधोनी ।
तरीच येईन परतोनी । ना तरी मरणी मारीन ।।४५।।
मातापित्यास करी नमना । माता म्हणे पुत्रा निधाना ।
प्रज्ञाप्तिविद्या धरी कर्णा । विजयी रणा होशील तू ।।४६।।
मग तो परसराम बळी । रायासी जावोन करी कळी ।
ग्रामात जालीसे आरोळी । त्यानि रवदळि माडिली ।।४७।।
विद्या प्रज्ञप्ति विख्यात । राजा जिंकिला तो क्षणात ।
पाप्यास कैंच यश प्राप्त । अधोगत दुष्टाशी हो ।।४८।।
परसराम विजयी जाला । अयोध्याराजी तो स्थापिला ।
कामधेनु घेवोनी आला । तो भेटला मातापित्याशी ।।४९।।
तो राज्य करी आनंदान । साधुसंता करी पाळन ।
जैनधर्मी असे निपुन । पुढतीस धन करील तो ।।५०।।
काव्यश्लोक–भवति जगति शूरः पडितो दिव्यलक्ष्मी– ।
पतिरिहसुखयुक्तः पुण्यपण्येन जीव ।
इति मनसि विचारं चारुकृत्वा सुभव्या. ।
कुरुत जिनमतोक्त सारपुण्यं सुखाय ।।५१।।

**इति कथा परसराम ।।५६।।**

श्लोक–यन्नाम–स्मृति–मात्रेन, प्राप्यते सारसपदा ।
तं प्रणम्य जिन वक्षे, सुकुमाळकथा मुदा ॥५२॥
कौशाम्बी नगरी ते विख्यात । अतिबल राजा पुण्यवंत ।
सोमश्रमा तो पुरोहित । ज्ञानवंत सुविचक्षण ॥५३॥
काश्यपी कामिनी तयास । वशी जन्म जाला पुत्रास ।
अग्निभूत्ति वायुभूतिस । सप्तवरुषे विद्यायोग्य ॥५४॥
ते दोघे पुत्र प्रमोदन । विद्या न ये तयालागुन ।
पूर्वी नाहीच केले पुण्य । मुखोत्पन्न कैंचि भारती ॥५५॥
श्लोक–पूर्वदत्तेसु या विद्या, पूर्वदत्तेसु या भार्या ।
पूर्वदत्तेसु यं धनं, अग्रे धावति धावति ॥५६॥
सोमश्रमा तो पुरोहित । काळव्याळेन तो डौसित ।
मृत्यु पावोन शोकशात । दिन बहुत जाले त्यासी ॥५७॥
गोत्रज सर्व मिळोनिया । पुरोहितपद हिरोनिया ।
मूर्खासी दान मान माया । केउत तया धन प्राप्त ॥५८॥
सभेत मानभंग जाला । गेले राजगृहनगराला ।
सूर्यमित्र चुलत्यासी केला । वृत्तान्त जाला तो सर्वही ॥५९॥
सूर्यमित्र तो ज्ञानसिंधु । केला पूर्ण तयासी बोधु ।
विद्या सीकवि नानाविधू । शास्त्रसिंधू व्याकर्णादिक ॥६०॥
विद्या शिकला पितृपाशी । आला आपुल्या स्वगृहासी ।
स्वविद्या भूपतिपासी । पढे सभेसी पुरोहित ॥६१॥
तो राजा ज्ञानी अतिवळ । दिल्हे पुरोहित पदस्थळ ।
पढे बृहपति कोवळ । राजा दयाळ तुष्ट मानसी ॥६२॥
एकदा राजगृहप्रदेशी । सरोवर पाळि तीरासी ।
संध्याया अर्घ्य सूर्यासी । देता तत्घडिसी काय जाले ॥६३॥

राजाने मुद्रिका दिधली । ते सरोवरात पडली ।
जळामध्ये तळास गेली । ते देखली जाला भयभीत ॥६४॥
जिनमंदिरासी जावोन । देवाधिदेवा करी नमन ।
सद्‌गुरूपासी येवोन । पचाग नमोस्तु करी ॥६५॥
सुधर्मकीर्ती मुनीश्वर । अवधिज्ञानी दयाकर ।
तयासी सागे जळातर । मुद्रिका कर पडती स्वामी ॥६६॥
अवधिज्ञाने ते पाहिली । भूमी कमळाग्रे बैसली ।
प्रात काळी उगवली । वऱ्हे आली कमळकळचा ॥६७॥
तुवा प्रात काळी जावोन । मुद्रिका घेई करागुळीन ।
ते ऐकोन सूर्यामित्रान । प्रातःस्नान तेथे गेला ॥६८॥
चारी दिशा अवलोकून । पाहिला स्नानाचा ठिकान ।
पुरोहित करि प्रात स्नान । करिता नयन देखे मुद्रा ॥६९॥
करागुळी घालोनी तया । सध्यावदन करोनिया ।
स्वामीपासी येवोनिया । नमन पाया भावयुक्त ॥७०॥
जोडोनिया तो द्वयकर । विनय करी वारवार ।
मम मस्तकी ठेवावा कर । पुढील होनार ते विद्या सागा ॥७१॥
तयाचे उत्तर ऐकोनी । हे ज्ञान ते दीक्षेवाचोनी ।
जैनधर्मप्रकाश करूनी । अवधिज्ञानी होशील ॥७२॥
स्वामी म्हणे सूर्यमित्रासी । विद्या शिकला गुरूपाशी ।
तैसीच विद्या धर्मराशी । शिकशी तरीच येईल ॥७३॥
विद्यालोभ धरी अतरी । दीक्षा मागे तो जैनेश्वरी ।
सन्यास घेवोनि लौकरी । गुरूमुद्रा धरी सूर्यमित्र ॥७४॥
पुन: पुन: गुरूपासी । मुनिक्रिया सागा मजसी ।
गुरूमुखे ज्ञान आसी । प्रसन्न त्यासी भारती ते ॥७५॥

मुनिक्रिया ज्ञाने संपूर्ण । शास्त्राभ्यास सिद्धान्तज्ञान ।
ग्यारा अंग चौदा पूर्व । अभीक्ष्णज्ञान जाल त्यासी ॥७६॥
गुरुची आज्ञा घेवोनिया । एकलाविहारी होवोनिया ।
कौशाबीनगरा जावोनिया । तपश्चर्या करीतसे ॥७७॥
आहारचर्या करावयासी । नगरात आले ते तपस्वी ।
अग्नीभूती मंदिरासी । पंचमुद्रेसी धरोनि यवौ ॥७८॥
अग्निभूतीन तयात । भक्तीयुक्तीन पडघावित ।
निरंतर जाले गुरू तेथ । तुर्यदमात आशीर्वाद ॥७९॥
अन्नदान जगती सार । सर्व सुखाचे ते मंदिर ।
सुपात्रासी भावे आहार । देति तर त्यासी मोक्षमार्ग ॥८०॥
तत् वायुभूति लघुभ्राता । क्रोध उत्पन्न तया चित्ता ।
याने आमच्या अनहिता । ब्राम्हणत्वासी टाकिले ॥८१॥
तयासी न करी नमन । निंदा द्वेषे दुर्वचन ।
बोल बोले महाकठीण । ते बधून ऐकिले सर्व ॥८२॥
अग्निभूति म्हणे बधुसी । निंदाकर्म पापाची रासी ।
निंदेने दुर्गति जीवासी । पापरासी न करावी सख्या ॥८३॥
गुरूपासी अग्निभूतीन । सुधर्म ऐकिला सपूर्ण ।
त्रिधा वैराग्य त्यासी उत्पन्न । मोक्षसाधन मागे स्वामिसी ॥८४॥
गुरूराय कृपा करोनी । दीक्षा दिधली भवतारणी ।
क्रिया सिद्धान्त जिनवानी । तपे तरणी सूर्यासमान ॥८५॥
अग्निभूतीची जे का प्रिया । सोमदत्ता सती ते जाया ।
चित्ती दु:खी होवोनिया । सागे तया वायुभूतीसी ॥८६॥
अहो तुम्ही आमचे दीर । मुनीसी न केला नमस्कार ।
निंदा केली तयाची थोर । मम भ्रतार पश्चात्तापासी ॥८७॥

वैराग्य करोन जाले जती । तुम्ही पापी वायोभूति ।
आमचे संसाराची शाती । केली दुर्मति तुमचेनी ॥८८॥
ऐसे ऐकोनिया तयासी । क्रोध आला त्याचे मानसी ।
जाय जाय गे त्याजपासी । नग्नमुनीसी भेटावया ॥८९॥
अशीच तो परद्वारी । त्याची वर्णीसी येथे थोरी ।
जाय येथोनी झडकरी । लत्ताप्रहरी ताडिली ते ॥९०॥
ऐकोनि त्याची पापवानी । हे निंदा पाप दु खखानी ।
पादघात मजलागुनी । भोगिसी योनि दुःखदाई ॥९१॥
मूढ जे निंदा करिताती । आवडी विष भक्षिताती ।
आप आपना मारक होती । मूढ भोगिती दु खयोनी ॥९२॥
मुनिनिंदा पापे करोन । वायुभूति रोग उत्पन्न ।
दुर्गंध शरीरी कुष्टेन । दु ख दारुण त्या न सोसावे ॥९३॥
पापभारे करोनीया । कुष्ट दुष्ट भोगोनिया ।
गर्दभीजन्म घेवोनीया । डोंबारिया घरी गाढव ॥९४॥
दु·खे मृत्यु तेथेहि जाला । शूकरी पोटी जीव जन्मला ।
दुःख भोगिता प्राण गेला । तिर्यंचयोनीला महत्दुःख ॥९५॥
नरदेही पाप करावे । स्त्रियेचे जन्मासी घ्यावे ।
हे जानोनिया भव्यजीवे । न करावे पापकारण ॥९६॥
सुकरी मरोनी कुत्री जाली । चंपापुरीमध्ये जन्मली ।
अंत्यजाघरी स्थिरावली । मृत्यु पावली श्वानी तेथे ॥९७॥
तेथेच चाडाळ कुशीशी । कन्या जन्मली अपेशी ।
दुर्गन्ध व्याप्त सर्वांसी । पिटली वनासी पापीन ॥९८॥
क्षुधापीडित वनवासी । जाभळ खाय पापरासी ।
अग्निभूती पाहे तियसी । सर्वांगासी महादुर्गंध ॥९९॥

शिष्य पुसे अहो गुरूराया । सूर्यमित्र हे कीर्तिराया ।
हा जीव दुष्ट तो पापिया । याचि काया हे अपवित्र ॥१००॥
याने काय पापात केले । ते सांगावे स्वामि वहिले ।
ते ऐकोनि गुरू बोलले । अवधि पाहिले ज्ञाननेत्रे ॥१०१॥
तुझा भाऊ वायुभूती । मुनिनिंदा पाप भोगिती ।
प्रथम कूष्टि मृत्युप्राप्ती । पापे होती ते गर्दभी ॥१०२॥
मरोनी जन्मली डुकरी । तेथे मृत्यु मग कूतरी ।
तेथोन चाडाळाचे घरी । जाली कुवरी ते पापी जीव ॥१०३॥
मातग टाकिली वनात । तो जीव हा भोगी पापात ।
ते तयेसी जाल श्रृत्य । जातिस्मरणात जाल तियसी ॥१०४॥
शरण शरण गुरूराया । तुम्ही तारक षट्काया ।
मजवर करावी दया । सांगा उपाया कर्मक्षयासी ॥१०५॥
मुनेश्वर कृपा करोनी । पंचाणुव्रत तिसी देवोनी ।
व्रतफळे पापाची हानी । चंपापुर भुवनी जन्मली ॥१०६॥
पुरोहित तो द्विजोत्तम । पुत्री नागश्री उत्तमोत्तम ।
द्वादशवरुषे स्वस्थधाम । सुखी क्षेम नादताती ते ॥१०७॥
एके दिवसी उद्यानवनी । श्रेष्ठी मत्री कन्या मिळोनी ।
नाग पूजावया लागोनी । वनभुवनी दोघी आल्या ॥१०८॥
पूजा करोनी वनसंपति । सख्यासहित पाहताती ।
तत्समयी देखिले जती । अग्निभूती तो सूर्यमित्र ॥१०९॥
नागस्त्रियन त्या पाहोन । केले पचाग त्या नमन ।
सन्मुख बैसल्या जावोन । पूर्वस्नेहान प्रीती मानसी ॥११०॥
शीषे वदे जी गुरूराया । मम मानसी स्नेहमाया ।
उद्भवली या नागस्त्रिया । कृपा करोनिया सागावे ॥१११॥

तत् बंधु वायुभूती जीव । सम्यक्त्व अणुव्रत वैभवं ।
शुभ कुळी जन्म अपूर्व । सुख सर्व पुण्यवंतासी ॥११२॥
ते श्रवन नागस्त्रियसी । नमोस्तु केला गुरूचरणासी ।
जिनगुणसपत्ति व्रतासी । द्यावे मजसी श्रीसद्गुरू ॥११३॥
व्रत आशीर्वाद घेवोन । कन्या गेली आपुले स्थान ।
द्विजकन्यालोक मिळोन । वर्तमान पित्यासी सागे ॥११४॥
तो नागशर्मा द्विजवर । म्हणे कन्ये ऐक उत्तर ।
ब्राह्मणकुळ महाथोर । व्रत मुनीवर योग्य नोहे ॥११५॥
जैनधर्मी गुरू टाकावा । वेदाग उपदेश घ्यावा ।
ते ऐकोन कन्येचे जीवा । पितृभावा त्रास मानित ॥११६॥
अहो तात काय बोलले । आत्महित व्रत म्या घेतले ।
कैसे टाकावे परबोले । तजवेल निश्चय जाना ॥११७॥
तत् क्रोध आला ब्राह्मणासी । करी धरिले स्वपुत्रीसी ।
चाल वेगी तू मुनीपासी । पुसेन त्यासी रीती नीती ॥११८॥
मार्गी चालता दोघेजन । तव देखिले दृष्टकारण ।
एक्या पुरुषाशी बधन । सुळारोपण करावयासी ॥११९॥
पुढे कुवाद्ये वाजताती । जन कोल्हाळ करिताती ।
ते पाहोन कन्या त्याप्रति । जाली बोलति काय रे साग ॥१२०॥
तुजसी जालेसे बंधन । याचे सागावे कारण ।
ऐकोनी बोले वरषेण । आमच धन नेलं म्हणती ॥१२१॥
मज कष्टवि तो वाणिक्पुत्र । राजकिंकर जग सर्वत्र ।
धन नाही म्हने वगत्र । निश्चय मात्र त्याचे अतरी ॥१२२॥
जावो गेला तरी प्राण । तो न सोडी आपुले मान ।
व्रत दत्त मुनीश्वरान । मी न टाकीन वापराया ॥१२३॥

पिता म्हने कन्ये ! आइक । व्रत आताच ठेवी नीक ।
मग तुजसी तो आनिक । देईल बालिके नग्नमुनी ॥१२४॥
तेथोनी नागश्री चालता । तोचि नर देखिला अवचिता ।
बंधन केले पुष्टिहस्ता । पुसे वनिता त्या नागश्री ॥१२५॥
वाणीपुत्र नारद मजसी । गाली देती जनही मजसी ।
काही नाही वो मजसी । पापि मजसी गाजितात ॥१२६॥
एकदा राजाने ऐकिले । लटकेचि मला बंधन केले ।
राव कोपायमान जाले । छेदा म्हणाले कर-पाद-जिव्हा ॥१२७॥
एक बाई त्याच दोषान । पापी ताडिती मजकारण ।
शष तरी कबूल होन । नाहीच म्हणे पूर्ववत् बुधै ॥१२८॥
अहो हो चोर परद्वारी । पापलोभ त्याचे अतरी ।
तत् व्रत टाकू कैशापरी । जन्मजन्मातरी सुखदाता ॥१२९॥
नागशर्मा म्हणे वो कन्ये । काए वर्णिसी व्रत साहणे ।
हे मुनीस देई जावोन । माझे वचन सत्य करी ॥१३०॥
नागश्री म्हणे पितियासी । मी न टाकीन या व्रतासी ।
दुर्जन गाजिती मजसी । सज्जन आम्हासी तेच होती ॥१३१॥
द्विज क्रोधाग्नि होवोनिया । स्वामी सन्निध जावोनिया ।
अरे रे मुने नगत्वया । मम कन्या तुवा भोंदिली ॥१३२॥
व्रत दिधल त्वा आपुल । ब्राह्मण कर्म बुडविल ।
क्रोधान अद्वातद्वा बोल । कुबुधी बुडाल जीवापायी ॥१३३॥
व्रतशीळ ते महाथोर । त्यास टाकिती जे नर ।
धर्म त्यजोन कर्मा सादर । तेच पामर दु खभोगी ॥१३४॥
सूर्यमित्र म्हणे ब्राह्मणा । हे तो माझी सत्यकन्या ।
माझी म्हणतोस तुफान्या । बोलावी कन्या आपली तू ॥१३५॥

तुझ्याजवळ ते येईल । तरी ते तुझी म्हणवील ।
आमची आम्हापासी राहील। सत्येच बोल बोलावी तू ।।१३६।।
बोलाविता ते तो न जाय । द्विज म्हणे हे काय हे काय ।
त्वरीत रुदित तो जाय । राजसभा फिर्यादी ।।१३७।।
चंपापुरी चद्रवाहन । तया द्विज सांगे गाऱ्हाण ।
माझी कन्या घेतली हीरोन । नग्नमुनीन बळत्कारे ।।१३८।।
ते ऐकोनिया सर्वजनी । आश्चर्य करी अत.करणी ।
कोठे आहेत साग मुनी । चला वनी जाऊ सर्व ।।१३९।।
राजा श्रावक मिळोनिया । नमोस्तु केला मुनिपाया ।
आसिर्वाद घेवोनिया । मुनिराया अवलोकिती ।।१४०।।
द्विज करितसे पुत्कार । माझी कन्या द्यावी सत्वर ।
मुनी वदे रे तू गवार । वारवार वाद करिसी ।।१४१।।
हे कन्यका महासद्‌गुण । चतुर्दशविद्या परिपूर्ण ।
सिद्धान्तज्ञान ते संपूर्ण । नृप ऐकोन पृच्छा करी ।।१४२।।
कन्या मुखोद्‌गत सरस्वती । श्रवण करू पुण्यकीर्ती ।
गुरू तो सूर्य मित्र कीर्ति । कन्येप्रति सुचेनार्थदा ।।१४३।।
जगच्चित्त महासंशय । तिमिर अध.कार हृदय ।
जिनवाणी ज्ञानसूर्य । प्रकाश होय ग्यारा अग ।।१४४।।
मुनी सागे पूर्वील खूण । वायोभूती जातिस्मरण ।
सपूर्ण ते सिद्धान्तज्ञान । होता श्रवण राजाश्चर्य ।।१४५।।
नागश्रिया ते सप्ततत्त्व । षड्द्रव्यादि ग्रथ पूर्व ।
मतिश्रुतिअवधि वैभव । ज्ञानार्णव केवळवानी ।।१४६।।
वाणी रसाळ प्रियकर । जनमन रजन सुदर ।
विस्मित जाला नरेश्वर । मुनीश्वर प्रार्थिला भावे ।।१४७।।

अहो हो श्रीपूज्य ऐसे ज्ञान । सांगा जीवाचे पूर्व पुण्य ।
राजपृच्छा अमृतासमान । सभाजन संताशातरि ॥१४८॥
मुनीराज अवधीज्ञानी । मधुरगिरा केवळवाणी ।
पूर्व भवातर कहानी । पापखानी तो वायुभूति ॥१४९॥
मुनीनिंदादि पापभोग । नानादु:ख भवाब्धिरोग ।
नरतिर्यंचाच भोगमार्ग । नाना उपसर्ग दु.खाचे ॥१५०॥
श्रवण होता राजा अंतरी । पश्चात्ताप हृदयातरी ।
क्रोध मान माया हे चारी । जन्मातरी दु:खाचे कारण ॥१५१॥
धिक् धिक् आता ससार । वैराग्य उद्भव अतर ।
बोलाविला विजयी पुत्र । राज्यभार समर्पिला ॥१५२॥
श्रीगुरूसी नमस्कारुनी । दीक्षा घेतली भवतारणी ।
नागशर्मा ब्रह्मज्ञानी । करी विनवनी मुनीराय ॥१५३॥
क्षमा करा सर्व अन्याय । दयावत श्री स्वामीराय ।
द्यावे मजसी दान अभय । सुधर्म उपाय दाखवी ॥१५४॥
धर्मामृत श्रवण केले । त्रिधा वैराग्य उद्भवले ।
संन्यास ग्रहण घेतले । तप करू लागले दुर्धर ॥१५५॥
आयुष्यांती अच्युतस्वर्ग । देव जाला मोक्षाचा मार्ग ।
नागश्रियसी तोचि मार्ग । अच्युतस्वर्ग देव जाला ॥१५६॥
अहो भव्य हो जगीसार । गुरू चिंतामणी तो धीर ।
तयाचे प्रसादे कर्म दूर । सुखमदिर जीवासी प्राप्त ॥१५७॥
अग्नि मंदरगिरीवरी । सूर्यमित्राग्नी भूतपकरी ।
घातिकर्माचा क्षय करी । केवळातरी ज्ञानोत्पन्न ॥१५८॥
जग उपदेश करोनिया । प्राप्त मोक्ष अक्षय ठाया ।
तत् प्रकारे श्रीदेवराया । करावी माया लघुचद्राची ॥१५९॥

यानंतरे अवंती देशात । उज्जनी नगरी पुण्यवंत ।
इंद्रदत्त श्रावक सत । जिनभक्त धर्ममार्गी तो ॥१६०॥
गुणवती तयाची राणी । रूपसौभाग्याची ते खानी ।
तिच्या उदरी स्वर्गाहुनी । देव च्यवोनी पुत्रजन्म ॥१६१॥
नागचर सुरेंद्र देव । पूर्वपुण्याचे वैभव ।
सुरेंद्रदत्त ठेविले नाव । करी उद्भव चंद्रासमान ॥१६२॥
सुभद्र श्रेष्ठी त्या नगरी । सुभद्रा नारीचे उदरी ।
यशोभद्रा सुदरपुत्री । सुरेंद्रदत्त स्त्री पर्णिली ते ॥१६३॥
नाना भोग मनइच्छित । पूर्वपुण्य सर्वही प्राप्त ।
जैन धर्म सदैव रत । देवगुरूभक्त सदाचारी ॥१६४॥
एकदा यशोभद्रा नारी । अवधी मुनी आले भावरी ।
नवविधा पुण्य निरतरी । पृच्छा वैखरी स्वामिराया ॥१६५॥
मज पुत्र केव्हा होईल । ते सागाव जी सत्यबोल ।
मम मनशा पुरेल । हर्ष होईल ममातरी ॥१६६॥
ऐकोन तयेचे वचन । मुनी सागे अवधीज्ञान ।
पुत्र होईल पुण्यवान । रूप सद्गुण मडित तो ॥१६७॥
तुझा भर्ता सुरेंद्रदत्त । पाहोनिया पुत्रमुखात ।
दीक्षा घेईल पुण्यवत । मोक्षमार्गात साधील ॥१६८॥
तुझा पुत्र पुण्यवान । होताचि मुनीचे दर्शन ।
भोग त्याग सर्व करोन । दीक्षाग्रहण करील तो ॥१६९॥
ऐसे ऐकता ते सुदरी । हर्ष पुत्रार्थी बहुअतरी ।
एके दिनी गर्भ उदरी । यशोभद्रा नारी हर्षली ॥१७०॥
नागश्रीचर देव च्यवोनी । पुत्र जालासे शुभदिनी ।
महामहोत्सव करोनी । नामाभिधानी सकुमाळ तो ॥१७१॥

प्रौढ झाला दिवसमासी । पिता पाहोनिया पुत्रासी ।
श्रेष्ठीपद देवोनिया त्यासी । मुनीपासी दीक्षा घेतली ॥१७२॥
पूर्वपुण्य करोनिया । नवयौवन पावोनिया ।
पर्णिल्या कुळवत स्त्रिया । रूपवत जाया षड्गुणी ॥१७३॥
बत्तीस स्त्रियाचे सागात । भोग भोगी मनइच्छित ।
न जानेचि दिवसरात । ससारात निमग्न जाला ॥१७४॥
यशोभद्रा ते तयाचि माय । मोह धरी पुत्राचा हे स्नेहे ।
मुनी वाणी धरी हृदय । करी उपाय पुत्रासी ते ॥१७५॥
मुनीदर्शन तपा जाईल । म्हणोनी त्या रक्षण केल ।
भावरीपुण्य आतरल । स्त्रियाचे बोल अनहित ॥१७६॥
कित्येक दिवसाउपरी । उज्जेनीचा एक व्यापारी ।
तया राजगृहनगरी । रोजगारी रत्नकावळे ॥१७७॥
ते रायासी दाखविले । दोन चौकड्या अमोल ।
कलाबुती हीरे जडले । मागितले मोल मिळेना ॥१७८॥
कोन्ही सावकार न दिसे तेथे । भ्रमण करी तो ग्रामाते ।
हवेली देखिली उन्नत । बैसला तेथे चितातुर ॥१७९॥
म्हणे एवढे थोर थोर । दिसतात हे सावकार ।
कोन्ही न घे द्विआष्टचीर । राजादी सारे द्रव्यहीन ॥१८०॥
तेथे ते यशोभद्राबाई । म्हणे वा बोलतासि काइ ।
एक वोझ अनल नाही । द्विजाष्ट काई पूरतील ॥१८१॥
मम स्नुषा बत्तीस । मज सुद्धा दादा त्रीतीस ।
रुसतील एकमेकास । हे तो षोडश आंगवस्त्र ॥१८२॥
सौदागरासी बोलाऊन । मोल वस्त्राचे घे प्राहोन ।
गीनती करोन एकसिक्का । . . . . ॥१८३॥

कोठड्या भरल्या अपार । संपत्तीचा अत ना पार ।
आश्चर्य करी सौदागर । वारंवार संपत्ती पाहे ॥१८४॥
तव ते पीतावर सोळा । द्विभाग करी ते वेल्हाळा ।
नेसल्या त्या द्विषोडशबाला । एक वेळा नित्य नवे नवे ॥१८५॥
पितृ इंद्रसपदा भोगी । अवधिज्ञान पुत्रालागी ।
इंद्रदत्त संपदाते भोगी । पुण्यानुरागी सर्वसुखी ॥१८६॥
एकदा साळुकी पक्षीण । राजमंदीरी ये त्वरे करोन ।
पाद पीत चंचू रक्तवर्ण । गवाक्षसदन बैसली ॥१८७॥
मजुळस्वरे बोले वाणी । राया ऐक चित्त देवोनी ।
तुझे ग्रामात एक प्राणी । इंद्रभवनी इद्र जैसा ॥१८८॥
काया जेवि कर्दळीगात्रा । पीतवर्ण सुवर्णप्रभा ।
दिव्या देवागना स्त्रिया शोभा । मदिरी आभा रत्नमय ॥१८९॥
शोभा देखोनिया ऐसी । सागावया आले तुजसी ।
चाल दाखविते तुजसी । हर्ष मानसी निघे त्वरा ॥१९०॥
राजा चालला पाहे त्यात । सकुमाळ देखिला अवचित ।
जेवि रत्नप्रभा उद्योत । हारिप्रियासूत त्यापरी ॥१९१॥
ऐसा पाहे भोजनवेळा । आश्चर्य करी हृदयमेळा ।
मातेसी पुसे राव भोळा । ते सागे सोहाळा पुण्याचा ॥१९२॥
भोजन जालियानतर । हौद भरले पूर्ण ते नीर ।
जलक्रीडा मनोहर । राजेश्वर सहित क्रीडती ॥१९३॥
राजमुद्रा पडली तेथ । राव पाहे त्या जळातील ।
त्यात आलकार समस्त । नित्य नित्य त्याग करिती ॥१९४॥
पाहोन राजा आश्चर्य करी । पूर्व पुण्याची हे सामग्री ।
भव्य जानोनिया अतरी । कैशाही परी पुण्यार्चना ॥१९५॥

पुण्यप्रभावे धनधान्य । सुसपदा सुखसंपन्न ।
पुत्रमित्र कलत्र सगुण । रूपयौवनभरमडित ॥१९६॥
सत् बाधवान् सुखसंपत्ति । नाना वस्त्र दिव्य शोभती ।
रगीत महाल दिसताती । माडीवरौती सप्तताल ॥१९७॥
रथहस्ती सोकाअसन । मानसन्मान सुभूषण ।
रूपवत्या स्त्रिया षड्गुण । जिनभाषित पुण्यप्राप्त ॥१९८॥
तस्मात् त्यक्त्वा कुमिथ्यामत । सद्धर्म दृढ हृदयात ।
द्रव्य खर्चा सप्तक्षेत्रात । पुण्याचे पर्वत जीवासी ॥१९९॥
सुपात्रदान चतुर्विध । मनइच्छित आहार शुद्ध ।
पुण्य जोडावे नवविध । भाव त्रिशुद्ध धरोनिया ॥२००॥
पूर्व पुण्य करोनिया । सकुमाळ सुखी स्वठाया ।
तत् मामा गणधराचार्या । ज्ञानवर्या सिद्धान्तमत ॥२०१॥
अवधी जानोनीया तेन । सकुमाळ आयुत्रिदिन ।
उद्यानवनात येवोन । प्रतिष्ठापन योग धृत्वा ॥२०२॥
यशोभद्रा जानोनी मात । निवारीले तया मुनीत ।
प्रज्ञप्ति विद्या असे त्यात । उर्ध्वपथे पठन करी ॥२०३॥
सकुमाळ ते ऐकोनिया । जातिस्मरण जाल तया ।
मुनी पार्श्वं तो जावोनिया । नमोस्तु पाया त्रिशुद्धीन ॥२०४॥
आशीर्वाद मुनी वदत । तीन दिन आयु तुम्हात ।
वेगी घेवोनी दीक्षेत । आत्महित स्वर्मोक्षदायी ॥२०५॥
ते ऐकोनिया सकुमाळ । त्वरित दीक्षा गुणोज्वळ ।
धर्मध्यान हृदयकमळ । संन्यास सकळ तपस्वी ॥२०६॥
तेव्हा पूर्व वैर करिता । अग्निभूती सोमदत्ता ।
निदानबंध पादघाता । भ्रमत भ्रमता वैर साधी ॥२०७॥

जन्म शृगालयोनीत । चारपुत्रा त्या सहित ।
भक्षण करिति मुनीत । परीसह साहत ध्यानी ॥२०८॥
सकुमाळ मुनी धीर मेरु । समता भाव शत्रु मित्रु ।
समाधी साधी तपशूरू । करी सहारु कर्मवैरी ॥२०९॥
तृतीय दिवशी देहे ठेवीत । अच्युतस्वर्गी जन्मस्थित ।
महर्द्धिक देव होत । सुख भोगीत पूर्ण आयु ॥२१०॥
अहो भव्य व्रतपुण्यान । सर्व सिद्धीचे कारण ।
सकुमाळ विमानी बैसोन । यात्रा तीर्थाटन करीत ॥२११॥
तदा उज्जेनी नगरात । काय जाल विपरीत ।
कुदेवता जनपीडित । कोल्हाळ करीत भोभाती ॥२१२॥
ते देखिले त्या देवान । गधतोय वृष्टी करोन ।
सर्वजना सुख सपन्न । समाधान सुखी अस्तु ॥२१३॥
तत्र गधवती नदी तीर । विराजमान पृथ्वीवर ।
संगम भागीरथीनीर । उपसमुद्रासी मिळाली ॥२१४॥
श्लोकः-स श्रीमान् वरभोगसगनीरतो ज्ञात्वा मुनेर्वाक्यत' ।
स्वल्प जीवितमात्मनो हि सकल त्यक्त्वा कलत्रादिक ॥
धृत्वा चारु-तपो जिनेद्रकथित सोढ्वा पशूपद्रव ।
देवोभूत् सकुमाळनिर्मळमुनिभूर्यात् सता शातये ॥२१५॥

**इति कथाकोशे श्री सकुमाळ कथा श्री गुरूरत्नकीर्ती स्वामीजी तत् शिष्य चंद्रकीर्ती विरचिते प्रसंग ३९ कथा ५७ सत्तावन समात शुभं भवतु ॥**

• • •

## प्रसंग चाळीसावा

### ॐ नमः सिद्धेभ्यः ।

श्लोक –अर्हंतं त्रिजगत्पूत भारती भुवनोत्तमां ।
नत्वा गुरू प्रवक्षेहं सुकोशलकथामिमा ॥१॥

अयोध्या नगरी विस्तीर्ण । प्रजापाळ राजा सद्गुण ।
श्रेष्ठी सिद्धार्थ लक्ष्मीवान । धर्मपुण्यसमन्वित तो ॥२॥
बत्तीस स्त्रिया त्याजप्रती । षग्गुण भार्या रूपवती ।
पूर्व कर्म योग तयाप्रती । पुत्र सतती वर्जित तो ॥३॥
अहो हो पुत्राविना नारी । शोभत नाही संसारी ।
पत्रशाखादि नानापरी । भूमीवरी वृक्ष निर्फळे ॥४॥
त्या समस्तात अतिप्रीति । प्राणवल्लभा गुणवंती ।
पुत्रार्थी उपाय करती । ते जयवती मन इच्छोन ॥५॥
यक्षयक्षी कुदेवधारी । मत्र तंत्रादि भालदोरी ।
पूर्व पुण्य नाही पदरी । खर्चिती नारी धन व्यर्थ ॥६॥
श्री गुरूराय महामुनी । भावरी आले एके दिनी ।
नतर पुसे ते कामिनी । सांगा मुनी सतता उपाय ॥७॥

मुनी म्हणे ऐका वचन । जैनधर्मी निश्चयकरण ।
कुदेवपूजा दुःख दारुण । द्यावे सोडोन कुदेवासी ॥८॥
या सप्तमासा मध्यतरी । गर्भ संभवेल उदरी ।
ते ऐकोनी सर्व नारी । धर्म अतरी निश्चयेसी ॥९॥
ततः कोन्हे एके दिवसी । गर्भोत्पन्न जयवंतीसी ।
सुकोशल नाम तयाप्रती । आनद सर्वासी जाहला ॥१०॥
एके दिवसी त्या श्रेष्ठीन । स्वपुत्राचे मुख पाहोन ।
नयधर मुनी विनऊन । दीक्षा घेवोन बैसला तो ॥११॥
जयवतीन ऐकोनिया । क्रोध उत्पन्न सर्व स्त्रिया ।
मुनीसमीप जावोनिया । परीसह तया दु स्सह ॥१२॥
ऐसे करणे होते तुम्हासी । तरी का धेनु गोविल्या फासी ।
चाला आपुल्या गृहासी । चौथ्या आश्रमासी घ्या दीक्षा ॥१३॥
अहो हो स्वामी मुनीराय । दीक्षेची न पाहती सोय ।
बत्तीस स्त्रिया तारुण्यवय । टाकू नये बोक्यासरीसे ॥१४॥
मुनी वदे ऐकावे बाई । आम्हासी श्रुत नाही काई ।
नूतन दीक्षा याच ठाई । गुरूचे पायी घेतली म्या ॥१५॥
बाई चोऱ्यांशी लक्षयोनीत । नरदेहदुर्लभप्राप्त ।
त्यातही स्त्रिया जन्म होत । दुर्लभ ह्यात पुरुषत्व ॥१५॥
जरी नर पुरुष जाला । कुळोत्तम दुर्लभ त्याला ।
जैन धर्म त्याला लाभला । दुर्लभ जीवाला दीक्षा हे ॥१७॥
बाई दीक्षा पुण्यपावनी । सर्वसुखाची हे ठेवनी ।
नेमिनाथ बाळत्वपणी । दीक्षाग्रहन लग्नसमयी ॥१८॥
बाई चिंतेसी न करण । पुत्रावरी दृष्टिसी देन ।
करावे त्याचे प्रतिपाळन । सुख समाधान सर्वासी ॥१९॥

ऐसे संबोधिता तयासी । मौन धरी सिद्धार्थ ऋषी ।
मग त्या पावल्या शातिसी । गेल्या गृहासी आपुलाल्या ॥२०॥
पुत्रवृद्धी पुण्यानुसार । जैसा तो द्वितीयेचा चद्र ।
रूपशोभा रुक्मिणीपुत्र । विद्या सर्वत्र सिकला तो ॥२१॥
तारुण्य आणि पुण्यवंत । आरोग्यकाया लक्ष्मीकात ।
सोयरे मिळोनी समस्त । कन्यालग्नाते महात्सवे ॥२२॥
वडिलाचे पूर्वपुण्य । चाल चालले त्याचि प्रमाण ।
बत्तीस स्त्रिया सद्‌गुण । पूर्वपुण्ये सर्वसुखी तो ॥२३॥
पुण्ये सुदर स्त्रिया होती । आरोग्य कायाधन सपत्ती ।
सतत आणि गुरूभक्ती । वाढति कीर्ति धरातळी ॥२४॥
देव गुरू शास्त्र अभ्यास । नवविधा पुण्य घडे त्यास ।
चार दानाचा सायास । इच्छाभोजनास स्वहस्ते ॥२५॥
पुण्य पुण्य जोडी जोडती । विविधा संपदा भोगिती ।
तीर्थयात्रा ते करताती । सुखी असती गृहाश्रमी ॥२६॥
एकदा सुकोशल जननी । भार्या धात्री सर्व मिळोनी ।
माडीवरे उभे राहोनी । शोभा नयनी पाहताती ॥२७॥
तत्‌समयी सिद्धार्थ श्रीगुरू । देखिले भवसागर तारु ।
पुसे मातेसी तो विचारू । कोन दिगवरु हा आला ॥२८॥
सर्वही पाहती तयासी । माता सागे त्या पुत्रासी ।
कोन्ही रक आला नगरासी । काय पुससी तू बाळा रे ॥२९॥
मातेचे ऐकोनिया वचन । ऋद्धिवत रक कोठोन ।
सुनदा धात्रीबाईस म्हणे । निंदावचन बोलू नये ॥३०॥
अहो बाई हा मुनीद्र । आपुला दिसे कुळचद्र ।
ते ऐकोनिया खूननेत्र । वारिली धात्र सुनदाते ॥३१॥

स्वामी नावडे दुष्टस्त्रियासी । धर्म ना रुचे त्या मानसी ।
ना ऐकावे त्या वचनासी । मौन मानसी धरावे हो ।।३२।।
माता तयासी न मानी । नीतीपुत्र तो धरी मनी ।
मनचे मनी समजोनी । दुज्या बोलोनी पुसतसे ।।३३।।
तव सूपकार सागे गुप्त । भोजनवेळे यावे येथ ।
कृपा करोनी बाळकात । तारावे आप्त अनाथासी ।।३४।।
स्वामी ऐकोनी मम मानसी । संतोष जाला हृदयासी ।
ऐशा उत्तम पुरुषासी । पहावे मानसी हे इच्छा ।।३५।।
तेव्हा ते सुनदया धात्र । सागे पूर्वाच सर्व सूत्र ।
सुकोशल ऐकता गात्र । रोमाचे सर्वत्र जाहला ।।३६।।
त्रिधा वैराग्य त्या उत्पन्न । धिक् धिक् म्हणे हे जिन ।
दुष्ट स्त्रियचे सगतीन । कर्म भोगन येईल ।।३७।।
आता असो ते सर्व काही । उत्तम पुरुषे पाहू सही ।
प्रपंच टाकोनी सर्वही । चालला विदेही होवोन ।।३८।।
जैसा रणचेत्वारिवीर । हस्तकी घ्यावे म्हणे सीर ।
रणागणी तो धीरवीर । जितोनी वैर जै पावती ।।३९।।
तैसा तो सकुमाळ वाळ । टाकी सर्व घरजजाळ ।
जावोनीया श्रीगुरूजवळ । द्वैपदकमळ नमोस्तु ।।४०।।
आसीर्वाद ऐकोनी चित्ती । सद्गुरूशी करी विनती ।
मज तारावे धर्मयुक्ती । ज्ञानस्फूर्ती देवोनिया ।।४१।।
ज्ञाननिधी ते मुनीश्वर । धर्म सागोनी सारासार ।
द्विधा सागार अनागार । सर्व प्रकार श्रुतज्ञान ।।४२।।
तो जानोनिया आत्महित । ज्ञात्वा सद्भाव मुनीद्रोक्त ।
संतोप जाला हृदयात । स्वस्थचित्त तो गुरुपाशी ।।४३।।

मग तो गृहासीं येवोनी । बोलाविली सुभद्रा राणी ।
तत् पुत्र तो श्रेष्ठ सद्गुणी । त्या समर्पोनी गृहस्थिति ॥४४॥

दत्वा श्रेष्ठीपदं शीघ्रेन । सोडिले मोह माया धन ।
सर्वांशी क्षमाभाव त्यान । असो सपूर्ण अम्हावरी ॥४५॥

माता वदे रे निजबाळा । मज टाकोनी सकुमाळा ।
जाउ नको रे बा वेल्हाळा । सर्व कोल्हाळा करताती ॥४६॥

समजावोनी पुत्रमाता । स्त्रियापरिवारसमस्ता ।
समताभावे वनातीता । गेला त्वरिता धर्मभावे ॥४७॥

नमोस्तु केला श्रीगुरूशी । शरण आलो त्वत् पदासी ।
उद्धरावे मज दीनासी । चरणापासी ठाव द्यावा ॥४८॥

दयावंत ते गुरूराय । केला दीक्षेचा महोछाव ।
सूरमत्र त्या कर्णद्वय । मुनीराय त्या सागितला ॥४९॥

जगोपदेशाषि पुस्तक । दिधले श्रीगुरूनायक ।
पिछि दिधली त्या हस्तक । झाडोन भूमीके निद्रार्थी ॥५०॥

कुमता सौच्याचे कारण । उष्ण तोय त्या परिपूर्ण ।
दीर्घलघु शका करोन । पदप्रक्षाळन करावे ॥५१॥

ब्रम्हचर्य व्रत दिधले । अणुव्रत पच सागितले ।
महाव्रतासी श्रवन केले । सागितले दशलक्षण ॥५२॥

श्रवन केली सप्त तत्त्व । सोळाकारण भाव सर्व ।
ग्यारा अग ते चौदा पूर्व । त्रैलोक्यभाव षट्काळादी ॥५३॥

पंचज्ञान ते विचक्षण । सर्वविद्यादी पूर्वपुण्य ।
धर्मवत्सल सावधान । कर्मखडन करिताती ॥५४॥

जयवती त्याची माउली । आर्त्तध्यानानें मृत्यु पावली ।
तिर्यंच योनि प्राप्त जाली । जन्म पावली क्रूरयोनी ॥५५॥

व्याघ्री जाली पापप्रभावे । तीन पिल्ली जाली उद्भव ।
देवधर्म टाकिती जीव । कुगति भव जन्म घेती ॥५६॥

तदा तो मुनी कर्मयोगेन । मौद्गिल्ल पर्वत महाविस्तीर्ण ।
मागधदेश तपोवन । धरिले ध्यान घोर तपेसि ॥५७॥

चातुर्मासोपवास करी । पूर्णयोग जगदोधारी ।
पारणे करून जावे नगरी । तत् देखिला नेत्री व्याघ्रीन ॥५८॥

पूर्व वैर ते सबधेन । व्याघ्रीस क्रोध तो उत्पन्न ।
तत् काया करी भक्षण । चौघ मिळोनी तोडताती ॥५९॥

परीसह साहे तो मुनी । धर्मध्यानादी शुक्लध्यानी ।
जव जव भक्षिते व्याघ्रीनी । तव तव ध्यानी समाधिस्थ ॥६०॥

धर्मध्यानी मृत्युसमाधी । सर्वार्थसिद्धी पिता सिधी ।
दोघे बैसले सुखाब्धी । नानाविधी भोग भुजान ॥६१॥

सुकोशल यात्रा करोन । आयुष्यांती मधे भुवन ।
राज्ये कुळी तप करोन । मोक्षमार्गान जातील ॥६२॥

ते व्याघ्री पाहे नयनेन । तत् करि चारु लाछनेन ।
दृष्ट्वा करिता त्या भक्षण । जातिस्मरन जाल तिसी ॥६३॥

जानोनी पापाचा तो भार । संसार दु.खाचा डोगर ।
साडोनिया सुधर्माचार । चौऱ्याशी फेर भ्रमति प्राणी ॥६४॥

धिक् धिक् मम उत्पत्ति । आर्त्तध्यान प्राज्ञ दुर्गती ।
धिक् ससार निदाकृती । सन्यास प्राप्ती मृत्यु तीसी ॥६५॥

संन्यासयोग करोन । सर्व पापाचे दहन ।
स्त्रीलिंगाचे केले हनन । देव होवोन सौधर्मस्वर्गी ॥६६॥

अहो हो श्री जैन सद्धर्मे । पावन त्रिभुवनात्तमे ।
कोठ व्याघ्री कोठ सौद्धर्मे । स्थिती उत्तम स्वर्गीची ॥६७॥

जीवपुण्ये अनतबळी । त्रैलोक्याग्रे मुक्ती सांभाळी ।
पापे होउनी निर्बळी । जाय पाताळी दुर्योनिसी ॥६८॥

ऐसा श्रीजैनधर्मकर्ता । स्वर्गमोक्षाचे सुखदाता ।
आराध्यभक्ती नित्यकर्त्ता । भव्यासी प्राप्ता आत्मसिद्धी ॥६९॥

विशुद्ध श्री मूळसंघाख्ये । बळात्कार तो गण मुख्ये ।
सरस्वतीगच्छे नायख्ये । मम गुरू मुख्य रत्नकीर्ती ॥७०॥

तत् शीष अल्पमति करून । कवित्व करू इच्छि मन ।
गुरूराज आज्ञेप्रमाण । वरदहस्तेन होईल ॥७१॥

मज न कळे संस्कृतार्थ । ग्रंथ आरंभिला प्राकृत ।
न होता आज्ञापिले मात । दुज्या कोन्हाते न होय ॥७२॥

गुरूचे वचन प्रमाण । सरस्वती वदे सपूर्ण ।
श्रोते दयावत सज्जन । घ्या साभाळोनी चुकीभुली ॥७३॥

ग्रथ कथाकोश समुद्र । ज्ञानजीवन भयकर ।
सरस्वती गुरू तारु थोर । पैलपार ते उतरती ॥७४॥

दर्शन–ज्ञान–चारित्र । तीन आराधना पवित्र ।
संपूर्ण जाल्या पूर्वसुत्र । तप थोर आराधना चौथी ॥७५॥

श्लोक:–तत. श्रीजिनधर्मोऽसौ, स्वर्गमोक्षसुखप्रदः ।
आराध्यो भक्तितो नित्यं, भव्यै स्वात्मप्रसिद्धये ॥७६॥

काव्य.–प्रोद्यत्सम्यक्त्वरत्नो जिनकथितमहासप्तभंगीतरंगैः ।
निर्द्धूतैकातमिथ्यामतमलनिकरः क्रोधनक्रादीदूरः ।।
श्रीमत् जैनेद्रवाक्यामृतविशदरस' श्रीजिनेद्रप्रवृद्धी ।
जीयात् मे सूरिवर्योव्रतनिचयलसत् पुण्यपर्ण्यः श्रुताब्धिः ।।७७।।

इति कथाकोशे श्री रत्नकीर्तीस्वामि तत् शीष चंद्र-विरचिते श्री सुकोलकथावर्णनो नाम प्रसंग ४० चाळीसावा संपूर्ण शुभं भवतु कथा ॥ ५८ ॥ छ ॥



## प्रसंग एक्केचाळीसावा

### श्री पंचगुरुभ्यो नमः

श्लोक–प्रसिद्धं स्वगुणै सिद्ध, विशुद्धं जिननायकं ।
नत्वा गजकुमारस्य, कथयामि कथानक ।।१।।

श्री द्वारकापुरी सुदर । त्रिजगी ते प्रसिद्ध थोर ।
श्रीमन् नेमीजिनेश्वर । जन्मपवित्र ते भूमिका ।।२।।
तेथे वासुदेव भूपती । त्रिखडाचे राज्य करती ।
त्या गधर्वसेना स्त्रीसती । पुत्रोत्पत्ती गजकुमार ।।३।।
कोटि भट बळ उन्मत । सुभटामाजि । श्रेष्ठवंत ।
यत् प्रतापेन सुशोभित । वैरी भयभीत देशातरे ।।४।।
तदा पोदनपुरी राजा । अपराजित पाळी प्रजा ।
कोन्ही न जिकी त्यासी राजा । कीर्तिध्वज तो दुष्टबुद्धी ।।५।।
स्वनगरी वासुदेवान । दौडी दिली भृत्याकुन ।
राजा आणावा तो धरोन । पुर पोदन अपराजित ।।६।।
वर देईन मनवाछित । ऐसी दौडी त्या नगरात ।
कोन्ही वीर न दिसे तेथ । गजकुमारा श्रृत्य जाहले ।।७।।
त्वरित आला पितृपासी । नमन केले तत् पदासी ।
युधि जिकोनिया वैऱ्याशी । बाधोनी रथासी आनिला तो ।।८।।

मनवांछित दिधला वर । वीर शूर तो अतिथोर ।
वैरी जितिला प्रतापसूर । विजयी कुमर जाहला ॥९॥
बळ मद चढला भारी । विषयाध जाला शरीरी ।
भोगलंपट परनारी । दुराचारी सप्तव्यसनी ॥१०॥
श्लोक:-कामातुराणा न भय न लज्जा ।
अर्थातुराणा न पिता न बन्धु ।
क्षुधातुराणा न बलं न लज्जा ।
चितातुराणां न बुद्धि न निद्रा ॥११॥
धिक् कामांध दुराचारी । पाप दुर्धर परनारी ।
श्रावकनारी ते सुदरी । बळात्कारी तो भोगईछा ॥१२॥
श्रावकामनी क्रोध फार । बळ न चाले त्यासमोर ।
तो गावचा धनी पुत्र । त्यासी वैरत्व लाउ नये ॥१३॥
कित्येक दिवसानतर । केवळज्ञानी जिनेश्वर ।
समोशरन गिरीनेर । आले समय वदनेसी ॥१४॥
द्वारकेचे जन मिळोनी । पूजाष्टविध ते घेवोनी ।
जै जै शब्द उच्चारोनी । विंद्र मळनि भुवनत्रय ॥१५॥
बळदेव तो वासुदेव । वज्रकुमारादि ते सर्व ।
छप्पनकोडी ते यादव । पूजिती देव अष्टविधा ॥१६॥
स्तुत्वा नत्वा महाभक्तीन । सन्मुख बैसले कर जोडोन ।
द्विविध धर्म केला श्रवण । वैराग्य मन मोक्षमार्ग ॥१७॥
ते ऐकोन गजकुमार । त्रिधा वैराग्य त्या अतर ।
धिक् धिक् आता ससार । पापभार अष्टकर्माचा ॥१८॥
स्वामिपासी दीक्षा घेवोनी । क्रूर तप पापनाशिनी ।
विहार करिती मेदनी । आले वनी गिरनारीचे ॥१९॥

सर्व सन्यास घेवोनिया । धर्मध्यानी बैसोनिया ।
मेरूसमान अचलकाया । तपश्चर्या मासोपवासी ॥२०॥
असो श्रावक द्वारकेचा । वैर धरोनी स्त्रीभोगाचा ।
मार्ग धरिला गिरनारीचा । पावला स्वामीचा आश्रम ॥२१॥
क्रोध धडकला शरीरी । लोहखीळे ते खीळि भारी ।
सादोसाद त्या बधन करी । बावीसापरी परीसह सोसि ॥२२॥
तदा त्या गजकुमारान । दृढ धरिले धर्मध्यान ।
सोसु कर्माच उसन । पुढती अझुन काय करी ॥२३॥
सर्व संन्यास करोनिया । धर्मध्यानी समाधिया ।
अत.काळ साधोनिया । पावोनिया स्वर्गसौख्यासी ॥२४॥
अहो हो चित्रचारित्र । भुवनत्रई ते पवित्र ।
परीषह भोगिता गात्र । सुख सर्वत्र इद्रपद ॥२५॥ कथा ॥५९॥
यानतरे श्री जिनराया । नमस्कार युगुळपाया ।
पनिकाख्यान श्रोतिया । श्रवण त्वया करावे भावे ॥२६॥
पनीश्वर ग्राम अनुपम । महीपाळ राजा उत्तम ।
राज्य करी पुरुषोत्तम । रयत आराम पाळितसे ॥२७॥
तेथे श्रेष्ठी सागरदत्त । पणिका सुदरी गुणवंत ।
तया पुत्र असे धर्मवत । पापरहित पणिक नामा ॥२८॥
एकदा तो पणिकज्ञानी । वर्धमान समोशरणी ।
तेथील शोभा ते पाहुनी । हेमरत्नी कलशतोरण ॥२९॥
मानस्तभादि तुग विस्तीर्ण । तुर्यंदिशी शोभायमान ।
खातिका शुद्ध जल मपूर्ण । सुवासपूर्ण पुष्पवाटी ॥३०॥
अशोक वृक्षाच्या पगती । गधकुटीमध्ये शोभती ।
कनकवर्ण रत्नदीप्ती । चंद्रकांतीते छत्रत्रय ॥३१॥

ताराहार उज्वल चामर । चारागुळ स्वामी अधर ।
स्वयंभूव तो पीठीकाग्र । सहस्त्रकरकोटदीप्ती ॥३२॥
सेवा करिती त्रैलोक्येंद्र । अष्टद्रव्य सुगंधकर ।
सूर्यकोटीत्ये प्रभाभार । दिव्य सुदर श्रीमंडित ॥३३॥
सर्व संदेह विनाशक । दिव्यध्वनि ते प्रकाशक ।
दुदुभीनाद अनुहस्तक । आनद त्रैलोक्यमडित ॥३४॥
इद्रनागेद्रादि चंद्रार्क । नरेंद्राद्ये भूमीद्रलोक ।
निर्ग्रंथादी चतुर्थैक । भव्यलोक स्तवन करिती ॥३५॥
शोभा चौतीस अतिशय । चारी दिशेसी चतुष्टय ।
श्री अनुपम लोकत्रय । शोभती प्रातिहार्य अष्ट ॥३६॥
ऐशापरी देव शोभला । सिंहासनावरी देखिला ।
पणिक श्रेष्ठी आनंदला । करिता जाला त्रिपरीत्य ॥३७॥
अष्टविध पूजा करोनी । जयमाळारती देवाचरणी ।
स्तवन स्तोस्त्र विनवणी । गंधोदक वदोनी बैसती ॥३८॥
धर्म ऐकिला सुखदाता । दीक्षा मागे स्वामी नाथा ।
कृपा करो मज अनाथा । शरणागता तारक तू ॥३९॥
जानोनिया भव्यजीवात । दीक्षा दिधली विधीयुक्त ।
क्रिया समस्त सागे त्यात । ज्ञानवंत तो तपसिंधु ॥४०॥
एकाकी एकलविहारी । पणिक मुनी वनातरी ।
गंगा उतरे पैलतीरी । नावेभीतरी बैसला ॥४१॥
नदी अथाक जीवनी । तारू चालला मध्यस्थानी ।
नाव फुटकीसी सिरे पानी । गले पळोनी ते उतारे ॥४२॥
तोय भरता त्या नावेत । मुनी बुडे कंठपर्यंत ।
उपसर्ग तेथ होतात । स्वामी ध्यानस्थ सिद्धरूपी ॥४३॥

सर्व संन्यास करोनिया । वर्धमान चिंति हृदय ।
श्रीगुरूमंत्र जपोनिया । मरण भयातीत जाले ॥४४॥

श्लोक–मरणोपसर्ग रोगादी, सयोगानष्टवियोगात् ।
न भयं त्र प्रवेशती साधूसमाधीश विग्नयाः ॥४५॥

साधु करितातो साधन । उपसर्ग रोगादि मरण ।
संयोगवियोग समान । समाधीरत तोचि साधू ॥४६॥

तेव्हा तो पणिक साधु मनी । समाधिस्थ तद्रूपचिंतनी ।
केवळोत्पन्न तत् क्षणी । इद्र येवोनी पूजताती ॥४७॥

मुडकेवळी जाले देव । साधिले मोक्षाचे वैभव ।
अचल अढळ तो ठाव । देवाधिदेव जाहला तो ॥४८॥

श्लोक–श्रीमत् सागरदत्तनाम पणिको स श्रेष्ठिनीनदन. ।
पूतात्मा पणिको विलोक्य शिवदं, श्रीवर्धमानं जिन ।
ज्ञात्वा स्वल्पतर निजायुरखिलं त्यत्वा च मोहादिकं ।
भूत्वा यस्तु मुनिः स मुक्तिमगमत् नित्य सुखं मे क्रियात् ॥४९॥

**कथा ६० साठ**

श्लोक –नत्वा जिन जगत्भद्रं सुरासुरनमस्कृतं ।
भद्रबाहोर्मुनीद्रस्य, चरित्र कथ्यते हित ॥५०॥

पुड्वर्धन त्या देशात । कोटपे नगर पुण्यवत ।
तेथे राजा पुण्यवत । पद्मरथ तो धर्मात्मा ॥५१॥

त्याचा सोमशर्मा ब्राह्मण । पुरोहित सज्ञान ।
पुत्र भद्रबाहु सगुण । रूप सद्‌गुणमडित तो ॥५२॥

प्रौढ पाहोनीया तो नेत्री । पिता मुजबंधन करी ।
एके दिनी गावाबाहेरी । क्रीडा करी नर त्रिदश ॥५३॥

नानापरी क्रीडा करोन । वनसंपत्ति पाहे नयन ।
तव ते यात्रा वर्द्धमान । श्रीजिन भव्यतारक पैं ।।५४।।
मुक्तगामी तीर्थंकर । पंचज्ञानी श्रीजिनवर ।
चतुर्विंशति भवतार । मध्ये चार चतुर्दश ।।५५।।
गोवर्धन मुनिराय । उर्जेतगिरी यात्रा जाय ।
सुखी वदति जय जय । मिळोनी समुदाय कोटचवधी ।।५६।।
ग्यारा अग ते चौदा पूर्व । भद्रवाहु ते जाने सर्व ।
पचज्ञान जे का अपूर्व । जाने सर्व श्रृतकेवळी ।।५७।।
ऐसे गुरू ते ज्ञानवंत । तीर्थरूपासी तो सागत ।
सोमश्रमा द्विज त्वरित । सद्गुरू समर्थ विनविले ।।५८।।
विद्यापाठ सर्व केला । मुनीमार्ग सर्व कळला ।
सिद्धान्तमार्गी सिद्ध जाला । त्यागिता जाला गृहकर्म ।।५९।।
गोवर्धन श्रीगुरूपाशी । दीक्षा घेतली सुखराशी ।
पाठक्रिया सामायिकासी । नौकरासी जाप्य करीत ।।६०।।
चतुर्दश ते संघाष्टक । ज्ञानतत्त्वसिद्धान्तपाठक ।
सर्वामध्ये तो ज्ञानाधिक । श्रुतविकेक सर्वकळा ।।६१।।
गोवर्धन गुरू आयुष्यांती । ते स्वर्गलोका गते सति ।
भद्रबाहु शिष्याचे चित्ती । करी खती तो हृदयात ।।६२।।
सर्व सघाष्ट मिळोनिया । संतोषविले मुनी तया ।
श्रुतज्ञान महाधीरा । उपदेश छाया भव्यजीवा ।।६३।।
यत्प्रकारे विहार करीत । आले उज्जेनी नगरात ।
भावरीचा जानोनी वक्त । ईर्यापथ शोधीत चालले ।।६४।।
तेथ मिथ्याती खेळताती । तेन पाहिला नग्न जती ।
द्विजपुत्र वळखोन म्हणती । जाय जाय परती ठाऊक ।।६५।।

ते ऐकोनिया यतीश्वर । तत्त्वज्ञ सागती होणार ।
बारा वर्षे दुर्भिक्ष थोर । या धरेवर महादुक्खिस्थ ।।६६।।
सागोनी अतराय केला । संघाष्टकामध्ये तो आला ।
सर्वासी तो सांगता जाला । दुर्भिक्षेला द्वादशवर्षं ।।६७।।
माझे स्वल्प आयुष्यांते । आम्ही स्वस्थ राहू येथे ।
तुम्ही समजावे मनात । दक्षण देशात जावे त्वरा ।।६८।।
ऐकोनी मुनीचे उत्तर । विशाखाचार्य यतीश्वर ।
शीषे घेवोनीया समग्र । चालले सर्वत्र दक्षणेसी ।।६९।।
देशविहार करित ते । येवोनी करनाटकाते ।
गोमटस्वामी वदोनी तेथे । सुखी स्वस्थ त्या पर्वताग्री ।।७०।।
गुरू आज्ञा ज्यासी प्रमाण । त्याला सुखासी काय उन ।
हे जानोन भव्यजीवान । गुरुकृपा संपादोन घ्यावी ।।७१।।
येरीकडे उज्जनी नगरी । चंद्रगुप्त तो राज्य करी ।
दुर्भिक्षकाळ वियोग भारी । नमोस्तु करी मुनीराया ।।७२।।
स्वामि कृपा करोनिया । दीक्षा द्यावी भव तराया ।
भव्यप्राणी तो जानोनिया । शूर मत्र तया दिधला ।।७३।।
तीव्र तपश्चर्या करिती । श्रीमत् जिनेंद्रचद्रयुक्ती ।
पचाग्नी साधन साधिती । ध्यान धरिती कायोत्सर्गी ।।७४।।
उज्जनीसमीप वटवृक्ष । द्विदश परीसह सोसी दक्ष ।
सर्व सन्यास सिद्ध साक्ष । समाधि क्षेम नर साधी ।।७५।।
स्वर्गी भोगिती सर्व सुख । तद्दर्शनेन दृष्ट्वा मुख ।
मम द्यावे अनंतसुख । जन्म चोक्ख भवभवांतरी ।।७६।।
श्लोक. श्री सोमशर्मद्विजवंशसन्मणि' श्री भद्रबाहुर्मुनी सत्तमाग्रणी:।
जैनेंद्रधर्माब्धिसमयचंद्रमा: कुर्यात् सता सारसुखाश्रितासु मां ।।७७।।

इति कथा ६१ भद्रबाहुची

इति कथा श्री भद्रबाहुची । पुढती ऐका भव्यजीवाची ।
जने मनसा चढे तयाची । मोक्षमार्गाची तेच वाट ॥७८॥

श्लोक –श्री सर्वज्ञ प्रणम्योच्चैर्लोकालोकप्रकाशक ।
द्वात्रिंशत् श्रेष्ठिपुत्राणा चरित्र रचयाम्यह ॥७९॥

कौशाबी नगर सुदर । बत्तीस श्रावक पवित्र ।
इंद्रदत्तादि बधुमित्र । द्रव्य सर्वत्र समृद्धगेही ॥८०॥

तेव्हा समुद्रदत्त सर्व । पुत्र ज्ञानी गुणी अपूर्व ।
देवपूजेसी समभाव । सम्यक्त्वभावमडित ॥८१॥

जिनपदी जेवि भ्रमर । सर्वबधुमित्राचा आकार ।
जन्मोजन्मी पुण्य प्रचुर । सर्वे समग्र नादताती ॥८२॥

अहो पूर्वपुण्यकरोन । संतत संपत सद्गुण ।
आरोग्य शरीर आयुपूर्ण । धर्म जैन दुर्लभ जीवा ॥८३॥

एकदा श्री तीर्थंकरदेव । केवळज्ञासप्राप्तवैभव ।
त्रैलोक्येंद्र मिळोनी देव । अष्टहि भाव पूजार्चिती ॥८४॥

नत्वा स्तुत्वा श्रेष्ठीपुत्र ते । सुधर्म ऐकिला भावार्थ ।
जानोनिया पुण्यपदार्थ । तीर्थनाथ धन्य ते गुरू ॥८५॥

जानोनिया सार असार । देह दिसे क्षणभगुर ।
दीक्षा मागती विनयकर । भवभवातर नाशिनी ॥८६॥

ते सर्व दिगंबर जाले । तीर्थराय उपदेशिले ।
तपश्चरण करू लागले । ध्यान धरीले यमुनातटी ॥८७॥

कायोत्सर्गी धर्मध्यान । मेरुवत् अचळ मन ।
मेघवृष्टी महागर्जन । नदी भरोन चालली ते ॥८८॥

धर्मध्यानी होते बैसले । समाधीमरण पावले ।
स्वर्गी इंद्रपद जाहले । भोगु लागले सर्वसुख ॥८९॥

विमानी बैसोनी समस्त । देवदेवांगनासहित ।
भावपूजावदनासमेत । अकृत्यकृत्यभक्तीनिर्भरः ॥९०॥

श्लोक  स जयतु जिनदेवो यस्य चारित्रमुचै ।
स्थिरतरमतुलं वै दुष्टनानोपसर्गैः ॥
सकलभुवनसारं दत्तसंसारपारं ।
परमसुखनिवासं ध्वस्तमोहादिपाशं ॥९१॥

### कथा ६२

यानतरे कथाश्रवण । श्रीधर्मघोष मुनीख्यान ।
प्रणम्य जिनेद्र भगवान । द्यावे अवधान कथेचे ॥९२॥

श्लोक --प्रणम्य त्रिजगत्देव श्रीजिन धर्मदेशकं ।
वक्षे श्री धर्मघोषाख्यमुनीद्रस्य कथानक ॥९३॥

चपा नगरी सुदर । धर्मघोष मुनीश्वर ।
मासोपवासी दिवाकर । करी आहार गोकुळात ॥९४॥

पारणे तेथे करोनिया । चालले मनइच्छे तया ।
हरित अकुर ज्ञानी दया । तृषा हृदया व्याकुळ तो ॥९५॥

गगातीरी वटवृक्ष । तेथे बैसला मुनी दक्ष ।
विश्रात जाला मनोपक्ष । मौन्यसाक्षे तो परमेष्टी ॥९६॥

गगादेवी तदा पाहत । मुनी तपस्वी तृषावंत ।
कळस घेवोन स्वहस्त । प्राशुकतोयात हेममय ॥९७॥

नमस्कारी भावपूर्वक । पानि पाणि घ्यावे उदक ।
तृषा-शात करा विवेक । मुनीनायक भुवनोत्तम ॥९८॥

ते श्रवणेसी मुनी मौनी । हस्त सवज्ञान घे पानी ।
देवता विमानी बैसोनी । विदेहभुवनी गेले ते ॥९९॥

केवळज्ञानी श्रीमंधर । स्वामिसी नमोस्तु त्रिवार ।
देवादम घोष यतिवार । न घे नीर कि कारणे ॥१००॥
तीर्थंकर मुनी बोलले । हे मुग्धे ऐक तू वहिले ।
देवताहस्ते न इच्छिले । ते तो न घेतील कल्पाती ॥१०१॥
गगादेवी तदागत्य । सुगधिक दिग्मुखा कृत्य ।
समंता मुनेद्रावरीत । सीतल तोयात वृष्टी करी ॥१०२॥
तदाऽसौ धर्मघोष मुनी । धर्मतत्त्वतो महाज्ञानी ।
समाधान मेरुसमानी । परीस्सहनी सादर तो ॥१०३॥
दृढ धरोन धर्मध्यान । शुक्लध्यानी जाला निमग्न ।
तत् समयी केवळज्ञान । जाल उत्पन्न सुखकारी ॥१०४॥
लोकातिक आले देव । पूजा करिती धरोनी भाव ।
सुरासुर भक्तीवैभव । मुक्तीवैभव प्राप्त पुण्य ॥१०५॥
तत् सुख मात द्यावे स्वामी । तत् चरणरज दास मी ।
तत् सेवा माते जन्मोजन्मी । द्यावी स्वामी अरहंतजी ॥१०६॥
श्लोक –स श्री केवळलोचनोऽतिचतुरो भव्यौघसबोधको ।
लोकालोकविलोकनैकनिपुणो देवेद्रवृंदार्चित. ॥
मिथ्यामोहाधकारतरणी चिंतामणि. प्राणिना ।
कुर्यात् मे भवता च निर्मळसुख श्रीधर्मघोषो जिन: ॥१०७॥
केवळज्ञान सल्लक्ष्मीनायक श्रीजिनेश्वर ।
नत्वा देवकृते कष्टे, वक्ष्ये श्रीदत्तवृत्तक ॥१०८॥
ईळावर्धन पुण्यनगरी । राजा अभिजित शत्रुमारि ।
ईलाईत सुदर नारी । पुत्र उदरी श्रीदत्त तो ॥१०९॥
अयोध्या भूपतीची कन्या । अशुमती ते रूपधन्या ।
श्रीदत्त निघाला परन्या । विधियुक्त मान्या स्वयवर ॥११०॥

पूर्व पुण्य भोगिती भोग । शुकपक्षीपूर्वप्रसंग ।
द्यूत खेळे तो राणीसग । मणरगण रंजवीतु ॥१११॥
श्रीदत्तराय एके दिनी । ते देखिली दूतरमणी ।
मीच एक रमण रमणी । दुजा रमणी रमवी नष्ट ॥११२॥
रायामनी क्रोध उत्पन्न । पक्षी धरिला केले बंधन ।
तत् ग्रीवा टाकिली खडोन । वैर बधन जीव करी ॥११३॥
विषय अंतरी वैर धरी । आप सुख परपीडा करी ।
वैर चालली भवातरी । न जाने अंतरी कुबुधी ॥११४॥
यक्षी मृत्य व्यंतर जाला । महाकष्टे वैर बाधला ।
तेथीच सुख भोगी भला । कर्म झोला जन्म जीवासी ॥११५॥
श्रीदत्त तो एके दिवसी । उपरी वरी पाहे दिसी ।
देखिले अभ्रपटलासी । विरक्त मानसी जाहला ॥११६॥
अहो ससार अभ्र समता । विघटे क्षण न लागता ।
काया जीवात्मा तो आतौता । विद्युल्लतासमान भासे ॥११७॥
भोगभुजंग तो विखारी । दश काया येती लहरी ।
हा कष्ट चौऱ्याशीमाझारी । फिरे फेरी मूढजीव हा ॥११८॥
इत्यादी विचार करोन । चित्ती भावना भावोन ।
संसारकुडाहा दुर्जन । दीक्षा घेण आत्महितासी ॥११९॥
निग्रंथ गुरूसी नमस्कार । दीक्षा घेतली सुखकार ।
होउनिया तो दिगंवर । एकविहार तीर्थवासी ॥१२०॥
देशातरा फिरत फिरत । आला तो जन्मभूमी जेथ ।
बहिर्भूमी शीतकाळात । उपवनात कायोत्सर्गी ॥१२१॥
शुक पक्षी व्यतर देव । तो पूर्व वैराचे प्रभाव ।
जानोनिया तो दुष्टभाव । करी उपद्रव ऋषीसी ॥१२२॥

घोर बातासनी महाशीत । तुषारवर्षाव करीत ।
दुस्सह परीषह करीत । जीव मिथ्यात काय न करी ।।१२३।।
श्रीदत्त तो मुनीश्वर धीर । समाधिस्थ तो निरंतर ।
शत्रु मित्र सम अतर । महाधीर वीर समाधिस्थ ।।१२४।।
बेवीस परीषह गहन । शुक्लध्यानी लाऊन मन ।
काया अचळ मेरुसमान । केवळज्ञानमोक्ष प्राप्त ।।१२५।।
श्रोते सावधान चित्ती । वैर न करावा कल्पाती ।
आर्जव गुण धर्मयुक्ती । भावे भक्ती करा शक्तीसार ।।१२६।।
काव्य: स श्रीमान् जितशत्रुराजतनुज श्रीदत्तनामा मुनिः ।
भूत्वा देवकृतप्रकष्टमतुल सोढ्वा श्रुतध्यानतः ।।
हत्वा शेषनिबधनानि नितरा, प्राप्त श्रियं शाश्वती ।
स श्रीकेवललोचनो जिनपतिर्दद्यात् स्वभक्ति मम ।।१२७।।

**इति कथाकोशे चतुर्थ आराधना-श्री गुरूरत्नकीर्ती तत् शीष लघुबीजचंद्रविरचिते श्रीदत्तमुनीकथावर्णनो नाम प्रसंग ४१ एकेतासाळसावा ॥ जै जै ५९-६०-६१-६२-६३-६४ संपूर्ण जै ॥**

● ● ●

## प्रसंग बेचाळिसावा

### ।। श्री वीतराग प्रसन्न ।।

श्लोक–प्रोल्लसत् परमानंदं जगद्वद्यं जिनेश्वरं ।
नत्वा वृषभसेनस्य चरित्रं रचयाम्यहं ।।१।।

उज्जनीचा तो महाराज । प्रद्योताख्य गुणविराज ।
गजारूढ तो महाराज । अनुगज प्रयाण वना ।।२।।

दूर जावोनिया वना । दरिशृग हिंडती नाना ।
गजास्तव दुखिस्त तना । वृक्ष नाना पशेताति ते ।।३।।

तदा देखिली पूरनगर । ग्राम ते महामनोहर ।
कूपतटी झाला तो स्थिर । तेथे सुदर जैन कन्या ।।४।।

तोय न्यावयासी ते आली । जिनदत्ता नामचि भली ।
तेथे नरेंद्रान पाहिली । इच्छा जाली जलप्राशनी ।।५।।

पानी देवोनिया त्यात । पित्या जिनदासा सागत ।
बापा पुरुषगुणवत । पानवठ्यात आला आहे ।।६।।

तेव्हा त्वरीत तो येवोनी । अति प्रीती तया भेटोनी ।
नेले गृहसुखाचे स्थानी । स्नानभोजनी तृप्त केले ।।७।।

आदर उपचार पाहोन । सुख संतोष रायमन ।
जै उष्णकाळी शीतप्राशन । वृक्ष उत्पन्न फळप्राप्ती ।।८।।
कन्यादान श्रावकमनी । नृप अंगिकार करोनी ।
लग्न उछाव पचदिमी । आनद मनी उभयताचे ।।९।।
पट्टराणी पद दिधले । जिनदत्ता गुणउज्जले ।
पूर्व पुण्य भोग भोगिले । मग्न जाले सुखससारी ।।१०।।
एके दिनी पश्चिम रयणी । स्वप्नी पाहे वृषभ गुणी ।
राय ऐकोनी तोश मनी । नौ मास कामिनी सपूर्ण ।।११।।
पुत्र प्रसवली सद्गुण । नाम ठेवी वृषभसेन ।
जिनमदीरी पूजादान । पुण्य न पुण्य जोडिताती ।।१२।।
वासरमास प्रौढ जाला । अष्टवरुष ज्ञाता भला ।
राजा प्रद्योत सतोषला । संसारी जाला विरक्त ।।१३।।
बोलाविले प्रिय पुत्रासी । बापा साभाळी या राज्यासी ।
आम्ही जावोनी गुरूपासी । दीक्षा तपासी करू पुत्रा ।।१४।।
पुत्र म्हणे वो तीर्थरूपा । राज्य करावे स्वस्थ भूपा ।
येथेच पहा सिद्धकृपा । करावे तपा गृहधर्म ।।१५।।
नृपति वदे चिरजीवा । प्रपची नोव्हे बा विसावा ।
जैनदीक्षा तपभावा । विना ठावा वा मोक्ष कैचा ।।१६।।
राज्यभार दुःखकारण । वचन पुत्रान ऐकोन ।
तयासी वैराग्य तत्क्षण । दु खाची खान नका ताता ।।१७।।
पुत्रा पाहोनी सम्यक्त्वी । बधु सुत बोलावी प्रीती ।
राज्य देवोन यथायुक्ती । गुरूप्रति विनयपाणी ।।१८।।
दीक्षा वृषभसेन मुनी । तप कुर्वंति जिनवाणी ।
सर्वक्रिया सिद्धान्तगुणी । भव्यजनी उपदेशक ।।१९।।

होवोन एकलविहारी । तो आला कौशाबी नगरी ।
आताप योग शिळेवरी । पर्वत शिखाग्री तिष्ठला ।।२०।।
जेष्ठ मास तप दारुण । शिळा तप्त उष्णेकरोन ।
भव्यजीवानी ते पाहोन । करिति नमना त्रिशुद्धी ।।२१।।
एके दिवसी मुनीराय । भावरीस्तव मुद्राहृदय ।
औट हस्त पाहोनी मोप । ते गुरूराय दिगबर ।।२२।।
तदा ते दुष्ट बौधमती । ते गेले पर्वतावरौती ।
अग्निकाष्ठ ते चेतवीति । शिळा तपती ते ताम्रवर्ण ।।२३।।
पापिसी साधू देखवेना । घुकासी हेळि आवडेना ।
तेवि तपसी देखवेना । करिती छळना पापिष्ट ।।२४।।
भ्रामरी करोनी त्वरित । पर्वत चढले साधुसत ।
शिळा देखिली अग्नितप्त । प्रतिज्ञा करीत तपस्वी ।।२५।।
स्वामी साधु वृषभसेन । पचाग्नी करिती साधन ।
बाह्याकारि तीन कृशान । आतरी दोन साधिती साधू ।।२६।।
करोनी सकळ संन्यास । धीर वीर साधि परीषह ।
शिळे बसताचि सुरेश । सिंहासनास निर्मीपिले ।।२७।।
केवळज्ञान उत्पन्न जाले । त्रैलोकीचे देव आले ।
निर्वाणपदासी ते गेले । चारित्र निश्चल तपस्वी ते ।।२८।।
श्रोते व्हावे सावधान । तप भावना करा श्रवन ।
अक्षरपदस्वरहीन । घ्या साभाळोन दयाभावे ।।२९।।
श्लोक.—यच्चित्तोन्नतपर्वतस्य पुरत: प्रोत्तुगभूभृत् गणे ।
ऽणुत्व याति सरित्यति सुनितरां दर्भाग्रबिंदुपमा ।।
स श्रीमान् वृषभादिसेन जिनप. प्रध्वस्तकर्मा विभू ।
दद्यात् स्वस्थगुणश्रिय गुणनिधिर्मे सर्वसिद्धिप्रदं ।।३०।।

कथा ६५

श्लोक: केवळज्ञानसन्नेत्र पवित्रं शर्मकारणं ।
नत्वा जिन प्रवक्षामि कार्तिकेयकथानकं ।।३१।।
कार्तिकाख्ये नगरी राजा । अग्निभूति तो पाळि प्रजा ।
राणी वीरमती ते भाजा । गृहकाजा ते षड्गुणी ।।३२।।
तत् पुत्री कृतिका सुदर । अष्टमी व्रत नंदीश्वर ।
पूजा करिती परिवार । षोडश प्रहर उपवास ।।३३।।
पारणे करोन यथास्थित । पिता पाहे स्वकन्येत ।
कुबुधी उद्भव मनात । विषयासक्त महान् ज्ञाते ।।३४।।
राजा विचार करी मन । मम गृही हे कन्यारन्त ।
न करीन मी परस्वाधीन । स्वगृही राहण सुदरी गे ।।३५।।
माता कन्या त्या दोघीजनी । दर्शना गेल्या जिनसदनी ।
स्वामिसी वृत्तान्त सागोनी । रायासी मुनी पाचारी ।।३६।।
राया ऐकावे मम वचन । कन्याभिलाष न करन ।
कष्ट कोटी दु:खदारुण । जगनिंदन इहलोकी ।।३७।।
गुरूवाक्य ऐकोनिया । क्रोध उत्पन्न राजिया ।
काय कारण हे बोलाया । येथोनिया तू जाय वेगी ।।३८।।
क्रोधे साधूसी पिटाविले । कृतिका कन्येसी परनिले ।
पापी कामाध भ्रष्ट जाले । दुर्गती गेले आनी जातील ।।३९।।
धर्मनेन लज्जाही नाही । गुरूनेन उपाध्या तोही ।
नेन सारासार पापही । उन्मत्तदेही मदनमस्त ।।४०।।
तत् विषय भोग भोगिता । पुत्रोत्पन्न एकसुता ।
कार्त्तिक पुत्र महाज्ञाता । विरमति सुता सुदरागी ।।४१।।
रोहेडनगरी कौचराव । कन्येचा केला तो विवाह ।
भोग भोगती अपूर्व । पूजिती देव वीतराग ।।४२।।

ततः कार्तिक प्रौढ जाला । चौदा वर्ष यौवनपदाला ।
सहज क्रीडा करीत आला । पिता पाहला विषयाध ।।४३।।
हे मात ऐक वचन । पिता नये सभेलागुन ।
सदा तो कामक्रीडामग्न । देहाचे भान त्यास नाही ।।४४।।
हे कैसे काय सांग माते । ऐकोनिया नीतीची मात ।
कृतिका नेत्री अश्रुपात । पापी वृत्तात न सांगवे ।।४५।।
पुत्र म्हणे सागावे वाई । ते वर्त्तमान कैसे काई ।
विपरीतार्थ ऐके हृदयी । म्हणे हे वाई वरे नोव्हे ।।४६।।
कार्तिक म्हणे वो मातोश्री । निषिद्धिला नाही राजेश्री ।
विद्वान् अथवा स्वामिश्री । शास्त्रादिक श्रीदेवगुरू ।।४७।।
माता वदे वो पुत्रराया । बुद्धिवत वर्जिल तया ।
स्वामी सागताची तया । पीटी स्वामिया देशावर ।।४८।।
ते मुनी कैशा परी बाळ । जानती सारासार कळा ।
सप्ततत्त्वाचा जिव्हाळा । ज्ञानरसाळा दिगंबर ।।४९।।
ते धर्मनायक निग्रंथ । मयूरपिच्छी दया अर्थ ।
शौच्यासाठी कुमडलहस्त । जगन्नाथ तो जगद्गुरू ।।५०।।
जननी वचन ऐकोनी । त्रिधा वैराग्य उद्भव मनी ।
गृहत्याग धिक्कार करोनी । गेला वनी श्रीगुरूपासी ।।५१।।
नमोस्तु केला त्रिशुद्धीन । दीक्षा मागे सुखसंपन्न ।
मुनीराज कृपा करोन । दीक्षाकल्याण विधीयुक्त ।।५२।।
मनिक्रिया पढे समस्त । सप्त तत्त्व नव पदार्थ ।
दसलक्षण धर्म सिद्धान्त । सर्व ग्रंथ पढीक्कमामि ।।५३।।
तत् माता ते कृत्तिका भली । आर्त्तध्यान मृत्यु पावली ।
व्यंतर देवता जन्मली । दिव्य चागली रूपवता ।।५४।।

कार्तिक मुनी दिगंबर । तीर्थयात्रा करी विहार ।
पातला रोहेड नगर । तपः तीव्र जेष्ठ मासात ।।५५।।
अमावास्या दिनी भावरी । करू पातले त्या नगरी ।
बहीण वीरमती सुदरी । उपरी वरी उभी होती ।।५६।।
तिन देखिला मुनीराय । म्हणे हा माझा बंधु होय ।
भ्रतारा सोडोनी लवलाहे । सन्मुख जाय श्रीगुरूचे ।।५७।।
तुभ्य नमोस्तु द्वैपद्म मूर्ध्नी । त्रिविध पचागे नमोनी ।
बधु मुनीराय सद्गुणी । अंत.करणी किं न प्रीती ।।५८।।
तदा तो क्रौंच नृप पापी । स्त्रीमुनी पाहोनिया कोपी ।
महाक्रोधे तो नष्टरूपी । शांतस्वरूपी मुनि विंधिला ।।५९।।
हाहाक्कार जाला ते समयी । भव्य श्रावक लवलाहि ।
राजभय त्याचे हृदयी । न चले बळ काई तयाचे ।।६०।।
पापी मिथ्यामती जे प्राणी । गुरू धर्म न रुचे मनी ।
कुबुधी हिंसक दुर्योनि । दु.खाच्या खानी भोगिताती ।।६१।।
तदा ते शीघ्र धाविन्नली । व्यंतरी देवी मुनी माउली ।
जातिस्मरणात पावली । झेप घाली बालकावरी ।।६२।।
मयूररूप धरोनीया । सीतळनाथ चैत्यालया ।
स्वामीसी तेथे नेवोनीया । ठेविले तया वसईत ।।६३।।
तेव्हा तो कार्तिक स्वामी मुनी । दीर्घ परीषह साहोनी ।
मुडकेवळी तो निर्वाणी । स्वर्गभुवनी सर्वार्थ त्या ।।६४।।
लौकातिक देव आले । भुक्ती युक्ती पाद पूजिले ।
स्वामी कार्तिक पूज्य जाले । तीर्थ स्थापिले विख्यात जगी ।।६५।।
माता वीरमती व्यतरी । द्वितीय कृत्तिका सुदरी ।
राजा आदि पश्चात्ताप करी । वदना करिती तीर्थभावी ।।६६।।

लौकिक पर्वतीर्थ जाले । भूतळी सर्व पूजू लागले ।
जैन मत आच्छादिले । प्रकाश केले आपमत ॥६७॥

श्रीमत् जिनेंद्रचद्रयुक्तं । शास्त्रसदेहे नाशकृत ।
भव्य लोक भजावे नित्यं । स्वर्गमोक्षदत्तं भाविका ॥६८॥

श्लोक :– सकल–तत्त्व–विलोकन–दीपिका ।
यदुदिता भूवनोत्तमभारती ॥
स मम देवनिकायसमर्चितो ।
दिशतु शाश्वतशर्म जिनःधिपः ॥६९॥

इति कथा ६६

श्लोक :– सप्रणम्य जिनाधीशं सुराधीशै. समर्चित ।
मुनेरभयघोषस्य चरित्रं रचयाम्यहं ॥७०॥

काकंदी नगरीचा राजा । अभयघोष पाळि प्रजा ।
अभयामती त्याची भाजा । भोग सेजा सुखसंपन्न ॥७१॥

एकदा राजा तो बागात । सरोवरी क्रीडा करीत ।
कूर्म देखिला अवचित । धरिले त्यात कुबुधीने ॥७२॥

चेतुस्या दात बाधोनिया । पुष्टीभागे तो घेवोनिया ।
धीवरगृहा जावोनिया । छेदोनिया चतुष्पाद ॥७३॥

ज्ञानी जानोनी करिती पाप । चौऱ्याशी लक्ष योनी माप ।
भोगिति दुःखाचे सताप । हिंसा पाप अनिवार ते ॥७४॥

कष्टे कासवा मृत्यु जाला । निदान वैरबध केला ।
रायापोटी जन्म घेतला । नाम पावला चडयोग ॥७५॥

प्रौढ जाला तो करी कृत्य । महीनाथ पाहे तो त्यात ।
सतोश पावला मनात । राज्य करीत पूर्व पुण्य ॥७६॥

एकदा अभय रायान । पाहिले चंद्राचे ग्रहण ।
त्रिधा वैराग्य त्या उत्पन्न । चितवी मन अनुप्रेक्षा ।।७७।।
अहो पापी मी मिथ्यामती । नाही केली म्या गुरुभक्ती ।
देवपूजा सिद्धात श्रुती । पुण्योत्पत्ती न कळे मज ।।७८।।
हिताहित न समजले । अळस मूढ पाप जाले ।
कुधर्मासी चित्त रमले । नाही केले म्या दानपुण्य ।।७९।।
कैसा तरेन या संसारी । पाप पडित मोहाधारी ।
दीक्षा घेवोन पाप सहारी । अष्टकर्मवैरी जितीन ।।८०।।
तप तीव्र महाघोरादरं । भाषितं श्रीजिनवगत्तं ।
पूर्वाचार्यसन्मार्गसूत्रं । कर्मशत्रु जिती महारिपु ।।८१।।
मुक्तिकांता तप बळेन । सर्व सुख मी पाहिन नैन ।
अनेक प्रकार विचारी मन । करीन यत्न चतुराइ ।।८२।।
राज्य दिल्हे चडपुत्रासी । दीक्षा घेतली पापनाशी ।
पंचाग नमन गुरूसी । मुनिक्रियासी अवलोकित ।।८३।।
पचेंद्रिया करी दमन । पंचपर्वनी उपोषण ।
अष्टकर्म करी खडन । क्षयकारण सर्व पाप ।।८४।।
गुरूसी नुती करोनिया । स्वामी कृपा सपादोनिया ।
एकट विहारी होवोनिया । तपश्चर्या मासोपवासी ।।८५।।
धर्मोपदेश जनाकरीं । तो आला काकिंदी नगरी ।
तप तीव्र वनातरी । शीळेवरी आतापयोग ।।८६।।
जन्मभूमी तोचि ठिकान । तेथे पूर्ववैरी येवोन ।
प्रचंड पुत्रापुत्र होऊन । कूर्म आवतरोन वैर साधी ।।८७।।
रीनवैर हा त्याहे तिन्ही । जीव भोगि दु खाची खानी ।
मासोपवासी अभयमुनी । ग्राम लक्षोनी चालले ।।८८।।

पंचमुद्रा हृदयी धरी । ईर्यापथ शोधन करी ।
प्रचडराय पाहे नेत्री । दिगंबरी हा मम पिता ।।८९।।
हेमकळस तोयपूर्ण । तिष्ठ तिष्ठ वदे वचन ।
त्रिपरीत्य करी नमन । पदप्रक्षाळन पाणि पानी ।।९०।।
कर शुद्धी सिद्धभक्ती । षड्रस पक्वान्न तृप्ती ।
नवविधा पुण्य जोडिती । नमोस्तु करिती सर्वही ।।९१।।
अभयघोष मुनीराय । चंडपुत्र त्यासी पाहू ।
क्रोध उत्पन्न त्या हृदय । दात खाय जातिस्मरन ।।९२।।
कासव जन्माचे उसन । वैरियासी मी दंड करीन ।
करी शस्त्र त्यान घेवोन । पाहिला नैन दिगबर ।।९३।।
वनी मुनी तपश्चर्या । मेरुवत् अचळकाया ।
सव्य भुज ते छेदोनिया । दु:खहृदया मुनी सोसी ।।९४।।
वामभागी येवोनी त्वरित । भुजा छेदि स्वर्गाचे हस्त ।
परीषह सोशी ध्यानस्थ । त्रिगुप्तागुप्त साभाळीतो ।।९५।।
वैरी करी पदछेदन । तत् उत्पन्न केवळज्ञान ।
लौकांतिक देव येवोन । करिती पूजन केवळीचे ।।९६।।
अहो जीवाची शक्ती थोर । कोठे नरक मोक्षघर ।
तपबळे धरोनी धीर । मोक्ष नार पाचवी गती ।।९६।।

श्लोक.–जित्वा शेषपरीषहान् दृढतरान् हत्वा च मोहादिक ।
नानाजन्मशतोरुकष्टजनकान् क्षित्वाशु कर्मादिकान् ।।
संप्राप्तो क्षयमोक्षसौख्यमतुलं स श्रीजिन श क्रियात् ।
संपूज्योऽभयघोषनामकलितो नित्य सता सेवित ।।९८।।

**इति कथाकोश कथा ६५–६६–६७ अभयघोष मुनीकथा**
**श्रीरत्नकीर्तीशीषविरचिते प्रसंग ४२ संपूर्ण छ ॥** ● ● ●

ते ऐकोन आश्चर्य करी । कोतवाल तुझी मैत्री ।
कोठे घडली सांग वक्त्री । गुरूवैखरी दृढ तुज ॥२१॥
आहेर देश मनोहर । बेनातट ग्राम सुदर ।
बेनानदी निर्मळ नीर । राज्यधर जितशत्रु तो ॥२२॥
जयावती सुदर सती । तय कुसी पुत्रोत्पत्ती ।
विद्युत्चर नाम ठेविती । रजविती मज नृपाळा ॥२३॥
तग्रामात एक तराळ । यमदंड तयाचा बाळ ।
पढत होता एकसाळे । उपाध्याय कुशल शीकवी ॥२४॥
चौरांग विद्या मी शिकलो । शास्त्रयुक्त दोघ पढलो ।
ज्ञानकळा गुणज्ञ जालो । प्रतिज्ञा बोलली ते ऐका ॥२५॥
तुम्ही आम्हीच दोघे जन । चोरी करिता ग्रामजन ।
त्वा करावे मम रक्षण । अभयदान देईन मी ॥२६॥
ऐसे वचन परस्पर । स्व स्व गृही जाहलो स्थिर ।
मम पिता गुणज्ञ चतुर । राज्यभार मज दिधला ॥२७॥
गुणकीर्ति श्रीगुरूपासी । दीक्षा घेतली पापनासी ।
भयभीत यमफासी । राजे फासी मज दिधले ॥२८॥
एके दिनी प्रतिज्ञास्तव । येन जाहले तुमचे गान ।
यमदंडा परत्भाव । सोसिले घाव केल्या कर्मांचे ॥२९॥
हार चोरला राया तुमचा । शब्द फिटला वो अमचा ।
साभाळ करावा सर्वांचा । यमदडाचा प्रतिपाळ ॥३०॥
ऐसे वदोनी विद्युत्चर । अनित्य पाहोनी संसार ।
येवोनीया तो स्वनगर । वैराग्य आतरे विरक्त ॥३१॥
राज्य दिधले स्वपुत्रासी । पूजाविधी जिनदेवासी ।
विनती करोनी गुरूसी । दीक्षा मजसी द्यावी स्वामी ॥३२॥

पूजा केली पंचकल्याण । संघपूजाविधीमार्गान ।
दिगंबर दीक्षा घेवोन । शूर मंत्रकर्णे गुरुमुखे ॥३३॥
जिनेंद्र भाषित तप करी । स्वर्गमोक्षाची ते पायरी ।
भव्य जैंना उपदेश करी । एकलविहारी महीतले ॥३४॥
तदा त्या पंचशतमुनी । संघ मिळाला महागुणी ।
तामलिप्त पूरपाठनी । श्चामुंडमुनी शीष सर्व ॥३५॥
मुनी सांगे सर्वासी युक्त । श्रावक येतील समस्त ।
मम पूजा भावार्थ शक्त । करितील स्वस्थ राजादी ॥३६॥
तोपर्यंत गावाभीतरी । न जावे समस्त चतुरी ।
ग्रामासमीप वनांतरी । शीष परिवारी चामुंड ॥३७॥
तदा विद्युत्चोर तो मुनी । ग्रामपश्चिमेसी जावोनी ।
शीष समग्र मीळोनी । धर्मध्यानी बैसले तेथे ॥३८॥
मुनी रात्रौ प्रतिमायोग । निश्चल ध्यानी कायोत्सर्ग ।
चामुंडच्या प्रचंडराग । करी उपसर्ग विद्युत्मुनी ॥३९॥
सर्प विंचू व्याघ्र समीप । दंशमशक ते कुरूप ।
व्यंतरी क्रूर दावी रूप । येती समीप क्रूरकर्कशा ॥४०॥
उपसर्ग दु:सह दारुण । विद्युत्मुनी मेरूसमान ।
उपसर्ग साहे दृढ ध्यान । शुक्लध्यानेन कर्मक्षय ॥४१॥
केवळज्ञान उत्पन्न जाले । सूर्यबिंबी निर्जर आले ।
श्रुतकेवळी पूज्य जाले । पद पावले मोक्ष अक्षय ॥४२॥
काव्य:—इंद्रैश्चारुनरेंद्रखेचरतरै:र्नागेंद्रयक्षेश्वर. ।
प्रोद्यत्पंचविधप्ररत्नमुकुटप्रव्यक्तभाभासुरै. ॥
नित्य यस्तु विशुद्धभक्तीभरत.संपूज्यचाराधित: ।
स श्रीमान् मम मंगल शिवपतिर्दद्यात् विद्युत्चर: ॥४३॥

कथा ६८

# प्रसंग त्रेचाळिसावा

## ।। श्री पंचपरमगुरुभ्यो नमः ।।

श्लोक:—सर्वं सौख्यप्रद नत्वा जिनेद्रं भुवनोत्तमं ।
वक्षे विद्युत्चराख्यानं विख्यातं मुनिभाषितं ।।१।।
मिथिलाख्यपुरीचा राजा । वामरथ पाळि तो प्रजा ।
देवगुरूशास्त्रवोजा । पुण्यध्वजा जिनमदिरे ।।२।।
तेथे यमदड तराळ । विद्युत्चोर महाविशाळ ।
चोरी करी महाकुशळ । असे सकळ दिनरात्नी ।।३।।
दिवसा दिसे अनाथदीन । रात्नौ दिव्यस्वरूप धरोन ।
माया विद्या जपे मोहन । धनहारन करी बहु ।।४।।
एकदा त्या भूपमदिरी । रात्नौपष्ट तो चोरी करी ।
दिवसा कुश्चळरूप धरी । कुदेवमदिरी वसवस्ती ।।५।।
राव पाचारी तराळासी । दिव्यरूप चोर आम्हासी ।
मोहनी घालोनी रत्नरासी । अपार धनासी हारिले ।।६।।
यमदडाते दे आनोन । नानिता तूते दड देईन ।
सप्त दिन केले प्रमाण । आणीन सोधून चोरासी ।।७।।
रायासी करोनी नमस्कार । ग्राम धुडीता सतोसार ।
सहा दिवसानतर । देखिला नजर वसवस्ती ।।८।।

त्यासी घेवोनिया त्वरित । आनिला रायाचे सभेत ।
राये पाहोनिया त्यात । कुरूप अनाथ दिसतो ।।९।।
नृप म्हणे नोव्हे तस्कर । तराळ म्हणे हाहि चोर ।
चौदावे रत्न यासि त्वर । दाखविता वगून कबुल ।।१०।।
तेव्हा त्यात कोतवालान । माघ मास सीत अग्नीन ।
तापन ताडन बंधन । भय उत्पन्न बत्तीसादी ।।११।।
कबूल हो रे रायापासी । चोर नोव्हे मी गुणरासी ।
छिन्न भिन्न जाले त्या अंगासी । राये त्यासी बोलावी त्वरे ।।१२।।
राजा वदे अरेरे चोरा । तो म्हणे मी सावच खरा ।
देहे दडिला तुम्ही बरा । आनिक करा मनइच्छेन ।।१३।।
यमदंड जाला लज्जित । नृप वदे त्या तस्करात ।
अभयदान दिल्हे तूत । सत्यासत्य सांगावे त्वया ।।१४।।
ते ऐकोन नृपवचन । विद्युत्चर निर्भय मन ।
मी चोर सत्यच प्रमाण । तराळवचन सत्य सत्य ।।१५।।
तेव्हा तो राजा वामरथ । विस्मय करी हृदयात ।
बत्तीस परी दंद तूत । सोसिले समस्त कैसे त्वा ।।१६।।
चोर म्हणे ऐकावे राया । मुनीपासी ऐकिल मया ।
महान् दु ख नर्क ठाया । जावोनीया भोगावे तेथे ।।१७।।
जन्म घेवोनिया पुढती । दु ख सोसावे नरकगती ।
म्हणोन क्षमा धरिली चित्ती । गुरुवचनोक्ती सखया ।।१८।।
ऐकोनी तयाचे वचन । रायाचे द्रवले अंत.करण ।
होवोनी प्रसन्न वदन । भाग देईन मनइच्छित ।।१९।।
विद्युच्चर म्हणे नृपति । अभय द्यावे वरदहस्ती ।
मम मित्र यमदडाप्रति । देवोन स्वस्तीक्षेम ठेवा ।।२०।।

ते ऐकोन आश्चर्य करी । कोतवाल तुझी मैत्री ।
कोठे घडली साग वक्त्री । गुरूवैखरी दृढ तुज ॥२१॥
आहेर देश मनोहर । बेनातट ग्राम सुदर ।
बेनानदी निर्मळ नीर । राज्यधर जितशत्रु तो ॥२२॥
जयावती सुदर सती । तय कुसी पुत्रोत्पत्ती ।
विद्युत्चर नाम ठेविती । रजविती मज नृपाळा ॥२३॥
तग्रामात एक तराळ । यमदड तयाचा बाळ ।
पढत होता एकसाळे । उपाध्याय कुशल शीकवी ॥२४॥
चौराग विद्या मी शिकलो । शास्त्रयुक्त दोघ पढलो ।
ज्ञानकळा गुणज्ञ जालो । प्रतिज्ञा बोललो ते ऐका ॥२५॥
तुम्ही आम्हीच दोघे जन । चोरी करिता ग्रामजन ।
त्वा करावे मम रक्षण । अभयदान देईन मी ॥२६॥
ऐसे वचन परस्पर । स्व स्व गृही जाहलो स्थिर ।
मम पिता गुणज्ञ चतुर । राज्यभार मज दिधला ॥२७॥
गुणकीर्ति श्रीगुरूपासी । दीक्षा घेतली पापनासी ।
भयभीत यमफासी । राजे फासी मज दिधले ॥२८॥
एके दिनी प्रतिज्ञास्तव । येन जाहले तुमचे गान ।
यमदडा परत्भाव । सोसिले घाव केल्या कर्माचे ॥२९॥
हार चोरला राया तुमचा । शव्द फिटला वो अमचा ।
साभाळ करावा सर्वाचा । यमदंडाचा प्रतिपाळ ॥३०॥
ऐसे वदोनी विद्युत्चर । अनित्य पाहोनी ससार ।
येवोनीया तो स्वनगर । वैराग्य आतरे विरक्त ॥३१॥
राज्य दिधले स्वपुत्रासी । पूजाविधी जिनदेवासी ।
विनंती करोनी गुरूसी । दीक्षा मजसी द्यावी स्वामी ॥३२॥

पूजा केली पंचकल्याण । सघपूजाविधीमार्गान ।
दिगंबर दीक्षा घेवोन । शूर मंत्रकर्णे गुरुमुखे ॥३३॥
जिनेद्र भाषित तप करी । स्वर्गमोक्षाची ते पायरी ।
भव्य जैना उपदेश करी । एकलविहारी महीतले ॥३४॥
तदा त्या पंचशतमुनी । संघ मिळाला महागुणी ।
तामलिप्त पूरपाठनी । श्चामुडमुनी शीष सर्व ॥३५॥
मुनी सांगे सर्वासी युक्त । श्रावक येतील समस्त ।
मम पूजा भावार्थ शक्त । करितील स्वस्थ राजादी ॥३६॥
तोपर्यंत गावाभीत्नरी । न जावे समस्त चतुरी ।
ग्रामासमीप वनातरी । शीष परिवारी चामुड ॥३७॥
तदा विद्युत्चोर तो मुनी । ग्रामपश्चिमेसी जावोनी ।
शीष समग्र मीळोनी । धर्मध्यानी बैसले तेथे ॥३८॥
मुनी रात्नौ प्रतिमायोग । निश्चल ध्यानी कायोत्सर्ग ।
चामुडच्या प्रचंडराग । करी उपसर्ग विद्युत्मुनी ॥३९॥
सर्प विंचू व्याघ्र समीप । दंशमशक ते कुरूप ।
व्यतरी क्रूर दावी रूप । येती समीप क्रूरकर्कशा ॥४०॥
उपसर्ग दु सह दारुण । विद्युत्मुनी मेरूसमान ।
उपसर्ग साहे दृढ ध्यान । शुक्लध्यानेन कर्मक्षय ॥४१॥
केवळज्ञान उत्पन्न जाले । सूर्यबिबी निर्जर आले ।
श्रुतकेवळी पूज्य जाले । पद पावले मोक्ष अक्षय ॥४२॥
काव्य –इद्रैश्चारुनरेद्रखेचरतरै.र्नागेद्रयक्षेश्वर. ।
प्रोद्यत्पंचविधप्ररत्नमुकुटप्रव्यक्तभाभासुरैः ॥
नित्यं यस्तु विशुद्धभक्तीभरत·सपूज्यचाराधितः ।
स श्रीमान् मम मगलं शिवपतिर्दद्यात् विद्युत्चरः ॥४३॥

कथा ६८

श्लोक: नत्वा पंचगुरून् भक्त्या, प्रोल्लसत् केवलश्रियं ।
गुरूदत्तमुनेर्वच्मि चरित्रं भुवनोत्तमं ।।४४।।

हस्तनागपुर सुदर । जैनधर्मी सर्वे नर ।
विजयदत्ताख्य राजा धीर । विजया सुंदर प्राणप्रिया ।।४५।।
तयाचा पुत्र रूपवंत । नामाभिधान गुरूदत्त ।
पूर्वपुण्येन यथास्थित । सुख भोगीत मन ईच्छा ।।४६।।
पुत्र पाहोन राजियासी । वैराग्य उद्भव मानसी ।
राज्यी स्थापोनी पुत्रासी । दीक्षा गुरुपासी घेतली ।।४७।।
तीव्र तपश्चर्या करीत । दिगबर वनी राहत ।
ग्रामी पुत्र राज्य करीत । इच्छा मनात विवाहाची ।।४८।।
लाट देश विख्यात असे । द्रोनी पर्वत विशाळ दिसे ।
त्यातळी ग्राम विषय । चंद्रपूर भासे अमरत्व ।।४९।।
तेथचा राजा चद्रकीर्ती । स्त्रीचंद्ररेखा राज्ञी सती ।
तत् कन्या अभयमती । रूपवंती चद्रवदनी ।।५०।।
ते मागे राजा गुरूदत्त । न दे चंद्रकीर्ती तयात ।
शीघ्रकोपी घेवोनी सैन्यात । चंद्रपुरीत वेढीले ।।५१।।
ते ऐकोनी अभयमती । तीर्थरूपा करी विनती ।
वापा न करी वैरस्थिती । नृप सम्यक्त्वी मज त्या देई ।।५२।।
तेव्हा त्यासी चंद्रकीर्तीने । कन्या दिधली महोत्सवान ।
श्रीगुरूदत्त वळवान । सतोष मन रायराणी ।।५३।।
त्या ग्रामासमीप पर्वत । द्रोणाचळ असे विख्यात ।
तेथे व्याघ्र भयरहित । भयभीत ग्राम वस जाले ।।५४।।
जितावे त्या व्याघ्रासी तुमी । ऐकोनिया हृदयधामी ।
त्याचा संव्हार करीन मी । स्वस्थ तुम्ही असावे मामा ।।५५।।

सर्व वीर मेळा मिळोनी । व्याघ्र वेष्टिला त्यानी वनी ।
कित्येक भयाभीत मनी । वीरश्रेणी शूरत्व वीर ॥५६॥
महाकोल्हाळ किकळचा वीर । दरी खोरीत गुप्त व्याघ्र ।
राजा धीट होवोनी ह्मोर । दडाला व्याघ्र गुफे आत ॥५७॥
राय कष्ट मेळवोनिया । गुफा संपूर्ण भरोनिया ।
अग्नी प्रदीप्त केला तया । व्याघ्र आरोळचा देत असे ॥५८॥
महाकष्टेन व्याघ्र मृत्य । क्रोधे वैरबंध अत्यत ।
चंद्रपुरी तेथेच तेथे । विप्रभरत जन्म व्याघ्रा ॥५९॥
भरताची स्त्री विश्वदेवी । पुत्र कपिला नाम ठेवी ।
दीर्घ होता क्रूर हृदयी । पूर्वीची ठेवी कर्मानुसार ॥६०॥
श्रीदत्त स्वस्थळा जावोन । भोग भोगी पूर्वीचे पुण्य ।
अभयमती पुत्रोत्पन्न । नामाभिधान सुवर्णभद्र ॥६१॥
रूपे सौभाग्यमंडित । विवाहक्रिया यथास्थित ।
ततो राजा देवगुरूदत्त । जाला विरक्त ससारी ॥६२॥
पुत्रासी राजी स्थापोनिया । गुरूसन्निध जावोनिया ।
महाविनय करोनिया । दीक्षाजाया ते परनिली ॥६३॥
जिनागम अभ्यास करी । गुरू आज्ञा एकलविहारी ।
भव्यजीवा उपदेश करी । चंद्रपुरी गमन त्यासी ॥६४॥
कपिला ब्राह्मण शेतात । कायोत्सर्गी मुनी ध्यानस्थ ।
पक्ष उपवास नेमस्त । काया पर्वत अचळ पै ॥६५॥
तदा पूर्वकर्म योगेन । दुष्ट कुबुधी तो ब्राह्मण ।
स्त्रियेसी सागे मे भोजन । शेतास घेवोन येई गे ॥६६॥
पाकनिष्पत्ती ते सारोन । गोदुग्ध दशमी घेवोन ।
त्वरे आली ब्राह्मणी सगुण । जेथे तो ब्राह्मण दिसे ना ॥६७॥

भट्टारकासी पुसे स्त्रिया। ध्यान मौन मुनिवर्या।
ब्राह्मणी गेली फिरोनिया। मुनीरायासी न पश्यंती ॥६८॥
ब्राह्मण आला स्वामिपासी। पुसता जाहला स्वामिसी।
मौन देखोनिया तयासी। गेला गृहासी क्षुधाक्रान्त ॥६९॥
क्रोधे बोले अनित्यवचन। अगे गे रडे घेसी प्राण।
शेता न आनिले भोजन। क्षुधातृषेण पीडले गे ॥७०॥
नग्न मुनी होता तो तेथ। का गे नाही पुसिल त्यात।
ऐकोनी कातवचनात। भीताभीत बोले धवासी ॥७१॥
स्वामी म्या पुसले स्वामिसी। तेथ होत मुनी मौनेसी।
मग मी आले स्वगृहासी। क्रोध कोन्हासी न करावा ॥७२॥
तदा तो कपिला ब्राह्मण। क्रोधे जावोनिया वने।
मुनीपासी काष्ठे रचोन। कापूस गुडून सेवरीचा ॥७३॥
अग्नि चेतवी पापी नर। तो शुक्लध्यानी मुनीश्वर।
घातिकर्माचा सहार। परीषह थोर सोशी तुझे ॥७४॥
शुक्लध्यान ज्ञान केवळ। प्राप्त होता मुनी दयाळ।
विमानारूढ सूर सकळ। पूजा केवळ पुष्पवृष्टी ॥७५॥
कपिला ब्राह्मणासी आश्चर्य। म्हने धन्य हे मुनीराय।
हृदयी भ्याला पापभय। नमस्कारी पाय स्वामीचे ॥७६॥
श्रुतकेवळी ज्ञानेश्वर। पूजू आले ते सुरनर।
उपदेश ऐकोनी समग्र। वैराग्य अंतरी ब्राह्मणाचे ॥७७॥
अपनिंदा करोनी तया। पुनः पुनः लागतु पाया।
स्वामी कृपा करोनिया। मम पापिया दीक्षा द्यावी ॥७८॥
महामिथ्याती तो ब्राह्मण। मुनीराय केला पावन।
शरणांगतासी तारण। केले पावन ब्राह्मणासी ॥७९॥

ततो भावे गुरूची सेवा । जिनधर्म मनी धरावा ।
पवित्र नरदेहे करावा । धर्म आचरावा मोक्षमार्ग ॥८०॥

श्लोकः–स जयतु जिनदेव. सर्वदेवेंद्रवंद्य–
स्त्रिभुवनसुखकर्ता विश्वसदेहहर्ता ॥
स्थिरतरगुरुदत्तः प्राप्तनित्यस्वभावो ।
मम दिशतु सुखानि श्रीप्रभाचंद्रदेवः ॥८१॥

**कथा गुरुदत्त ६९**

श्लोकः–चंचत्सत्केवलज्ञानलोचन श्रीजिनेश्वरं ।
नत्वा चिलाइतपुत्रस्य चरित्रं रचयाम्यह ॥८२॥

देवगुरू वंदोनी भावे । माय सारजे प्रसन्न व्हावे ।
ज्ञानकथा तप वैभव । सावध व्हावे श्रोता ज्ञानी ॥८३॥
राजगृह असे विस्तीर्ण । उपश्रेणिक पुण्यवान ।
माया अश्वावरी बैसोन । गेला अरण्य पाहावया ॥८४॥
वारू गेला आकाशपंथ । नृपेंद्र पडला वनात ।
भीम भिल्ल होता तेथ । नेला स्वस्थ आपुले धामी ॥८५॥
त्याची कन्या तिलकसुदर । सुश्रूषा करी मनोहर ।
पाहोनी मदनाचा भर । विरह थोर व्यापला तो ॥८६॥
भिल्लासी म्हणे हे सुदरी । आम्हासी द्यावी वो झडकरी ।
कन्यासुता राज्यनगरी । घाल तरी करावे लग्न ॥८७॥
राजा वदे सत्यवचन । तिलकापुत्र राजी स्थापीन ।
रायाचे लग्न आनदान । आले सदन राज्यगृही ॥८८॥
पूर्वपुण्य भोग भोगिता । गर्भिणी जाली भिल्लसुता ।
पुत्र जाला स्वरूपवता । माता पिता वहु आनद ॥८९॥
बीजचद्र वाढे तो निसी । प्रोढ देखोनिया पुत्रासी ।
.... .... ... । चिलाईत नामासी दिधले ॥९०॥

पुत्रासी यौवन भरले । राय निमित्या पाचारिले ।
आम्हा पुत्र पचशत भले । राज्य होईल कवनासी ॥९१॥

निमित्ती पाहे जन्मपत्र । श्रेणिकासी राज्यसूत्र ।
हे ऐकता हृदयमत्र । सागे सर्वत्र निमित्यासी ॥९२॥

निमित्ती म्हणे पहा प्रचीत । एक युक्ती सागा सर्वात ।
जो करील त्यासीच प्राप्त । राया सत्य सत्य जानावे ॥९३॥

सर्वही करिता भोजन । श्वान द्यावी त्यात सोडोन ।
न अतळता करी भोजन । राजा बुधिवान् प्रतापी ॥९४॥

शर्करापेटी पश्चिममुख । तैसेच तोय घटानेक ।
गुप्तकोठडी एक एक । न सोडिता भुके न राहावे ॥९५॥

राजगृहा अग्नि लागेल । सिहासन छत्र जो घेईल ।
भेरीहस्ती रूढ होईल । राज्य करील तो प्रतापी ॥९६॥

तैसीच युक्ती राये केली । ते श्रेणिकासी साध्य जाली ।
पाहता राया चिंता पडली । कृश जाहली तनु त्याची ॥९७॥

प्रधान पुसे राजियासी । काय व्याधि असे तुम्हासी ।
राव सागे सर्व तयासी । मम वचनासी सत्य करी ॥९८॥

तो म्हणे निर्भय असावे । राया हृदयी शात व्हावे ।
धर्मध्यानी मन ठेवावे । सार्थक करावे शास्त्रयुक्त ॥९९॥

तुमचे मनी ते करीन । सत्य राया भाक हे घेन ।
मज ठावे अभयदान । निश्चित राहणे राजेश्री ॥१००॥

तेव्हा प्रधान विचारित । .... ... .... ।
एक दोश ठेवावा यात । भोजन केले त्या श्वानात ।
दोषभय ठेवोनी त्यात । देशावरुते पिटिला तो ॥१०१॥

पुण्यप्राणी गेला देशासी । मातुळ भेटला तयासी ।
कन्या दिधली श्रेणिकाशी । नंदा राणीशी सर्वसुख ॥१०२॥
द्राविड देश काचनपुरी । श्रेणिक राजा सुखमंदिरी ।
येरीकडे राजगृहनगरी । उपश्रेणिकांतरी संतोष ॥१०३॥
चिलाईत राजी स्थापिला । भाष शब्द सत्य जाहला ।
पाहता धर्म आचरिला । हृदयी आठविला श्रेणिक ॥१०४॥
राजमुद्रा शोभे त्यासी । देवा म्या पिटला देशासी ।
विरक्त होवोन मानसी । वैराग्यासी चितवीतसे ॥१०५॥
मुनिसी विनय करोनी । दीक्षा विधियुक्त घेवोनी ।
श्रीकीर्ती महाशुद्धज्ञानी । मोक्षमार्गानी जातील ॥१०६॥
तेव्हा तो चिलाईतपुत्र । मूढा न कळे राज्यसूत्र ।
अन्याय विन वानपुत्र । पिडोन सर्वत्र द्रव्य हारी ॥१०७॥
कित्येका दिवसानंतरे । श्रेणिका श्रृत्य समाचार ।
घेवोनिया तो दलभार । राजगृह नगर पातला ॥१०८॥
चिलाईत गेला पळोनि । श्रेणिक बसला सिंहासनी ।
प्रजा पाळी पुत्रासमानी । जिनभुवनी नित्य पूजा ॥१०९॥
नित्य करिती चार दान । राजा रहित पुण्यवान ।
गुरूभक्ती शास्त्रयुक्तीन । शास्त्रश्रवण ते सिद्धान्त ॥११०॥
चिलाईत गेला वनात । दुर्ग बोधिला बलान्वित ।
करभार घेत देशात । द्रव्य अगणित संचये ॥१११॥
तत् समीप ग्रामांतरी । भर्तृमित्राख्य तो संसारी ।
त्याचा मातुळ श्रावकाचारी । राजगृह नगरी नांदत ॥११२॥
रुद्रदत्त नामाभिधान । तत् कन्या सुभद्रा सगुण ।
ते मागे भर्तृमित्र आपन । न देत म्हणे मिथ्यातिसी ॥११३॥

तो गेला चिलाईतापासी । द्रव्य आशा दावि त्यासी ।
म्हणे मातुळकन्या मजसी । बळत्कारेसी लग्न करा ।।११४।।
पंचशत भिल्ल मिळोन । भर्तृमित्राख्यासी घेवोन ।
त्वरे राजगृही जावोन । लाविले लग्न बळत्कारे ।।११५।।
चिलाईत सर्व मिळोन । सुभद्रा कन्या केले हरण ।
तो कोल्हाळ श्रेणिक ऐकोन । निघे त्वरेन तयापृष्टी ।।११६।।
सैन्यासहित तो वेष्टिला । भिल्लाचा मेळा तो पळाला ।
पापी करिती ते पापाला । प्राण घेतला सुभद्रेचा ।।११७।।
आर्त्त क्रोधध्यानी ते मरोन । व्यतरी जाली त्याचवने ।
चिलाईत वैर बाधोन । वनभ्रमण करीतसे ।।११८।।
राय धरिला चिलाईत । मग त्यासी केले फजीत ।
उत्तमकुळी जन्मप्राप्त । परपीडा तूत कुगती ।।११९।।
ते ऐकोन बंधुवचन । आपनिंदा करी वदन ।
धिक् धिक् माझे हे जिन । कुळी लाछन लाविल म्या ।।१२०।।
आता तारी बंधु सखया । शरणागत तुझ्या पाया ।
राय अभय देवोनिया । याच ठाया सुखी राहिजे ।।१२१।।
तत् वैभार त्या पर्वती । पचशतमुनी असती ।
मुनिदत्ताख्य मुख्य जती । तपे तपती भानु जैसे ।।१२२।।
त्या गिरीवरी चिलाईत । सहज गेला चिंताग्रस्त ।
मुनीद्र दृष्ट्वा अकस्मात । केला नमोस्तु द्वयपाणी ।।११३।।
स्वामी मी अज्ञानी पापिष्ट । माझे निवारा भवकष्ट ।
मज तारावे कृपादृष्ट । चरणी ललाट ठेविले ।।१२४।।
स्वामी दयाब्धि अवधीज्ञानी । भव्यप्राणी जानोनी मनी ।
धर्म तत्त्व उपदेशोनी । दीक्षेलागुनी सिद्ध जाला ।।१२५।।

श्रीगुरूराज दयावंत । दीक्षा दिधली विधीयुक्त ।
सुरमंत्र दिधला तयात । शास्त्रसिद्धान्त निपुण तो ।।१२६।।

स्वामी मजसी नेम देन । पक्ष उपास मी करीन ।
गुरू पाहे अवधीज्ञान । तव अष्टदिन आयुष्य ।।१२७।।

ते ऐकता चिलाईत । अनशनव्रत गुरूहस्त ।
कायोत्सर्ग ध्यानस्वस्थ । जैसा स्तंभ अचळ तो ।।१२८।।

श्रेणिकराय वैभारासी । देवदर्शन पाहे गुरूसी ।
नमोस्तु केला भावार्थेसी । चिलाईतासी वोळखिले ।।१२९।।

तप वीर धीर देखोन । नमन केले त्या रायान ।
प्रशसा केली धन्य धन्य । वंश धन्य देहे सार्थक ।।१३०।।

पुनः नमोस्तु केला त्यासी । श्रेणिक गेला निजस्थानासी ।
सुभद्रा व्यंतरी पाहे त्यासी । पूर्व वैरासी आठवी ते ।।१३१।।

रूप धरी क्रूर पक्षीण । मस्तकी बैसे फोडी नैन ।
अशुद्ध वाहे नेत्रातून । मक्षिका वेष्टन अगासी ।।१३२।।

डास गांधनी तोडी शरीर । परीषह दु.सह दुर्धर ।
पूर्वकर्म न सोडी वैर । श्रोते चतुर परिसावे ।।१३३।।

दुर्धर परिषह सोशी । समाधीमरण जाल त्यासी ।
तपे इंद्रपद तयासी । सर्वार्थसिद्धिमी सर्वसुख ।।१३४।।

काव्यः—स श्रीमान् सुभटाग्रणीर्गुणनिधि जित्वोपसर्गं दृढ ।
श्रीमन्जैनपदाब्जचितनपरो देवेंद्रवृंदैः स्तुतः ।।
सप्राप्तो निजपुण्यसंबलयुत सर्वार्थसिद्धि शुभा ।
दद्यात् चारुचिलातपुत्रसुमति भव्योऽत्र मे मंगल ।।१३५।।

**चिलाईत कथा संपूर्ण ॥ कथा ७० ॥**

चिलाईत कथा संपूर्ण । पुढील कथेसी लावा मन ।
भव्य जीव सावधानेन । तपविवर्ण परिसावे ।।१३६।।
नमस्कृत्य श्री जिनाधीश । धर्मसार तो उपदेश ।
धन्य नामा मुनीविशेष । चरित्रविशेष सुखदायी ।।१३७।।
जंबूद्वीप महाविख्यात । मेरू पूर्वेसी विदेहात ।
वीतशोकापुरी पुनीत । राज्य करी अशोक राजा ।।१३८।।
धान्यलोभ त्याचे अतरी । आर्तध्यान तो लोभ धरी ।
जीवदया नसे अतरी । क्रोध करी पर जीवाचा ।।१३९।।
दाने खातील ते उदंड । खळ्यात बाधि पशुची तोंड ।
गाई म्हैसी वच्छे तो द्वाड । पयपान तोंड आखडितो ।।१४०।।
स्त्रिया करिती स्वयंपाक । थोडे अधिक दावी धाक ।
दास दासीची मोडी भूक । याचका भीक घालो नेदि ।।१४१।।
न खाय पूर्णता उदर । न दे तो कधी दान चार ।
दान पूजा नि गुरूशास्त्र । क्षीण मात्र त्या नेम नाही ।।१४२।।
स्त्रिया पाजिती बाळकासी । कामास्तव वर्जी तयासी ।
स्तनबंध बोडसासी । जैसे अजासी धनगर ।।१४३।।
राज्य प्राप्त पूर्व पुण्यान । येथे न करी पुण्य जानोन ।
सदा करी पर पीडन । ते बंधन कर्मबधन ।।१४४।।
एकदा तस्य पापास्तव । मुखरोगव्याप्तदेहे सर्व ।
कर्मदंड लोभ्या याच भव । वैद्या द्रव्यदंड सोसिती ।।१४५।।
राज्यदंडानी अग्नीचोर । दंड सोसिती पापी नर ।
हे जानोन तो राज्यधर । रागे जर्जर फार जाला ।।१४६।।
महावैद्य महाऔषध । रोगनाशार्थात विविध ।
भाजन रसायन शुद्ध । करोनी सीध स्वीकारावे ।।१४७।।

तत् समयी पूर्वपुण्येन । तपकीर्ती मुनी धीमान् ।
बावीस परीषह ध्यान । तरणतारण त्रैलोकी ।।१४८।।
नौंवा सोळाकारण । भावरी आले राजसदन ।
त्या नृप पाहोनी नयन । दर्शनेन पुण्य उद्भव ।।१४९।।
मुनीचा माझा रोग एक । राज जानोनिया नि.शंक ।
कळस घेवोनी हस्तक । मुनीनायक पडघावी ।।१५०।।
दिव्य औषध आहारात । तुर्यदानेन मुनी तृप्त ।
नवविधा पुण्य प्राप्त । रोगरहित गुरूराय ।।१५१।।
क्षुधारोग वपुचा रोग । मुनींद्र जाले दिव्य अग ।
जैसे मिथ्यामत भग । सत्यार्थमार्ग उपदेशे ।।१५२।।
नृपही जाला आरोग्यता । पुण्यप्रतापे आयुपूर्ता ।
अंती भरत क्षेत्रातौता । पुण्यवंता पुण्यमंदीर ।।१५३।।
आमलकटाख्ये नगरी । अनिष्टसेन तो राज्य करी ।
नंदीमती राज्ञी सुदरी । तत् उदरी अशोकराजा ।।१५४।।
पुत्र जन्मला रूपवंत । नाम ठेविले धान्यवंत ।
माता पिता सतोषवित । पुण्ये मंडित सकुमाळ ।।१५५।।
द्वितीयचंद्र पौर्णमेसी । वृधी पाविला तारुण्यासी ।
सर्वकळा गुणरासी । सिद्धान्तासी श्रुतज्ञानी पैं ।।१५६।।
एकदा वसंत ऋतु दिन । अरिष्टनेमी नाथ जिन ।
विहार पुष्प वागवन । समवशरण वारसभा ।।१५७।।
ते पाहोनिया वनमाळी । षड्ऋतु पुष्प फळी ।
आला घेवोन रायाजवळी । पुण्यबळी राया तुमचे ।।१५८।।
ऐकोन दिल्ही आनंदभेरी । वंदने चाले सहपरिवारी ।
जावोनिया तो वनांतरी । जैजैकारी वचने वदे ।।१५९।।

तीन प्रदक्षिणा देवोनी । निछै निछै वदे वचनी ।
श्रीफळाष्टद्रव्यपूजोनी । नमोस्तु त्रिकरणी त्रिशुद्ध ।।१६०।।

धर्ममाकर्ण्य श्रीजिनेद्र । अर्चनीक नर सुरेद्र ।
विरक्त तो जाला राजेद्र । संसारचरित्र धिक् धिक् ।।१६१।।

दीक्षा द्यावी स्वामी समर्था । तुर्याश्रम आयुस्वल्पता ।
ऐसे विनवी नेमिनाथा । हस्तमाथा सुरमंत्र त्या ।।१६२।।

ज्ञानाभ्यास पूर्ण जाहला । उग्रोग्र तप करू लागला ।
एकलविहारी तीर्थाला । हिंडत आला सौरपुरी ।।१६३।।

यमुना नदी पूर्वतीरी । आतापयोग शिळेवरी ।
तेथे पारधी दुराचारी । पाहे नजरी हे श्वापद ।।१६४।।

बाण अचूक सोडोन । हृदयी रूतला तीक्ष्ण ।
धीर वीर तो धर्मध्यान । शुक्लध्यान धन्य मुनीद्र ।।१६५।।

उपसर्ग सोसिता घोर । मुड केवळी ज्ञानधर ।
जय जय  रव नरसूर । उपदेशसूत्र भव्यजीवा ।।१६६।।

शुक्लध्यान देह ठेवोन । तप प्रभावे मोक्षपेन ।
श्रोते व्हावे सावधान । शुक्लध्यान ईछावे मनी ।।१६७।।

श्लोक'–धन्यो धन्यमुनीश्वरो भयहरो, भव्यात्मना तारको ।
देवेद्रादिसमर्चितो हितकर. सन्मुक्तिकातावर ।।
आधिव्याधिसमस्तदोषनिकर, हत्वा सुखं शाश्वत ।
कुर्यात् मे वरबोधसिंधुरतुलश्चारित्रचूडामणि' ।।१६८।।

**कथा ७१ संपूर्ण**

श्रीजिनेद्र पद वंदोनी । माय सारदा मम मनी ।
सद्गुरूरत्नचूडामणी । कवित्व करनी तत् योगे ।।१६९।।

दीक्षा शिक्षा गुरूपंकमळा । विनवीतसे वेळोवेळा ।
मति द्यावी कवित्वकळा । आप्तलडिवाळा साभाळी ॥१७०॥

श्रोते भव्यजनपडित । सुकथा ऐकावी एकचित्त ।
तपव्रतनेमवमकृत्य । मोक्षमार्ग त्यात सहजची ॥१७१॥

पंचशत मुनी चरित्र । दक्षिणदेशी भरतक्षेत्र ।
देश ग्राम पुण्य पवित्र । कुभकार नगर शुभ ॥१७२॥

राजा दंडक अभिधान । राज्ञी सुव्रता ते सद्गुण ।
बाळकाख्य मत्री दुर्गुण । धर्म जैन नावडे त्या ॥१७३॥

तत्रैव उद्यान वनात । मुनी आगमन पंचशत ।
उत्कृष्ट तपस्वी ज्ञानवत । मुख्य अभिनदन कीर्त ।
विहार करीत स्थलिल या ॥१७४॥

खडकाख्य ब्रह्मचारी । चर्यार्थ गेला पाहु नगरी ।
राजगृही करिता भावरी । प्रधान नेत्री पाहे त्यासी ॥१७५॥

मंत्री म्हणे हे मुनी कुश्चळ । वस्त्रहीन हे अमगळ ।
लज्जारहित हे कश्मळ । सदाकाळ हे वनवासी ॥१७६॥

यासी नाही घराश्रम । सतत संपत वस्त्र धाम ।
कैंच व्रत तो कैंचा नेम । सन्यासाश्रम न जानती ॥१७७॥

ते ऐकोनिया ब्रह्मचारी । रे रे मूर्खा दुराचारी ।
तुझे गुरू मासाहारी । घराचारी ते प्रपचिक ॥१७८॥

आपना सन्यासी म्हणती । षड्रिपु हृदयी वसती ।
गुरु शीष प्रपंच वर्त्तती । नर्का जाताती क्रियाविण ॥१७९॥

स्याद्वादमते तो प्रधान । निंदावाद करी दुर्जन ।
सुव्रता राज्ञी ते ऐकोन । करी निर्भर्त्सना तयाची ॥१८०॥

राज्यबळे तो प्रधान । राणीसी वाद करी दुर्जन ।
तेन रायासी सागोन । कोपायमान राजा जाहला ।।१८१।।

राजा दुष्ट बौधमती । प्रधान तैसाच मिथ्यामती ।
द्वेष धरोनिया चित्ती । कपटि करिती अनिष्ट ।।१८२।।

यंत्र छेदिती हृदयासी । खिळे रोपिती पदासी ।
उपसर्ग घोर मुनीसी । करिता तयासी दया नये ।।१८३।।

दयाविरहित जे नर । कोटचकल्प भोगी अघोर ।
ते मुनीराय धीरवीर । परीषह समग्र तोसिती ।।१८४।।

तपबळे करोनी ज्ञानी । मेरूसम अचल मौनी ।
क्षमासम तुल्य मेदनी । शुक्लध्यानी मार्ग मोक्षाचा ।।१८५।।

राजा दंडाख्य मिथ्यामती । दुष्ट पापी रौद्र कोपति ।
करू नये तेचि करिती । दुर्गति अनत संसारी ।।१८६।।

परीषह समुदाय भोगोनी । केवळज्ञानी जाले मुनी ।
त्रैलोक्य पूजनीक होवोनी । उपदेशोनी अंती मोक्ष ।।१८७।।

काव्यः-चंचत्सुवर्णगिरिराजसुनिश्चलास्ते ।
प्रध्वस्तकर्ममलसंगतयो मुनीद्राः ।।
देवेद्रदानवनरेद्र-समर्थनीया ।
नित्यं भवंतु भवशातिविधायिनो मे ।।१८८।।

पचशत मुनीकथा पूर्ण । श्रीरत्नकीर्तीप्रसादेन ।
चंद्रकीर्ती अज्ञानपण । तपवर्णन तुर्याराधना ।।१८९।।

**कथा ७२ संपूर्ण**

श्री जिनेद्राचे दर्शनेन । सर्वही पापाचे दहन ।
पंचगुरुसी करू नमन । कवित्व ज्ञान द्या मजसी ।।१९०।।

माय सारदा वदोनिया । शिक्षा दीक्षा गुरुचे पाया ।
मज दीना साह्य होवोनिया । कथा श्रोतिया वदवावी ।।१९१।।
पाटली नगरी विख्यात । नंदो राजा राज्य करीत ।
त्रय मंत्री असती त्यात । कावि शोभत प्रथम हा ।।१९२।।
सुबंधु सकटा तीसरा । पुरोहित कपिल बरा ।
देविला राज्ञी ते मुदरा । तत् पुत्र चतुर चाणक्य ।।१९३।।
वेद वेदाग विचक्षण । षड्‌शास्त्री ज्ञाननिपुण ।
एकदा कवि मंत्री येवोन । वर्तमान रायासी सांगे ।।१९४।।
देशिक भूप मदोन्मत्त । बळाढचे करभार घेत ।
न देता देश विध्वसित । उपाय यात नंदराया ।।१९५।।
राजा म्हणे त्या द्रव्य देन । उद्धत नरा नीवारण ।
मंत्रीन तत् युक्ती करोन । भंडारातून द्रव्य दिल्हे ।।१९६।।
परराष्ट्र निर्वाह करोनी । प्रजा सतोषात अवनी ।
नदराजा विचारी मनी । द्रव्याची ठेवनी पहावी ।।१९७।।
कित्येक दिवसानंतरे । भाडारी बोलाविला त्वरे ।
द्रव्यसच्चय पुसे बरे । प्रधानेच सारे नलेकी ।।१९८।।
राव क्रोधाग्नि धडकत । भांडार लुटला समस्त ।
प्रधानाची सर्व संतत । आधारीत घातली त्याने ।।१९९।।
नित्य चने एकचि मुष्ट । पानी पाजी त्यासि नेमष्ट ।
द्वारे पच्चि दृढकपाट । अधारी दाट भयंकर ।।२००।।
प्रधान दिधला काढोन । तो गावात फिरे जेवि दीन ।
त्यासी जाले कित्येक दिन । प्रधानाविन राज्य न चाले ।।२०१।।
कावि प्रधाना बोलाविले । प्रधानपद त्यासी दिधले ।
मग तेन राया विचारिले । कोठे ठेविले मे परिवार ।।२०२।।

राव म्हणे पुस भृत्यात । क्रोधे पाहे तो प्रधानात ।
त्रिवर्षा पाहता त्यात । जाला मृत्य सर्वाचा ।।२०३।।
प्रधान त्यात पाहोनी । गुप्त ठेविले अत:करणी ।
नृपे कुटुबक्षय करोनी । तैसेच करणी मी करीन ।।२०४।।
तयासी कळ न करता । एकदा गेला बागातौता ।
तेथे गर्त्ता खन खनिता । राजसुतासी जाल श्रुत ।।२०५।।
चाणक्य पुसे वो प्रधान । या गर्त्तेचे काय कारण ।
दर्भमूलात उत्पाटन । यत् प्रमाण वैरी कुळक्षय ।।२०६।।
प्रधान म्हणे राजपुत्रासी । क्षय केला मम वशासी ।
तेसीच गति करू त्याची । भ्याला मानसी चाणक्य ।।२०७।।
कावि प्रधाना समजाउन । क्षमा करावी वडिलान ।
मग तो गृहासी येवोन । केले निवेदन स्त्रियसी ।।२०८।।
यशस्वती ते म्हणे स्वामी । चतुर्दान करावी तुम्ही ।
दानपुण्य आपुल्याश्रमी । वशधामी वृधीसी होय ।।२०९।।
तं श्रुत्वा कावि प्रधानेन । नंदराजा करिता पुण्य ।
उपाध्यासी देता दान । भोजन दक्षना शतैक ।।२१०।।
अतर कपटी तो मन्त्री । म्हणे पुण्य करा राजेश्री ।
चाणक्य बोलावी सत्वरी । परिवारी कपिलपुत्र ।।२११।।
श्रेष्ठासनी बैसविला तो । तेथे मन्त्री दुष्टबुधी तो ।
श्रेष्ठासन समस्तासी तो । पुण्य होम तो करा कैसा ।।२१२।।
होमकुंड करी चाणक्य । कृतंन्यास सागती ऐक्य ।
आशा तृष्णा वदति वाक्य । येणेच सौख्य तुम्हा होय ।।२१३।।
ते ऐकोनिया काविमंत्री । रे रे भट निघा बाहेरी ।
राजाज्ञा ऐसी वैखरी । घालावे बाहेरी सर्वही ।।२१४।।

एक गळा हाती धरोनी । सर्व लाविले पिटाळुनी ।
चाणक्य समजला मनी । वंशाची हानि हाचि दुष्ट ।।२१५।।
मग मंत्रीसी तो विचारी । एकात सागा परोपरी ।
दोघे समजले अंतरी । राजा बाहेरी घालावा ।।२१६।।
अथवा करावा नि पात । मग राज्य करी तू स्वस्थ ।
पुत्रा मानले तेचि सत्य । रक्षावे वशात आपुल्या ।।२१७।।
प्रधाने आणोनी प्रचक्र । राज्यभार घेती समग्र ।
प्राण हिरावोनि सत्वर । राजी कुमर बैसविला ।।२१८।।
अहो मंत्री कोपे करोन । राज्यहानी प्राणहनन ।
जैसी स्त्री कोपे राक्षसीन । पतिहानन ढाल गळि ।।२१९।।
राजा चाणक्य राज्य करीत । पूर्व पुण्य सतत संपत ।
तिघे मंत्री दुष्ट मिथ्यात । पश्चात्तापात दूर केले ।।२२०।।
वैराग्य जाले त्या उत्पन्न । धिक् धिक् संसारभान ।
पिता मित्र ते वधूजन । मिथ्यात संपूर्ण धिक् हे ।।२२१।।
चिंतोनी द्वादशानुप्रेक्षा । महीधरमुनी तळीवृक्षा ।
नमोस्तु शुद्ध त्रिकरणदक्षा । धर्मपरीक्षा श्रुत सर्व ।।२२२।।
विधियुक्त दीक्षा यथास्थित । भव्यजनमुनी पंचशत ।
ग्यारा अग पूर्व समस्त । गुरूआज्ञेत विहारती ।।२२३।।
सबोधोनी भव्यजीवासी । तीर्थवंदना त्या सर्वासी ।
दक्षिणदेश क्रौचपुरासी । पश्चिमभागासी तिष्ठले ।।२२४।।
नंदरायाचा तो प्रधान । पापिष्ठ कुधी परायण ।
राजा मरोन क्रोध ध्यान । जाले उत्पन्न क्रौंचपुरी ।।२२५।।
तत् ग्रामी सुमित्र राजा । धर्म साधितो आत्मकाजा ।
गोठना येवोन मुनीराजा । पादपूजास्तु विधियुक्त ।।२२६।।

विनय नमोस्तु गुरूवर्या । नृप गेला अपले ठाया ।
नृपनदजीव तत् समया । मनीचे ठाया पातले ते ॥२२७॥
पूर्व वैर जातिस्मरण । पापिया पापची उत्पन्न ।
न चुके हा त्या वैररीन । परीषह त्यान फार केला ॥२२८॥
चौफेर काष्ठ ते रचोनिया । अग्नि चेतविला तत् समया ।
कायोत्सर्ग मुनीराया । ध्यान धर्मशुक्ल हृदया ॥२२९॥
कर्म क्षपाया धीर धरिती । मुडकेवळी मोक्षा जाती ।
सावधान व्हावेजी श्रोती । तप श्रुती कथा दीर्घत्व ॥२३०॥
पुढिलाध्यायी तपवर्णन । चरित्रकथा वृषभसेन ।
भव्य श्रोते करा श्रवण । मोक्षमार्गान जावयासी ॥२३१॥
काव्य '-यत्रानतसुखसमस्तजगता पूज्य व्यथावर्जितं ।
राग-द्वेष-मद-प्रमाद-रहितं सप्राप्य सिद्धालय ।
सर्वे ते मुनयो विशुद्धचरणा तिष्ठन्ति ये नित्यश ।
कुर्युमेऽपि सुख विमुक्तिजनितं बोधाब्धयो निर्मल ॥२३२॥

**इति श्री कथाकोश कथा विद्युत्चर ६८, गुरूदत्त ६९, चिलाईत ७०, धन्यनाम ७१ तथा पंचशतसमता ७२, चाणक्य ७३**

**इति श्री गुरूरत्न लघुचंद्रद्वितीय विरचिते प्रसंग ॥४३॥ तिन्हेताळसावा कथा ॥७३॥ शुभं भवतु कल्याणविजयी भव तथास्तु ॥ छ ॥**

# प्रसंग चौरेचाळिसावा

## ॐ नमः सिद्धेभ्यः ।

ॐ नमो पच परम गुरू । अरिहंत सिद्ध मुक्तीवरू ।
आचार्य ज्ञानदाता तारु । ग्रथाधारू पाठक साधू ।।१।।
माय सारजा जिनवाणी । बाळकाच साह्यकारिनी ।
हृदयी जिह्वाग्री वसोनी । कवित्व करणी तूच तू ।।२।।
दीक्षा शिक्षा सद्‌गुरूराये । ग्रथाची दाखविली सोये ।
परि मी अज्ञानी मूढ होय । करावे साह्य जनकापरी ।।३।।
मज न कळे संस्कृतार्थ । देशभाषा हे पराकृत ।
गुरूनी निरोपिले माते । करावे कवित बाळभाषा ।।४।।
स्वामी गेले मोक्षमार्गान । ग्रथ खडित पाहिला नैन ।
गुरू आज्ञा हृदयी धरोन । तत् प्रसादेन कथाकोश ।।५।।
श्रोते ज्ञाननिधी गभीर । श्रवण करा गगानीर ।
क्षीराब्धि अथाक मधुर । लावावा कर ज्ञानकृपेन ।।६।।
मागील अध्यायाची कथा । तप आराधना पच कथा ।
विद्युत्‌चर गुरूदेवदत्ता । चिलाईता मोक्ष सौख्यात ।।७।।

धन्य नामा पंचशतशे । चारणमुनी ते पाचशे ।
पंच कथा महाविशेष । श्रीजिनेश पूर्ण करविता ।।८।।
पुढति अध्याय निरोपण । वृषभसेन चरित्र गहन ।
श्रवण करावे श्रोते जन । जेन गमन मोक्षमार्गे ।।९।।
श्लोक:–श्रीजिनं भारती नत्वा श्रुताब्धि मुनिसत्तमं ।
वक्षे वृषभसेनस्य, चरित्र भुवनोत्तमं ।।१०।।
दक्षिण दिशेसी विख्यात । कुनाल नगर महत ।
राजा वैश्रवण शोभत । धर्मवंत सम्यक्दृष्टी ।।११।।
ईष्ट नामे प्रधान कुमती । पापी दुष्टात्मा धर्मघाती ।
जै चदन वृक्षावरौती । अहि लुब्ध ती विखार ते ।।१२।।
एकदा मुनी संघसहित । तेथे आले ज्ञानवत ।
नगरी राया जाले श्रुत । आले त्वरित वदनेसी ।।१३।।
त्रि परीत्य भक्तिपूजा । त्रिविध नमोस्तु गुरूराजा ।
धर्मामृत श्रवण काजा । बैसला राजा वैश्रवण ।।१४।।
तेव्हा ते वृषभसेन मुनी । राया धर्मवृद्धी देवोनी ।
स्वामि वदती सिद्धान्तवानी । मोक्षदायिनी जीवासी ।।१५।।
श्रावक नगरीचे समस्त । तेही आले वदनेत ।
श्रवण करिती सिद्धान्त । ऐकोनी तृप्त हृदयासी ।।१६।।
धर्म सागार अनगार । ऐकोन राया सतोष फार ।
षट् शास्त्राचे हेचि सार । पंचमिथ्या दूर पाखंडी ।।१७।।
जैन धर्म त्रिजगी श्रेष्ठ । सर्व सुखदाता उत्कृष्ट ।
हे ऐकता प्रधान दुष्ट । मिथ्याती पापिष्ट कुवादी ।।१८।।
वाद करिता दीन सत्य । मुनीराज जाले जयवंत ।
प्रधानातरी क्रोध तप्त । वैर हृदयात धरी पापी ।।१९।।

रात्री तो दुष्टात्मा दुराचारी । अग्निकाष्ठ घेवोनी करी ।
ध्यानस्थ असती वनातरी । वैर परी साधीन आता ॥२०॥

समुदाय घेवोन सेवक । काष्ठ मेळविली अनेक ।
रचना केली दुःखदायक । अग्निचौक प्रदीप्त केला ॥२१॥

स्वयं शीघ्र चौदिशेसी । पुनः टाकिती धूळीसी ।
पापी करिती पापराशी । नर्कभूमीसी ते जातील ॥२२॥

तदा ते सर्वही मुनी । शुक्लध्यान बैसले ध्यानी ।
दुष्ट उपसर्ग साहुनी । मोक्षसदनी स्वर्गापवर्ग ॥२३॥

दुष्ट साधुसी विघ्न करिती । जन्मोजन्मी त्यासी दुर्गती ।
जे का स्वामिसी शरण जाती । अद्भुत भोगिती सौख्यासी ॥२४॥

कथा ७४

श्लोक.–सन्तस्ते मुनिसत्तमा' शुचितराः सद्ध्यानशैलाश्रिता. ।
श्रीमत्सारजिनेंद्रतत्त्वचतुरा जित्वोपसर्गं दृढं ।
सप्राप्ताः स्वविशुद्धभावभरतः स्वर्गापवर्गं शुभं ।
देवेंद्रादिसमर्चिता. शुभकराः कुर्यु सता मंगल ॥२५॥

ते मुनी सर्व ध्यानी अचळ । श्रीजिनेंद्र तत्त्व अढळ ।
दुष्टोपसर्ग तपबळ । जितोनी सकळ सर्वसुखी ॥२६॥

ऐसी हे तप आराधना । श्रवण केली श्रोतेजना ।
पुढे मनोदोष लक्षण । तप आराधना एकावी ॥२७॥

श्लोक.–स्वयभुव नमस्कृत्य, जिनेंद्र केवलक्षण ।
संबोधाय सता वच्मि, मनोदोषस्य लक्षण ॥२८॥

स्वयभूरमण समुद्र । विख्यात असे महाथोर ।
सहस्त्रयोजन विस्तार । तदार्धं नीर अथाक ॥२९॥

तत् अर्धं शत ते दोन । महामत्स्य ते विस्तीर्ण ।
श्रेष्ठ असे दीर्घायमान । लघु कृतघ्न मनभ्रष्ट ।।३०।।

शालिसिक्ताख्य दोघे बधू । कर्णमळ भक्षी आब्धु ।
श्रेष्ठ मत्स्या पूर्वसमधु । निद्रा आब्धू पड्मास पै ।।३१।।

निद्रा करी मुख पसरोन । दीर्घ दाढा एक योजन ।
त जंतु करिती गमन । ते पाहोन लघुमत्स्य इच्छी ।।३१।।

ऐसे मुख माझे असत । तरी मी भक्षितो सर्वांत ।
ऐस पाप मन चेष्टित । त्या कर्णमळात भक्षी सदा ।।३३।।

मनो-मळ-पापे करोनी । आयुष्याती श्वभ्रसदनी ।
महाकष्ट दुर्योनी । भोगी प्राणी सप्तम नर्की ।।३४।।

अहो हो पुण्य आनि पाप । मनचि कल्पी आपोआप ।
पापतोचितो यमकोप । पुण्य तो भूप स्वर्गाचा की ।।३५।।

याच अर्थी हो नित्य नित्य । सदा करावे जिन श्रुत्य ।
पूर्व पाप जयान त्यक्त । जिनवचनोक्त मनी कल्पा ।।३६।।

श्लोक.--श्रीमत् जैनवच. प्रदीपनिकर मिथ्यातमोनाशकं ।
देवेद्रादिसमस्तभव्यनिवहैर्भक्त्या समभ्यर्चित ।।
भो भव्या भव-भूरिदु.खदलन स्वर्मोक्षमार्गप्रदं ।
नित्य चेतसि चितयतु नितरा शान्त्यै भवत: श्रिय: ।।३७।।

श्रीजिनेद्रवचन ते थोर । जेने हारे मिथ्याध.कार ।
भव्य जीवा सुख अपार । मोक्षमदीर अनुक्रमे ।।३८।।

॥ कथा ७५ ॥

त्रयपचीसी कथा जाली । ते श्रोतेजना श्रुत केली ।
जरी असेल चुकी भूली । साभाळिली पाहिजे ज्ञाते हो ॥३९॥

पुढील कथेचे निरोपण । कथाकोश तप आराधम ।
सुभौम राजा गुणीजन । पुण्यवान अष्टमचक्री ।।४०।।
श्लोक:–ईंद्र–नागेद्र–चंद्रार्क–समर्चित–पद–द्वयं ।
नत्वा जिनं प्रवक्षेहं, सुभोमेशस्य वृत्तकं ।।४१।।
ईर्शावतीपुरीचा राजा । कार्तवीर्य कीर्तीची ध्वजा ।
रेवती कामिनी त्या भाजा । तत् पुत्र राजा सुभोमवाक् ।।४२।।
अष्टम चक्रवर्ती गुणी । सर्व ऋद्धीसहित ज्ञानी ।
पाकनिष्पती चातुर्य मनी । विजैसेन कर्णीयुक्त तो ।।४३।।
एकदा त्यान त्या भूपासी । क्षीरभोजन उष्ण त्यासी ।
देता क्रोध त्याचे मानसी । तो ठाव त्यासी त्राहाटिला ।।४४।।
विजयसेना मृत्यु जाला । क्रोधध्यान वैर बांधला ।
क्षारसमुद्री व्यंतर जाला । त्या समजला पूर्ववैर ।।४५।।
क्रोधे तापसरूप धरी । मिष्ट फळ घेवोनिया करी ।
वैर साधु मनी विचारी । आली मदिरी रायाचे पै ।।४६।।
फळ अर्पिली तया म्होरे । सुगध मिष्ट अति सुंदर ।
स्वाद जानोनी चक्रेश्वर । पुसे वगत्र तापसासी ।।४७।।
तेव्हा तापस प्रपंचान । समुद्रतीरा गेला घेवोन ।
त्याचे करावे हनन । केले स्मरण नौकार चक्री ।।४८।।
वळ न चाले व्यंतराचे । कपट समजले तयाचे ।
चक्री म्हणे मम प्राणाचे । हनन साच करू पाहसी ।।४९।।
व्यतर म्हणे कोठे जासी । आता वधीन मी तुजसी ।
तेव्हा भयभीत मानसी । शरण त्यासी देहलोभ ।।५०।।
कुबुधी म्हणे एक करी । नौकार लेही भूमीवरी ।
पादे पुसशील जरी । सोडीन तरी तुजला मी ।।५१।।

जिवित्वलोभ धरोनीया । निंदकर्म केले त्या ठाया ।
आयुष्यांती मरोनीया । सप्तमठाया नर्कभूमी ॥५२॥

धिक् मूढत्व जे का प्राणी । विषयलपट कुज्ञानी ।
चक्रवर्ती असोन ज्ञानी । देहे लोभ धरोन कुगती ॥५३॥

व्यंतराचा वैर फिटोन । म्हणे मी पापी लक्षगुण ।
नौकराच केल हनन । म्या पाप्यान पाप जोडिले ॥५४॥

अपनिंदा करोनी फार । तोडिला कर्माचा भवभार ।
श्रीजिनपूजेनी तत्पर । गुरू निरंतर परमेष्टी ॥५५॥

धन्य ते जिन पूजनीक । धन्य ते सुदेव सेवक ।
धन्य तो जिनवानी ऐक । सर्व सुख तयासी होय ॥५६॥

श्लोक:-सम्यक्त्वं त्रिजगत्-हितं भवहर शक्रादिभिः पूजितं ।
नानाशर्मविधायकं गुणकरं स्वर्गापवर्गप्रदं ॥

तत् भक्त्याष्टविधं जिनेंद्रकथित श्रित्वा च मुक्तिश्रियं ।
चित्ते भव्यमतल्लिका गतभयं संभावयतु प्रिय ॥५७॥

जे का सम्यक्त्वी भव्यप्राणी । षट्कर्मादि देवपूजनी ।
सप्तक्षेत्री द्रव्य वेचुनी । मोक्षगमनी अनुक्रमे ॥५८॥

सुभोमराजाचे चकवर्ती । कथा श्रवण ज्ञानी करिती ।
क्षमाभाव धरोनी चित्ती । अल्पमती त्या सांभाळावे ॥५९॥

॥ कथा ७६ ॥

स्याहात्तर कथा सपूर्ण । पुढे श्रोता करा गमन ।
सरस्वती मज प्रसन्न । भावार्थाने तुमचिया पैं ॥६०॥

श्लोक : प्रणम्य परमानंद श्रीजिनेद्रं जगत्-हित ।
शुभाख्य-भूपतेर्वच्मि चरित्रं विरतिप्रदं ॥६१॥

मिथुळा नगरीचा राजा । सुभोमा तयाची भाजा ।
देवरति पुत्र तो प्रजा । पाळक वोजा गुणाकर ॥६२॥
एकदा त्याची नगरात । मुनींद्र आले ज्ञानसंयुक्त ।
देवगुरूकीर्ती नाम त्यात । सघसहित विहार केला ॥६३॥
तदा तो राजा महिपती । सहपरिवारे समस्ती ।
नमन–पूजन–भावयुक्ती । धर्मामृत करिती श्रवण॥६४॥
तदा राजा तो करी प्रश्न । मम जन्म कोण ठिकाण ।
ते मुनीराय ऐकोन । अवधिज्ञानान सागतुसे ॥६५॥
हे राया तू त्वा न पुसावे । पापकारण न ऐकावे ।
राजा म्हणे श्रीपूज्य सांगावे । संशयभावे तुटेल ॥६६॥
आग्रह देखोनी तयाचा । देवगुरू स्वामी मधुरवाचा ।
पूर्वपापे जन्म तुमचा । अपवित्राचा ठिकान जो ॥६७॥
महाकृमीजंतु जीवन । अपवित्र भोगिती पापान ।
आजपासोन सप्तदिन । होणार प्रमाण सागु तुज ॥६८॥
नगरात प्रवेश करशील । अपवित्र मुखात पडेल ।
छत्र मुकुट घात होईल । वायो सुटेल सत्राने पै ॥६९॥
विद्युत्पात दिवा होउन । रथघात तुझे मरण ।
तत् गुदईष्टा मुखे ग्रहण । होईल जान राजिंद्रा ॥७०॥
पापाचे उदय करोन । काय न होय राया जान ।
पुण्ययोग पापदहन । हे जिनवचन पुराणात ॥७१॥
पापोदय त्या राजासी । पुण्य नाठवेच रायासी ।
बोलाउनीया स्वपुत्रासी । विचार तयासी सागसे ॥७२॥
अपवित्र ठिकानी जनन । होता त्वा करावे हनन ।
जे जे सागितले साधुन । ते ते घडोन आले त्यासी ॥७३॥

विद्युत्पात होईल जरी । रायभय धरील अंतरी ।
लोहो मजुस पेठारि । यत्न करी देह लोभान ॥७४॥

तो मंजुस गंगागृहात । नेवोन ठेविला तेथे गुप्त ।
पूर्ण होता दिवस सप्त । मत्स्य हुसळित बाहे त्यासी ॥७५॥

सप्त दिवसाच प्रमाण । विघ्न चुकल पुत्र म्हन ।
तत् समयी विद्युत्पतन । गेला भगोन मंजूस तो ॥७६॥

पुत्रा वृत्तान्त समजला । शोक पावोनी शात जाला ।
अपवित्र ठिकानी पाहिला । जतु देखिला पंचवर्ण ॥७७॥

त्याचा करोनिया घातात । मनी समजला पापकृत्य ।
धिक् धिक् जन्म व्यर्थ । हेही जीवित पुण्यविना ॥७८॥

देवरति तो भव्यजीव । त्या उत्पन्न वैराग्यभाव ।
आता स्वामीसी शरण जाव । स्वहित कराव जन्माचे ॥७९॥

राजी स्थापोनिया पुत्रासी । शरणागत सद्गुरूसी ।
देवगुरूराज तयासी । शूर मंत्रासी दिधले ॥८०॥

गुरूकृपेच महिमान । सर्व । मुनीक्रिया सपूर्ण ।
द्वादशांग शास्त्र जान । अनुक्रमेण मोक्षमार्ग ॥८१॥

श्लोक –सकळभुवनसार दत्तसंसारदारं ।
दुरितशतनिवार यस्य वाक्य सुतार ।
स सृजतु जिनदेवो देवदेवेंद्रवंद्यो ।
जिनचरणसुसेवा मुक्तिपर्यंतमुच्चै. ॥८२॥

त्रिभुवनी ससारसार । जन्मोजन्मी दुरितनिवार ।
वदनीक ते जिनेश्वर । मुक्तीदार चूडामणी ते ॥८३॥

॥ **कथा ७७** ॥

सत्ताहातर कथा जाली । श्रोता पाहिजे क्षमा केली ।
जरी असेल चुकी भुली । क्षमा केली पाहिजे वो ॥८४॥
श्लोक :–नत्वा जयत्नधीशैः पूजितं श्रीजिनेश्वर ।
वक्षे सुदृष्टिसन्नाम रत्नविज्ञानि वृत्तकं ॥८५॥
उजनि नगरी महाराज । प्रजापाळ तो कृतकाज ।
श्रीमत्‌जिनदेवपदाब्ज । भ्रमर सहज मधुव्रत ॥८६॥
तयाची सुप्रभा सुंदरी । रूपलावण्यमदनस्त्री ।
शीळवंती जिनमदिरी । धर्माधिकारी सम्यक्त्वी ॥८७॥
त्याच नगराअतौता नर । रत्नपारखी महाचतुर ।
सुदृष्टी सुज्ञानी मधुर । संसारसार हितकारी ॥८८॥
तत् स्त्री विमलाकुबुधी । वक्राख्ये दासदुर्बुधी ।
त्यासी रतली ते अबधी । हीनबुधी ते पापरासी ॥८९॥
एकदा विमळा दासासी । म्हणे मारावे सुदृष्टिसी ।
तत् घडि कृतात तयासी । मन उल्हासी पापी रमति ॥९०॥
मरोन भर्ता विमलोदरी । सुदृष्टी तेथ गर्भ धरी ।
पुत्र जाला सतोष नारी । पूर्व परिकर्म योगेन ॥९१॥
अनंतससारी हा जीव । क्वचित् दीन वैभव ।
नर्क तियंच भवाभव । नट सोगीईव भवविधी ॥९२॥
असो एकदा उद्यान वनी । वसतक्रीडेसी लागुनी ।
सुप्रभराजा समुदायानी । रमण रमणी विनोदती ॥९३॥
पुष्पहार कठी शोभत । तो हार क्रीडाविलासित ।
महासुदर सुवासित । कांतिमडित गानप्रिय ॥९४॥
राजा म्हणे धन्य हा हार । कोन्हे गुफिला कारागीर ।
पुण्यविना ज्ञान्न चतुर । न लभे प्रकर जीवासी ॥९५॥

ज्ञानविज्ञान आनि सद्दानं । श्रीजिनगुरूपूजनेनं ।
पूर्वाभ्यासे पूर्वपुण्यन । चतुराई संपूर्ण प्राप्त होती ।।९६।।
प्रजापाळ हाराते पाहे । म्हणे चमत्कार दिसताहे ।
सदृष्टि प्रमाण हा आहे । तत् भार्यासी पाहे पुत्रसह ।।९७।।
विमला सुता तत् समयी । जातिस्मरण जाल हृदयी ।
रायास वदे मी अन्यायी । पूर्वील भवई हार गुफी ।।९८।।
मी पूर्वी सुदृष्टी रत्नाकर । गुफीत होतो ऐसा हार ।
मरोनी जालो स्त्रीचा पुत्र । पूर्वसूत्र म्या हार केला ।।९९।।
पूर्ववृत्तान्त स्त्रीचरित्र । रायासी सागे तो सर्वत्र ।
ऐकोन संसृती अनित्य । हृदयात वैराग्य उत्पन्न ।।१००।।
सुदृष्टीचे जीवाकारण । विमलासुत राजी स्थापोन ।
स्वामीपासी दीक्षा घेवोन । मोक्षसाधन आत्महित ।।१०१।।
मुनी जाले ते दिगबर । तप करिती महाक्रूर ।
विहार करिती क्षितीवर । धर्मामृत आहार भव्य जीवा ।।१०२।।
ऐसे हिंडता सौरपुरीसी । यमुनानदीच्या तटासी ।
शुक्लध्यान कर्मरिपुसी । जिकोनी केवळीसी उत्पन्न ।।१०३।।
केवळज्ञान उत्पत्ती । त्रैलोक्येद्र पूजा करिती ।
जाले ते मोक्षस्त्रीचे पती । तेचि मजप्रति प्राप्त व्हावे ।।१०४।।
श्लोक : स श्रीमान् भवसिंधुतारणपरः सत् केवलज्ञानभाक् ।
कर्मारातिविनाशकृत् शिवपतिर्देवेद्रवृदार्चिताः ।
लोकालोकप्रकाशनैकचतुर स्वर्गापवर्गप्रदो ।
भूयान्मे भवता च पूजितपद' स श्रेयसे श्रीजिनः ।।१०५।।
श्रीमान् भवसिंधुतारण । कर्मविनाश केवळज्ञान ।
त्रैलोक्यासी ते पूज्यमान । मम भवतारण जिनेद्र ।।१०६।।

कथा ७८

अष्टसप्तकथा सपूर्ण । श्रोते व्हावे सावधान ।
कथाकोश तप आराधन । करावे श्रवण अद्वैत ॥१०७॥
श्लोक:–सर्वदेवेंद्र चद्राद्यैर्वंदितं श्रीजिनेश्वरं ।
नत्वा श्रुताब्धिमाप्तं च, धर्मसिहकथा ब्रुवे ॥१०८॥
दक्षिण दीप असे विख्यात । कौसल्या नगरी असे त्यात ।
वीरसेन प्रजानाथ । स्त्री रूपवत वीरमती ॥१०९॥
चद्रभूती तयाचा कुमर । चंद्रश्री भगिनी सुदर ।
राज्य करिती पुण्यानुसार । धर्म निरतर करताती ॥११०॥
तत् कोसलय देश विख्यात । कोशल नगरी पुण्यवत ।
धर्मसिह तो धर्मवंत । चंद्रश्रियत परनील ॥१११॥
धर्मसिहा चंद्रश्री राणी । सुख भोगिती पुण्य करोनी ।
देवपूजातुर्यंदानी । दशलक्षणी जैनधर्म ॥११२॥
एकदा तो धर्मसिह राजा । चैत्यालयासी गेला सहजा ।
दमधराचार्य गुरूराजा । त्रिकर्ण वोजान नमोस्तु ॥११३॥
आशीर्वाद धर्मश्रवण । धर्मत्रिभुवनी तारण ।
श्रावक येती धर्म ऐकोन । दीक्षाग्रहण मुनीच जाले ॥११४॥
चंद्रश्री जाली दु खित । चद्रभूतीन ऐकिली मात ।
भगिनी घेवोन सांगात । गुरूरायात विनवीले ॥११५॥
नूतन वय राज्यभार । टाकल्या नोव्हे हे वो बर ।
आताचा करा अगीकार । दीक्षा मोहेर चौथ्याश्रमी ॥११६॥
अनेक प्रपंच करोन । गृह आनीला महाबळान ।
राज्ज ससारी त्या स्थापोन । गेले सज्जन स्वस्वगृहा ॥११७॥
पुनरपि सीघ्र गुरूपासी । पुनर्दीक्षा घेत तपेसी ।
जिनमुद्रा पचाग्निसी । साधु सायासी आत्मसार्थक ॥११८॥

पुनः श्रवण चद्रभूती । दुरात्मा आला शीघ्रगती ।
धर्मसिह अचळ यति । उपसर्ग करिती पापिष्ट ।।११९।।

तत् समयी सधी पाहोन । करावया व्रतरक्षण ।
करी कलिवर पाहोन । तत् त्याजोन बैसला तो ।।१२०।।

दुर्गंधी तेथे उपसर्ग । सर्व सन्यास मोक्षमार्ग ।
देहत्याग षोडश स्वर्ग । पुण्ये भोग त्या देवागना ।।१२१।।

श्लोक.—श्रीमत् जैनविशुद्धधर्मरसिक· श्रीधर्मसिहो मुनि. ।
कृत्वा सारतपो जिनेद्रगदित स्वर्गापवर्गप्रद ।
प्राप्ता सर्वसुख प्रसिद्धमहिमा सत्पुण्यतो निर्मल ।
स. श्रीमान् गुणरत्नरजितमतिः कुर्यात् च मे मंगलं ।।१२२।।

जैनधर्म हा महारसिक । धर्मसिह मुनी तपार्क ।
सिद्धपद महिमादायक । धर्मसकळिक करा प्राणी ।।१२३।।

**।।कथा ७९।।**

कथा एकोनऐंशीपूर्ण । सकळित सागे मतिहीन ।
नाही बुधी मज तीक्ष्ण । क्षमा करणे सम्यक्त्वी ।।१२४।।

श्लोकः—नत्वा जिन जगतपूज्य स्वर्गमोक्षसुखप्रद ।
वक्षे वृषभसेनस्य, सत् चरित्र सतामिदं ।।१२५।।

पाटली नगरी विख्यात । वृषभश्रेष्ठी धर्मवत ।
धनधान्य पूर्वसुकृत । क्रियावत सम्यक्त्वी तो ।।१२६।।

वृषभ स्त्रिया महासुदर । वृषभसेन तया पुत्र ।
भक्तिभावे पूजी जिनेद्र । जैसा भ्रमर लुब्धवासा ।।१२७।।

त्याचा मातुळ धनपती । श्रीकाता ते कामिनी सती ।
तयोद्वयो सुता उत्पत्ती । रूपवती चा[illegible] ।।१२८।।

तो वृषभसेन आतुर । त्यान प्रणिती उपचार ।
भोगिती भोग पुण्याधार । निरंतर सर्वेही सुख ॥१२९॥

एकदा ते दमधर मुनी । भ्रामरीकृत्या गृहागनी ।
प्राशुक आहार पुण्यवर्द्धनी । धर्मश्रवनी दीक्षाग्रहण ॥१३०॥

धनश्री चारु कन्यका ते । रुदन करीतसे दीर्घंते ।
तत् पित तोज्या माताते । आनोनी गृहात व्रतखंडी ॥१३१॥

अहो मोहअंध ते प्राणी । धर्माधर्म न पाहे मनी ।
अप्रमत्त देह अभिमानी । बंधनी अनंत ससारी ॥१३२॥

त्या कुबुधी धनपतिन । वृषभमुनी व्रत खडोन ।
गृहस्था कित्येक दिन । उदास होवोन पुनर्दीक्षा ॥१३३॥

पुन जोगे घेवोनिया । गवसोनी आनीला स्वठाया ।
गृही सखळा लाविली पाया । मंदिरठाया सुखसेजा ॥१३४॥

मनी विचारी मुनीराय । शीळव्रत भंगु नय ।
सर्व सन्यास धरी हृदय । अनसनोपाय धर्मध्यानी ॥१३५॥

मरोनिया शुक्लध्यान । स्वर्गप्राप्ति निश्चयपुण्य ।
दुर्जनासी नर्कभुवन । सुखसंपन्न व्रतनेमिका ॥१३६॥

श्लोक:-भवतु दुर्जन को विपदाप्रदो ।
विशदबुद्धिरसौ सुजनः पुनः ॥
जिनपतेः पदपद्मसुसेवनात् ।
भवति शर्मपति निजपुण्यत. ॥१२७॥

दुर्जनासी आपदा फार । सुजनासी सुख अपार ।
जिनभक्ती जया निरतर । स्वर्गमदिरदेवागना ॥१३८॥

॥कथा ८०॥

कथा जाल्या संपूर्ण अैशी । भव्य जन मन सतोषी ।
चित्त द्यावे अग्रकथेसी । अज्ञानासी साभाळावे ।।१३९।।

श्लोक–सारलक्ष्मीप्रद नत्वा जिनेद्र मुक्तीनायकं ।
वक्ष्ये श्रीजयसेनस्य, भूपते सत् कथानक ।।१४९।।

श्रावस्ती नगरीचा राजा । जयसेन पाळक प्रजा ।
वीरसेना तयाची भाजा । पुत्र राजा वीरसेन पै ।।१४१।।
राजगुरू बौध कुमती । शिवगुप्ताख्य मास भक्षिती ।
राजा कटाळा धरी चित्ती । मिथ्यामती बौद्ध दुष्टात्मा ।।१४२।।
एकदा तया नगरीसी । मुनीराज आले सघेसी ।
वृषभ मुनीद्र गुणराशी । ते रायासी श्रुत्य जाले पै ।।१४३।।
राजा भव्यसघ सहित । वदना केली त्रि परीत्य ।
पादपूजा यथास्थित । पुण्यप्राप्त धर्मवृद्धी ।।१४४।।
धर्मामृत श्रवण केले । राया श्रावक व्रत घेतले ।
श्रावक सर्व संतोषले । विधान केले जिनगृही ।।१४५।।
तदा जीर्णोद्धार नूतन । सर्व देशात धर्म स्थापोन ।
नित्य नेम देवदर्शन । कीर्ती सपूर्ण धर्मवृद्धी ।।१४६।।
तदा तो बौद्धमत पापी । वैरभावे तो सीघ्रकोपी ।
शिवगुप्त नामकुतपी । मंत्र तत्र अर्पी कुविद्या ।।१४७।।
सम्यक्त्व बळे न चाले काही । मत्र तंत्र तो इलाज नाही ।
मारेकरी घालिता तेही । न चाले काही उपाव ।।१४८।।
मग तो गेला पृथ्वीनगरा । सुमताख्ये सीष बरा ।
त्यासी सागे धर्मसारा । टाकिलाधराज जयसेनान ।।१४९।।
तेव्हा सुमतीरायान । पत्रिका पाठविली त्यान ।
कुळधर्म तुम्ही न सोडण । बौद्धगुरू चरण धरा ।।१५०।।

जैनधर्म सोडोन द्यावा । आपला गुरू बौध्द बाबा ।
त्यासीच नमस्कार करावा । मुनी धरावा कुळधर्म ।।१५१।।
ते ऐकोन जयसेनान । जैनधर्म निर्हिंसिक जान ।
दयाधर्म तो त्रिभुवन । तारू निधान निश्चयेसी ।।१५२।।
जरी सूर्य पश्चिमे उदय । तथापि अंती शाती होय ।
तरी न सोडी धर्मसोय । देह जाय तरी जावो हा ।।१५३।।
ज्यानी जानला जैनधर्म । तो टाकिता महा अधर्म ।
ज्याचा निश्चय दृढवर्म । मेरूसम अचल तो ।।१५४।।
सुमति दुष्टा श्रुत जाले । त्यान सुभट पाठविले ।
त्यास मारोनि वहिले । सीघ्र आले पाहिजे ।।१५५।।
ते आले श्रावस्ती ग्रामासी । संधी पाहती मारायासी ।
इलाज न चाले पुण्यासी । क्षीण मानसी ते जाहले ।।१५६।।
ते आले परतोन समस्त । सर्व सागितला वृत्तान्त ।
पापात्मा जाला क्रोधवंत । विचारीत दुष्टबुद्धी तो ।।१५७।।
सभेत केला त्याहान पण । कोन्ही मारील जयसेन ।
त्यासी अर्द्धराज्य देईन । निश्चय करण सुभट हो ।।१५८।।
त्या समयी त्याचाच सुत । आहिमाख्ये जोडित्त हात ।
म्हणे मी करीन या कार्यात । असावे स्वस्थ राजेश्री ।।१५९।।
राजे मदपापमंडित । कुकर्मी विचारी मनात ।
म्हणे तो जैनधर्मी सत्य । रीघ तेथे नव्हे आमचा ।।१६०।।
श्रावस्ती नगरासी आला । वृषभमुनी तेथे पाहिला ।
प्रपचदीक्षा घेता जाला । सेवाभावाला दावि कपटी ।।१६१।।
एकदा जयसेन राजा । सरळचित्ते देवपूजा ।
चैताळियात गुरूराजा । नमोस्तु वोजा त्रि परीत्य ।।१६२।।

अणुव्रती पाहोन त्यात । तत् समयी पाहिला एकात ।
पापी नित्य होता जपत । केला घात जयसेनाचा ।।१६३।।

कोन्हा न कळता गेला निघोन । हे पाहिले वो श्रीगुरून ।
पाप केले मम शिष्यान । घेतले अनशन तत् घडी ।।१६४।।

दर्शनद्रोह होईल । म्हणोन भीतीवर ल्हेले ।
आहि नृप न मारील । पूर्वपापे जाले मृत्यासी ।।१६५।।

शस्त्र विदारिता मुनी । सर्व सन्यास करोनी ।
देहे ठेविला धर्मध्यानी । स्वर्गभुवनी सर्वसुखी ।।१६६।।

वीरसेन राजपुत्र । जयसेन पाहे नजर ।
लीप पाहिले भीतिवर । श्रीगुरू धीर प्रशंसिले ।।१६७।।

पितादी देहे संस्कारिले । सोक पावोन शात जाले ।
संसार अनृत पाहिले । वैराग्य भाविले तपभाव ।।१६८।।

दुष्टात्मा पाप आचरती । ते कुगती भोगिताती ।
धर्मात्मी याला सुख संपत्ती । निर्दोप होती भव्यप्राणी ।।१६९।।

श्लोक–यः श्री देवनिकायभूपतिशतै नागेद्र सत् खेचरैः ।
पूज्यो भक्तीभरेण शर्मनिलयो धर्मो जिनेद्रोदितः ।
नानादुक्खविनाशको भवहरः स्वर्गापवर्गप्रदः ।
स श्रीमान् भवतां जगत्नयहिता दद्यात् सुख मंगल ।।१७०।।

ये श्रीजिनदेव जगत्नयवद्ये । पूजा भक्ती विधीयुक्तसुधे ।
नाना रोग विनाश सुखद । जयत्नय हितदं मगल ।।१७१।।

।।कथा ८१।।

एक्याशी कथा हे संपूर्ण । श्रीरत्नकीर्ती सद्गुरून ।
लडिवाळा देऊन ज्ञान । सारदे मातेन साह्य केले ।।१७२।।

पुढील कथा तपाचा प्रभाव । श्रोते सज्जन भव्यजीव ।
क्षमा धरोन श्रवण करावे । श्रवणे व्हावे शुभमंगल ।।१७३।।
श्लोक--नत्वा पदद्वयं जैन शर्मद त्रिजगत्--हितं ।
ब्रुवेहं शकटालस्य मुनेर्वृत्त वुधैर्मत ।।१७४।।
पाटलीपुर ते विख्यात । नदराजा सधर्मवत ।
तत् मंत्री सम्यक्त्व पुनीत । धर्मी रत शकटालाख्ये ।।१७५।।
वरादिरूचि द्वितीय मत्री । अधर्मी कपटी अंतरी ।
कुवुधी तो मिथ्यात सूत्री । वैर धरी जैनधर्मासी ।।१७६।।
एकदा श्री सद्गुरूराज । महापद्म श्री मुनीराज ।
त्रैलोक्यवदनी श्रीपूज्य । चारित्रध्वज ज्ञानवंत ।।१७७।।
राजा प्रदान सर्व रहित । गुरूपूजा शास्त्रयुक्त ।
द्विधा धर्म करोनी श्रुत । वैराग्य प्राप्त शकटालासी ।।१७८।।
दीक्षा घेतली विनयान । गुरूभक्ती शास्त्रोक्तीन ।
आचार्य पदवी गुणज्ञ । जाला सर्वज्ञ गुरूकृपे ।।१७९।।
एकलविहारी होउनी । धर्मोपदेश सर्वाजनी ।
तीर्थयात्रा पुण्यखानी । आले भुवनी जन्मस्थळ ।।१८०।।
पाडळिपुर नगरात । प्रवेश केला आहारकृत्य ।
राजगृह अत.पुरात । निरातराय अक्षयदान ।।१८१।।
ग्रामप्रदेशी ध्यान धरी । वरादिरुची पूर्ववैरी ।
नरेंद्रभूपासी चाडि करी । तव मदिरी शकटालाख्य ।।१८२।।
मुनीचा धरोनिया वेस । अत'पुरी केला प्रवेश ।
कामचेष्टा तो करी हासे । नदभूपसे क्रोध आतरी ।।१८३।।
पापी पूर्व धरोनी वैर । पाप करिती महाथोर ।
ऐसे जानोनिया चतुर । हिंसा ऋण वैर न कीजे ।।१८४।।

राजा जमदेमदात्धीसी । सारासार न कळे त्यासी ।
सुभट पाठवी वधीसी । करा घातासी तयाचे ।।१८५।।

वरादिरुचि पूर्व वैरी । द्वेष धरोनिया अतरी ।
जावोनिया वनातरी । नानापरीचे परीसह ।।१८६।।

शकटालाख्य मुनी धीर । दुष्ट कुबुधी जेवि खर ।
काष्ठ मृत्तिकानि फत्तर । शस्त्रास्त्र दुर्जन कुधी ।।१८७।।

सर्व सन्यासासी घेवोनी । समाधि साधी मुनी ध्यानी ।
अत'काळी स्वर्गभुवनी । सुखसदनी पूर्ण आयु ।।१८८।।

दुष्ट करिती ते दुष्टावा । तयाचा जन्म नर्क ठेवा ।
अनतदु ख नाही विसावा । चौऱ्याशी गोवा जीवासी ।।१८९।।

स नदविवेकी तो राजा । परीक्षे पाहे विचारी भाजा ।
निर्दोष घात मनी राजा । पापभाज्या स्या वरिली ।।१९०।।

आपनिदा करोनी वेगी । दोषाचा डाग दुष्टसगी ।
त्वरित निघे लागवेगी । धर्मस्थ वेगी त्वरिताच ।।१९१।।

महापद्म श्री मुनीराय । त्रि परीत्य नमोस्तु पाय ।
द्विविध धर्म श्रुतहृदय । व्रतविधाय श्रावकसुधी ।।१९२।।

तुर्यदान श्री जिनपूजा । षट्कर्म त्या सहित भाजा ।
त्रिपनक्रिया धर्म वोजा । पुण्यकाजा प्रवर्तला ।।१९३।।

कोन्हीही जीव कुसंगान । महा पापाचे करी कारण ।
सद्गुरूचे जाल्या दर्शन । पापनाशन पुण्यप्राप्ती ।।१९४।।

यासाठी तुम्ही भव्यप्राणी । सद्गुरूसेवा करावी त्यानी ।
गुरूकृपे स्वर्गभुवनी । मोक्षसदनी अनुक्रमे ।।१९५।।

श्लोक–सम्यग्दर्शनबोधवृत्तसुतपो रत्नोकराराधना ।
माळा श्रीजिनसारसूत्रसहिता पूर्वं बुधैः निर्मिता ।
सद्बोधांबुधिभिः जगत्त्रयहितै सा शर्मणे श्रीप्रभा ।
चद्राद्यै' तदनुग्रहेण सुधिया चक्रे मयापि श्रियं ।।१९६।।

सम्यदर्शन रत्नत्रय । धर्म आराधना जिनराय ।
सिद्धान्तसूत्र ज्ञानजगत्रय । मोक्षमार्ग होय भव्यासी ।।१९७।।
मोक्ष आराधना जीवासी । तारक होय पुण्याची रासी ।
हे हितकारी जीवासी । मुनीजनासी बहुप्रिय ।।१९८।।
पुढील अधिकारी श्रद्धान । ते श्रवण करावे सज्जन ।
रत्नकीर्तीचे प्रसादेन । कथानुसंधान बाळभाषा ।।१९९।।
सस्कृत ज्ञान मज नाही । गुरू आज्ञा देश भाषा करावी ।
ज्ञाते चुकी भुली साभाळावी । क्षमा भावि चंद्रकीर्ती ।।२००।।
इति कथाकोश ग्रथ । तुर्य आराधना मोक्षपथ ।
ज्ञानी जानोनिया समर्थ । अवश्य यथार्थ गमनी ।।२०१।।
इति आराधना कथाकोश । नवकथा जाल्या सुरस ।
तिन्याहत्तरादि ब्योशिस । श्रीजिनेश पूर्ण करिता ।।१०२।।

**इति आराधना कथाकोश श्री रत्नकीर्तीशीष चंद्र विरचिते कथा ।।८२ प्रसंग ४४।। श्री जिनार्पणं नमोस्तु शुभं भवतु कल्याणमस्तु तथास्तु छ।।**

• • •

## प्रसंग पंचेचाळिसावा

### ॐ जय श्री वीतरागाय नमः

प्रथम नमु श्री पंचगुरू । वाग्वादिनी ज्ञानदातारू ।
दीक्षा शिक्षा परमगुरू । ग्रथाधारु ज्ञानदाता ॥१॥

सम्यक्त्वी श्रोता सावधान । तपाराधना सिंहावलोकन ।
नव कथा जाल्या सपूर्ण । श्रद्धाख्यान सज्जनाप्रिय ॥२॥

श्लोक–विशुद्धकेवलज्ञानप्रकाशितजगत्त्रय ।
नत्वा जिन प्रवक्षामि श्रद्धाख्यानं सतां प्रियं ॥३॥

कुरूजागल देश थोर । त्यामध्ये हस्तनागपुर ।
तेथे राजा विनयधर । प्रियकर स्त्री विनयमती ॥४॥

त्याच नगरी वृषभदास । वृषभप्रिया स्त्री तयास ।
तत् पुत्रोत्तम गुणरास । जिनदास गुणोज्वल पैं ॥५॥

एकदा तेथीचा नृपराजा । कामासक्त जाला भाजा ।
महाव्याधि कर्म बीजा । कामकाजा तो न शातय ॥६॥

वैद्यवाणी ते तत्र मत्र । भूतभविकाजोतिसी यत्र ।
ग्रह व्यंतर तारा चद्र । जाले सर्वत्र क्षिदक्षीण ॥७॥

न चले कोन्हाचेच काही । महाव्याधी पीडित देही ।
स्थत दु:स्थित सर्वही । राजा देही क्षीद तळपे ।।८।।
जैसा मत्स्य जळरहित । दुर्जने पापी घात सोसीत ।
किंवा पतिव्रतेचा कात । गेला दूरस्थ बहुदिन ।।९।।
सिर्थद्यो श्रावक प्रधान । तो सम्यक्त्वी गुणीजन ।
रायासी म्हणे धीर धरणे । औषधपान यत्न करू ।।१०।।
त्वरित वाचवी मम काया । जे मनसी देईन त्वया ।
धर्मवंता पाळिसी दया । प्राण सखया धर्मवंता ।।११।।
मत्री गेला देवदर्शनासी । दर्शन वदन सद्गुरूसी ।
मुनीपद प्रक्षाळ जलेसी । त्या औषधासी घेतो त्वरे ।।१२।।
राया आणोन केले प्राशन । सर्वही व्याधि विनाशन ।
श्रीजिनगंधोदकेन । श्रद्धादि गुणसंयुक्त तो ।।१३।।
ते विनयधर भूपति । जळसुधी व्याधी निवृत्ती ।
जेवि निर्मळ तो गभस्ती । किरण फाकती राजचिह्न ।।१४।।
सूर्योदयी जैसा अंधोत्तम । मुनीप्रभावे राजोत्तम ।
स्वामी पद जल उत्तम । सर्व ग्राम प्रशंसा करिती ।।१५।।
यथासिद्धान्त मंत्रीपान । मुनीपद जळ राया देऊन ।
तथा श्रद्धाभावे भव्यान । करावे प्राशन मुनीतीर्थ ।।१६।।
ऐसे मुनीपदाब्जतीर्थ । सदैव वंदा भवहितार्थ ।
मनि श्रद्धा भावार्थयुक्त । धर्माची युक्त शक्तीसार ।।१७।।

श्लोक–बाहुल्येन करोति या शुभतरा, सत्केवलाद्योतनं ।
व्यक्तानतचतुष्टय शिवकर सा शर्मणेवोस्तु वै ।
श्रद्धा श्रीजिनधर्मकर्मणि सता दु:खौघविध्वंसिनी
देवेद्रादि–नरेद्रचक्रीपदवीशर्मप्रदा स्तोकत: ।।१८।।

श्रद्धा जिनधर्माची मनी । दु:खव्याधी पापाची हानी ।
इद्र नरेद्र पद पावोनी । दीक्षा घेवोनी अतिमोक्ष ।।१९।।

॥ कथा ८४ ॥

चौऱ्याशी कथा हे समाप्त । पुढती श्रोते हो द्यावे चित्त ।
तप आराधना हा ग्रथ । क्षमायुक्त श्रवणी धरा ।।२०।।

श्लोक:--सर्वदेवेंद्रचंद्राद्यै: पूजित श्रीजिनेश्वर ।
संप्रणम्य प्रवक्षेहं स्वात्मनिंदाफलोत्कर ।।२१।।

काशी देश तो विख्यात । वाराणसी नगर त्यात ।
राजा विशाखदत्तो अद्‌भुत । स्त्री गुणवंत कनकप्रभा ।।२२।।

विचित्र नामा चित्रकार । नाना चित्रकळा चतुर ।
विचित्रादिपति स्त्रीसुदर । मनोहर रमण रमणी ।।२३।।

तयो कुसीमी बुद्धिमती । पुत्रीज्ञान चित्राचि मती ।
एकदा भूपमदिराप्रति । चित्रोत्पत्ती रंगीत महाल ।।२४।।

चित्रकार नित्य चित्र । काढिता एके दिनी कलत्र ।
भोजना बोलावया तत्र । आली वगत्र सुभानना ।।२५।।

भोजना गेला चित्रकारी । चित्रलिखित बुद्धीसुदरी ।
मयूररत पिच्छ उभारी । नृत्य करी कामासक्त ।।२६।।

लाढोरी त्या स्त्रियाचा मेळा । नृत्य करी कामाची लीळा ।
अश्रुपात नेत्रकमळ । झेलिती सकळा कामतृप्त ।।२७।।

ऐसेचि ते मनोहार । राजा पाहे आपुले नेत्र ।
हृदयी उत्पन्न कामलहर । कामातुर विकळ जाला ।।२८।।

चित्रकारासी पुसे राजा । चित्र लिहिल कवने काजा ।
तो म्हणे मम अनुजा । सहजी सहज चित्रिले ।।२९।।

राजा म्हणे ऐसी ते गुणी । तयसी दाखवी नयनी ।
कन्या आनिली पड्यानी । पाहे लोचनी भरयौवन ॥३०॥
राजा म्हणे अहो मामा । कटाक्ष द्यावी तुम्ही त्या ।
मामा म्हणे तुम्हासी भामा । दासत्व कामा देउ काय ॥३१॥
जरी कराल पट्टराणी । भाख द्यावी मज लागुनी ।
तुम्ही या पृथवीचे धनी । सत्यवचनी सम्यक्त्वी ॥३२॥
राय सर्व कबूल करोन । विधियुक्त पाणिग्रहण ।
पट्टराणी पद स्थापून । सुखसंपन्न पुण्ययोग ॥३३॥
वुधमती सुंदर नार । आज्ञा पाळिती समग्र ।
परी त्या स्त्रियचा मछर । शब्द ठोसर कुळहीनी ॥३४॥
ईचाच जाला गे फैलाव । राया दावी रूपवैभव ।
शब्द ठोसला नित्यमेव । तो न सोसवे बाळिकेसी ॥३५॥
तिन वर्जिले अन्नपानी । देहे दुर्बळ जाली राणी ।
म्हणे देवा त्रैलोक्यधनी । सुख होवोनी दु खप्राप्त ॥३६॥
जावोनिया जिनमंदिर । आपनिंदा ते करी फार ।
देवा व्यर्थ हा संसार । दु खाचा भार मम सीरि ॥३७॥
मी राड पापीन अत्यत । धार्मिकाची घडली सगत ।
ससारसुखही समस्त । परि शब्दमात सोसवेना ॥३८॥
अहो देवा जिननायक । स्वर्गमोक्षाचे दायक ।
कुळहीन पापीन मी मूर्ख । दोष दु ख कोन्हासी देउ ॥३९॥
देवा मी त्वमेव शरण । दुःखदावाग्नि निवारण ।
आपनिंदा नित्य नित्यान । दुर्बळ कामीन पाहे राजा ॥४०॥
रमण म्हणे गे रमणी । किमर्थ दुर्बळ चिंता मनी ।
नृप अळगी अंकासनी । गहिवर नयनी अश्रुपात ॥४१॥

सद्गदित कंठ जाहला । काही न वदवे शब्दोला ।
आस्वासुनि शात जाला । अग्रे गेला जिनभुवनी ॥४२॥
गुप्तरूपी राहिला तेथ । राणी आली ते दर्शनात ।
आपनिंदा करिता तेथ । जाले कृतार्थ सर्वराया ॥४३॥
जावोनिया तो अंतःपुरी । निर्भत्सिल्या सर्व नारी ।
सती बुधीमती ते नारी । पट्टाधिकारी सर्वप्रिय ॥४४॥
एवं बुधजनै सर्वत्र । जिनाग्रे निंदादोषसूत्र ।
प्राचित घ्यावे देह पवित्र । स्वर्गसूत्र मोक्षदायक ॥४५॥
शुभकुलोत्तमशर्मविधायिनी । जिनपते. पदभक्तीरसी सदा ।
भवतु दुर्गतिदु.खविनाशिनी । शिवपदं मम देव यतो मुदा ॥४६॥
जिनपदि भक्ती करोनिया । शुभकुळी जन्म होय तया ।
दुर्गति दुःख निवारोनिया । शिवपद ठाया अनुक्रमे ॥४७॥
जाल्या संपूर्ण चौऱ्याशी कथा । मी नेने सस्कृत अर्था ।
ज्ञानी समजावे सर्वार्था । क्षमा सर्वथा मम दया ॥४८॥
श्लोक.– सर्वदोषप्रहर्तारं शर्मणः कारणं सता ।
नत्वा जिनं प्रवक्षेहं । स्त्रीकथा गर्हणाश्रिता ॥४९॥
अयोध्यानगरीचा राजा । दुर्योधन पाळक प्रजा ।
श्रीदेवी कामिनी त्या भाजा । पाळिती प्रजा न्यायमडित ॥५०॥
तेथे वसे एक ब्राह्मण । उपाधीक सर्वही जन ।
तत् भार्या वीराख्या तारुण्य । भरयौवन उन्मत्त मनी ॥५१॥
ब्राम्हण शीशा तो छात्रक । अग्निभूती रत कामिक ।
निजपतीसी ते मारक । कौटाल्यक स्त्रिया जाति ॥५२॥
कृष्णरात्र ते मध्यान्ही । पापी नेला त्या स्मशानी ।
छात्री तो गुप्त करोनी । कोपात्म शानिथ्यंत तो ॥५३॥

त्यान शेडि वेणी बाधून । पापीन पापी ते खिळोन ।
तेव्हा उदय जाला दिन । नारी नर जन पश्यती ॥५४॥
लोका म्हणती दुराचारी । सोडा म्हणति घरोघरी ।
न सुटे गाठ ते व्यंतरी । राजमदिरी न्याय गेला ॥५५॥
राव पुसे त्या कारण । ऐसे का जाले तुम्ही सागण ।
ते न बोलती लाजीरवाण । राजा म्हणे कपटी तुम्ही ॥५६॥
व्यतर प्रगट तत् समयी । सागाल तरी सुटाल सई ।
राया सागती दोघही । उपाध्यायी मारला आम्ही ॥५७॥
तेव्हा ते सोडिले व्यतरान । देवा गुरू सागावे गाऱ्हान ।
कर्तृत्व प्राचित घेवोन । निर्दोस होऊन सुखी राहावे ॥५८॥
श्लोक:–शल्येनेव यथा प्रपीडिततनुर्निष्काश्य शल्यं भट ।
संप्राप्नोति सुखं तथाच सुधिय: श्रीजैनसूत्रान्वितान् ।
श्रित्वा श्री मुनीनायकान् शुभतरान् भूत्वा च शल्योद्धिता ।
स्वात्मोत्पन्नकुदोषगर्हणभरै नित्य भजंतु श्रिय ॥५९॥
जीवाष्ट मद करोन । कर्म करिता लागे दूषण ।
ते जिनाग्रे प्रगट करोन । जिनचरणेन निर्दोसी ॥६०॥

॥कथा ८५॥

पच्याएशी जाल्या कथा सर्व । पुढति भाविके चित्त द्यान ।
कान्हामात्रेसी साभाळावे । क्षमाभावे शास्त्रसूचना ॥६१॥
श्लोक:–सप्रणम्य जिनाधीश सारधर्मोपदेशक ।
सोमशर्ममुनेर्वच्मि शर्मद सुकथानकं ॥६२॥
टीका: श्री वीतराग नमु भावे । धर्मोपदेश करू भव्य ।
सोमशर्म मुनीवैभव । ऐकता भावे मोक्षमार्ग ॥६३॥

जीवासी घडले निंद्यकर्म । गुप्त प्रकट घडे अधर्म ।
हे सागावे सर्वही वर्म । कर्म वर्म दूर होताती ।।६४।।
याचि अर्थीचा कथितार्थ । वरेंद्र विषय देशात ।
देवि कोटचपूर ग्रामात । ब्राम्हण तेथ सोमशर्मा ।।६५।।
वेदवेदाग महाज्ञानी । सोमिल्या तयाची कामिनी ।
तयासी पुत्र युग्मगुणी । वायुभूती अग्निभूती द्वै ।।६६।।
त्याच नगरी विष्णुदत्त । विष्णुस्त्री कामिनी तयात ।
धनसग्रह यथास्थित । पूर्वपुण्ये प्राप्त जीवासी ।।६७।।
त्या पासी सोमदत्तान । ऋण घेतल कृत्यकारण ।
प्रपच सतत संयोगेन । धनखर्च ऋण जाहाले ।।६८।।
यदा विचार करी मना । गेला देवाचे दर्शना ।
धर्मसार केला श्रवना । पुण्यविना मानव ।।६९।।
पश्चात्ताप जाला जीवासी । दीक्षा घेतली मुनीपासी ।
पठन आगम सिद्धान्तासी । गुरू आज्ञेसी एकलविहारी ।।७०।।
भव्यजीवा उपदेश करीत । जन्मभूमी कोटचपुरात ।
विष्णुदत्तात पाहे अवचित । आपुले द्रव्यात मागावे ।।७१।।
याचे पुत्र जाले निर्धन । द्रव्य देइ वो झडकरून ।
सोममुनीत ते ऐकोन । धरिले मौन तपोनिधी ।।७२।।
विष्णु म्हणे चाल मत् गुरूपासी । वीरभद्र तो स्मशानासी ।
धर्म विकोन दे द्रव्यासी । तेव्हा तुजसी सोडीन मी ।।७३।।
त्याला नेले स्मशानात । वीरभद्र देवता तेथ ।
बोले देवता त्या मुनीत । तव धर्म विक्रीत सागावा ।।७४।।
आगम सिद्धान्त मूळोत्तर । दशलक्षण महाथोर ।
धर्म अमोल पृथ्वीवर । श्रीमत् जिनेद्र कथितार्थ ।।७५।।

धर्म श्रवण मनी तोष । देविसी जाला हो सतोष ।
मुनीपद नमी भक्तिहर्ष । जाल औध्यास आश्चर्य पैं ॥७६॥
धर्म जय देवतावस्य। अनर्घ्य वस्तु ये हातास ।
धर्मसौख्य वसुधरेस । धार्मिकास कामधेनु च ॥७७॥
काय वर्णन त्याच करू । धर्म त्रिभुवनीचा तारू ।
मनईच्छित फळ दातारू । अमोल अपार निधी रिधी ॥७८॥
विष्णुदत्त तयासी म्हणे । भावार्थ पुरे द्रव्य देणे ।
शब्द उपसर्गाच कारण । करिता देवीन देखिल ॥७९॥
दिव्य रूप प्रकट करी । मुनीपूजा सद्‌भावे करी ।
रत्नरासी तत् चरणाग्री । स्तुत करी धन्य मुनीराय ॥८०॥
श्रीमत्‌जिनेंद्र प्रभावेन । जीव त्रिजगी पूज्यमान ।
इद्र नरेंद्र देवता लीन । स्वहितकारन जानोनिया ॥८१॥
पाहोन तपाची लक्षुमी । निंदा करी हृदयधामी ।
म्हणे मी दुर्बुधी अधर्मी । निंदिला स्वामी द्रव्यलोभे ॥८२॥
धन्य मुनी हे धीरवीर । महातपस्वी दिगंबर ।
अष्टकर्म करोनी दूर । स्वदेहावर विरक्त जो ॥८३॥
आम्ही द्रव्यलोभी तस्कर । असत्य द्रव्य सग्रह फार ।
तो उतरावया पापभार । शरण चरणाग्र भावार्थं ॥८४॥
विनयस्तुती करोनिया । दीक्षा मागे मुनीराया ।
भव्यजीव तो जानोनिया । शूरमंत्र तया दिधला ॥८५॥
गुरुची भक्ती पाठशक्ती । मोक्षमार्गाची चढे मती ।
अहो धर्म वसे ज्याचे चित्ती-। सुख उत्पत्ती सुधर्मान ॥८६॥
हे जानोन वो भव्य जीव । स्वात्महित विचाराव ।
ते पाहोनिया पुत्रादि सर्व । सोडिला गर्व जाती मद ॥८७॥

कोन्ही घेताती जैनधर्म । कित्येक घेती व्रतनेम ।
जिनधर्मांचे जे जे वर्म । त्याचही मर्म जानताती ॥८८॥

जिनबिंव वसई थोर । तीर्थयात्रा प्रतिष्ठा चतुर ।
चतुर्थ दानाचा प्रकार । षट्कर्मशास्त्र धनखर्च ॥८९॥

श्लोक– श्रीमन्सारजिमेद्रदेवगदित त्रैलोक्यसंपूजितं ।
नानाशर्मविधायक भवहरं स्वर्मोक्षद सत्तप. ॥
आराध्यैव विशुद्धभक्तिभरतो य साधवो धीधनाः ।
प्राप्ताः मुक्तिसुखं विनाशरहितं कुर्वन्तु ते मे श्रियं ॥९०॥

श्रीजिनेद्रवचनोक्तीसार । नृसुर सुखात देणार ॥
तप लक्षुमी धर्मसार । सर्व सौख्य थोर अविनाश ॥९१॥

॥ कथा ८६ ॥

शासी कथा जाल्या संपूर्ण । पुढती काळाध्यय निरोपन ।
तत्त्वार्थ सिद्धान्त माध्यान । पुराण श्रवण सर्वदा ॥९२॥

श्लोक– यस्य ज्ञानं जगत्सार संसारांबोधिपारद ।
तत् प्रणम्य जिनं वक्षे कालाध्ययनवृत्तकं ॥९३॥

वीरभद्र तपस्वी ज्ञानी । महानिबिड दाट वनी ।
गुरूकृपे आज्ञा घेवोनी । अकालध्ययनी अहोरात्र ॥९४॥

श्रुतदेवी प्रकट तेथ । त्यासी सबोध करायात ।
गौळणी रूपे ते त्वरित । मधुरतक्रात पुकारी ॥९५॥

मुनीसमीप मधुर स्वरे । घ्या हो घ्या म्हणे सुदर ।
मुनी बोलले वीरभद्र । आ वो गव्हारे का जल्पसी ॥९६॥

अवकाळी निरंजनात । कोन घेतील तव दधीत ।
देवी ऐके ते वचनोक्त । प्रत्योत्तर त्यात देतसे ॥९७॥

तूची गवार अवकाळी । तीर्थंकर वचनावळी ।
सूत्रसिद्धान्त निसिमेळी । पाठ अकाळी न पढावा ॥९८॥

मुनी समजले अंतरी । नक्षत्र पाहिले अंवरी ।
गुरुसन्निध झडकरी । पृच्छा करी मुनीची क्रिया ॥९९॥

मुनी म्हणे शीषराया । प्रहरदिन आलिया ।
सूत्र न पाढावा व्यर्थ वाया । मर्यादा हृदया द्विपक्ष ॥१००॥

शीष धरोनी चित्तात । हृदयी मानी आत्महित ।
श्रुतदेवता पाहोनी त्यात । संतोष चित्तात मानिला ।१०१।

संतुष्ट होउनी अतरी । अष्टविधान पूजा करी ।
इद्र नरेद्र विद्याधरी । सद्‌गुणारि पूजिजाती ॥१०२॥

ऐसे मुनी गुणी मडित । दर्शन–ज्ञान–चारित्रवंत ।
अनुक्रमे मुक्तिकांत । मम दीनात बुद्धिदाता ॥१०३॥

श्लोक– तस्मात् श्रीजिनभाषित शुभतरं ज्ञानं जगन्मोहन ।
नित्य सारविभूतिशर्मजनकं स्वर्गापवर्गप्रद ॥
युक्त्या भक्तिभरेण निर्मलधियो विश्वप्रदीप हित ।
श्रित्वा शोककलकपक्हरण कुर्वन्तु सन्त सुख ॥१०४॥

यासाठी जिनभाषितज्ञान । नित्य करावे शास्त्रश्रवण ।
जेन स्वर्गमोक्षाचे कारण । सौख्यनिधान भवभवी ॥१०५॥

॥ कथा ८७ ॥

ज्ञान कथाकोश ग्रथ । सत्याशी जाल्या समाप्त ।
पुढती ज्ञान धर्मामृत । श्रवण वक्त्रात तृप्त व्हावे ॥१०६॥

श्लोक– नत्वा जिन जगत्वद्य केवळज्ञानलोचन ।
अकालाख्यानकं वक्षे सता सबोधहेतवे ॥१०७॥

शिवनंदी तो मुनीश्वर । गुरू आज्ञा घेवोनी त्वर ।
श्रीमत् श्रवण नक्षत्र । उदय तत्र अध्ययना काळ ॥१०८॥
परीक्षा जानोनिया तथा । ज्ञानी अज्ञान कर्मवोथा ।
अकाळी तो पठन करिता । समाधी त्यक्ता कलिवर ॥१०९॥
गगानदीत तो उत्पन्न । महामत्स्य देहे धरोन ।
जिनशास्त्रा आज्ञा लोपोन । दुर्गती वेधन ज्ञातिया ॥११०॥
अहो त्या गंगातीरासी । मुनी आले महातपस्वी ।
काळाध्ययन करिता त्यासी । जाल मत्यासी जातिस्मर ॥१११॥
अहो म्या अवकाळी पठन । केले जिनवानी लोपन ।
तत् पापे दुर्गति कारण । कुगति जनन मछ जळी ॥११२॥
आत्मनिंदा करी फार । धर्म त्रिजगी सत्यसार ।
सम्यक्त बध भक्तिभार । व्रत तत्पर भावना भावी ॥११३॥
जिनेद्रपदी मन लावी । सुगति जन्म मनी भावि ।
भावे मनोरथे पुरवी । स्वर्ग पदवी महर्द्धिक ॥११४॥
धर्मइच्छा स्वर्गप्राप्ती । अधर्मी कुगतीसी जाती ।
पाप पुण्य भोग भोगिती । शुद्ध सम्यक्त्वी मोक्षमार्गी ॥११५॥
ऐसे जानावे बुध जनै । धर्म श्रीजिनमुखोत्पन्नै ।
मनवचकायात्रिशुधिनै । सुखोत्पनै अनेक तदा ॥११६॥
श्लोक– विमलतर–विभूति. प्राणिना शुद्धकीर्ति ।
भवति विशदमूर्ति ज्ञानतश्चारुशाति ।
असुरसुरनरेद्रै खेचरेद्रैः प्रपूज्य ।
जिनपतिवरबोध सभजन्तु प्रभव्या ॥११७॥
निर्मळ पुण्य आनि कीर्ती । श्रद्धा भक्तीते दयाशाती ।
त्रैलोक्य पूज्यमान होति । जानावे चित्ति भव्यजीव ॥११८॥

॥ कथा ८८ ॥

कथा अठ्यांशी संपूर्ण । पुढील कथे मन लावण ।
श्रवणे ज्ञान आनि पुण्य । तपोत्पन्न भाविक श्रोता ।।११९।।
श्लोक–सर्व–देवेद्रनागेद्रनरेद्राद्यै. समर्चितं ।
नत्वा श्रीजिनं प्रवक्षेह् विनयाख्यानकं शुभ ।।१२०।।
वत्स देश असे विख्यात । कौशबी नगरी असे तेथ ।
राजा भूधनसेनाख्यात । विष्णुभक्त मिथ्यात बुधी ।।१२१।।
धनश्री स्त्रीरूप अत्यत । रमण रमणी उपमातीत ।
कामिनी जिनपदसम्यक्त्व । भ्रमरवत् श्रावकीन ।।१२१।।
त्याच नगरी एक ब्राह्मण । नाम सुप्रतिष्ठ अभिधान ।
भागवत क्रिया निपुण । नित्यभोजन राजा दे त्यासी ।।१२३।।
कुतप कुविद्या आराधी । जलस्तंभन मत्र साधी ।
प्रपचेन जनास भोंदी । यमुनेमधी पलंकासनी ।।१२४।।
जप करी जळातराळी । जन पाहति नेत्रकमळी ।
आश्चर्य करिती हृदमेळि । मूढामूढ नव्हाळी सत्येची ।।१२५।।
अथ श्री विजयार्द्धावरी । दक्षिण श्रेणिलाख्यापुरी ।
चक्ररथ राजनीती बरी । सहपरिवारी नादतु ।।१२६।।
राजा विद्युत्प्रभ विख्यात । श्रावकधर्मी तो मडित ।
राणी विद्युत्वेगा मिथ्यात । विष्णुभक्त ते मोहरी ।।१२७।।
एकदा तो विद्याधर । कौशावी आला परिवार ।
माघमासाच माहात्म्य थोर । यमुना नीर स्नानक्रिया ।।१२८।।
तेथे पाहिला कुतपस्वी । जळामध्ये तो ध्यानी ऋषी ।
विद्युत् प्रभा पाहोनी त्यासी । प्रशंसा रायासी सागत ।।१२९।।
राजा म्हणे हे मूढमते । कुविद्येचे बळ ईयात ।
जना दाखवी चमत्कारार्थ । उदरनिमित्त पोटार्थी ।।१३०।।

तदा विद्यारूप चाडाळ । प्रकट चर्म घे तत्काळ ।
नदी उपरि धूतवेळ । फपिस बंबाळ कुतपस्या ।।१३१।।
गगाजळ दुर्गंध येता । क्रोध आला त्या भागवता ।
अरेरे नष्टा अपविल्ला । दुर्गंधता त्वा केला सर्व ।।१३२।।
महाश्रमी होऊनी तेथ । गेला उपरी डोहात ।
कुविद्ये जाप करी तेथे । मिथ्यति तयात प्रशंसिती ।।१३३।।
पुनः परीक्षा पहावयासी । देवता विद्या दुर्गंधासी ।
करिता पुनरपि तयासी । क्षीद तो मानसी जाहला ।।१४४।।
तेथे देखोनि आश्चर्य । म्हणे पाहीन याची सोय ।
जळ जपत तत् समय । टाकोन बाह्ये निघाला ।।१३५।।
तेथे राजा राणी समूळ । वनक्रीडा खेळती खेळ ।
हिंदोळादि नभमंडळ । सुविद्याबळ विनोदक्रीडा ।।१३६।।
विद्याधर बैसे विमानी । क्रीडा करी नभ गगनी ।
विष्णुभक्त पाहे नयनी । धरी मनी विद्यालोभ तो ।।१३७।।
त्या वनी होता तो चाडाळ । तोहि दाखवी विद्याबळ ।
विद्याभिलाषी सकळ । उच नीच कुळ न जानती ।।१३८।।
तदा तो लोभी भागवत । मातगासी लावी तो प्रीत ।
म्हणे हे विद्या सागा मात । आश्चर्यात पाहिला म्या ।।१३९।।
ते ऐकोनिया मातंग । म्हणे तुम्ही ब्राम्हण चाग ।
तुम्हा मुखी वेदवेदाग । आम्ही हीनाग नीचकुळी ।।१४०।।
तुम्ही जानता सर्वशास्त्र । सदा सोवळ काया पवित्र ।
गुरूविनयविना मत्र । विद्या पवित्र कैसी लाभे ।।१४१।।
गुरूसी नमन पूजन । तन मन आनि धन ।
विश्वासे गुरूसी अर्पण । तेव्हा प्रसन्न गुरूराज ।।१४२।।

गुरूकृपा संपादावी । विद्या याचना ते करावी ।
गुरू संतुष्ट स्वस्वभावी । विद्या द्यावी सुखप्रदायक ॥१४३॥
स्वामिप्रसादे करोन । विद्यासाध्य अनेक पूर्ण ।
हे ऐकताचि वचन । करी नमन भागवत ॥१४४॥
अहो कृपा करावी स्वामी । विद्या सांगा विद्यार्थी आम्ही ।
लोभप्रपच हृदयधामी । कामिक कामी कामातुर ॥१४५॥
साष्टाग नमस्कार करोनी । भक्ति भावार्थ दाखवुनी ।
तुमचे प्रसादे करोनी । विद्यासाधनी साधीन मी ॥१४६॥
तथा तेन मातंगेन । सांगे विद्येचे त्या पठन ।
काळ साहे दुष्टाकारण । विद्यासाधन विष्णुभक्ता ॥१४७॥
गुरू आज्ञा घेवोन त्वरे । भोजनवेळा राजमदिरे ।
राजा पुसे का हो उशीर । राया तप थोर म्या केले ॥१४८॥
तपमाहात्म्य पाहोनिया । इंद्र ब्रह्मा आले मम ठाया ।
त्यासी सबोध करोनिया । पाचारिता या आम्हापासी ॥१४९॥
त्या सवे वेरझार करिता । वाढवेळ गगनपथा ।
दिव्या शोभा विलोकिता । जाली तृप्तता मनाची राया ॥१५०॥
तेव्हा धनसेन राजा म्हणे । हे आश्चर्य आम्हा दाखवणे ।
प्रभात मठासी येईन । करू भोजन आम्ही तुम्ही ॥१५१॥
येरे दिवशी राजादि सर्व । पाहू पातले ते अपूर्व ।
राजा राणी ग्रामिकभाव । पाहावया मेळाव पातले ॥१५२॥
ब्रह्मा विष्णु रुद्रादिरूप । इंद्रचद्रसूर्यप्रताप ।
विद्यावळ दावि नेकरूप । कार्यार्थ अपजन भोदि तो ॥१५३॥
तत् समयी चाडाळ समजला । प्रकटरूपे तेथे आला ।
म्हणे रे रे तमाशा केला । आत्महिताला चुकलासी ॥१५४॥

मातंगासी क्रोध उत्पन्न । गुरूआज्ञेचा अपमान ।
तुझी विद्या निर्फळ जान । दांभिकपन प्रपची तू ।।१५५।।

राजा आदि सर्व पुसती । कारण सागा आम्हाप्रती ।
विद्यार्थ विनय गुरूभक्ती । ऐकोन तृप्ती सर्व जाहाले ।।१५६।।

तेव्हा तो विष्णुभक्त लज्जित । गुरूसी जाला शरणागत ।
विद्या सुफळ व्हावी मात । आज्ञाकित मी तुमचा ।।१५७।।

शीष विनय पाहोन । सद्‌गुरू जाले त्या प्रसन्न ।
नेकविद्या दत्त देवोन । क्षेमकल्यान शीषराया ।।१५८।।

अहो हो सज्जन हो सर्वी । गुरूकृपाते सपादावी ।
जिनवानी हृदई धरावी । भावना भावावी मोक्षाची ।।१५९।।

तत् समयी सभातरी । राजा मत्री सर्व परिवारी ।
चाडाळरूप तो व्यतरी । सभातरी प्रकट जाला ।।१६०।।

विद्युत्प्रभ राजा पाहे । प्रेम प्रीती करि विनय ।
तया पाहोनी राजा हृदय । आनद न समाय पोटात ।।१६१।।

तयाचा विनय पाहोनी । विद्या दिधली बहुरूपिनी ।
गुरूकृपा ते सपादोनी । विद्यालाभ मनी गृह गत्वा ।।१६२।।

त्यासभे मीळनी भारी । जैनधर्माची देखली थोरी ।
मिथ्याती जाले श्रावकाचारी । घरोघरी मगळाचार ।।१६३।।

गुरू विनय करोन । ज्ञानोपयोग जीवा उत्पन्न ।
सर्व कार्यासी समाधान । गुरू त्रिभुवनतारक ।।१६४।।

गुरू जानावा तोचि देव । जीव देव गुरू सद्‌भाव ।
मोक्षमार्गाचा उपाव । सार्थक करावे जन्माचे ।।१६५।।

श्लोक–यस्य श्रीजिनपादयुगुले देवेंद्रचंद्रार्चित ।
शास्त्रसद्विनयः तथा मुनिजने जैने सदा तिष्टति ।।
तस्य श्रीजयकीर्तिकांतिविलसत्‌बोधादयः सद्‌गुणाः ।
प्रीत्या पार्श्वे निवासिनोऽतिनितरा तिष्ठन्ति शर्मप्रदा. ।।१६६।।

श्रीजिनेद्र पदयुगुळ । शतेद्र वदिती विनयांजुळ ।
सदा तिष्टती भव्यमेळ । गुरू दयाळ जयकीर्ती ।।१६७।।

।। कथा ८९ ।।

ऐस्या कथा या समाप्त । श्रोता सज्जन ज्ञानवत ।
उपध्ययन कथामृत । श्रवणतृप्त मोक्षमार्गी ।।१६८।।

श्लोक–पादपदद्वये नत्वा जिनेद्रस्य शुभप्रदं ।
उपधानकथा वक्षे यतः सौख्यं भजाम्यहं ।।१६९।।

अहिच्छत्र नगरराजा । वसुपाल पालक प्रजा ।
ज्ञानी पाठ धर्मार्थिकाजा । वसुमति भाजा सम्यक्त्वी ।।१७०।।

त्या रायाने पुण्य योजिले । सप्तक्षेत्री द्रव्य खर्चिले ।
सहस्रकूट चईत्याले । बिंब स्थापिले पासोबाचे ।।१७१।।

कवने एके अवसरी । तो राजा श्रीजिनमदिरी ।
चैताल्यात गिलावा करी । कारागिरी कळावत तो ।।१७२।।

राजा वदे दिवसा करा । कामारी लुब्ध मासाहारा ।
दिवसा लोळे सैरावैरा । गिलावा करा रात्रौ करी ।।१७३।।

जिनधर्मचि कामावर । नेमिक असावे कारागर ।
मिथ्या व्यसनी तो गवार । देवता क्रूर चेळकरी ।।१७४।।

रायासी समजले कपट । कारागर हृदयस्फोट ।
आपनिंदा करी तो स्पष्ट । म्हणे म्या नष्ट कार्य केले ।।१७५।।

देव आनि गुरूसन्निध । नेम घेतला कारागर शुद्धं ।
अपवित्र कुछळ आबध । धर्म हा शुद्ध निश्चयेसी ।।१७६।।
व्रत घेवोनिया तो स्थिर । पूर्ण जाला जिनमंदिर ।
नृप श्रावका हर्ष थोर । व्रतनिर्धार अवग्रहं ।।१७७।।
तदा त्या वसुपाळ रायान । लेपकारका वस्त्राभरण ।
पूजा अभिषेक संपूर्ण । चार दान पात्र सुधी ।।१७८।।
कार्य सिद्धी झाल्यानतर । श्रावका जाला जयजयकार ।
अवग्रह भक्ती निर्धार । करिती चतुर भव्य जीव ।।१७९।।

**षट्कथा ॥ १९८ ॥**

श्लोक–एवं मुन्यादिभि जैनधर्मशर्मदे सदा ।
पूजामानादिक कार्यं, नित्य सद्बोधसिद्धये ।।१९९।।
श्रीमज्जैनपदाब्जेऽत्र नितरा स्वर्मोक्षसौख्यप्रदे ।
शास्त्रे श्रीजिनभाषिते शुभतरे धर्मे गुरौ सज्जने ।।
ये यच्छन्ति विशुद्धभक्तिभरता सद्भूरिमानादिकं ।
तेषा सारयश सुबोधविलसत् श्रीशर्म नित्यं भवेत् ।।२००।।

**इति कथाकोशे ८३ सात ७ ऐक्यान्नव बहुमान–कथा-वर्णन श्रीगुरूरत्नकीर्तिचंद्रविरचिते प्रसंग ४५ पंचेताळसावा श्रीजिनार्पण नमोस्तु शुभं भवतु कल्याणवस्तु जै जै जै ॥ छ छ छ ॥**

# प्रसंग शेहेचाळिसावा

ॐ नमः सिद्धेभ्यः । श्रीवीतरागाय नमः ।

श्री चोवीस जिनवर अर्हंत । त्रैलोक्याग्री श्री सिद्धनाथ ।
आचार्य छेत्तीस गुणवंत । त्रिवर्गात नमस्कार माझा ॥१॥

उपाध्याय पाठक मुनी । सर्वसाधू श्री पचज्ञानी ।
तत् मुखोत्पन्न जिनवानी । ज्ञानदायिनी बाळकासी ॥२॥

उक्तंच-कोटीशत द्वादशचैव कोटचो लक्षान्यशीतित्र्यधिकाति चैव ।
पचाशदष्टौ च सहस्रसंख्यामेतं श्रुत पंचपद नमामि ॥३॥

गाथा–अरहतभासियत्थ गणहरदेविंदथियं सम्मं ।
पणमामि भत्तिजुत्तो, सुदणाणमहोवहिं सिरसा ॥४॥

श्रोता व्हावे सावधान । रत्नकीर्तीचा शीष अज्ञान ।
कर्म गाजिल वैरियान । कथावर्णन न चालेच ॥५॥

कथासमुद्र विख्यात । मज न कळे त्याचा अत ।
देवा साह्य व्हावेजी येथ । भवसमुद्रात तारावे ॥६॥

तुर्य आराधना कथाकोष । त्रय आराधना उपदेश ।
गुरू आज्ञेन सावकाश । तप आराधनास कर्म गाजी ॥७॥

देवा कर्माधीन केल मात । शरण जाऊ मी कवनातं ।
चद्रकीर्ती विनवी तुम्हात । कर्मबंधात छेदि बापा वो ॥८॥
येथोनी कथा अनुसधान । सकळी तयाचे असे वर्णन ।
शेवट अधिकार सपूर्ण । देवकृपेन होय सर्व ॥९॥
श्लोक–यस्य सत्केवलज्ञाने भाति विश्वमणूपमं ।
त जिनेद्र प्रणम्योच्चेरनिह्नवकथं ब्रुवे ॥१०॥
अवती देश उज्जनी नग्र । राजा धृतीसेन चतुर ।
राणी मलयावती सुदर । चडपुत्र गुणोज्वल तो ॥११॥
पूर्वपुण्य सर्वसुखी । दक्षिणदेशी बेनातटाखी ।
ब्राह्मण तेथे वसे सुखी । पुत्रसुखी काळसजिव ॥१२॥
सर्व विद्या सपूर्ण । उज्जनी नग्रासी जावोन ।
चड प्रद्योत जिंतिला ज्ञान । दीक्षा उत्पन्न उभयतासी ॥१३॥
विहारकरिता पृथ्वीवर । विपुलाचली महावीर ।
श्रेणिक राजा वंदी त्वर । उपदेश समग्र ऐकिला ॥१४॥
समवशरणाबाहेरी । श्वेत संदिव मुनी तपश्री ।
श्रेणिक त्यात विचारी । गुरूनाम उच्चारी स्वामिया ॥१५॥
तो म्हणे गुरू वर्धमान । नाम चोरील गुरूच त्यान ।
अनिह्नव दोष दारुण । सर्वांगान कुष्टी जाहला ॥१६॥
पाहोन त्या आचार्यासी । श्रेणिक पुसे गौतमासी ।
गणधर सागे रायासी । सूचना त्यासी करा वेगी ॥१७॥
श्लोक . शीघ्र पश्चात् समागते तत् समीप महीभुजा ।
श्रेणिकेन शुभैवाक्यैर्भत्या सवोधितः स च ॥१८॥
श्रेणिक म्हणे गुरूवर्या । गुरू नाम लोप केला त्वया ।
कुष्ट व्यापला सर्व हृदया । अणिन्हव क्रिया दुःखदायी ॥१९॥

तेव्हा तो श्वेत संदीव मुनी । आपनिंदा पश्चात्ताप मनी ।
शुक्लध्यानेन कर्मधुनी । केवळज्ञानी समुत्पन्न ।।२०।।

श्लोक :–ततो भवैर्नकर्तव्यो निन्हवः स्वगुरौ सदा ।
समाराध्यो गुरू यस्मात् स्वर्गमोक्षसुखप्रदः ।।२१।।

ते जाले मुड केवळज्ञ । उपदेश केला भव्य वृंद ।
तयासी अंती मोक्षपद । मम भवछेद कर्महत्वा ।।२२।।

श्लोक :–असत्यसहिता हिंसा मिथ्यात्वचनदृशते ।
अष्टांगं यत्र सम्यक्त्वदर्शनं द्वीसुधीदं ।।२३।।

चौथी हे तप आराधना । असत्य नसावी रसना ।
सोळाकारण भावि भावना । सख्या जीव मना शांति धरी ।।२४।।

॥कथा ९२॥

पुढील कथा अनुधान । सकळित श्रोतासी श्रवण ।
गुरू आज्ञा शास्त्राधारान । कवित्ववचन जिनवाणी ।।२५।।

श्लोक :–नत्वा श्रीमत्जिनेंद्रस्य पादपद्मद्वय मुदा ।
वक्षे व्यजनहीनस्य कथा सबोधहेतवे ।।२६।।

देश मागध विस्तीर्ण श्रेष्ठ । त्यात राजगृह नगर जेष्ठ ।
वीरसेन राजा नेमिष्ठ । वीरसेना स्त्री सुष्ठ षड्गुणी ।।२७।।

तयाचा पुत्र सिंहसेन । उपाध्या सोमशर्मा ब्राह्मण ।
सर्वशास्त्रादि विचक्षण । पूर्वपुण्यराज्य करिती ।।२८।।

तत् समधी विख्यात । पोदनपूर असे तेथ ।
तयो राजिंद्र सिंहरथ । ज्ञानवंत षट्कर्मादी ।।२९।।

तयासी वीरसेन रायान । करभार मागे क्रोधे करोन ।
त्याचा ग्राम राहे वेष्टोन । बहुत दिन जाहले ।।३०।।

वीरसेन राजगृहासी । पुत्राध्ययन करायासी ।
पत्र लेहुन स्वकरेसी । चतुरनरासी पाठविले ।।३१।।
पत्र वाचिता ज्ञानवत । ध्यायन करावे सिंहसुत ।
आकारहीन अर्थानर्थ । आळशाअर्थ व्यंजनहीन ।।३२।।
अपमत्त तर्कपणेन । अर्थ लाविला ज्ञानियान ।
सिंहपुत्रासी राजकारण । सिकवावे बैसोन समीप ।।३३।।
तेव्हा राजा स्वल्पदिवसा । येता जाला स्व आवासा ।
राजनीती पाहे मनसा । ज्ञान ससा पुत्रासी नसे ।।३४।।
बोलावुनी पुत्र रानीसी । अध्ययन किं न करिसी।
आम्ही पाठविले पत्रासी । त्या पाठासी कारण केले ।।३५।।
राव पिता पाहोनी क्रोधाग्नि । पुत्र वदे विनयवानी
बापा पत्र अर्थ पाहोनी । केली करनी वाचकाज्ञेन ३६।।
पाचारोनिया वाचकात । पत्रार्थ विचारिला त्यात ।
अनर्थ पाहोन भयाभीत । धरी मौनात अधोवदन ।।३७।।
मानभंग जाला तयाचा । रायदंड केला मूर्खाचा ।
यालागी ज्ञानिय अर्थाचा । अळसक्षर व्यजनाचा नसो ।।३८।।
श्लोक :–यथौषध हीनगुणत्वमाश्रितं निहति नैवाऽन्नशरीरवेदना ।
तथाक्षरे हीनगुणाश्रित शुभ हित न तत् शुभं सुधी. पठत् ।।३९।।
यथा वैद्य औषध देत । पथ्य न सागे रोगीयात ।
शरीरवेदना होति त्यात । तेवि ज्ञात्यात अर्थाऽनर्थ ।।४०।।
पडित ऐसे न करावे । अळसविना शास्त्र पढावे ।
व्यजनाक्षर न चुकावे । पढने पढावे शुद्धाक्षर ।।४१।।
कथा तिन्हान्नव सपूर्ण । पुढिल कथेसी सावधान ।
अर्थहीन ज्ञान सागन । ते निरोपन श्रुत करा ।।४२।।

श्लोक :–सर्वकल्याणकेपुष्पैर्चर्चिता त्रिदशादिभिः ।
नत्वा जिनेश्वरान् वक्षे अर्थहीनकथानकं ।।४३।।
विनीता देश तो विस्तीर्ण । त्यात पुर नगर जान ।
साकेता नगरी विस्तीर्ण । द्वादशयोजन अयोध्या ।।४४।।
तेथील राजा वसुपाळ । वसुमती स्त्री गुणमाळ ।
तत् पुत्र जाला सकुमाळ । वसुमित्र नामाभिधान ।।४५।।
तयाचा उपाध्या गर्गाचार्य । तर्क व्याकरण ज्ञानवर्य ।
राजा वसुपाळ धीर वीर । सर्व ऐश्वर्य राज्य करी ।।४६।।
तथा अवती देशामाझारी । उज्जयनी नाम असेस नगरी ।
वीरदत्त राजा राज्य करी । वीरदत्ता आतुरी वल्लभा ।।४७।।
वीरदत्त तो राज्यधर । वसुपाळा न दे करभार ।
मानभग तो जोरावर । करोन नगर बळकावी ।।४८।।
वसुपाळ भूपती सैन्यासी । वेष्टिता जाला उजनीसी ।
वस्य करोन सर्वदेशासी । तो त्या ग्रामासी गुतला पै ।।४९।।
स्वनगरा पत्र पाठवोन । पुत्रा करवावे विद्यापठन ।
गर्गाचार्यासी बोलउन । नित्य भोजन उपाध्यासी ।५०।।
श्लोक पुत्रोऽध्यापयितव्योऽसौ वसुमित्रोऽति सादरं ।
शालिभक्त मसिपृक्त सर्पियुक्त दिन प्रति ।।५१।।
पत्र लिहिल संस्कृत । राजस्त्रीय वसुमतीत ।
पुत्र सुमित्र त्यास युक्त । पत्र वाचीत पाठक ज्ञानी ।।५२।।
त्यान सागितला अर्थ । भोजन घालावे गर्गात ।
कोळसे घालोनी भातात । घृत यथास्थित पुष्कळ ।।५३।।
मषि अर्थ न समजला । साखर कोळसा अर्थ केला ।
अनर्थ झाला अर्थाला । दोष लागला वाचकासी ।।५४।।

गर्ग उपाध्या नित्य जेवी । म्हणे याचि काय वो चवि ।
पुत्र म्हणे उगाच जेवी । आज्ञा पाळावी राजियाची ।।५५।।

भोजन करी संकोचित । काया कृश मलीन दिसत ।
तत् राय जितून वैरियात । आले अयोध्येत राजेश्री ।।५६।।

भेट जाली सर्व लोकासी । क्षेमकुशल पुसे त्यासी ।
राया तत् पुण्य सर्वत्रासि । खुशाल क्षेमेसी असो देवा ।।५७।।

गर्ग उपाध्या पाहून राया । गहिवर दाटला तत् हृदया ।
कृश झाली मलीन काया । शब्दमुखे त्या न बोलवे ।।५८।।

नृपे पाहोनी तयासी । दया आली हृदयासी ।
धरोनी स्वकीय पोटसी । समजावी त्यासी दयावत ।।५९।।

पाहोनिया कृश शरीर । काळिमा चढली अंगावर ।
म्हणे काय व्याधी सागा त्वरे । करीन निर्जर औषधान ।।६०।।

राया तुमचे आज्ञेप्रमान । नित्य कोळशाचे भोजन ।
तेन काया जाली मलीन । तुमचे पुण्यान वाचलो मी ।।६१।।

ऐसे ऐकताची समग्र । रायासी कळला विचार ।
हृदयी क्रोधाग्निसंचार । कर्म दुर्धर अनुचित पैं ।।६२।।

स्त्रीपुत्रासी बोलाउनी । पुसे राजेद्र क्रोधाग्नि ।
तव ते वोले गुणशालिनी । वाचक गुणी दर्शविला ।।६३।।

राय क्रोधे करून त्यासी । मुडन केले अर्धमीसी ।
खरारोहण पश्चिमेसी । दड तयासी दिधला ।।६४।।

एव अन्य न करावे । जिनभाषित मनी धरावे ।
शुद्धाक्षर अर्थ वदावे । मनी धरावे गुरूचे ज्ञान ।।६५।।

श्लोक–तस्मात् श्रीजिनभाषित शुभतर कीर्तिप्रमोदप्रद ।
ज्ञानं ज्ञानधनैर्विशुद्धचरणैः सद्भिः सदा सेवितं ।
युक्त्या भक्तिभरेण निर्मलधियो भव्या भजति अत्र ये ।
तेषा सारसुखं प्रवोधविलसत् श्रीसंभव सभवेत् ।।६६।।

कथा ।।९४।।

श्लोक–विशुद्धकेवळज्ञान नत्वा श्रीमत्जिनेश्वर ।
व्यजनार्थप्रहीणस्य वक्षे तस्य कथानक ।।६७।।

कुरूजांगल देश थोर । त्यात ते हस्तिनागपुर ।
तत् महापद्म नृपवर । धर्मी तत्पर षट्कर्मी ।।६८।।

तयाची स्त्री पद्मावती । रूपलावण्य गुणवंती ।
श्रीजिनेंद्र धर्म करिती । शीलव्रती षड्गुणभार्या ।।६९।।

तथा त्या सुरम्य देशात । पोदनापुर ते विख्यात ।
सिंहनंदी तो महीनाथ । रायासी न देत करभार ।।७०।।

पद्मराजा पोदनपुरा । वेढा घातला त्या नगरा ।
तेथे वागात जिनमंदिरा । पाहोनी नेत्रा संतोषला ।।७१।।

सहस्त्रकूट चैताळ तेथे । सहस्त्र स्तंभ मनोज्ञ त्यात ।
श्री जिनबिंब वेदिवरीत । रत्नमय ते अनुपम ।।७२।।

नृप पाहोनिया अंतरी । हर्ष निश्चय त्रिप्रकारी ।
त्रिःपरीत्य जय उच्चारी । नमन करी साष्टांग पै ।।७३।।

अनुपम चैत्याले पाहोनी । विचार करी अंतःकरणी ।
आपुले ग्रामासी जावोनी । करउ भवनी सहस्त्रस्तंभ ।।७४।।

ऐसे विचारोनी मानसीं । पत्रिका लिहिली ग्रामासी ।
सहस्त्रस्तंभ सायासेसी । महाप्रयत्नेसी ठेवावे तुम्ही ।।७५।।

तदा पत्र वाचिता पंडित । अर्थ न कळे कवनात ।
एक होता कुज्ञानवत । अपमत्त अर्थ लाविला ॥७६॥
म्हणे मागे पुढे अक्षर । वस्त ऐसा अर्थ चतुर ।
बकरे मेळउनि सहस्र । केले तय्यार बोकड ते ॥७७॥
चारापानी त्यासी घालोन । वहुत रक्षिले यत्न करोन ।
व्यजन अक्षरा केली हान । गुरूविना ज्ञानगर्विष्ट ते ॥७८॥
तेव्हा तो राजा आगमनेसी । येता जाला स्वग्रामपुरासी ।
कार्य पुसे कारभान्यासी । दावा आम्हासी स्तंभ सर्वेही ॥७९॥
राजा वदे करा तय्यारी । स्तंभ पाहीन आपुले नेत्री ।
ते म्हणती आनितो सामोरी । वैसावे कचेरी क्षणैक ॥८०॥
राजा म्हणे काय वदती । पाहू यासी काय अनिती ।
तव ते सहस्र बस्तहाकिती । वदनी वदती तीरदुस्स ॥८१॥
तेव्हा राजा क्रोधभरित । धरा मारा त्यासी वदत ।
तेव्हा ते काकुलति येत । लिहीले युक्त राया पत्री ॥८२॥
नृप वदे पत्रासी दावा । वाचकासी त्वरे बोलावा ।
तयाच्या फेडीन मी ठावा । सूर्यपुत्र गावा धाडीन ॥८३॥
वाचक म्हणे मी अज्ञान । व्यजन अक्षर अर्थहीन ।
मज न कळे शास्त्रज्ञान । आळस प्रमादेन अर्थ केला ॥८४॥
रे रे मूर्खा तू मिथ्यामती । पुण्यहानी अपेशप्राप्ती ।
दंड करोनी तयाप्रती । विचारी चित्ती पुण्यमार्ग ॥८५॥
बोलाउनीया कारागर । स्तभ करोनी सहस्र ।
तयार केले जिनमंदिर । रत्नाकार जिनबिंब ते ॥८६॥
मधे पूजाप्रतिष्ठा विधी । पुण्य मेळवी नवनिधी ।
कीर्ती जाहाली जगामधी । उत्पन्न बुद्धी वैराग्याची ॥८७॥

राज्य दिधले पुत्रासी । आपन गेले अरण्यासी ।
विनंती केली स्वामिसी । दीक्षा भारासी घेतले त्वरे ।।८८।।

तीव्र तीव्र तप करोन । केले परव्राचे साधन ।
अनुक्रमे मोक्षगमन । तत् पदस्थान कवि मागे ।।८९।।

असो श्रोता गुणवंत । आळस न करावा अक्षरार्थ ।
जेन होय पुण्या अनर्थ । व्यंजन अक्षरहीनार्थ नसो ।।९०।।

श्लोक –इत्थ श्रीजिनभाषित शुभतर ज्ञात्वा सुशास्त्र बुधै ।
त्यक्त्वा मोहविधायक भयहरं त्रेधा प्रमादं सदा ।
धर्मे कर्मणि शर्मकोटिजनके संज्ञानदानादिक्रे ।
भक्त्या श्री जिनपूजने शुभतरे कार्या मति' श्रेयसे ।।९१।।

॥ कथा ९५ ॥

कथा जाल्या पच्यान्नव । पुढे श्रोता व्हावे सावध ।
जिनभाषित ज्ञान पाहावे । हीनाधिकार पाहे मनी ।।९२।।

श्लोकः–नत्वा जिन जगत्पूज्य केवलज्ञानलोचन ।
हीनाधिकाक्षराख्यान प्रवक्षे भव्यरंजनं ।।९३।।

सोरटदेशात विख्यात । श्री उजतगीरी उन्नत ।
गिरनेर नाम असे त्यात । श्रीमत् चद्रगुफेत मुनी ।।९४।।

श्रीधरसेन महाचार्य । जैनतत्त्वाब्धि ज्ञानवर ।
चारित्राब्धि परीपहधीर । द्विविध क्रिया उपदेशी ।।९५।।

जानोनिया अल्पजीवित । निमित्तशास्त्र पाहे गणित ।
विद्या साध्य नोव्हे त्यात । चिताग्रस्त चित्तात जाहला ।।९६।।

तत् समीप आंध्र देसे । तत् बेनातट नग्र असे ।
सघ आले जिनयात्रेस । त्यात ज्ञानी असे महाचार्य ।।९७।।

शीष द्वौ ब्रह्मचारी । नूतन ज्ञानी व्रतधारी ।
सिद्धान्तधारण धुरंधारी । सघाभीतरि ज्ञानवंत ।।९८।।
जानोनिया त्या आचार्यांनि । पत्र पाठविले त्या कारण ।
चतुर शहाणा पाहून । त्यान जावोन पत्र दिधले ।।९९।।
पत्र पाहोनी ब्रह्मचारी । सतोष पावले अतरी ।
तेव्हा तो भूतमुनी विचारी । धर्मप्रकाश करी जनासी ।।१००।।
पुष्पदंताख्य मुनीराय । भूतादिबळी ज्ञानसूर्य ।
दोघे पाठविले लवलाहे । तत् आचार्य भेटिलागी ।।१०१।।
तत् पूर्वी त्या आचार्यासी । स्वप्न जाले पश्चिमनिशी ।
शुभ्र नूतन वृषभासी । दिव्य शरीरासी पाहिले ।।१०२।।
ते दोघे वृषभ येवोन । पदपद्मासी जाले लीन ।
ते देखोनिया आचार्यांनि । सतोष होऊन अतरी ।।१०३।।
सदेह अतरात होता । तो निवारी श्रुतदेवता ।
दिनकर उदय होता । उठोनी त्वरिता बैसला ।।१०४।।
दिवस उगवल्यावरी । दोघे आले ते ब्रह्मचारी ।
नमस्कारिला तो आचारी । स्तुतीत करी पदद्वया ।।१०५।।
तीन दिवस भक्तियुक्ती । गुरूची सेवा यथाशक्ती ।
पाहावया ज्ञानप्रचीती । पाठ सागति गुरूराज ।।१०६।।
एकासी सागे हीनाक्षर । अधिकाक्षर दूज्यासी मंत्र ।
दोघा सागे साधनसूत्र । त्या गिरनेर पर्वताग्री ।।१०७।।
श्री तीर्थंकर नेमिदेव । त्या शिळातळी धरोनी भाव ।
विद्या साधिती शीषराव । सरळ भाव धरोनिया ।।१०८।।
हीनाधिकाक्षर पढती । मत्रविद्या मुनी साधिती ।
कान्हादेवी विक्राळदंती । पाहता चित्ती सावध जाले ।।१०९।।

म्हणती क्रूर देवता आली । मंत्राची परीक्षा पाहली ।
हीनाधिकाक्षर वोळखिली । शुद्ध केली ते बुद्धीबळे ॥११०॥
अर्थ पाहोनीया व्याकरण । जानोनी त्यांनी ज्ञानखुन ।
तत् श्रुतदेवता येवोन । अभय देवोन स्थापिले ॥१११॥
तेंव्हा ते दोघे ब्रह्मचारी । विद्यासिद्धी जाल्यावरी ।
येते जाले ते झडकरी । गुरूपदावरी मस्तक ॥११२॥
गुरू विनयभक्ती करोन । सर्व सागितले निरोपण ।
कुदेवीचे जाले दर्शन । हीनाधिकाक्षरान अनर्थ ॥११३॥
शुद्ध पढता ते सुदेवी । सरस्वती ते श्रुतदेवी ।
हृदयोत्पन्न ज्ञान दावी । सुबुधी बरवी गुरूकृपे ॥११४॥
शीपयुक्ती ऐकोनिया । परम संतोष गुरूराया ।
शाबास म्हणे शीष सखया । ज्ञान उदया देवकृपेन ॥११५॥
तेंव्हा तो योगींद्र धरसेन । शुद्धपाठे तुष्टायमान ।
सिद्धान्तकर्ता धर्म जैन । प्रकाशकारण शीष हे ॥११६॥
मुनी सागती शुद्ध पाठ । शीष पढती होऊनी धीट ।
आगम सिद्धान्त असे श्रेष्ठ । धर्म गरीष्ट धुरधरौ ॥११७॥
ऐशापरी धर्मप्रकाश । शास्त्रोक्त करिती जगास ।
मार्गप्रभावना सतोष । भव्यजीवास वत्सलत्व ॥११८॥
ऐसे जानोनी ज्ञानवंत । हीनाधिकाक्षर अर्थानर्थ ।
पुराणपठन अक्षरार्थ । आत्महितार्थ गुरूमुखे ॥११९॥
श्लोक –स श्रीमान् धरसेन नाम सुगुरू. श्रीजैनसिद्धान्ततो ।
सद्वादीदुर्व पुष्पदतसुमुनि श्रीभूतपूर्वो बलिः ।
एते सन्मुनयो जगत्त्रयहिता सर्वामरैरर्चिता ।
कुर्युर्मे जिनधर्मकर्मणि मतिं स्वर्गापवर्गप्रदे ॥१२०॥

॥ कथा ९६ ॥

श्रीजिनासी शतादि इद्र । पूजा करिती निरंतर ।
तत् पदी करू नमस्कार । व्रतयोगेंद्र सागेन पै ।।१२१।।
सोरटदेस असे विख्यात । द्वारका नगरी असे त्यात ।
हरिवंशी तो कृष्णनाथ । पुण्यवंत पूर्वदत्तेमु ।।१२२।।
सत्यभादि रुक्मिणीसती । सोळा सहस्र भामा असती ।
सप्तरत्न त्रिखंडमती । राज्य करिती द्वारकेचे ।।१२३।।
एकदा श्री नेमीश्वर । समोशरण गिरिनेर ।
वदावया यादवेंद्र । समुदाय समग्र चालले ।।१२४।।
जाता मार्गी सुव्रतमुनी । सुतपस्वी तो धर्मध्यानी ।
व्याधि क्षीणाग पाहे नैनी । श्रीकृष्णमनी दया आली ।।१२५।।
जीवकाख्य तो महावैद्य । त्याच्या हस्ते केले औषध ।
क्षीर लाडु मोदकसुध । गृहिंगृही बोध श्रावकासी ।।१२६।।
नित्य त्या भावरीवेळेस । तुम्ही द्यावे औषधास ।
आहार करिता मुनीश । सर्वांगास सुध जाहला ।।१२७।।
शुद्ध चारित्र धर्मध्यानी । दिव्य देह जाला मुनी ।
नवविधा पुण्यदाता जनी । तुर्यदानी सप्त त्रिधीयुक्त ।।१२८।।
श्लोक:-श्रद्धा-भक्तिशक्तिर्मुदाविज्ञानदयाच शाति ।
लुब्धतासप्तगुणास्तं दातारस्य प्रशंसिता: ।।१२९।।
श्रद्धा मनी जे तो निश्चय । भक्तीमन जे मनास प्रिय ।
शक्ति सर्व युक्तीची होय । ज्ञानाची सोय विज्ञान दया ।।१३०।।
दया षट्कायासी निपुण । शाती ते पृथिवीसमान ।
ऐसा दाता पुण्यपावन । लुब्धता गुणज्ञ सुपात्रासी ।।१३१।।
तदउपमेन वासुदेव । दानादि पूजा भक्तिभाव ।
तीर्थंकर गोत्री केला जीव । मोक्षवैभव मेळविले ।।१३२।।

महासुपात्रा दान केल । त्यानी सर्व सुख मेळविल ।
नरदेहाच सार्थक जाल । श्रोते हो ऐस केल पाहिजे ।।१३३।।
तेव्हा कोन्हे एके दिवसी । मुनीश्वर आले पारण्यासी ।
नवविध पुण्याची रासी । जोडोनी त्यासी पृच्छा करी ।।१३४।।
अहो श्रीपूज्य जगदेश । निर्व्याधी जाली शरीरास ।
आहात की सुखसंतोष । सांगावे आम्हास गुरूवर्या ।।१३५।।
ते ऐकोन गुरू वदती । कुकर्म दु.ख भोगविती ।
सुकर्म सुख होय प्राप्ती । करिता भक्ति जिनपदी ।।१३६।।
ते ऐकोनिया चक्रधर । निर्मळ मुनी वाक्योत्तर ।
पुनः पुनः कृत नमस्कार । प्रशंसा थोर करीतसे ।।१३७।।
सन्निध होता वैद्य अज्ञानी । जीवकाख्य नामाभिधानी ।
तो म्हणतसे मम करणी । व्यर्थ मुनीनी गमावली ।।१३८।।
जरी घेता हा माझे नाव । पावन होता कृष्णदेव ।
काही देता आम्हासी द्रव्य । बाबानी सर्व ममानहित ।।१३९।।
निंदा मुनीची करिता जाला । आर्तध्यानी मृत्य पावला ।
नर्मदातीरी जन्म पावला । वानर जाला तिर्यंच पै ।।१४०।।
मूढप्राणी ते जानती । स्वामिची निंदा करिताती ।
निंदे कुयोनी जन्म घेती । चौऱ्याशी भोगिती गुरूद्रोही ।।१४१।।
एकदा तो वनी वानर । वृक्षातळी पाहे मुनीश्वर ।
त्यास स्मरण पूर्ववैर । उपद्रव थोर करीतसे ।।१४२।।
पद्मासनी ते मुनीराय । वृक्षशाखा घालिती घाय ।
छिन्न भिन्न जालीसे काय । सोसी परीषह द्विविस ।।१४३।।
मुनीद्र निश्चल देखोन । वानरा जाल जातिस्मरण ।
वैर फिटल्या शुद्ध मन । पूर्वज्ञान त्यास जाहले ।।१४४।।

म्हणे म्या गाजिले मुनीसी । पाप बैसले मम शीषी ।
शरण असावे आता पासी । तेन पापासी होईल खड ।।१४५।।

तेव्हा विचारोनी मनात । वनवल्ली आनिली त्वरित ।
रस घालोनी घायात । दिव्यदेहात मुनी जाहले ।।१४६।।

पुनः पुन. तो स्तुती करी । मस्तक ठेवी चरणावरी ।
उपसर्ग केले नानापरी । अपनिंदा करी बांदर ।।१४७।।

मुनीन साहिले परीषहासी । अवधीज्ञान जाले तयासी ।
पूर्वभवातर वानरासी । सागतात तयासी पश्चात्ताप ।।१४८।।

तेव्हा तो मर्कट ऐकोनी । मुनीवाक्य धर्मश्रवणी ।
स्वर्गमोक्षाची ते ठेवनी । कर जोडोनी करी विनती ।।१४९।।

स्वामी मी अन्यायी पतित । मज सागावे आत्महित ।
मग त्यासी दिल्हे अणुव्रत । निश्चय सम्यक्त्व पाळी तू ।।१५०।।

सप्तदिन सर्व सन्यास । मरोन गेला तो स्वर्गास ।
महर्द्धिक सौधर्मस्वर्गास । सर्व सुखास सपूर्ण आयु ।।१५१।।

जैन धर्म जतु करिती । तयासी होय सुखप्राप्ती ।
तिर्यंच मर्कटा स्वर्गप्राप्ती । पुण्य जोडिती गुरूप्रसादे ।।१५२।।

तस्मात् गुरूआज्ञाप्रमाण । स्वर्गमोक्षाच ते कारण ।
श्रोता व्हावे सावध मने । तीर्थेश वचन दृढ करा ।।१५३।।

श्लोक –स जयतु जिनधर्मो यत् प्रसादात् जनोऽय ।
भवति सुरनरेद्रश्रीशिवश्रीपतिश्च ।
तदिह विदिततत्त्वै श्रीजिनेद्रोक्तधर्मे ।
परमपदसुखाप्त्यै सारयत्नो विधेयः ।।।१५४।।

॥ कथा ९७ ॥

श्री जिनेद्र नमु भक्तियुक्ती । केवळज्ञान मुखोत्पत्ती ।
कथा सांगु हरिसेन ख्याति । पुण्याश्रव होति श्रवणे ।।१५५।।
अग देश असे विख्यात । कपिला नगरी असे त्यात ।
राजा सिहध्वज पुण्यवंत । स्त्री गुणवंत वप्रादेवी ।।१५६।।
तत् पुत्र हरिसेन ज्ञानी । वीर्य शौर्य तो राज्ये मानी ।
धर्मतत्पर सप्तगुणी । पितृजननीसमवेत ।।१५७।।
ते वप्रादेवी शुद्ध श्राविका । श्रीजिनपदाब्जभाविका ।
नदीश्वरव्रत अष्टान्हिका । जिननायका पूजाविधी ।।१५८।।
तथा तयसी सापत्न्यरानी । लक्ष्मीमती असे कुज्ञानी ।
रायासी म्हणे प्रीती करोनी । रथ मिरवणी माझी आधी ।।१५९।।
ते राणी कुगुरू मिथ्याती । ब्रह्मरथ तयार करिती ।
ते ऐकोन विप्रादेवी । प्रतिज्ञा करिती सुधार्मिक ।।१६०।।
रथयात्रा मी आधी करीन । तेव्हाच करीन भोजन ।
निश्चय अंतरी करोन तीन । रथमिरवण चिताग्रस्त ।।१६१।।
तत् समयी भोजनार्थ । हरिसेन आला मंदिरात ।
माता पाहिली चिंता चित्तात । माते किमर्थ म्लानमुखी ।।१६२।।
बापा मम अष्टाह्निक व्रत । करोन चाले मम रथ ।
राज भार्या मिथ्यामत्तात । मम अग्रे रथ मिरवी म्हणे ।।१६३।।
विचार सागोनी मातेस । भोजन घालावे आम्हास ।
आम्ही जिंतुनी देशविदेश । जिनधर्मप्रकाश रथयात्रा ।।१६४।।
माते असावे स्वस्थचित्त । आहार करोन यथास्थित ।
निघता जाला अतित्वरित । फिरत फिरत चालला तो ।।१६५।।
वोलाडिली वन उपवन । तस्कर गुफा पाहली त्यान ।
विद्युत्चोर नामाभिधान । राघोच पाळन वृक्षावरी ।।१६६।।

शुक म्हणे सावध धनी । पथिक धनवंत आला कोन्ही ।
आपुले हित करावी करणी । ते राय ऐकोनी सावध ।।१६७।।
पथ सोडोन दूरस्थ । चालला त्वरे तो बंदोबस्त ।
कुसगतीन त्या राव्यात । वैचप्रप्त हित आत्म्याचे ।।१६८।।
तेव्हा राजा तो हरिसेन । निघता जाला तो त्वरेन ।
पाहिले तापसाचे ते वन । गुफा विस्तीर्ण देखिली पै ।।१६९।।
तेथे पक्षीरावा तो होता । हरिसेन पाहिला दुरस्ता ।
राघो म्हणे वो गुरूनाथा । गुणी जन ज्ञाता येत आहे ।।१७०।।
ते ऐकोनीया हरिसेन । पुसता जाला त्या कारण ।
म्हणे आमचे गुणज्ञान । कैसे नयन वोळखिले ।।१७१।।
राघो म्हणे ऐकावे देवा । सुसगतीने ज्ञानठेवा ।
कुसगतीने पाप जीवा । दुष्टभावा कुबुधी प्राप्त ।।१७२।।
तो श्रुकमी सखेचि बधू । त्यास घडला दुष्ट सबधु ।
मम गुरू तो ज्ञानसिधु । मज केला बोध गुरूराये ।।१७३।।
गुरूकृपे ज्ञान मात जाले । दूरस्थ तुम्हासी वोळखिले ।
चार दिन तेथे कर्मीले । प्रसशील मुनी त्यासी ।।१७४।।
तत् तापसाची पूर्व कथा । श्रवण करावी पुण्य श्रोता ।
अज्ञानपन लिहिले ग्रथा । न्यून पदार्था पूर्ण करा ।।१७५।।
तत् संबंधी चपानगर । शतमनु तेथे राज्यधर ।
स्त्रिया नागवती सुदर । मनोहर ते शीळवती ।।१७६।।
रत्नत्रय ते व्रतधारी । षट्कर्म त्या हृदयांतरी ।
काडनी पिछनी सोधी नीरी । समार्जन करी शास्त्रयुक्त ।।१७७।।
पात्र शुधी अग्नी प्रदीप्त । षड्विध दया धर्मवत ।
गुरू आज्ञा प्रतिपाळित । जिनगुणसपत् षड्गुणी ।।१७८।।

तत् पुत्र जन्मो जयगुनी । मदनावली त्याची भगिनी ।
रूपसौंदर्य गुणाची खानी । नसे मेदनी अनुपम ॥१७९॥
माता पिता विचार करिती । कन्येस वर न दिसे क्षिती ।
पाचारोनी जोतिषा निमित्ती । वर पुसती कन्यकेचा ॥१८०॥
तारा चंद्रबळ विचारिती । कन्येसी वर षट्खंडपति ।
स्त्रीरत्न चक्रवर्तीस प्राप्ति । अन्य क्षिती अन्यथा नसे ॥१८१॥
रायवचन त्रिधा सत्य । राव म्हणे कन्या पुण्यवत ।
मग तो राहिला निर्शिचत । मार्ग लक्षित जामाताचा ॥१८२॥
तेव्हा कवने एके दिवसी । चक्षु देखिले शुभ्र रोमासी ।
राज्य देवोनिया पुत्रासी । बांधला शीषी राजपट्ट ॥१८३॥
वैराग्य उद्भव जाल त्यासी । जाउनिया सद्गुरूपासी ।
विनय करोन घे दीक्षेसी । जाला तापसी वनगुफेत ॥१८४॥
मदनावली रूपवती । मात फाकली देशाप्रती ।
पृथ्वीराजे पृच्छा करिती । तयासी न देती जन्मोजय ॥१८५॥
तथा उड्र नाम देशात । कळावंती नगरी तयात ।
तेथे कळाकळ नामा उन्नत । जैसा मदोन्मत्त दशानन ॥१८६॥
पाठविले चतुर नर । न देता जाला क्रोधाय नेत्र ।
सामत राजे दळभार । ठाकोन चंपापुर वेष्टिले ॥१८७॥
मोहनी कर्म तो बळवंत । नित्य विषयी युद्ध करीत ।
जन्मोजय सात्विक सत्य । क्षमावत षट्कायजीवा ॥१८८॥
क्रोध–मान–माया–लोभ चारी । सात्विक जीवाचे हे वैरी ।
ग्राम घेतला बळात्कारी । आलि हारी सप्तव्यसना ॥१८९॥
सुरूग होता वना अतौती । मायकन्या दोघि निघती ।
राजा तापसिया सागती । स्थिरावती त्याच वनात ॥१९०॥

पर ललना इच्छी मानसी । यश कैंच त्या पुरुषासी ।
असाध्य जाल तयासी । गेले ग्रामासी आपुलिया ।।१९१।।
ते चक्रवर्ती ऐकोनिया । नौकारमंत्र स्मरोनिया ।
मदनावली परनोनिया । मातापितिया संतोषवी ।।१९२।।
राहोनिया काहिक दीन । पुढती केल त्यान गमन ।
सिंधुदेश महाविस्तीर्ण । नग्र अभिधान सिंधुतट ।।१९३।।
राजा सिंधुनद बळवत । सिंधुमती राज्ञी तयात ।
सिंधुदेवी आदि एकशत । कन्या रूपवंत अंत पुरी ।।१९४।।
राय पुसोनी निमित्यासी । कन्या दिधल्या चक्रवर्तीसी ।
लग्न जाले विधियुक्तीसी । बलाढ्ये पुरुषी ऊन काय ? ।।१९५।।
महागज देश जिंतिला । तेथे कन्यारत्नलाभ जाला ।
विद्याधर पर्वतासी गेला । देवीन नेला चित्रमाली ।।१९६।।
ते वेगवती विद्याधरी । पाहोनी रूपाची कुसरी ।
देवी पाठऊन झडकरी । निद्रिस्त रात्री गगनमार्गे ।।१९७।।
सावध होवोनी राजा पाहे । तव ते खेचरी नेत आहे ।
क्रोधे मुष्टी मारू पाहे । तयसी साहे कोन तेथे ।।१९८।।
तयासी शरणागत जाहली । स्वामी ऐकावी मम बोली ।
विद्याधरी स्वरूपे भली । मात ऐकिली त्वत् रूपाची ।।१९९।।
विह्वळ जाली रूप ऐकोन । मज पाठविले त्वरेन ।
तुम्हास प्राप्त कन्यारत्न । निमित्तियान सागीतले ।।२००।।
त्या विद्याधर पर्वतावर । सूर्योदर महान् पुर ।
राजा शीद्र धनुर्धर । अत पुरे वुधीमती स्त्री ।।२०१।।
मुख्य सुपुत्री जयचद्रा । स्वरूपवंत गुणभद्रा ।
दृष्टिन पाहे राजेद्रा । हीनगुण मुद्रा चित्तासी नये ।।२०२।।

वेगवती आदि शतपुत्री । तव रूपची कीर्ती थोरी ।
ऐकोनी जाला विह्वळआंगी । मनाअंतरी ईच्छा तुझी ।।२०३।।
तत् समीप नेते तुम्हासी । ऐकोनी हर्ष जाला मानसी ।
शाबास म्हणे खेचरीसी । विद्याचलासी पोहोचले ।।२०४।।
विद्याधराच्या कन्यारत्न । विवाह जाले विधीयुक्तीन ।
अनेक राजे ते जितून । स्त्रियारत्न परनिल्या त्या ।।२०५।।
नवनिधी चौदाच रत्न । शहान्नव सहस्र स्त्रीरत्न ।
साहाखंड पृथ्वी जिंतुन । पदपावन त्या चक्रवर्ती ।।२०६।।
विजयी होऊन गृहासी । नमस्कारी मातापित्यासी ।
स्थापना केली जिनधर्मासी । जिनमदिरासी उभविले ।।२०७।।
अष्टान्हिक उद्यापन । करोन रथयात्रा मिरवण ।
मिथ्यामत केले खंडन । श्रोते जन परिसा तुम्ही ।।२०८।।
त्रिभुवनकीर्ती रत्नमणी । तत् शिष्य बिजआश मनी ।
मज न कळे कवित्व कर्णी । गुरूअज्ञे करूनी केलेसे ।।२०९।।
श्लोक:–स जयतु जिनदेवोदेव देवेंद्रवंद्य· ।
यदुदितवरधर्मे शर्मभात्री जन·स्यात् ।।
गुणगणमणिखानि: स्वर्गमोक्षप्रयोनि ।
सकळभुवनचद्र केवळज्ञानसाद्र: ।।२१०।।
इति आराधना कथाकोश । ऐकता वक्त्यासी महाहर्ष ।
पापक्षय सर्वदोषनाश । मोक्षमार्गास लावी भव्या ।।२११।।

इति कथाकोशे हरिसेनचक्रवर्ती आख्यान चंद्रकीर्ती-
विरचिते छेताळिसमोध्याया संपूर्ण शुभं भवतु
कल्याणमस्तु जय जय ।। प्रसंग ४६ ।।

• • •

# प्रसंग सत्तेचाळिसावा

## ॐ जय ॐ नमः सिद्धेभ्यः श्री वीतरागाय नमः

ॐ नमो पंच परमगुरू । जे भवसागराचे तारू ।
त्याहासी साष्टाग नमस्कारू । कवित्वा आधारू जिनराय ।।१।।
ॐ नमो ते माय वाग्वादिनी । अज्ञानासी ज्ञानदायिनी ।
ग्रथकर्त्या हृदयभुवनी । साह्यकारिनी तूचि माय ।।२।।
गुरूराज श्री रत्नकीर्ति । तुमची आज्ञा अज्ञानाप्रती ।
कवित्व बाळबोधयुक्ती । द्यावी मती साह्ये होउनी ।।३।।
श्रोता सम्यक्त्वी धर्मवंत । ग्रंथश्रवणी अर्थवत ।
हस्तदोष व्यग पडत । साहाकारि तेथ भव्य प्राणी ।।४।।
श्लोक:—नमस्कृत्य जिनं देव सुरासुरसमर्चितं ।
वक्षेह परजंतूना गुणग्रहणसत्कथा ।।५।।
परदोष त्यागी जो नर । स्वल्पगुणाचा करू विस्तार ।
उत्तम गुण शास्त्राधार । जिनगुणसार प्रकाशिती ।।६।।
स्वर्गी इंद्रसभेचे आत । जिनगुणचर्चा ज्ञानवत ।
करिता त्याते इद्र पुसत । भूमीतळात ऐसा कोन ।।७।।

सौधर्म इंद्र वदे वचनी । भूतळी द्वारकापाटनी ।
वासुदेव नौवा मेदनी । नामाभिधानी कृष्णदेव ॥८॥
तेव्हा सवेगतो इंद्रदेव । पहावया श्री नेमिदेव ।
उत्तम गुणाचे वैभव । नारायणराव द्वारकेचा ॥९॥
श्री नेमीनाथ तीर्थंकर । साष्टाग तत्पदी नमस्कार ।
नौवा नारायण पृथ्वीवर । यादवेद्र श्री कृष्णदेव ॥१०॥
तत् परीक्षा पहावयासी । दुर्गंध सोडिला मार्गासी ।
निर्मापित मृत्य स्वानासी । उत्तम गुणासी पहावया ॥११॥
मार्गी ठेवोनिया तिष्ठत । महादुर्गंध दिशा व्याप्त ।
सर्व सेना मुख आच्छादित । घ्राण धरीत मुष्टीन पै ॥१२॥
तो द्वितीय विप्ररूपेण । येता जाला प्रपचवृत्तीन ।
वासुदेवा सन्मुख येवोन । कर्कुरघान दुःसह महा ॥१३॥
तदा ऐकोन कृष्णनाथ । बाह्मणा सागे शरीरार्थ ।
सुवास कुवास यथार्थ । समसमार्थ मानीत जावा ॥१४॥
ते ऐकोन इद्रमानसी । सतोष पावोन हृदयासी ।
टाकोन माया वेषासी । प्रकट रूपासी निर्जर तो ॥१५॥
म्हणे धन्य श्री नारायणा । इद्र केले तुमच्या वर्णना ।
त्याही परीस अधिक जाना । जतुविचक्षना नसेची ॥१६॥
देवोनिया वस्त्राभरण । सुर वदे स्तुतिवचन ।
त्रिखडाधीश नारायण । विनय करोन गगनमार्गी ॥१७॥

श्लोकः–एवं सुभव्यैर्जिनभक्तियुक्तै ।
त्यक्त्वात्र दोषान् परलोकजातान् ।
नित्य तु साधु प्रगुणो हि भक्त्या ।
ग्राह्यो गुणज्ञै वरशर्मसिद्ध्यै ॥१८॥

ऐशा प्रकारे भव्यजन । जिनभक्तियुक्ती करोन ।
पंचविश दोष टाकून । परलोकी जान अनुक्रमे ॥१९॥
नित्य साधुची भक्ती करी । जिन गुण हृदयी धरी ।
पठन पाठन सदैव करी । मोक्ष पायरी करीती यासी ॥२०॥

॥कथा ९९॥

श्लोक:-विशुद्धकेवलज्ञान नत्वा श्रीमत्‌जिनेश्वरं ।
दृष्टान्ते र्दशभिर्वच्मि मनुष्यत्वं सुदुर्लभं ॥२१॥
गाथा:-चोल्लय[1]-पास[2]-धयन्नं[3] जुवार[4]दण्णानि[5] सुमिण[6]चक्क[7] वा ।
कुम्म[8] जुग[9] परमाणु[10] दस दिठुता मणुयलभे ॥२२॥
श्रोता व्हावे हो सावधान । दहा दृष्टान्ते ज्ञान पाहून ।
नरदेह दुर्लभ जानून । सिद्धान्तज्ञान वोळखा हो ॥२३॥
प्रथम चोल्लक दृष्टान्त । श्रवण करा एकचित्त ।
मोक्षा गेले श्री नेमीनाथ । गिरिनेर पर्वत उत्तंग ॥२४॥
तत् समयी विनीता देशात । अयोध्या नगरी विख्यात ।
अतिम चक्रवर्ती तेथ । ब्रह्मदत्त षट्खडाधिपति ॥२५॥
सहस्रभट महाबळी । सुभट असे महीस्थळी ।
तत् कांतापार गुणगळी । सुमित्रा बाळि रूपवती ॥२६॥
हे तो प्रथम मुख्य जाया । शहान्नव सहस्रा त्या स्त्रिया ।
चौदा रत्न उत्पन्न अपल्या । बत्तीस सह श्रतया देश ॥२७॥
तस्मिन् सहस्रादि श्रीध[11] । महामडळीक राज्यपद ।
तयासी सत्पुत्र कुबुध । नामाभिध वसुदेव तो ॥२८॥

---

१. चोल्ल-भोजन, २. सोकढी, ३ धान्य, ४. द्यूत, ५ रत्न, ६. अणिक स्वप्न, ७ चक्र, ८. कूर्म, ९. युगप्रमाण, १०. परमाणुजान दाहावे, ११. चिन्ह

पितृवचनेसी पाळीच ना । मातोश्रीचा शब्द ऐकेना ।
स्त्रीसपदा भोगवी नाना । मूर्खराजचिह्ना न जानेची ॥२९॥
त्यासी कैसा हो राजमान्य । पुण्यविना कैचा सभामान्य ।
गुरुची सेवा नसे ज्ञान । नरदेहा येऊन खरपसु ॥३०॥
तदा तो सुमित्रा मातेसी । जीर्ण झोपडी बैसवी तीसि ।
कदान्न देतसे खावयासी । दास विषयिकासी पक्कान्न ॥३१॥
कुपुत्र मातेसी वध केला । तावूल मोदक न दे तयेला ।
ऐसे श्रम त्या मातोश्रीला । कुळी जन्मला कुलाछनी ॥३२॥
पिता सागे हिताची गोष्ट । ते नायकेची महादुष्ट ।
पित्याहृदयी महाकष्ट । अहो हा नष्ट कैसा तरी ॥३३॥
ऐसे करीता भरयौवन । वसुदेवा प्राप्त तारुण्य ।
अगरक्षक समसमान । चचळ पन मनस्वी तो ॥३४॥
असो एकदा चक्रवर्ती । गमन आव्या वनाती ।
रोगपीडित अश्वहस्ती । वसुदेवाप्रति दिधला ॥३५॥
त्या अश्वासी खद्यचारु । तुरकी तुरंगम वारू ।
उडान चक्र नृत्यकारु । तेज अपारु तो तेजस्वी ॥३६॥
ते अवलोकुनी चक्रवर्ती । प्रस्तावा करीतसे चित्ती ।
दुर्बळ अश्वासी बहुकाती । जेवि दीप्ती तैलशिखा ॥३७॥ -
सतोष होउनी चक्रेश । पृच्छा केली जगास ।
ते श्रुत जाले वसुदेवास । सागे पित्यास सर्व वार्त्ता ॥३८॥
षट्खडाधीश ऐकोनिया । शाबासकी दिधली तया ।
करीच कंकण देवोनिया । अश्वास न तयासि दिधले ॥३९॥
वसुदेव गेला अयोध्येसी । सागता जाला कोतवालासी ।
चक्रवर्तीन हे आम्हासी । स्वकरकंकणासी अर्पिले ॥४०॥

ते ऐकोनिया कोतवाल । द्यूतसाळेसि ठेविले ।
जुव्हारियासी दाखविले । सागितले प्रमाण त्यासी ।।४१।।
या ककनाचे प्रभावे । आम्हा अयोध्यच राज्य व्हावे ।
सिंहासनावरी बैसावे । सहा खड जिंतावे स्वबळे ।।४२।।
द्यूतकार म्हणती अहो स्वामी । तुमची सेवा करू आम्ही ।
राज्यभार मागावा तुम्ही । चक्रधरस्वामी विनवा ।।४३।।
त्वरित आला पितृपासी । इच्छिले सागे जे मानसी ।
पुण्याविना हो मानवासी । कैंच तयासी सुख प्राप्त ।।४४।।
प्राणी इच्छिति सर्व सुख । प्रारब्ध घडवी अनेक ।
पुण्याविना इच्छिल सुख । दुर्ल्लभ देख राजिंद्रा ।।४५।।
पुत्र पाहिला राजियान । काय ईच्छा वद वचन ।
काही न सुचे त्या कारण । मौन धरोन राहिला ।।४६।।
त्यास सुचली एकमति । जाऊन पुसु मातेप्रती ।
सुमित्रा माता गुणवती । जीर्ण झोपडी कष्ट भोगिती ।।४७।।
पुत्रलोभ धरोनी चित्ती । येइ येइ बापा म्हणती ।
त्वरित आला मूढमती । वार्त्ता तिजप्रति सागतु ।।४८।।
ते ऐकिले सर्व मातेन । पुत्रा रायासी माग भोजन ।
मनइच्छित तुझिया मन । ते मागून घे रायासी ।।४९।।
पुन येवोनी रायापासी । उभा राहिला मौन मुखासी ।
पुत्रलोभे पुसे तयासी । इच्छा मानसी ते सागावे ।।५०।।
बापा देई मज भोजन । मनइच्छित पक्वान्न ।
पुत्रजनक विनोदान । माग तू भोजन चोल्लक ।।५१।।
ब्रह्मदत्त राजा पुसे । तुझे भोजन ऐसे कैसे ।
जे इच्छा असेल मानसे । सागावे आम्हासे त्वरित ।।५२।।

ते ऐकोनिया वसुदेव । अहो पिता मम ऐकावे ।
षड्रसपक्वान्न द्यावे । आनिक द्यावे सर्वराज्य ।।५३।।
ते चक्रवर्ती ऐकोनिया । राहिले मौन धरोनिया ।
या पुत्र मूढ हा आनिया । राज्य प्राप्त या कैसेनी ।।५४।।
पूर्वजन्म पुण्यावाचून । कैंच प्राप्त राजा निधन ।
मनवाछित इच्छापूर्ण । सुकृतावाचून जीवासी ।।५५।।
पुत्रलोभ धरोनिया । स्नान भोजन दिधले तया ।
राज्यधन प्राप्त व्हावया । ज्ञान हृदया कैंच त्यासी ।।५६।।
स्त्रीपुत्र राज्य नि धन । धान्यादि वसन अशन ।
पूर्वदत्त तुर्य दानेविन । ईच्छित मन नव्हेचि पै ।।५७।।
कर्तृत्व करी जरी जीव । नरदेही पावेल वैभव ।
पुनरपि प्राप्त मानव । दुर्लभ जीव नरदेही ।।५८।।
ऐसे जानुनी बुद्धीजन । टाका दुर्मार्ग दु खकारण ।
जिनगुणसपत्ति हृद्मन । मोक्षमार्गानि चालावे ।।५९।।
याच अर्थी कथा दृष्टान्त । पुढति ऐका एकचित्त ।
गौतमस्वामी श्रेणिकात । समोशरणात सागतु ।।६०।।
श्लोक –अथ पाशकदृष्टान्त कथ्यते मगधाभिधे ।
देशे पुरे शतद्वारे शतद्वाराख्य भूपतिः ।।६१।।
सोगटी फाशाचा दृष्टान्त । सज्जनी श्रवण एकचित्त ।
देश मागध देशात । नग्र तयात शतद्वार ।।६२।।
शतद्वाराख्य तो भूपति । पूर्वपुण्यसतत सपत्ति ।
गावास शतद्वार करिती । हर्ष चित्ती न समाय पै ।।६३।।
येकयेका दारवटयासी । अकरा सहस्रस्तभ कळशासी ।
तेरा धारा एका खाबासी । दीर्घद्वारासी विस्तीर्ण पै ।।६४।।

एकएका दरवाज्यात । मवशे असती बुधीवत ।
एक एका स्तभ धारत । खेळ खेळत सोगटीचा ।।६५।।
ऐसे खेळती हावभावेन । एक दासी वश्रमा ब्राह्मण ।
खेळ खेळावया हर्षान । खेळतो म्हणोन बैसला ।।६६।।
फासा ढाळिती मदोन्मत्त । एकमेका द्रव्य जितीत ।
द्रव्यमदान जाले मस्त । जुवा खेळत चडोवडी ।।६७।।
ऐसे खेळता एके दिनी । सर्व जितिले ब्राह्मणी ।
द्रव्याचा मद धरोनी । जितिला सर्वांनी ब्राह्मण ।।६८।।
गेला डाव देत घेत । दैवयोगेन सर्व प्राप्त ।
पुनः पुन' एकमेकात । पुण्यसंचित हारविती ।।६९।।
नरास द्रव्यही येईल । कर्तृत्वात प्राप्त होईल ।
आयुष्याती देह जाईल । धर्म राहिला जीवामागे ।।७०।।
नरदेह दुर्लभ जीवात । जैसा डाव पडे अवचित ।
किवा सपत्ति होय प्राप्त । सतति होत पूर्वदत्ते ।।७१।।
तैसा शीघ्र मनुष्यजन्म । दुर्लभ जीवासी उत्तम ।
जानोनी चित्ती कथा उगम । पुण्यधाम करावे त्वरा ।।७२।।
सुद्धमति करोनी चित्ती । देवपूजा भावार्थभक्ती ।
चार दान पात्र सुयुक्ती । व्रतशील करिती उपास ।।७३।।
नरदेह सर्वात श्रेष्ठ । उत्तम कुळ त्या वरिष्ठ ।
श्रावक गुणधर्म पृष्ठ । जिनगुण गोष्ट हे दुर्लभ ।।७४।।

**॥ फाश दृष्टान्त २ ॥**

तिसरा दृष्टान्त बुधीजन । जानोनी धर्म आचरण ।
आचार मोक्षमार्गान । मार्गपेन पचमगती ।।७५।।

**॥ अथ धान्य दृष्टान्त ३ ॥**

श्लोक –धान्यदृष्टान्तकं वक्षे सक्षेपेण सता हितं ।
जंबूद्वीप प्रमाणाच योजनैकसहस्रत. ।।७६।।
तृतीय धान्याचा दृष्टान्त । कवि सागतु सकळित ।
जबूद्वीप प्रमाणयुक्त । सहस्रशतयोजन पैं ।।७७।।
एक योजन खोलीगार । रोम टुकडे गच्ची फार ।
नित्य एकखड काढिता बाहिर । रीतीगार योजन एक ।।७८।।
योजनाचे काय प्रमाण । सहस्र कोस चाले विमान ।
षड्मास रात्रदिन । एक योजन इंद्राचे पैं ।।७९।।
हेही काळयोग होईल । नरदेह गेल्या न येइल ।
जरी जीव पुण्य करील । जिनेंद्र भासिले किंचित् ।।८०।।
याच अर्थी धान्य दृष्टान्त । विनीता देश अयोध्येत ।
राजा प्रजापाळ पुण्यवंत । राजनीत व्रत आचरी ।।८१।।
त्याचा शत्रु राजगृहात । जितशत्रु हा बळवंत ।
अयोध्यापत्तन घेउ पहात । निघाला त्वरित सैन्येसी ।।८२।।
ते ऐकोनिया प्रजापाळ । जमा केला सैन्य मेळ ।
प्रजा पाचारिली सकळ । धान्य समूळ एकत्र ठेवा ।।८३।।
राजदुर्गात ठेवा धान्ये । अभयदान आचरा पुण्य ।
देवपूजा पट्कर्म दिने । सुपात्रदान चतुर्विध ।।८४।।
धर्म आचरा पुण्य होय । पुण्य विघ्नाचा नाश होय ।
जिनशासनी साह्य होय । अबिकामाय वज्रधारी ।।८५।।
तत्समयी जितशत्रु । न धरत वेग वगत्रु ।
बलोन्मत्त तो ताम्रनेत्रु । पूर्वशत्रुत्वं वैरभाव पैं ।।८६।।
क्रोध धडाडे अत करणी । जैसा तो प्रळयीचा अग्नी ।
अष्टदिशा वेष्टोनि शैनी । दणादणी क्रूरघोरवाद्यैं ।।८७।।

वीराआगी महास्फुरण । करी शस्त्र दिसती नग्न ।
हस्त घोडे रथ पायदळान । चतुरंग सैन्यसिंधु तो ॥८८॥
गडगडीत मदहस्ति । अश्वही सारे चमकत ।
रथी वीर बाणभाती । पायदळ घेती दारुयंत्र ॥८९॥
अयोध्या नगरीत आनंदे । देवपूजा वाद्य सुवाद्ये ।
पडित पढति मत्र शुद्ध । जय जय शब्द यशस्वी ॥९०॥
पूजा संपूर्ण विधियुक्त । श्रीपूज्यपूजा यथाशक्त ।
गुरू आशीर्वाद जयवंत । भोजनी तृप्त तुर्यसघ ॥९१॥
मग पाचारोनी सैन्यक । सैन्य मेळा वाद्ये अनेक ।
गज रथ तुरग पाईक । रत्नभेरी धाक वैरिया ॥९२॥
रत्नखाब रणागनी । पूजा केली सैनिकानी ।
रणवाद्ये एकच ध्वनी । वैरी दणाणी अतरी ॥९३॥
जितशत्रु क्रोधि आनीळ । अयोध्यापती शातिजळ ।
क्रोधाग्नी वैरी तो निर्बळ । करिता बळ यश न ये ॥९४॥
दोघ पश्चात्ताप करून । वैर साडिला शास्त्रयुक्तीन ।
आर्जव धर्म तिसरा गुण । कोन्हासी भाडण करू नये ॥९५॥
दोघा समता भाव जाला । जिनधर्म महोत्सव केला ।
आदराप्रती आदर भला । मार्गस्थ केला क्षमाभावे ॥९६॥
तदा तस्मिन् प्रजा सर्वे । निज धान्यं मागति सर्वे ।
राजा दयावत अपूर्वे । शास्त्र सर्वे ज्ञानसागर ॥९७॥
ज्याचे त्यासी दिधल धान्य । किंचित् जिनधर्मपुण्य ।
सिद्धान्तधर्मी नृप धन्य । अदत्ता धान्य न घेचि ॥९८॥
जे जे गेले ते होय प्राप्त । पुण्य करा जिनभाषित ।
हेही घडेल अवचित । नरदेह जीवात दुर्लभ ॥९९॥

ऐसे जानोनी भव्यजीवन । कैसेही करा जिनपुण्य ।
जेन होय मुक्तीगमन । इयापरी ध्यान्य दृष्टान्त ।।१००।।

॥ इति धान्य दृष्टान्त द्वयं ४ ॥

श्लोक –द्यूतदृष्टान्तमावच्मि शतद्वारे पुरे तथा ।
द्वारपचशतान्येव द्वारे द्वारे मनोहरे ॥१०१॥

तृतीय जुव्याचा दृष्टान्त । सज्जनी ऐका एकचित्त ।
मार्ग सापडे मोक्षपथ । परमार्थ सिद्धान्त वळखी ।।१०२।।

शतद्वारपूरनगर । त्या नगरीत शतद्वार ।
एक्या द्वारवटचा अधार । धर्मशाळा थोर पचशत ॥१०३॥

एकाएका शाळा भीतरी । सहस्रार्ध असती जुव्हारी ।
ज्ञानी खेळती नानापरी । कुशलत्व भारी द्वाररक्षका ॥१०४॥

जुवारी एकच ईनामा । खेळू आला तो द्तकामा ।
सर्वे जितुनिया धामा । पुण्य आत्मा सुखी भवेत् ॥१०५॥

स्वेच्छा हिंडोन देशातर । चईनामा तो द्तकार ।
येता ते मिळाले समग्र । कर्मयोगानुसार तेही पैं ॥१०६॥

तैसा मनुष्यजन्म गेला । पुन॰ न सापडे जीवाला ।
किंचित् पुण्य सापडला । दुर्लभ धर्माला करा सर्व ॥१०७॥

याअर्थी द्वितीय दृष्टान्त । ह्याच ग्रामी अन्य शाळात ।
नीळ लक्षीमन तो द्त । यशे तयात नय पापे ।।१०८।।

स्वप्नात जय नय तया । किंचित् पूर्वीच पुण्य उदया ।
खेळता जय प्राप्त तया । शुभ उदया जितिले सर्व ॥१०९॥

सर्वानी द्रव्य हारविले । कापडी कासी देशा गेले ।
कित्येक दिवस भ्रमले । पुनरपि आले स्वग्रामासी ॥११०॥

तेही सर्व एकत्र होति । पुनः पुनः खेळ खेळति ।
गेला नरदेह पुन प्राप्ती । नयकलपांती बुधजनै ॥१११॥
येथे करावे धर्मध्यान । किंचित् पुण्यसंचय करणे ।
सर्व मिळेल सचितान । सुपुण्यकरन शास्त्रयुक्त ॥११२॥

॥ इति दूतदृष्टान्त । अथ रत्न दृष्टान्त ॥

दुर्लभ मनुष्य देह रत्न । चक्रवर्ती दुर्लभ रत्न ।
प्राप्त तयासी चौदा रत्न । जीवा रत्न नरदुर्लभ ॥११३॥
याच अर्थी भव्य जीवास । सबोध व्हावया पुण्याश ।
श्री श्रीमत् भरतचक्रेश । द्वितीय चक्रेश सगर पै ॥११४॥
तृतीय मघवा चक्रधर । चौथा जाना सनत्कुमार ।
शाति तो कुथु चक्रेश्वर । अरनाथ चक्री सप्तम ॥११५॥
सुभोमाख्यो तो महापद्म । हरिसेनो गुणोत्तमो ।
चक्री श्रीजयसेन नाम । ब्रह्मदत्त अतिमा चक्री ॥११६॥
ऐसे जे का ते चक्रवर्ती । पूर्वपुण्य ऋद्धिप्राप्ती ।
पुनः जीवासी तैसी गती । नरदेहप्राप्ती दुर्लभ ॥११७॥
तथा नष्ट मनुष्यदेह । इच्छिता पुढे ऐसा नोव्हे ।
भव्य जन करा निश्चये । श्री जिनेद्र साह्ये करावा ॥११८॥

॥ इति रत्न दृष्टान्त ॥

श्लोक.-तथा स्वप्नप्रदृष्टान्तेऽवती देशेमनोहरे ।
उज्जयिन्या महापुर्यां हल्लाखः काष्ठवाहक ॥११९॥
अवंती देश अयोध्यापुरी । त्यातळी उज्जनी नगरी ।
तेथे हल्लाख मजुरी । काष्ठ सीरी वाहतसे ॥१२०॥
ऐसे भ्रमता एके दिसी । बहुत श्रम जाले त्यासी ।
गृहे निद्रा माध्यान नीसी । स्वप्न तयासी काय जाले ॥१२१॥

तो जाला राजा ग्रामभूप । चक्रवर्ती सेना अनूप ।
स्त्रिया गुणी सुदर रूप । अळिकारस्वरूप शोभा पै ॥१२२॥

तो वैसलासे सिहासनी । दास वारिती चौरिपानी ।
कुडल झळकती द्वैकर्णी । हेमधूम्रपाणि झर्झरी ॥१२३॥

नेक उपचार सभेस । मध्याह्न होता भोजनास ।
स्नान मर्दन दासीदास । चंदन सुवास पुष्पादी ॥१२४॥

भोजनी षड्रसपक्वान्न । स्त्रिया वाढती विनोदान ।
एक पदार्थ लवणाविन । क्रोध उत्पन्न जाला त्यासी ॥१२५॥

एक स्त्रिया होती सेजारी । पाल्लवी धरी झटका मारी ।
तव त्याची आस्त्री मंजूरी । जागृत अंतरी भयभीत ॥१२६॥

काहितो झोपित जागृत । उठोनी चालला सभेत ।
बैसला सिहासनावरूत । तव तो जागृत जाहला ॥१२७॥

कैची सभा कैच तेज । दिनोदयी उठवी भाज ।
जाई अति ते मोळिवोझ । दुर्लभराज्य पुण्यविना ॥१२८॥

तथा नष्ट मनुष्यजन्म । पुन. न ये जीवा उत्तम ।
जनभाषित धर्मकाम । उत्तमोत्तम ज्ञाते हो करा ॥१२९॥

॥ इति स्वप्न दृष्टान्त ६ ॥

श्लोक–वक्षेहं चक्रदृष्टान्तं स्तभाद्वाविंशतिर्दृढाः ।
स्तंभे स्तंभे भवत्चक्रे चक्रे चक्रे बुधैर्मतं ॥१३०॥

सुदर्शन मेरुदक्षिणे । वेशात काकिंदी पत्तने ।
राजा द्रौपद कुळी भान । धर्म जैन क्रियावत ॥१३१॥

तत् ग्रामासमीप बागात । द्वाविंशाति ते स्तभ त्यात ।
स्तंभे स्तभे चक्रे वरौत । चक्रे बुधीवंत तिष्ठताती ॥१३२॥

चक्राचक्रासहस्र आरा । आराद्वारा बहुतछिद्रा ।
भ्रमण जैप्य पळा त्वरा । सुभटद्वारा रक्षिताती ॥१३३॥
स्तभा स्तभा उपरि राधा । अलंकारे शोभति मूर्ध्नी ।
षोडशाभरण विविधा । मुक्ताफळ सुधा नासिकी ॥१३४॥
द्रौपदपुत्री रूपवंती । द्रौपदी बाळा गुणवती ।
सैंवर मडप पृथ्वीपति । राजे येताती क्षितिधर ॥१३५॥
मंडप दिधला विस्तीर्ण । पृथवीराजे जैसे भान ।
करिनीवरी बाळा बैसोन । उभी येवोन राधा यत्नी ॥१३६॥
करी पुष्प माळा सुवासे । सुगध चाले दशदिसे ।
जेवि ते इद्रकन्या भासे । गगनी दिसे चद्रकळा ॥१३७॥
की विद्युल्लता मेघमाळी । की शेषकन्या सुकुमाळी ।
की मुक्तकाति मुक्ताफळी । चाफेकळी पीतवर्ण ॥१३८॥
राधायत्न पाहोनी राय । पुण्यविना साध्य न होय ।
पूर्वदत्त पुण्याशिवाय । स्त्रीरत्न होय केवि प्राप्त ॥१३९॥
श्लोक–पूर्वदत्तेसु या विद्या पूर्व दत्तेसु या स्त्रिया ।
पूर्व दत्तेसु यत् धन अग्रे धावति धावति ॥१४०॥
दुर्लभ नरदेह जाला प्राप्त । तुर्यदान पुण्यशास्त्रयुक्त ।
यापरी सुपुण्य पूर्वदत्त । तरी प्राप्त स्त्रीधनविद्या ॥१४१॥
धनुर्विद्या पूर्वपुण्यान । राशयंत्र भेदल त्यान ।
दुर्लभ जीवा पुरूषरत्न । पूर्वदत्त पुण्य द्रौपदीचे ॥१४२॥
अर्जुन गळा माळा घाली । जयजयकार केला सकळी ।
क्रोधे तप्त जाले ते बळी । कोन हा अकुळी कापडी ॥१४३॥
राजे उठले महावीर । रण चत्वारी जे झुझार ।
टाक देई अमची नार । नग्न शस्त्र बाण लाविती ॥१४४॥

ते पाहोनिया पार्थिवान । धनुष्य टणत्कारिले तेन ।
अरेरे हा पडुनदन । अभिधान धनजय ॥१४५॥
अर्जुन म्हणती या देहासी । आता सावध व्हा मानसी ।
टणत्कारिले धनुष्यासी । त्या नादासी ते सर्व भ्याले ॥१४६॥
द्रौपद वोळखी अर्जुन । राजे शात केले तयान ।
सैंवर मडपरितीन । लग्नविधीन पाच रोज ॥१४७॥
हे उभयता रत्नप्राप्त । पुण्यावाचोनी कैस होत ।
गेला नरदेह नाही येत । जिनभाषित पुण्याविना ॥१४८॥
सातवा तो कूर्म दृष्टान्त । श्रोता श्रवनी एकचित्त ।
स्वयभूरमण अब्धीत । लक्ष कासव वर्स भ्रमित ॥१४९॥
तयाचे चर्म सूक्ष्म फार । सूर्या न दिसे अणुमात्र ।
काळे करोनी कर्मयंत्र । सूर्यनेत्र अवलोकील ॥१५०॥
स्वस्वकुटुवही पाहील । पुन. दिनकरही देखेल ।
गेल्या नरदेह न येईल । जीवा साभाळिल पाहिजे ॥१५१॥
भव्यै जानोनिया हितासी । पहा सिद्धान्त शास्त्रास ।
कुशास्त्र सुशास्त्र भेदासी । सुदेव कुदेवासी वोळखा ॥१५२॥
सुगुरू कुगुरूचे भेद । सुबुद्धीन पाहावे सुध ।
कुबुधी वळखा विविध । सुधासुध आत्मप्रचीत ॥१५३॥
सुधासुध दोन अक्षर । अनत भेद याचे फार ।
सुपुण्यकुपुण्य अतर । पडित चतुर वोळखावे ॥१५४॥
सुबुधीन सुखच प्राप्त । कुबुधीन दु ख अनत ।
चौऱ्याशी लक्ष योनि भ्रमत । तुर्य गति मिथ्यात दु खी ॥१५५॥
म्हणोन पडित चतुर । सुपुण्य करा तिळभर ।
जेने जन्म पुन नर सुर । द्वी कुगती दूर जीवाच्या ॥१५६॥

ऐसी तीर्थंकराची वानी । सम्मेदशिखर पुराणी ।
शिखर यात्रा करी प्राणी । चुकली दोनी नरक तिर्यंच ।।१५७।।
ऐसे तीर्थंकर बोलले । ते चद्रहृदयी धरले ।
त्याहाचे वचन सांभाळिले । कवित्व केले लघुचंद्र ।।१५८।।
श्लोक–शृण्वन्तु युगदृष्टान्तं सज्जना चारुचेतसः ।
प्रमाणं योजनाना हि लक्षद्वयसमायते[1] ।।१५९।।
योग दृष्टान्त तो आठवा । किंचित् सज्जनी परिसावा ।
जावया मोक्षाचिया गावा । पुण्यठेवा करावा बुधैं ।।१६०।।
क्षार समुद्राच प्रमाण । दोन लक्ष असे योजन ।
लंबायमान तो सपूर्ण । टाकिती दोन काष्ठ त्यात ।।१६१।।
ते काष्ठ भ्रमत भ्रमत । योगायोगि फिरता त्यात ।
न मिळेचि एकएकात । फेरे फिरत बहुकाळ ।।१६२।।
असो तेही कालातरे । मिळती जुग्म बरोबर ।
नरदेहे न ये त्वर । बुधिवत समग्र जानावे ।।१६३।।
जानोनी करावा सुधर्म । कुधर्म द्यावा तो टाकून ।
सर्वा भूती दया करण । पुण्याचरण नरदेही ।।१६४।।
नरदेह सर्वात श्रेष्ठ । दुर्लभ जैन धर्म गरीष्ठ ।
क्रिया आचार तोही सुभट । मार्ग नीट गति पाचवी ।।१६५।।
याच अर्थी दृष्टान्त एक । किंचित् ऐकावा भाविक ।
कथानुसधान कौतुक । जिननायक साहाकारी ।।१६६।।
नौवा दृष्टान्त अल्पमती । प्रमाण सागे योमकीर्ती ।
पूर्वाचार्याधारे मती । रत्नकीर्तीचे प्रसादे पै ।।१६७।।

---

१. लावी

श्लोक–परमाणुऽन्नें दृष्टान्त कथ्यते दशमो मया ।
सर्वं चक्रेशिना दण्डरत्नं हस्तचतुष्टयम् ॥१६८॥
द्वादशचक्रीभूमीपती । साखंडपृथ्वी क्षितिपती ।
चौदा रत्न दंडप्रमिती । प्रमाणयुक्ती महाशास्त्री ॥१६९॥
शास्त्रयुक्त्याचि गणित । गणधर सांगे समस्त ।
रूपांतर परीक्षावंत । ऐश्वर्य अगणित सर्वही ॥१७०॥
स्त्रिया सहस्र शाहान्नव । तितुकेचि अश्व अपूर्व ।
गज हस्ती प्रमाण सर्व । रथादिमेव प्रमाण तेही ॥१७१॥
चतुरंग सेना अपार । गणित केली गणधर ।
कवित्व करिती चतुर । जे थोर थोर पूर्वाचार्य ॥१७२॥
असो पूर्व पुण्यउदय । चक्रवर्ती पदवी होय ।
पूर्वदत्त जानती सोय । पुढील उपाय पुण्यार्जना ॥१७३॥
पुण्य नरदेहेच प्राप्त । गति दूसरी स्वर्ग प्राप्त ।
तीर्थयात्रा विमानी कृत । पुन. येतात नरदेहा ॥१७४॥
ऐसे येती जाती गणती । काळे करोन चक्रवर्ती ।
तेही पुण्यास्तव उत्पत्ती । क्वचित् होति पुण्ययोग ॥१७५॥
यालागी ज्ञात्वेति पंडितैं. । श्रीदेवपूजाशास्त्रयुक्तै ।
जळगंधाक्षत अखंडितैं । पुष्पचरुतै आत्महित ॥१७६॥
दीप धूप फळ अष्टक । अष्टविध पुण्य भाविक ।
शास्त्रगुरू जिननायक । दुर्लभदायक नृजन्म ॥१७७॥

श्लोक– भवतैरिह दुर्लभतामिवं ।
परमसानृजन्म जगत्हितं ॥
बुधजनाः सुविचार्य शुभश्रिय ।
जिनवृश प्रभजंतु जगत्त्रयं ॥१७८॥

टीका:– शतानुशत दुर्लभता । नरदेहे न ये मागुता ।
भव्यै: धावि दृष्टात कथा । किंचित् श्रोता श्रवण करा ।।१७९।।
चौऱ्याशी लक्ष योनीत । जीवा दुर्लभ देह प्राप्त ।
गगा ओघ अब्धि मिळत । पुन: मागुत येइना तो ।।१८०।।
कळि वर्षारूतु आकासी । गगाजळ मिळे समुद्रासी ।
काळगती नरदेहासी । येता धर्मासि भेट नोव्हे ।।१८१।।
कुकुळी जन्मला जो प्रानी । कुधर्म वसे त्याचे मनी ।
कुदेव कुशास्त्र श्रवणी । सुपुण्य स्वप्नी न मिळे त्या ।।१८२।।
तेथे नृजन्म व्यर्थ गेला । पुन. भोगितो चौऱ्याशीला ।
आला गेला तो गेला आला । ज्ञानी ओळखिला पाहिजे ।।१८३।।
यत् प्रकार दहा दृष्टान्त । जानोनी करा आत्महित ।
देवगुरू शरणागत । मोक्षपथ जावयासी ।।१८४।।

**इति गुरू रत्नचंद्रकीर्ती कथाकोश तुर्य आराधना दहा दृष्टांत कथा विरचिते प्रसंग ४७ संपूर्ण शुभं भवतु । कल्याणमस्तु ।**

## प्रसंग अठ्ठेचाळीसावा

### ।। श्री वीतरागाय नमः ।।

स्वति श्रीपचपरमगुरु । भवसागरतरणतारु ।
सरस्वती ज्ञान आधारु । नमु श्रीगुरूरत्नकीर्ती ।।१।।
नमु करू चौदासे बावन । चतुर्थज्ञानी सूर्यासमान ।
वीजचद्र तो मतिहीन । इच्छी कवन पराकृत्य ।।२।।
कथाकोश शास्त्रसमुद्र । सस्कृत असे दृढतर ।
नेत्र फिरताती गरगर । अर्थांतर न कळे मज ।।३।।
तेव्हा स्मरिली ते भारती । प्रसन्न जाली सरस्वती ।
हृदयी करोनिया वस्ती । सुज्ञान जोति प्रकाशवी ।।४।।
श्रोता सावध ज्ञानगुणी । सिद्धान्त शास्त्रार्थ पाहोनी ।
महाराष्ट्र भाषा आना ध्यानी । स्वर्गभुवनी सुखवस्ती ।।५।।
श्लोक.– जिनपादद्वयं नत्वा सर्वसौख्यप्रदायकं ।
भावानुराग रक्तस्य प्रवक्षेहं कथानक ।।६।।
जिनेद्र पद वदा त्वर । सर्व सौख्यासी तो देनार ।
भाव अनुराग सुदर । कथा मनोहर भाविका ।।७।।

अवती देश तो विख्यात । उज्जनी नगरी असे त्यात ।
धर्मपाळ राजा धर्मवंत । धर्मस्त्री रूपवंत गुणी ।।८।।
सागरदत्त तेथे असे । सुभद्रा स्त्री रोहिणी भासे ।
नागदत्त पुत्र तयास । जिनपदी भासे भ्रमर पैं ।।९।।
तथा समुद्रदत्त गुणी । शीलवत स्त्रिया रूपिणी ।
तया उभयता पासोनी । कन्या सगुणी प्रियंगा ते ।।१०।।
तेव्हा त्या श्रीनागदत्तान । प्रियगा परणीली विधीन ।
कुळधर्मपूजादि दान । पंचदिन तेतृस संघ ।।११।।
तथा ते दोघ सर्व सुखी । कोन्ही पापी विषयदुखी ।
प्रियंगा भोग इच्छा शेखी । कपटी मुखी वैर धरी ।।१२।।
एकदा येवोन गृहासी । संधी पाहे मित्रत्व त्यासी ।
नागदत्त व्रत उपौसी । कायोत्सर्गेसी अचळ तो ।।१३।।
धर्मानुराग तो सयुक्त । श्रीमत् जैनालय तिष्ठत ।
ते पाहोनी कुबुधी धृत । तत् पदी ठेवीत रत्नहार ।।१४।।
चोर चोर करी पुत्कार । पापी इच्छा भोग आतर ।
तराळे पाहोनी सत्वर । रायासी खबर सागुतसे ।।१५।।
क्रोधे राजा तराळा बोले । त्यासी मारा एक वेळे ।
दुष्टानी स्मशानासी नेले । खड्ग उपसिले सीर छेदु ।।१६।।
घाव घातला मूर्घ्नीवरी । तत् पुण्याचा उद्योत भारी ।
गळा शोभे रत्नसरी । प्रकाशभारी रत्नहार ।।१७।।
इद्रासन कपित जाले । विमानी बैसोनिया आले ।
नागदत्तासी बैसविले । सिंहासन केले पुष्पवृष्टी ।।१८।।
स्तुती करिती इद्रदेव । वाद्ये वाजताती अपूर्व ।
साधु साधु म्हणती सर्व । राव अपूर्व पाहे दृष्टीन ।।१९।।

अहो धर्म अनुरागेन । धर्म निश्चय जयाचे मन ।
देव साह्यकारी होउन । करिती पूजन भूलोकी ॥२०॥

तद् दर्शन जाल रायासी । इंद्र पूजिती नागदत्तासी ।
धर्मपाळ महिनाथासी । जाल मानसी त्या वैराग्य ॥२१॥

सर्वही नगरीचे लोक । अचंबा करिती धार्मिक ।
नागदत्त ते राज्यादिक । दीक्षा अनेक गुरूपासी ॥२२॥

कितेक भव्य समुदाय । मिथ्यात टाकोनिया स्वय ।
धर्मानुरागी त्या निश्चय । स्मरति हृदय अरिहंत ॥२३॥

श्लोकः– नास्ति अर्हत्परोदेवो धर्मोनास्ति दयापर' ।
तपनास्ति च निर्ग्रंथ यत्ते सम्यक्त्वलक्षणं ॥२४॥

देव जानावा अरिहत । अठरा दोषाचे रहित ।
धर्म तोचि दया पाळित । सम्यक्त्ववत भव्यजीव ॥२५॥

ऐसी हे भावानुराग कथा । प्रेमानुराग ऐका श्रोता ।
पाहावया मोक्षाचे पंथा । श्रोता आनि वक्ता सावध ॥२६॥

श्लोक.– सकलभुवनभव्यैः सेवित श्रीजिनेद्र ।
तदुदितवरधर्मो निर्मल शर्महेतु' ॥
विशदतरसुखश्रीः प्राप्यते यत् प्रसादात् ।
स भवतु मम शान्त्यै कर्मणां शातिकर्ता ॥२७॥

॥ इति कथाकोशे भावानुराग रक्तारव्यान संपूर्ण छ ॥

श्लोक.–सर्वदेवेद्रनागेद्रसमर्चितपदागज ।
नत्वा जिनं प्रवक्षेह वृत्तं मज्जानुरागज ॥२८॥

देवेद्र नागेद्र क्षितीद्र । त्रैलोक्याचे एकशे इद्र ।
पूजिताती भावे जिनेद्र । त्यासी नमस्कार साष्टागी ॥२९॥

राजपुत्र तो तत्क्षणी । जाउनी ठाके रणांगणी ।
रिपु काळमेघ जिंतुनी । आला घेवोनी पितृपासी ।।५४।।
करभार घेवोनी सोडला । लकुचो विषयाध जाला ।
परस्त्रीची इच्छा मनाला । पुसे बापाला द्याहो आज्ञा ।।५५।।
पुत्र कुबुधी दुराचारी । बलाढ्ये म्हणे न भय धरी ।
चित्ता येईल ते तू करी । पापभारी परस्त्रियचे ।।५६।।
गावात हिंडे घरोघर । शीलभग करी तो फार ।
पापी चाडाळ राजपुत्र । स्त्रिया बाहेर न निघती ।।५७।।
तेथे पुगल एक जैन । नागधर्मा त्याची कामीन ।
तयासी आसक्त दुर्जन । ते भ्रताराने पाहिले ।।५८।।
तदा पुगलोपि श्रावक । क्रोधाग्नी हृदयी धडक ।
राजपुत्राचा हृदि दाहक । काही विवेक विचारितु ।।५९।।
शीलवंती ते कामीनास्त्री । गृहीगुप्त त्या दिनरात्री ।
तदा तो राजपुत्र मंत्री । वनक्रीडाधाली सैन्यासी ।।६०।।
पूर्व पुण्य होत पदरी । गुरू भेटले वनातरी ।
निश्चयाने नमोस्तु करी । धर्म सागारी अनगार ।।६१।।
गुरू उपदेश ऐकोन । पापासी भ्याला तो जैन ।]
अतरी वैराग्य उत्पन्न । दीक्षाग्रहण दिगबरी ।।६२।।
तेरा प्रकाराच चारित्र । सोळाकारण व्रत पवित्र ।
उज्जनी नगरीचे धात्र । जन्मभूमी मात्र पहावी ।।६३।।
महाकाळ वना आतौता । कार्योत्सर्गी क्षितिवरौता ।
पुगले ऐकोनिया वार्ता । वैर चित्ता उद्भवला त्या ।।६४।।
रात्रौ जावोनिया वनात । लोहे खिळे खिळले त्यात ।
मुनी उभे हृदयी शांत । परीषह साहत वावीस ।।६५।।

धर्मानुराग धरी चित्ती । उपसर्ग साहे शास्त्रयुक्ती ।
सोळा भावना भावि मती । आयुष्याती त्या परलोक ॥६६॥
अहो पडित आना मना । भव विचित्र जीव नाना ।
त्रिभुवनी उत्तम जाना । सोळा भावना तीर्थजन्म ॥६७॥
श्लोक –स जयतु मुनिनाथो भूरिकष्ट सुजित्वा ।
सपदि लकुचनामा प्राप्तवान् शर्मसारं ।
गुणगणमणिरुद्रो वोधिसिंधुः प्रसादो ।
जिनपतिहिमरश्मिः प्रोल्लसत्–रश्मीयोगात् ॥६८॥
ऐशा कथा शतत्रिदश (११३) । पुढे चित्त द्यावे कथेस ।
दर्शनच्यवन आख्यानास । हृदय मादुस ठेवावे ॥६९॥
पाटलीपुर नगर विख्यात । तेथे तो श्रेष्ठी जिनदत्त ।
सदाचारी सद्गुरूभक्त । दर्शनयुक्त परमेष्ठिचे ॥७०॥
जिनदासी तयाची भार्या । जिनदासपुत्र गुणवर्या ।
व्रतधारी त्रिपनक्रिया । भक्ती आचार्या तत्पर ॥७१॥
एकदा जिनदास गुणी । सुवर्णद्वीपा चालला वाणी ।
धनमेळवाया लागुनी । समुद्रजीवनी जहाजात ॥७२॥
पूर्ववैरी व्यतर कुदेव । काळाख्य असे त्याचे नाव ।
ते पाहोनी समुद्री नाव । जिनदासासव चालतु ॥७३॥
व्यतर म्हणे जिनदासासी । देव कोण साग आम्हासी ।
जिनमत नाही या भूमीसी । मृत्य पावसी न सागता ॥७४॥
त्यान ते ऐकोनिया सर्व । रे रे पापी कुज्ञान गर्व ।
आमचा जिन देवाधिदेव । रुखबदेव वर्धमान ॥७५॥
त्या देवासी नमस्कार । केवळज्ञानाचा तो भास्कर ।
तत् वचनोक्त मतांतर । त्रिभुवनी थोर वर्तती ॥७६॥

उज्जनी नगरी विख्यात । राजा राणी ते पुण्यवंत ।
तेथ वसुमित्र जिनदत्त । जिनेंद्रभक्त धर्ममार्गी ।।३०।।
दानपूजा व्रत उपास । मज्जानुराग रत आस ।
चार दान मुनीरायास । मन हर्ष गुरूची भक्ती ।।३१।।
एकदा उत्तरदिशेसी । द्रव्यार्थी चालले उद्यमासी ।
किराना भरोन मार्गासी । ते दूर देशासी चालले ।।३२।।
महा निबिड अरण्यात । तस्करे लुटले समस्त ।
ते हिंडती वनातौत । पश्चात्तापात फार करिती ।।३३।।
धिक् धिक् हा ससार । ऐसे हिंडता वनातर ।
तेथे भेटले मुनीश्वर । आनद थोर श्रावकासी ।।३४।।
नमोस्तु करोनी तयासी । द्विविधा धर्म उपदेशी ।
मनानुरागरतहर्सी । विनय स्वामिसी दीक्षा द्यावी ।।३५।।
गुरूराजानी कृपा केली । भवतारक दीक्षा दिली ।
क्रिया सर्वही सिकविली । सरस्वती जाली प्रसन्न ।।३६।।
तेव्हा तेथे एक ब्राह्मण । ससारासी जाला उद्विग्न ।
भ्रमत भ्रमता अरण्य । देखिले नयन मुनीराय ।।३७।।
नमन करोनी तयासी । पृच्छा केली मुनीरायासी ।
विपत्ती आनि सपत्तीसी । कारण आम्हासी सांगावे ।।३८।।
मुनी सागे दयाधर्म । त्रिपनक्रियादि षट्कर्म ।
सागार-अनागारादि वर्म । तत्त्वार्थ-सुगम-सिद्धान्त ।।३९।।
सुदेव-सुगुरू-सुशास्त्र । येन सपत्ति सुपवित्र ।
विपत्ती होय पाप-सूत्र । जीव पवित्र भ्रमतसे ।।४०।।
कुदेव-कुगुरू-कुशास्त्र । कुसील-कुक्रिया-कुमत्र ।
हेही टाळावे अपवित्र । कुगति-यंत्र भोगविती ।।४१।।

जीव अनादि असे सिद्ध । सुख दुख न जाने भेद ।
पाप पुण्य कर्म विविध । प्रपच अगाध जीव भ्रमे ॥४२॥
जरी जीव पुण्यकर्त्तार । तरी तो मुक्तीचा भ्रतार ।
ब्राह्मण ऐकिल समग्र । वैराग्ये त्वरे मागे दीक्षा ॥४३॥
दीक्षा घेवोनी घोर तप । तोडिला कर्माचा सताप ।
मति श्रुती अवधी व्याप । जपजाप्ये अचळ ध्यानी ॥४४॥
जिती उपसर्ग कठीण । बावीस परीषह साहून ।
आयुष्याती स्वर्गी जाऊन । जाला उत्पन्न महर्द्धिक ॥४५॥
तो जीव श्रेणिका उदरी । अभयकुमर पुण्यपरी ।
मोक्षगामी एकावतारी । मोक्षपायरी लाधेल तो ॥४६॥
जिनदत्त तो वसुमित्र । तप करोनी घोरादर ।
आयुष्याती स्वर्गमदिर । महर्द्धिकेंद्र सौधर्मी ते ॥४७॥
मनानुरागरतकथा । भावानुरागकथा श्रोता ।
पुढे पहावे ग्रथप्रपचा । मोक्षाचे माथा जावयासी ॥४८॥
श्लोक –विशुद्धकेवळज्ञानं लोकालोकप्रकाशकं ।
नमस्कृत्य जिन वच्मि कथा धर्मानुरागजा ॥४९॥
केवळ वाक्य शुद्धज्ञान । ज्ञानेच होय मुक्तिस्थान ।
त्याहासी करोन नमन । धर्मानुरागेन सागु कथा ॥५०॥
अवती देश तो विख्यात । महापुरी उज्जनी त्यात ।
राजा धनवर्मा पुनीत । धनस्त्री रत राजभार्या ॥५१॥
तयासी कुमर उत्पन्न । लकुचो नाम बलवान ।
शत्रुजना धाक दाउन । मानाभिमान रणागणी ॥५२॥
एकदा काळमेघ राजा । म्लेच्छ उन्मत्त बोले पैजा ।
करभार घेईन मी वोजा । पीडितो प्रजा दुष्टबुद्धी ॥५३॥

राजपुत्र तो तत्क्षणी । जाउनी ठाके रणागणी ।
रिपु काळमेघ जिंतुनी । आला घेवोनी पितृपासी ।।५४।।
करभार घेवोनी सोडला । लकुचो विषयाध जाला ।
परस्त्रीची इच्छा मनाला । पुसे बापाला द्याहो आज्ञा ।।५५।।
पुत्र कुबुधी दुराचारी । बलाढये म्हणे न भय धरी ।
चित्ता येईल ते तू करी । पापभारी परस्त्रियचे ।।५६।।
गावात हिंडे घरोघर । शीलभग करी तो फार ।
पापी चाडाळ राजपुत्र । स्त्रिया बाहेर न निघती ।।५७।।
तेथे पुगल एक जैन । नागधर्मा त्याची कामीन ।
तयासी आसक्त दुर्जन । ते भ्रतारान पाहिले ।।५८।।
तदा पुगलोपि श्रावक । क्रोधाग्नी हृदयी धडक ।
राजपुत्राचा हृदि दाहक । काही विवेक विचारितु ।।५९।।
शीलवती ते कामीनास्त्री । गृहीगुप्त त्या दिनरात्री ।
तदा तो राजपुत्र मत्री । वनक्रीडाधात्री सैन्यासी ।।६०।।
पूर्व पुण्य होत पदरी । गुरू भेटले वनातरी ।
निश्चयान नमोस्तु करी । धर्म सागारी अनगार ।।६१।।
गुरू उपदेश ऐकोन । पापासी भ्याला तो जैन ।]
अतरी वैराग्य उत्पन्न । दीक्षाग्रहण दिगबरी ।।६२।।
तेरा प्रकाराच चारित्र । सोळाकारण व्रत पवित्र ।
उज्जनी नगरीचे धात्र । जन्मभूमी मात्र पहावी ।।६३।।
महाकाळ वना आतौता । कार्योत्सर्गी क्षितिवरौता ।
पुगले ऐकोनिया वार्ता । वैर चित्ता उद्भवला त्या ।।६४।।
रात्री जावोनिया वनात । लोहे खिळे खिळले त्यात ।
मुनी उभे हृदयी शात । परीषह साहत बावीस ।।६५।।

धर्मानुराग धरी चित्ती । उपसर्ग साहे शास्त्रयुक्ती ।
सोळा भावना भावि मती । आयुष्याती त्या परलोक ॥६६॥
अहो पंडित आना मना । भव विचित्र जीव नाना ।
त्रिभुवनी उत्तम जाना । सोळा भावना तीर्थजन्म ॥६७॥
श्लोक –स जयतु मुनिनाथो भूरिकष्टं सुजित्वा ।
सपदि लकुचनामा प्राप्तवान् शर्मसारं ।
गुणगणमणिरुद्रो वोधिसिंधुः प्रसादो ।
जिनपतिहिमरश्मिः प्रोल्लसत्–रश्मीयोगात् ॥६८॥
ऐशा कथा शतत्रिदश (११३) । पुढे चित्त द्यावे कथेस ।
दर्शनच्यवन आख्यानास । हृदय मादुस ठेवावे ॥६९॥
पाटलीपुर नगर विख्यात । तेथे तो श्रेष्ठी जिनदत्त ।
सदाचारी सद्गुरूभक्त । दर्शनयुक्त परमेष्ठिचे ॥७०॥
जिनदासी तयाची भार्या । जिनदासपुत्र गुणवर्या ।
व्रतधारी त्रिपनक्रिया । भक्ती आचार्या तत्पर ॥७१॥
एकदा जिनदास गुणी । सुवर्णद्वीपा चालला वाणी ।
धनमेळवाया लागुनी । समुद्रजीवनी जहाजात ॥७२॥
पूर्ववैरी व्यंतर कुदेव । काळाख्य असे त्याचे नाव ।
ते पाहोनी समुद्री नाव । जिनदासासव चालतु ॥७३॥
व्यतर म्हणे जिनदासासी । देव कोण साग आम्हासी ।
जिनमत नाही या भूमीसी । मृत्य पावसी न सांगता ॥७४॥
त्यान ते ऐकोनिया सर्व । रे रे पापी कुज्ञान गर्व ।
आमचा जिन देवाधिदेव । रुखबदेव वर्धमान ॥७५॥
त्या देवासी नमस्कार । केवळज्ञानाचा तो भास्कर ।
तत् वचनोक्त मतातर । त्रिभुवनी थोर वर्तती ॥७६॥

तेव्हा श्री जिनदासश्रावक । ब्रह्मदत्त आनि जैन लोक ।
पच नौकार कथानक । यक्षनायक मारू पाहे ।।७७।।

तदा उत्तर कुरू यक्षेन । तत् आसन कपायमान ।
अनावृत्त यक्ष येऊन । गुप्त होऊन बैसला तो ।।७८।।

तो पापी क्रोधयुक्त मनी । मारू पाहे तो शस्त्रपाणी ।
क्रोधे जिनयक्ष तत्क्षणी । चक्रेण मूर्ध्नि उडविली ।।७९।।

तो काळदेव महापापी । वैर साधीन म्हणे कोपी ।
पूर्वपुण्यान विघ्नसोपी । वडवानळापि टाकिला तो ।।८०।।

लक्षुमी दिव्य देवागण । धार्मिका बैसवी शासना ।
पूजा करिती विधी नाना । सर्वेही जना आनद पै ।।८१।।

सम्यग्दर्शन ते सार । पाळिती शहाणे चतुर ।
ते पूजनीक क्षितिवर । निरतर दृढ सम्यक्त्वी ।।८२।।

तेव्हा तो जिनदास गुणी । येता झाला आपुले स्थानी ।
न्हवनपूजा जिनसद्मनि । षड्रस भोजनी सर्व तृप्त ।।८३।।

पुण्यवानाचे मदिरासी । स्वामी आले भावरीसी ।
प्राप्त नवविध पुण्यासी । मग मुनीसी प्रश्न केला ।।८४।।

गुरू अवधिज्ञान नेत्रे । सर्व सागे ते वैरसूत्र ।
पूर्वभवीचा वादी तो मित्र । ज्ञानेन मात्र कर्मबध ।।८५।।

ऐसे जानोनी भव्यजन । शुद्धत्रय करा दर्शन ।
जेन प्राप्त मोक्षसदन । सुखसपन्न मोक्षवासी ।।८६।।

श्लोक:-त्रिभुवनैकहित शिवकारण शुचितर प्रभजतु सुदर्शनं ।
परमसौख्यकृते सुबुधोत्तमाः । किमिहचान्यमहाश्रमकारणैः ।।८७।।

।। इति दर्शन कथा ११४।।

श्लोक–नमस्कृत्य जिनं देवं–देव देवेद्रवंदितं ।।
सम्यक्त्वामुक्तकाख्यानं द्वितीय रचयाम्यहं ।।८८।।
श्रीजिनेद्रदेवागमन । सरस्वती मुखी उत्पन्न ।
जे सम्यक्त्वमुक्त आख्यान । करावे श्रवण मोक्षार्थी ।।८९।।
लाट देश सुविख्यात ते । गलगोद्रहपटनात ।
श्रावक तो श्रीजिनदत्त । कामिनी त्यात जिनदत्ता ।।९०।।
तयासी कन्या जिनमती । रूपसौभाग्य गुणवंती ।
पूर्वपुण्य शीलसंपत्ती । देव पूजिती अरिहंत ।।९१।।
तेथे दुसरा असे जैन । नागदत्त त्या अभिधान ।
नागदत्ता त्याची कामीन । पुत्र उत्पन्न रुद्र तो ।।९२।।
जिनदत्ता तो नागदत्त । कन्या द्यावी मम पुत्रात ।
तत्पुत्र मिथ्यामतिरत । नउ त्यात गुणशालिनी ।।९३।।
तथा तो नागदत्त कुधी । रुद्रदत्त प्रपंचबुधी ।
गुप्ताचार्य मुनी समाधी । सुविद्या साधी कामातुर ।।९४।।
सत्यार्थी होउनिया धूर्त । कन्या परनिली विधीयुक्त ।
पुन चालती बौधमत । वज्रमिथ्यात ऐशापरी ।।९५।।
रूद्रदत्त म्हणे सुदरी । मम धर्म तू अगिकारी ।
सार धर्म गे माहेश्वरी । कर्णद्वारी मत्र सागतो ।।९६।।
जिनमती म्हणे देहधनी । धर्म विख्यात त्रिभुवनी ।
जिनकीर्त्त महापुराणी । त्यात टाकुनी मिथ्या नेघे ।।९७।।
तुम्ही टाकोन मिथ्यामत । जैनधर्म आत्महित ।
घेवोनी करा सार्थकात । मोक्षपथ स्वधर्मे होय ।।९८।।
ऐसा प्रतिवाद करिती । स्वस्वधर्म आचरताती ।
सुधबुधी ते जिनमती । देवगुरूभक्ती त्रिशुद्ध ।।९९।।

एके दिवसी विपरीत । काय वर्तल त्या ग्रामात ।
भिल्ल चेतविले अग्नीत । कोल्हाळ बहुत जाहला ॥१००॥

तदा ते जिनमती सती । बोले भ्रतारा यावो आर्ती ।
तुमचे देव ते सत्यार्थी । अग्निशाति बोलवा तुम्ही ॥१०१॥

तेव्हा तो ज्ञान अभिमान । सर्व जना साक्षी करोन ।
कुळदेवता आराधून । प्रार्थना मौन करीतसे ॥१०२॥

ब्रह्मा विष्णु महेश्वरा । अर्घ्य देतसे ऋषेश्वरा ।
शाति नोव्हेच वैश्वानरा । ग्राम तो सारा भक्षु पाहे ॥१०३॥

पाहोनी जिनमती सती । धर्मवत्सला एकाग्रचित्ती ।
पचनमोकार मत्रोक्ती । अर्घ्य अर्चिती अष्टविध ॥१०४॥

न्हवन स्तवन गधोदक । जप जाप्य जिननानक ।
आरती विसर्जन सर्वलोक । गधोदक वदिती सर्व ॥१०५॥

तेव्हा ते जिनमती बाळा । अग्नीस अर्घ्य एक दिला ।
गंधोदक शिंपिती त्याला । शात जाला वैश्वानर ॥१०६॥

धर्म अतिशय देखोनी । जयजय शब्द वदति वाणी ।
रुद्रदत्त आदि करोनी । सत्य सत्य जिनवाणी सत्य ते ॥१०७॥

रुद्रदत्त पुत्रासहित । टाकोनिया मिथ्यामतात ।
अगिकारोनी जिनमत । सत्य सम्यक्त्व जैनधर्म ॥१०८॥

अहो हो हा श्रीजिनधर्म । भुवनत्रयी असे उत्तम ।
असती त्या मोक्षधाम । सौख्य उत्तम अनतानत ॥१०९॥

यथा जिनमती श्रावकीण । तथास्तु सम्यक्त्वरक्षण ।
ज्ञाते पडित भव्यजन । आत्मसाधन भूमडळी ॥११०॥

श्लोक–श्रीमत् जैनपदांबुजेषु नितरा भृंगा पवित्राशया ।
सदृष्टिर्जिनशब्दपूर्वकमतिः शर्मप्रदा सा सती ।
नानावस्त्रसुवर्णरत्ननिकरैः देवादिभिः पूजिता ।
सदृष्टिर्जिनभक्तिनिश्चलमति कैकैर्न संपूज्यते ॥१११॥

॥ इति दर्शन कथा ११५ ॥

श्लोक–श्री जिनं त्रिजगद्देवं, नमस्कृत्य सुरार्चितं ।
त ब्रुवे सम्यक्त्वमाहात्म्य चेलनाश्रेणिकाश्रितं ॥११२॥

श्रीजिन त्रिजगाचा देव । त्रिकाळवंदू देवाधिदेव ।
कथा सागु सम्यक्त्ववैभव । श्रेणिकराव चेलनाते ॥११३॥

मगध देश तो विख्यात । राजगृह नगर त्यात ।
राजा उपश्रेणिक तेथ । राणी गुणवत सुप्रभा ॥११४॥

तत् पुत्र श्रेणिक सद्‌गुणी । पचशतात शिरोमणी ।
धीर वीर गंभीर जनी । भोक्ता अग्रणी दाता च ॥११५॥

एकदा पूर्व कृत वैर । नागधर्म तो राजेश्वर ।
श्रेणिका पाठवी नजर । अश्वकरभार पोश्याशी ॥११६॥

तेजी तुरंग व्योमगति । त्याची न कळे कोन्हा युक्ती ।
देता येईल तो मागुती । केली युक्ती त्या वैरभावे ॥११७॥

उपश्रेणिक एके दिनि । अश्वारूढ फेरी मेदनी ।
वाग वोढिता चाले गगनी । निबिड वनी पडला तो ॥११८॥

त्या वनी असे वनपति । यमदड यमाकृती ।
विद्युन्मती स्त्री रूपवती । पुत्री गुणवंती तिलका ॥११९॥

उपश्रेणिक पाहे तियसी । मदनव्याकुळ मानसी ।
भिल्लमामा हे द्या मजशी । शुभलग्नासी करा मामा ॥१२०॥

राज्यपद श्रेणिकासी । निश्चय होईल तयासी ।
पाहोनी उपश्रेणिकासी । चिंता मानसी अनिवार ॥१३३॥
पुण्यानुसार नरदेह । बुद्धी कर्मानुसार होय ।
अग्नि शात जाल्यावर । सेवका स्वय पाचारूनी ॥१३४॥
जानोन राय चित्तात । मम शब्द नव्हे सत्यार्थ ।
प्रपच धरोनी मनात । दोष तयात कर्कुराचा ॥१३५॥
स्वानादेखत जेविला । तोचि अंतराय तयाला ।
हा तो न लगेचि आम्हाला । बाहेर घातला प्रधान ॥१३६॥
दोषरहित तो श्रेणिक । वनवासी एकला एक ।
भ्रमता बुधीचा विवेक । ग्राम एक पाहिला त्यान ॥१३७॥
गभस्ती आला दोन प्रहर । क्षुधाग्नि उत्पन्न उदर ।
नंदीग्राम तेथे ते विप्र । नंदीचे तीर विद्याघोष ॥१३८॥
ते ब्राह्मण विद्यागर्विष्ट । मनुष्यावर न दे दृष्ट ।
अंगी मदगज तो श्रेष्ठ । सर्वश्रेष्ठ ब्राह्मण आम्ही ॥१३९॥
क्रोधे पुढे चालला जेठी । सन्याशाच्या बैसला मठी ।
विष्णुशाळा पाहोनी दृष्टी । भोजन संतुष्टी तृप्त जाला ॥१४०॥
तत् तयाच ज्ञान ऐकोन । विष्णुधर्म घेतला त्यान ।
पुढती दक्षिणा देईन । चालला त्वरेन पुढती ॥१४१॥
दक्षिण देश कांचीपुर । वसुपाळ राजा धर्मवीर ।
राणी वसुमती सुदर । कन्या सुदर वसुमत्या ॥१४२॥
सोमश्रमा ब्राह्मण मत्री । तत्प्रिया ब्राह्मणी सोमश्री ।
अभयमती तयाची पुत्री । कमळनेत्री विचक्षणा ॥१४३॥
तदा सोमश्रमा ब्राह्मण । तीर्थयात्रा गंगास्थान ।
परतोनी येता मार्गान । देखिला नयन श्रेणिक ॥१४४॥

रूप अनुपम पाहिला । पूर्वपुण्य योग जाला ।
बोलता चातुर्ये चागला । सतोषला निजमानसी ॥१४५॥
तेव्हा श्रेणिक बोले त्यात । मामा जिह्वेचा करा रथ ।
मज बैसवोनि तयात । चालता पथ सिनहारे ॥१४६॥
तो म्हणे स्वरूपे चांगला । वेडा दिसतो अतराला ।
पुढे जाता वृक्ष देखिला । छाया बैसला छत्रीधारी ॥१४७॥
तेथोनि चालता पुढती । पुसे ग्राम वस की वस्ती ।
भोजन करावया यथास्थिति । ग्राम पुढती असे की नसे ॥१४८॥
नदीत जल पसरून । मोचे चढविले तयान ।
पथि चाले हस्ती धरून । तो ग्राम नयन देखिला ॥१४९॥
तेथ देखली एक नारी । भ्रतारासी ते ताडन करी ।
बघा की मुक्त हे सुदरी । ऐकता अंतरी सत्यवेडा ॥१५०॥
तेव्हा मृत प्रेत देखिले । हे आता मेल की वाचले ।
पुढे शेत एक देखिले । रक्षण बैसले कुणबी ॥१५१॥
मामा हे भक्षिल कि भक्षिती । ऐकोन कंटाळलो चित्ती ।
रूपवान राजस काती । गहिला चित्ती भासतसे ॥१५२॥
असो ते आले काचीपुरा । श्रेणिक राहे नदीतीरा ।
ब्राम्हण आला तो मदिरा । कमळनेत्रा पाहे कन्या ॥१५३॥
पिता पाहला हर्षे बुधी । मनी म्हणे मत् कार्यसिद्धी ।
वैसउनि यथाविधि । वाप्पा फारही श्रम जाले ॥१५४॥
पिता म्हणे गे वुधीवते । बटु देखिला रूपवत ।
परि तो गहिला भासत । मार्गी जलपत भलतैसा ॥१५५॥
त्याचे ऐका वेडेचार । ऐकोनिया प्रश्न समग्र ।
तो म्या ठेविला वाहेर । नदीचे तीर तिष्ठतसे ॥१५६॥

प्रथम त्याची भेट जाली । मामा वदे हे काय वोली ।
जिव्हेचा रथी बैसोनी चाली । छाये धरिली छत्री त्याने ॥१५७॥
इत्यादिक ते दहा प्रश्न । कन्ये सांग तू ज्ञान नयन ।
वापास त्याचि विधा त्यान । मामाभिधान तुम्हासी दिले ॥१५८॥
जिन नाम कथा श्रवण । तोचि रथ पथि जानन ।
छत्री धरली वृक्षातळी । मळमूत्र वाघोळी उफराटचा ॥१५९॥
ग्राम वस की आहे वस्ती । ज्या ग्रामी देव गुरू असती ।
पूजा दान शास्त्राची युक्ती । भोजन तृप्ती त्या ग्रामात ॥१६०॥
नदीत मोचे चढउन । पदि पद्म ते राजचिन्ह ।
मार्गी चाले हाति धरोन । जीवदयेने श्रावकमार्ग ॥१६१॥
पुढे ग्रामात एक नारी । बंधकी मोकळी विचारी ।
पतिव्रता ते दुराचारी । प्रेत नजरी पाहे पुढे ॥१६२॥
हे मेले किंवा हो जिवत । अपकीर्ती सुकीर्ति जयवंत ।
पुढे पाहता एक शेत । भक्षिल-त्यात ऋण घेता ॥१६३॥
प्रश्न होताचि संपूर्ण । व्याकुळ झाली मदनान ।
मग आपन सावरून । बाबा नयन तो दाखवी ॥१६४॥
नदीतीरासी वदे पिता । दासी पाठविली त्वरिता ।
मोगरेलनखा अतौत । चातुर तो निपुणमति ॥१६५॥
पाहोनी स्वरूपाचा हेळी । मदन व्याकुळ ते जाली ।
कर्णाची खून दाखविली । सागिसली वार्ता सर्वही ॥१६६॥
वाई तुमचे पूर्वपुण्य । रूपगुणे तो धन्य धन्य ।
ऐकताची मदनबाण । उचवळून धीर धरी ॥१६७॥
तत् परीक्षा पाहावयासी । कर्दम करवी मार्गासी ।
अल्प नीर क्षालनासी । गुप्तरूपेसी झरूक्यात ॥१६८॥

थोडे जळ करि क्षालन । उरल प्यावे अवघे जन ।
धर्मवंत महाजैन । दया पालन करावे ।।१६९।।
मोती वाकडे असे छिद्र । सूत्र शर्करा केवी भद्र ।
अभयमती मुखचंद्र । पाहोनी नरेद्र वरिला ।।१७०।।
विधियुक्त विवाह् जाला । पूर्वपुण्य सूर्य उदेला ।
पुण्यवान सुखे जाहला । भोगू लागला सर्व सुख ।।१७१।।
अथ कवने एके दिसी । सोमश्रमा परिवारेसी ।
वनक्रीडा करिता त्यासी । जिनदत्त ऋपी देखिले ।।१७२।।
नमोस्तु केला अवघेजन । धर्म ऐकिला तो सपूर्ण ।
सर्व सुखाचे कारण । वैराग्य उत्पन्न द्विजासी ।।१७३।।
गुरू अग्रे दीक्षा अगीकार । आतापयोग तप तीव्र ।
आयुष्यांती स्वर्गमदिर । सौधर्म सुर धर्मयोग ।।१७४।।
तस्मात् अगत्य पुण्येन । श्रेणिकासी सुखसंपन्न ।
अभयमती स्त्रियारत्न । पुत्ररत्न अभयकुमार ।।१७५।।
महासुभट चर्म अगी । ज्ञानी आनि धर्मानुरागी ।
भावि मोक्षस्त्री पद लागी । तत् पुण्यालागी कोन वर्णी ।।१७६।।
तत् राजा काचीपुरात । वसुपाळ तो गुणवत ।
जिनमदिरी दर्शनार्थ । पाहिले तेथे जीर्णालय ।।१७७।।
सोमशर्मा ब्राह्मणास । कार्य सागितले त्यास ।
जीर्णोद्धार करावयास । न्यावे द्रव्यास त्वरा करा ।।१७८।।
तत् द्विजपुत्र तो अज्ञान । न कळे तया कृतकारण ।
श्रेणिक बुद्धिचा प्रवीण । केला जीर्णोद्धार अनुपम ।।१७९।।
पच कल्याणाची पूजा । वाद्ये वाजती ऐके राजा ।
देखिली सिहचिन्हे ध्वजा । चालला राजा दर्शनासी ।।१८०।।

अनुपम जिनमंदिर । पाहोनी संतोष अतर ।
म्हणे हे कृत्य करणार । दाखवा नजर माझिया ।।१८१।।
श्रेणिक येवोनी त्वरित । म्हणे कर्ता श्री अरिहंत ।
पाहिला ज्ञानी रूपवंत । सुमित्राकन्येत द्यावे यासी ।।१८२।।
विधियुक्त सुलग्न केले । पूर्वपुण्य सुख भोगिले ।
राजगृही काय जाहले । ते श्रवण केले पाहिजे ।।१८३।।
उपश्रेणिक गुरू अग्र । धर्म द्विधा ऐके समग्र ।
वैराग्य उत्पन्न अनुग्र । घेऊन उग्र तप करू ।।१८४।।
राज्यपट् चिलाईतासी । दीक्षा घेतली गुरूपासी ।
करिती आत्मसार्थकासी । न शोभे राज्यासी चिलाईत ।।१८५।।
प्रधाने श्रेणिकासी पत्र । धाडिले वेगे दूत सूत्र ।
वाचिता करे नीर नेत्र । हृदयमत्र स्त्रीसी सागे ।।१८६।।
अहो तुम्ही सगुण स्त्रिया । राजगृह पांडुकुटिया ।
आम्हा त्वरा असे जावया । त्या निर्दयासी निर्घाटीन ।।१८७।।
राज्यभार त्वरा घेवोनी । राजगृह सन्निधाग्रणी ।
चिलाईत गेला पळोनी । प्रधान येवोनी भेटले ।।१८८।।
राज्ये स्थापिला श्रेणिकराव । चैत्यालयासी महोत्सव ।
राजनीति महावैभव । पुण्यप्रभाव मानवासी ।।१८९।।
येरीकडे अभयकुमार । मातेस पुसे समाचार ।
पिता आमचा सागा त्वरे । त्याविना क्षणभर न गमे ।।१९०।।
सुमित्रा ते अभयमती । पुत्रा ऐकावे भो सन्मती ।
पाडूकुटी राजगृहाती । राज्य करिती तव जनिता ।।१९१।।
ते ऐकोनिया उतावळे । जावे म्हणे तो सकुमाळ ।
सर्वा पुसे क्षेमकुल । निघे तत्काळ कुटुबेसी ।।१९२।।

नदिग्रामासी जाल येण । तव तेथे पूर्वी श्रेणिकान ।
ब्राम्हण गर्विष्ठ दडीन । अन्याय पाहून तयाचा ।।१९३।।
एक पत्र पाठविल त्यासी । मिष्ट भृगार विहिरीसी ।
न पाठविता तुम्हासी । दडीन अवघ्यासी जानावे ।।१९४।।
पत्र वाचिताची ब्राम्हण । भयभीत ते अवघे जन ।
विचार करिता बैसोन । नानावचन बोलताती ।।१९५।।
त्या न समजता विचार । तेथे तो अभयकुमर ।
पृच्छा करीतसे चतुर । बुधीप्रकर सागे तया ।।१९६।।
तयाचे ऐकोनी वचन । आनदले अवघे जन ।
चतुर पाठवा ब्राम्हण । रायाकारण विनती करा ।।१९७।।
तो जाउनिया सभेप्रती । श्रेणिकरायासी विनती ।
कूप रुसला न ये म्हणति । ते मागती स्त्री प्रभुराया ।।१९८।।
पुरूपान स्त्री पाहोनिया । विषयलुब्ध येति ठाया ।
विहीर द्यावी करा दया । प्रेमच्छाया गरीबावरी ।।१९९।।
मौन राहिला राजेश्वर । कोणी ब्राम्हण आहे चतुर ।
मग पाहे तो दुजा विचार । गज तोलुनी द्यावा त्वरे ।।२००।।
ते पाहोनिया द्विजराये । कुमरा म्हणे करा साह्ये ।
न सागताची दड होय । द्यावे अभय नामसार ।।२०१।।
कुमर म्हणे आना नाव । त्यात घालावा तो गजराव ।
खुने पाषाणात तो लावे । मोजून द्यावे बरोबर ।।२०२।।
राजा धरी मौन वदना । विचारिता अपुल्या मना ।
विप्र मूर्ख नसे शाहणा । कोन्ही पाहुणा आला असे ।।२०३।।
एक अजा अनिला वरा । नदीगावा धाडिला त्वरा ।
यासी घाला पुष्कळ चारा । बरोबरा तोलून द्या ।।२०४।।

ब्राम्हण पुसे कुवरासी । न कळता सागे मातेसी ।
अभयमती म्हणे पुत्रासी । व्याघ्र लाडग्यासी आनावे ।।२०५।।
एडक्यासन्निध्य बांधावे । खायासी पुष्कळ घालावे ।
जथा तथा तोलुनी द्यावे । श्रेणिकराव संतोषती ।।२०६।।
राय धाडियले कोहळ । घागरीत घाली कोवळ ।
नित्य घालावे याते जवळ । पूर्ण सकळ द्यावे आम्हा ।।२०७।।
न देतीची ग्राम घेईन । ऐस ऐकताची ब्राम्हण ।
कुमरापासी ते येवोन । लोटागण उच्चारिताती ।।२०८।।
कुमर म्हणे ब्राह्मणासी । हे काय सागता आम्हासी ।
पीडा आली रे गावासी । जाउ वेगेसी आम्ही त्वरा ।।२०९।।
ब्राह्मण करिती विनय । आम्हासी तुम्ही टाकू नये ।
हा उगवा आम्हासी स्वय । सागुन द्यावे दयावता ।।२१०।।
तेंव्हा द्रवला अत:करणी । द्विजासी दिधले सागुनी ।
वेला घाला पुष्कळ पानी । धुळी घालोनी कुंभ भरा ।।२११।।
तेंव्हा ते विप्र आनंदले । तैसेचि राया पाठविले ।
जितुके तितुके देखिले । राहिले उगले राजेश्री ।।२१२।।
मग विचारूनिया मनी । आता पाहू तयाची करणी ।
द्वै दूत पाठविले गुणी । कोन ज्ञानी पाहोनी यावे ।।२१३।।
जासूद गेले अतित्वरा । ते हिंडले नगर सारा ।
मग ते आले नदीतीरा । खेळत्या पोरासी पाहिले ।।२१४।।
जबुवृक्षावरी कुमर । जाभुळ भक्षिती सुदर ।
आम्हासी द्यारे आरे पोर । घ्यारे गवार उष्ण कि शीत ।।२१५।।
जाबुळ टाकिता क्षिताक्षितीत । मृत्तिका जाली त्यात लिप्त ।
फुंकून खाता म्हणे त्यात । तोड पोळत मिशा जळती ।।२१६।।

सदा सतोषोनि नृपती । प्रीत्या देवार्चन करिती ।
देवासन्मुख पसरीती । कन्येच्या मूर्ती सात चित्र ।।२४१।।
भावपूजा श्री जिनेद्रनी । सर्वस्व कल्याणदायिनी ।
भक्तिभाव करा नित्यानी । भव्यजनी मनरंजनी ।।२४२।।
एकदा चेटकरायान । सर्व सैन्य सज्ज करोन ।
राजगृही उद्यानवन । योग्यस्थान ते उतरले ।।२४३।।
तेथे जिनपूजाविधान । महामहोत्सव विधीन ।
पट्ट पसरिला तयान । कन्यारत्न ते हेमवर्णी ।।२४४।।
चार कन्या विवाह झाल्या । चेलना जेष्टा चंदनेला ।
श्रावकी वर पाहिजे त्याला । मिथ्या श्रावकाला न देती ।।२४५।।
ते ऐके श्रेणिक राजेद्र । अशक्त जाला हृदयात ।
मदनव्याकुळ भूमीद्र । त्या मुखचद्र उतरला ।।२४६।।
पुत्र बोलाविला अभय । पाहू आता त्वत् चातुर्य ।
या शरीरा स्त्रीरत्न होय । पहावी सोय ज्ञाननिधी ।।२४७।।
मत्री पाठविला त्यापासी । कन्या द्याव्या वो राजियासी ।
सोध पाहता कुधर्मासी । मिथ्यामतीसी देववेना ।।२४८।।
अभयकुमार ऐकोन । चित्ती विचारी करावा यत्न ।
पट् लिहिला अभयान । चित्र सिंहासन श्रेणिकादि ।।२४९।।
वाणिज्ये वृषभ भरोनी । विशालाढ्या नगरी जावोनी ।
नगर उद्यानी राहोनी । मडपस्थानी पट्ट स्थापी ।।२५०।।
पूजा न्हवन जिनेद्रासी । ग्रामलोक आले पाह्यासी ।
दान मान तुर्यसघासी । दिधले ज्ञातिसी भोजन ।।२५१।।
पट्ट पाहोनी सर्वजना । धार्मिक वर्णिती सद्गुणा ।
ऐकोनी चदना चेलना । हर्षल्या मना जेष्ठा देवी ।।२५२।।

श्रेणिक रूपात पाहोनी । चेलना निश्चय करी मनी ।
मम देहाचा हाचि धनी । नमोकार मनी स्मरतसे ।।२५३।।
सुरूंग मार्ग गावातून । तिघी कन्या सवे घेउन ।
चदना जेष्ठा परतून । नेम निमित्या न गेल्या त्या ।।२५४।।
चेलना अभयकुमार । पातले राजगृहनगर ।
विवाह मंगळगजर । सघ चतुर अन्नदाने ।।२५५।।
चेलना पट्टस्त्री सुमती । अभया सुमित्रा ते सती ।
पूर्वीचे पुण्यसुखप्राप्ती । राजनीति प्राणवल्लभा ।।२५६।।
तथा श्रेणिक मिथ्यामत । चेलना जिनभक्तिरत ।
कुधर्म सुधर्म म्हणत । कुदेव भक्त न करावी ।।२५७।।
कुगुरू मत्र नच घ्यावा । कुशास्त्रार्थं न आईकावा ।
सुधर्मे होय पुण्यठेवा । सिद्धान्त ऐकावा स्वहिता ।।२५८।।
परस्पर वाद करिती । स्वस्वधर्म प्रशशिती ।
तव एक्या दिवसाप्रती । आले बौधमती राजगुरू ।।२५९।।
श्रेणिक म्हणे वो चेलना । मम प्रिय कुळमडना ।
पतिव्रते पतिचे वचन । शब्द उल्लघना न करावी ।।२६०।।
आमचे गुरू आले घरा । भोजन घालावे सुंदरा ।
विष्णुभक्ता ज्ञान अपारा । विनय करा भक्तीभावे ।।२६१।।
ऐकताची चेलना सती । त्वरा केली पाकनिष्पत्ती ।
पाचारिले ते बौधमती । येवोनी बैसती ध्यानस्थ ।।२६२।।
धानस्थ ते अवघे जन । एक शीष पाहे चक्षुन ।
त्यासी पुसे ते मृगनयन । चातुर्यपन बोले शिष्या ।।२६३।।
कुश्चळ देह मळलिप्त । टाकुनी गेले वैकुठात ।
विष्णुपदी जाले ध्यानस्थ । सर्वसौख्यात ते तिष्टती ।।२६४।।

क्रोधनेत्र अरे रे पोरा । कुवर म्हणे रे गवारा ।
अहो जाहो हो हे वैखरा । नम्रोत्तरा काहो बोला ना ।।२१७।।
त्याचे ऐकोनी नम्रोत्तर । नृपातुल्य दिसे कुवर ।
केले परस्पर जुहार । रूप सुंदर सतोषले ।।२१८।।
येवोनी सागती रायासी । राजा सतोषला मानसी ।
पत्र पाठविले तयासी । यावे गावामी चतुराइन ।।२१९।।
नदी न मार्ग न रात्र । न वहन न पायी न सूत्र ।
न भुकी न भोजन न नीर । यावे चतुर ऐशा रीती ।।२२०।।
ते पाहोनिया कुशलता । विचार करी ज्ञानयुक्ता ।
रथ सजोगी त्या वरौता । सीडातौता साक बाधिले ।।२२१।।
हस्ती जुपुनिया रथात । अपन बैसला सिक्यात ।
सक फुटाणे घे वोटीत । चूळ भरीत पानियाने ।।२२२।।
न जेवला न भुकेला । न तान्हेला ना पानी पेला ।
न मार्गाला न अडमार्गाला राजगृहीला पाहे नैनी ।।२२३।।
न क्षिति तो न ग्रामातर । अर्धबिबी ना दिनकर ।
रायासी श्रुत हे चतुर । सभा समग्र आनदली ।।२२४।।
आनदेभेरी राय दिली । सर्व नर नारी चालली ।
नेक वाद्ये वाजती भली । सर्व मिळली एकवट ।।२२५।।
बाहेर आले लोक समग्र । अभयकुमार जैसा चद्र ।
कुळदीपक तो खीद्र । पाहे राजेद्रान दअश्रु ।।२२६।।
न गादी न सिंहासनावरी । न नट न तो अलकारी ।
अगरक्षक मध्ये तरी । पाहे नेत्री त्या श्रेणिकराव ।।२२७।।
कुळी दीप महा चतुर । सर्वं आनिला अलंकार ।
गजारूढ वाद्यगजर । हर्षं समग्र नारीनरा ।।२२८।।

मिरवत आले राजेश्री । स्वस्थ जाले राजमदिरी ।
पूर्वपुण्याची ऐसीपरी । पुत्रपोत्री ते सर्वसुखी ।।२२९।।
अभयमती सुमित्रासी । प्रधान अनिक ज्ञानशास्त्री ।
पडित कळादि सुमत्री । षड्शास्त्री ते सिद्धान्तमार्गं ।।२३०।।
ऐसे कर्मीता कित्येक दिन । पुढे कथा अनुसधान ।
सिंधुदेशे सुविचक्षण । शोभायमान ग्राम विशाळ ।।२३१।।
चेटक राजा पुण्यवत । जैनधर्मी तो महासत ।
राणी सुभद्रा रूपवत । पुत्री गुणवंत सप्तम ।।२३२।।
प्रथम पवित्रा प्रियकारिणी । तत् पुण्यवर्णी नसे कोणी ।
मृगावती मृगनयनी । द्वित्री भामिनी सुप्रभा ते ।।२३३।।
प्रभावती ते तुर्यबाळी । चेलना पचमी गुणागळी ।
जेष्ठा षष्ठी रूपा आगळी । स्वरूपावली चदना ते ।।२३४।।
अनुपम स्वरूप धन्य । देवागना त्या न सामान्य ।
रूप-शीला-क्रिया-निपुण । सप्त सती मान्य बालिका ।।२३५।।
नृप चेटक महाराज । पुत्रीचा स्नेह धर्मकाज ।
मिथ्याती निर्भत्सी सहज । सत्यार्थी दीजे नेमयुक्त ।।२३६।।
कन्येचा पटरूपरेखा । चित्रकारासी म्हणे रेखा ।
रेखोनियाते चित्र देखा । रायाचे सन्मुख आनली ।।२३७।।
नृप पाहता न्याहाळून । शामचिन्ह पडद्यातून ।
पाहता तो क्रोधायमान । चित्रकाराने पाहिले त्यासी ।।२३८।।
गूढार्थ तो समजला । भूपति त्यान विनविला ।
राया देवी प्रसन्न मला । वारीक सेला तिळचिन्ह ।।२३९।।
ते ऐकता वचन सत्य । राजा संतोष हृदयात ।
दानमानेन वस्त्रार्पित । मम कन्या अद्भुत गुणी ।।२४०।।

सदा संतोषोनि नृपती । प्रीत्या देवार्चन करिती ।
देवासन्मुख पसरीती । कन्येच्या मूर्ती सात चित्र ॥२४१॥
भावपूजा श्री जिनेंद्रनी । सर्वस्व कल्याणदायिनी ।
भक्तिभाव करा नित्यानी । भव्यजनी मनरंजनी ॥२४२॥
एकदा चेटकरायान । सर्व सैन्य सज्ज करोन ।
राजगृही उद्यानवन । योग्यस्थान ते उतरले ॥२४३॥
तेथे जिनपूजाविधान । महामहोत्सव विधीन ।
पट्ट पसरिला तयान । कन्यारत्न ते हेमवर्णी ॥२४४॥
चार कन्या विवाह झाल्या । चेलना जेष्टा चंदनेला ।
श्रावकी वर पाहिजे त्याला । मिथ्या श्रावकाला न देती ॥२४५॥
ते ऐके श्रेणिक राजेद्र । अशक्त जाला हृदयात ।
मदनव्याकुळ भूमीद्र । त्या मुखचद्र उतरला ॥२४६॥
पुत्र बोलाविला अभय । पाहू आता त्वत् चातुर्य ।
या शरीरा स्त्रीरत्न होय । पहावी सोय ज्ञाननिधी ॥२४७॥
मंत्री पाठविला त्यापासी । कन्या द्याव्या वो राजियासी ।
सोध पाहता कुधर्मासी । मिथ्यामतीसी देववेना ॥२४८॥
अभयकुमार ऐकोन । चित्ती विचारी करावा यत्न ।
पट् लिहिला अभयान । चित्र सिंहासन श्रेणिकादि ॥२४९॥
वाणिज्ये वृषभ भरोनी । विशालाढचा नगरी जावोनी ।
नगर उद्यानी राहोनी । मंडपस्थानी पट्ट स्थापी ॥२५०॥
पूजा न्हवन जिनेंद्रासी । ग्रामलोक आले पाह्यासी ।
दान मान तुर्यसघासी । दिधले ज्ञातिसी भोजन ॥२५१॥
पट्ट पाहोनी सर्वजना । धार्मिक वर्णिती सद्‌गुणा ।
ऐकोनी चंदना चेलना । हर्षल्या मना जेष्ठा देवी ॥२५२॥

श्रेणिक रूपात पाहोनी । चेलना निश्चय करी मनी ।
मम देहाचा हाचि धनी । नमोकार मनी स्मरतसे ।।२५३।।
सुरूंग मार्गं गावातून । तिघी कन्या सवे घेउन ।
चदना जेष्ठा परतून । नेम निमित्या न गेल्या त्या ।।२५४।।
चेलना अभयकुमार । पातले राजगृहनगर ।
विवाह मंगळगजर । संघ चतुर अन्नदाने ।।२५५।।
चेलना पट्टस्त्री सुमती । अभया सुमित्रा ते सती ।
पूर्वीचे पुण्यसुखप्राप्ती । राजनीति प्राणवल्लभा ।।२५६।।
तथा श्रेणिक मिथ्यामत । चेलना जिनभक्तिरत ।
कुधर्मं सुधर्मं म्हणत । कुदेव भक्त न करावी ।।२५७।।
कुगुरू मन्त्र नच घ्यावा । कुशास्त्रार्थं न आईकावा ।
सुधर्मे होय पुण्यठेवा । सिद्धान्त ऐकावा स्वहिता ।।२५८।।
परस्पर वाद करिती । स्वस्वधर्मं प्रशशिती ।
तव एक्या दिवसाप्रती । आले बौधमती राजगुरू ।।२५९।।
श्रेणिक म्हणे वो चेलना । मम प्रिय कुळमडना ।
पतिव्रते पतिचे वचन । शब्द उल्लघना न करावी ।।२६०।।
आमचे गुरू आले घरा । भोजन घालावे सुदरा ।
विष्णुभक्ता ज्ञान अपारा । विनय करा भक्तीभावे ।।२६१।।
ऐकताची चेलना सती । त्वरा केली पाकनिष्पत्ती ।
पाचारिले ते बौधमती । येवोनी बैसती ध्यानस्थ ।।२६२।।
धानस्थ ते अवघे जन । एक शीष पाहे चक्षुन ।
त्यासी पुसे ते मृगनयन । चातुर्यंपन बोले शिष्या ।।२६३।।
कुश्चळ देह मळलिप्त । टाकुनी गेले वैकुठात ।
विष्णुपदी जाले ध्यानस्थ । सर्वसौख्यात ते तिष्टती ।।२६४।।

बाई म्हणे ते पुण्यवान । आता न लगे येन जाणे ।
कुश्चळदेहे अग्निदहन । संस्कार करन आता याचा ॥२६५॥
म्हणोनी आनी अग्निभेळा । भडभडा निघती ज्वाला ।
ते पाहाता घेती तत्पळा । ध्यान अचळ कैसे त्या ॥२६६॥
राजा कोपला ते पाहोनी । तयासी बोले प्रिय राणी ।
स्वामी ऐका शात होवोनी । गुरूची करणी तुमच्या ॥२६७॥
देहे ठेउनीया वो पथ । वैकुंठी बसले ध्यानस्थ ।
पुनरपि येवोनी येथ । ससारी दु:खिस्थ होतील ॥२६८॥
म्हणोनी पर उपकार । करावा देह सस्कार ।
क्रोध शांतता राजेश्वर । कथातर दृष्टान्त ऐका ॥२६९॥
वत्स देश महाविख्यात । कौशाबी पत्तन अते त्यात ।
प्रजापाळ ऐश्वर्यवत । सुखी नादत पूर्वपुण्य ॥२७०॥
तेथे श्रेष्ठी सागरदत्त । वसुमती स्त्री गुणवत ।
तेथे एक समुद्रदत्त । भार्यायुक्त समुद्रदत्ता ॥२७१॥
तयोर्द्वयो स्नेह बहुत । धर्म आचरत निर्हिसा त्यक्त ।
वचन प्रमाण बोलत । होता सतत दोघ व्याही ॥२७२॥
काळे पुत्र कन्या जाहली । दोघानी लग्नही चागली ।
दोघ यौवनभरा आली । कि गती जाली ऐका राया ॥२७३॥
रात्रौ दिव्य नरदेह् प्राप्त । दिवा भुजंग पेटारीत ।
ऐसे दुगड भोग भोगीत । ससारी रात विचित्र राया ॥२७४॥
तथा त्या समुद्रदत्ताच । नागदत्ता कन्या सुरस ।
तिचा रूपगुण विशेष । एकमेकास विचारिती ॥२७५॥
त्या नागदत्ता वासुमित्रान । विधियुक्त जाल लग्न ।
वाचादत्त नाही चळन । वचन मरन सत्यराया ॥२७६॥

वसुमित्र यौवनभर । दुगडभोग सर्वरात्र ।
दिन पेटारी कष्ट गात्र । दिव्यनर रात्री होतसे ॥२७७॥
दोही पक्षी ते सदासर्वदा । काही सौख्य किती आपदा ।
सुपुण्यविना भवबाधा । न चुके कदा स्वामिराया ॥२७८॥
म्हणोन त्याहाच्या हितासी । ते असोत विष्णुपुरिसी ।
त्याच्या कुश्चळशरीरासी । संस्कार अग्नीसी योजिला ॥२७९॥
ते ऐकोनिया महीनाथ । धर्मयुक्ती न कळे त्यात ।
मौन धरोनी हृदयात । मिथ्यामती ॥२८०॥
एके दिनी वनक्रीडेला । निविड वनी प्रवेशला ।
तेथ मुनीश्वर देखिला । तपस्वी भला सूर्यासम ॥२८१॥
तो यशोधर महामुनी । रायासी क्रोध आला मनी ।
हा राणीचा गुरू म्हणोनी । कुतरी त्यानी चेतविली ॥२८२॥
पचशत श्वानाचा मेळा । मुनीसमीप क्रोधलीळा ।
प्रदक्षिणा देती सकळा । बैसले जवळ कर्कुर ॥२८३॥
तयाचे महात्म्ये करूनी । वैरभाव नसे मनी ।
बैसले स्तब्ध ते नयनी । ते पाहोनी तप्त नरेंद्र ॥२८४॥
क्रोधे बाण लाविला सीति । बाणामागे बाण सोडिती ।
पुष्पमाळा गळा पडती । पुण्य वर्णिती मुनीचे कोण ॥२८५॥
त्याच समयी गतिबंध । सप्तमनर्कीचा निबध ।
त्रितीससागरवर्षाब्धि । महत् बध भूरिकष्टदायी ॥२८६॥
तत् मुनिपादाबुजेन । सद्गुरूचे दर्शन करून ।
दर्शनेन पापनाशन । जाहला क्षीण नरकायु ॥२८७॥
पुण्यवान तो महामुनी । यशोधर तपस्वी ज्ञानी ।
तयाचे मुखे जिनवानी । सम्यक्त्व मनी उपशम ॥२८८॥

पुण्यपाप क्षीण जाले । सम्यक्त्वेन दु ख बुडाले ।
चौऱ्याशी लक्ष वर्ष राहिले । भोगणे आले प्रथम नरकी ॥२८९॥
आत्मिक चित्रगुप्त गुरू । उपदेशिला धर्मतारु ।
क्षयोपसम्यक्त्व निर्धारु । पापसंहारू भक्तिभावे ॥२९०॥
वर्धमान जिननायक । नेक कथा उपदेशक ।
जाले तेथे शुद्ध सम्यक्त्व । क्षायिक ते मोक्षदायक ॥२९१॥
सम्यक्त्व पापाचा तो क्षय । सम्यक्त्व स्वर्गप्राप्त होय ।
सम्यक्त्व मोक्षाची ते सोय । तीर्थंकर होय जीव हा ॥२९२॥
म्हणोन सद्रत्न सम्यक्त्व । स्वर्गमोक्ष सुखदायक ।
अन्य कोणी भक्तभाविक । भव्यै विवेक आदरावे ॥२९३॥
श्लोक:- य: देवेंद्र-नरेंद्र-शर्म-जनकं दु खौघ-निर्नाशकं ।
सम्यक्त्व शिवसौख्यबीजमतुलं विद्वज्जनै: सेवितं ॥
तत् श्रीमत्जिनदेवभाषितमहातत्त्वार्थसारे रूचि ।
प्रोक्त श्रीश्रुतसागरैर्मुनिवरै भव्या: श्रयतु श्रियं ॥२९४॥
सम्यक्त्व जीवाचा हितकर्ता । देवेंद्र स्वर्ग सुखदाता ।
भूमेंद्र सर्व सुख पिता । दु.खहर्त्ता सम्यक्दर्शन ॥२९५॥
सम्यक्त्व शिवसुखाच-बीज । भव्यप्राणी प्रेरक गुज ।
यास्तव श्रीमत् जिनराज । भासिती सहज तत्त्वार्थ ॥२९६॥
साररूचि श्रीजिनवानी । सागें श्रुतसागर मुनी ।
भव्यजन आणोनी ध्यानी । सार्थक करणी करावी ॥२९७॥

इति कथाकोशे शुद्धसम्यक्त्ववर्णनायां महामंडलेश्वर । श्रीश्रेणिक महाराज । चेलनाबाई कथा वर्णनं नाम प्रसंग ४८ अठ्ठेचाळीसावा संपूर्ण शुभं भवतु कल्याणमस्तु । कथाविरचिते श्रीरत्नकीर्ती तत् शिष्य लघुचंद्र अज्ञान महाराष्ट्र भाषा कवित्व संपूर्ण शुभं छ ॥

# प्रसंग एकोणपन्नासावा

## ।। श्री वीतरागाय नमः ।।

प्रथम नमु जिनदेवा । श्रीगुरूराय ज्ञानठेवा ।
माय सारजे मार्ग दावा । कवित्व भावा बाळकासी ।।१।।

पंच परमगुरू वंदु । ज्ञानदाता दयेचा सिंधु ।
श्रोता सावध कथा प्रबधु । पाप अगाधु निशीभुक्त ।।२।।

रात्रीभोजन सोडा तुम्ही । क्रिया शुद्ध आचारधर्मी ।
ते कर्ता सर्व सुखधामी । नृसुरयोनी निर्जर तो ।।३।।

कीर्ती काती ते महाशाती । सतती सतती सुभक्ति ।
आरोग्य काया शुद्धमती । रात्रिभुक्ती विवर्जनात् ।।४।।

नव विध पुण्यकारण । पुन नरदेहासी येन ।
रात्री भोजन न करण । अनुक्रम जाने मोक्षासी ।।५।।

निशि भोजन करू नये । दरिद्र रोगी काया होय ।
अंध पंगु कुशील होय । अल्प आयु निशिभोजनात् ।।६।।

रात्री भोजन करिताती । पतग कीट पडताती ।
मुगी सूक्ष्म जीवाच्या पंक्ती । जिवासी होती मासदोषे ।।७।।

म्हणोन दिवसा भोजन । द्विघटका राहता दिन ।
दया क्रिया धर्म जैन । श्रावक म्हणन तयासी ॥८॥
श्लोक–अन्हो मुखेऽवसाने च यो द्वे द्वे घटी त्यजेत् ।
निशाभोजन दोषज्ञोऽश्नोत्यसौ पुण्यभाजनं ॥९॥
आदि मध्येअवसाने च द्विघडि आदि सेवटे च ।
निशाभोजन त्यक्त च जीव तोच पुण्यभाजन ॥१०॥
पानसुपारी विडा पानी । लवग किंचित् दातवनी ।
वहु कष्ट होताचि मनी । त्यज आहार पानिफळादि ॥११॥
नीरस दुग्ध साकर पेढे । इक्षुरस न घ्यावे भीडे ।
माया बाप म्हनती पुढे । व्रत औघडे चौथ्याश्रमी ॥१२॥
सदा त्यजा रात्री आहार । चतुर्विध नेमप्रकार ।
पक्षमासोपवासो धीर । शक्तीसार सवत्सरादी ॥१३॥
अथ श्रीजिनसूत्रवाणी । दृष्टान्त कथा महापुराणी ।
प्रीतिकर श्रावक ज्ञानी । धर्मधनी तो भव्यजीव ॥१४॥
मेरू दक्षिण भरत देश । देश मागध तो पवित्र ।
स्वधर्म मार्ग तीर्थक्षेत्र । तत्त्वार्थसूत्र विराजित ॥१५॥
तेथे सुप्रतिष्ठ नगर । जयसेन राजा सुदर ।
धार्मिक न्यायिक चतुर । समता पुत्र प्रजा पाळी ॥१६॥
तत् ग्रामी वसे कुबेरदत्त । जिनपदाब्जी असे रत ।
तत् प्रिया धनमित्राख्यात । ज्ञानवत धर्मवत्सला ॥१७॥
एके दिवसी सुपात्रासी । अन्नदान घटावी त्यासी ।
सागरसेन ज्ञानी ॠपी । नवविधिसी पुण्योत्पन्न ॥१८॥
स्वामिसी पुसे एक प्रश्न । मज प्राप्त पुत्र सतान ।
आहे की नाही द्या सागुन । न होता घेईन दीक्षेसी ॥१९॥

ऐसें ऐकता मुनीराय । अवधीज्ञानी जाने सोय ।
त्व भाग्यवंत पुत्र होय । चरमांगी देहे प्रतापी ।।२०।।

ऐकोन मुनी वचनोक्ति । आनद न समाये चित्ती ।
सद्‌गुरूचरण यथोक्ति । नमस्कारिती पुन: पुन: ।।२१।।

मुनीवचनाचा विश्वास । पूजा करिती जिनेद्रास ।
तुर्यदान सुपात्रास । श्रीसघास जेवणावळ ।।२२।।

तेव्हा दान पुण्य करोनी । गर्भ वोढ स्त्रिया सद्‌गुणी ।
नेक महोछव अघरनि । प्राप्त मनी त्या निधी यथा ।।२३।।

ते ऐकोन सर्वजनासी । प्रीत जडली त्या मानसी ।
पुत्रजन्म पूर्णमासासी । दान याचकासी विधीन ।।२४।।

द्वादश दिवस जाहले । प्रीतंकर नाम दिधले ।
चतुर संघ तृप्त केले । चंद्रापरी दीर्घ जाहले ।
रूपे जिंतीले मदनासी ।।२५।।

पच वरूषे होता पूर्ण । जैन उपाध्या बोलाउन ।
सरस्वती महोत्सवान । वस्त्रभूषण यज्ञोपवीत ।।२६।।

गुरूचे वाक्य ज्ञानामृत । सवत्सरात ज्ञान प्राप्त ।
नानाशास्त्र ते मुखोद्‌गत । पूर्वपुण्यात सर्व कला ।।२७।।

गुरूभक्तीन यथाशक्ती । धर्मशास्त्रज्ञानयुक्ती ।
सस्कृत पुराण व्युत्पत्ती । सरस्वती जिह्वाग्री असे ।।२८।।

सज्जन श्रावक मिळोनी । जिनचर्चा नित्यनित्यानी ।
मातृ पितृ आनद मनी । पुत्र सद्‌गुणी कुरवाळिती ।।२९।।

रूप ज्ञान कळा मडित । बळा आगळा पुण्यवत ।
जैसा रवि आकाशपंथ । की रयणीत इंदु जैसा ।।३०।।

तो पाहोनिया रूपागळा । प्रौढ जाला यौवनकळा ।
आता करू लग्नसोहळा । द्रव्य पुष्कळा मेळउनी ।।३१।।

द्रव्यार्थी द्वीपातरासी । नानारत्नादि द्रव्यरासी ।
मन इच्छित विभूतीसी । आले गृहासी पुण्याश्रय ।।३२।।

तत् तस्य सुपुण्येन । राजा संतोषला पाहून ।
परम आदर करोन । पृथ्वीसुदरी कन्यारत्न ।
रूपेन गुणशालिनी ।।३३।।

सैवरा मडप दिधले । सज्जन सोयरे मिळाले ।
विधियुक्त लग्न लावले । अर्धराज्य दिले अंदन ।।३४।।

राज्यविभूती होता थोर । बळा आगळा पृथ्वी विवर ।
हिंडता द्वीप देशातर । कन्या सुदर परनिल्या ।।३५।।

राजकन्या श्रावकपुत्री । परनिल्या ते पुण्यसूत्री ।
प्रीतिकर राजा धरत्री । कुरंगनेत्री भानु जैसा ।।३६।।

एकसष्ठ स्त्रिया प्रनिल्या । सकळित सांगितल्या ।
श्रीमन् महापुराणी वर्णिल्या । विस्तारल्या बहुविभूती ।।३७।।

अथ प्रीतिकरो राजा तदा । पावोनिया राज्यसपदा ।
पुण्यभोगी सुखसंपदा । आनदकंदा वृद्धीहेत ।।३८।।

सदा सुपात्रा दान देत । श्रद्धादि सप्त गुणान्वित ।
नवविध पुण्य जोडीत । शास्त्रयुक्त पुण्यपावन ।।३९।।

पूजा न्हवन जिनदेवा । विधीयुक्तीन पुण्यठेवा ।
सप्तक्षेत्री देवाधिदेवा । द्रव्य ठेवा जीर्णोद्धारन ।।४०।।

परोपकार यथायोग्य । दानधर्माय तथा योग्य ।
शास्त्रयुक्तिन स्वयं भाग्य । अनुराग भक्ति तत्पर ।।४१।।

इत्यादिक कथा श्रीजिनेद्रोक्त । धर्मसेवा दृढ सम्यक्त्व ।
सर्वसुखी तो यथास्थित । प्रजा पाळीत प्रीतीन ।।४२।।
तदा तस्मिन् त्या अवसरे । संन्यासी ज्ञानाचे सागर ।
सागरसेन तपसूर । करीतील हो लोकोपदेश ।।४३।।
त्या मनोहार उद्यानात । चारण मुनी आले तेथ ।
ऋजुविपुल नाम त्यात । द्वितियात मति विपुल ।।४४।।
ते सुख स्वस्त वनातरी । तदा ऐकोन नग्रनारी ।
श्रीसघाचे हर्ष अतरी । वंदनेत्वरि वाद्यघोष ।।४५।।
मुनीदर्शन पापनाशन । तीन प्रदक्षिणा देऊन ।
अष्टद्रव्य पूजाविधीन । कृत्य नमन ज्ञानसागरा ।।४६।।
धर्म सागा वा गुरूराय । जेन स्वर्ग मुक्ती उपाय ।
जेष्ठ मुनी करुणाहृदय । सागती सोय आत्महित ।।४७।।
मधुर गिरा करोनी वानी । धर्मद्विधा ऐका श्रवणी ।
महाव्रतिक तपज्ञानी । अपतरोनी तारि तुज्या ।।४८।।
उत्तमादि दशलक्षण । धर्मकथा सोळाकारण ।
पचपर्वनि पद्मासन । उपास करन पक्ष मास ।।४९।।
सार सम्यक्त्व पाळिताती । अष्टाग ते भेदयुक्ती ।
कार्योत्सर्ग तप तपति । मोक्ष जाती स्वर्गापवर्ग ।।५०।।
अहो प्रीतिकर श्रावक । धर्म ऐका भवतारक ।
स्नपनक्रिया व्रतानेक । मोक्षदायक भव्यजना ।।५१।।
मिथ्यात्व त्यजावे दूर । परधर्म तो अनाचार ।
जेन चौऱ्याशी वेरझार । नर्क घोर दु खभाजन ।।५२।।
त्यासाठी जिनेश्वर वाणी । नित्य ऐका तुमी श्रवणी ।
मति श्रुति ज्ञानाचे धनी । अर्थपुरानी विचक्षणः ।।५३।।

तेथे प्रसूत जाली सती । दिव्य पुत्र पुण्यान प्राप्ती ।
कर्मसंयोग जीवा होती । विचित्रगति विधिचेष्टित ।।८१।।
तत् समयी मनुष्य एक । नमन करी बोले मुस्क ।
माते मी तुमचा सेवक । रक्षावया बाळक आलो मी ।।८२।।
ऐक माते तू मम वाणी । खगाचळ दक्षिण श्रेणी ।
नगरी विद्याधर गुणी । सुभाषणी ते विद्युत्पुर ।।८३।।
विद्युत्प्रभ विद्याप्रवुर । विद्युल्लेखा त्या स्त्री सुदर ।
तयचा मी असे कुमर । नाम शरीर बालदेव ।।८४।।
एकदा विमानी बैसोनी । कनकमाला मम कामिनी ।
स्वइच्छेन क्रीडा करोनी । आकाशगमनी भ्रमतु ये ।।८५।।
रामगिरि मार्ग पाहिला । विमाना अटकाव झाला ।
तेथ उतरता देखिला । ज्ञानी भला वीर भट्टारक ।।८६।।
मी मूढ उपसर्ग त्या करी । पद्मावती आली सत्वरी ।
पार्श्वनाथ मस्तकावरी । तत् चरणाघ्रि षट्पदवत् ।।८७।।
उपसर्गात निवारूनिया । विद्या छेदल्या मम तया ।
क्रोधनेत्र रे दुष्टा त्वया । केले वाया साधूपीडन ।।८८।।
विद्या छेदिता ते समस्त । भग जाला विमानात ।
निर्वळी जालो मी अशक्त । शरणागत नमस्कारी ।।८९।।
माते मी अज्ञानभावेन । उपसर्ग केला मूढपन ।
आता मी तुजला शरण । विद्या देण मज देवते ।।९०।।
दयावंत ते पद्मावती । शांत होउनी मज वदती ।
ऐक रे मम वचनोक्ती । जा सीघ्रगति नागपुरा ।।९१।।
श्मशानि बाळ आनि माये । त्याचे रक्षण त्वा करावे ।
रे खग त्या बाळाप्रभावे । विद्या सर्व प्राप्त होतील ।।९२।।

ऐकोनी देवीचे वचन । तत्समीप आलो धावोन ।
मातग वेश मी धरोन । सर्व निरोपण केले म्या ॥९३॥
ते ऐकोनिया पद्मावती । द्वीविसदिन निर्भयचित्ती ।
सतुष्टमान सरळचित्ती । बीजचंद्र युक्ती वृद्धीबाळ ॥९४॥
तेव्हा तो वदतु खेचर । माते चालावे मम मदिर ।
बाळ खेळवी मनोहर । विद्या समग्र विमानसिद्धी ॥९५॥
विद्याधर विमानी बैसला । बाळ वोसगी घेत याला ।
कनकमाळा स्त्रीन घेतला । बाळ देखिला सूर्यप्रभा ॥९६॥
कमळचिन्ह करि कंडु । नाम तयासी करकडु ।
आजानबाहु तो प्रचडु । वाहुदडु वीरश्रीयतो ॥९७॥
विमानारूढ परिवार । व्योमव्यान ते चाले स्थिर ।
क्रमेण प्राप्त विद्युत्पुर । सर्वांतर महाआनद ॥९८॥
अहो भव्यै पूर्वपुण्येन । जीवा कष्टे पि सुखसंपन्न ।
विपत्ति संपत्ती शक्तीन । जिनगुणपुण्य आचरा ॥९९॥
पुण्य सुपात्रदानेन । पुण्य श्री जिनपूजन ।
पुण्य व्रतनेमे करून । सुखसंपन्न करिती यासी ॥१००॥
पुण्य इद्र साह्ये करिती । खेचर भूचर पद्मावती ।
दुष्ट कर्म दूर होताती । सुखोत्पत्ती त्या पुण्यवता ॥१०१॥
तेव्हा ते पद्मावती सती । अर्जिकाबाई गाधरीमती ।
पाहोनी पुण्योद्भव चित्ती । वैराग्य उत्पत्ती मनात ॥१०२॥
तियचे माघ चैत्याल्यात । देववंदना स्वामिनाथ ।
अवधीज्ञानी समाधीगुप्त । नमोस्तु युक्त मुनीराया ॥१०३॥
करयुगुळ जोडोनिया । दीक्षा द्यावी जी गुरूराया ।
तत् वचन ऐकोनिया । सागे अवधिया हिताहित ॥१०४॥

अहो पुत्री ऐक वचन । दीक्षेचे न दिसे कारण ।
तीन वेळा दीक्षा घेवोन । व्रतखंड न पूर्वजन्मी ।।१०५।।
पंचविपय तारुण्यमद । व्रतखंडन पापवध ।
तीन वेळा दु:खदारिद्रच । भोग विविध भोगिले त्वा ।।१०६।।
तत् कर्म शात व्हावयासी । पुत्रराज्य पाहे नेत्रेसी ।
चौथ्याश्रमी परिवारेसी । दीक्षा तुजसी होईल हो ।।१०७।।
ऐकोनिया गुरूवचन । चित्तासी जाले समाधान ।
गुरू अर्जिकासी नमन । स्वस्थ मन पुण्याश्रित ।।१०८।।
तथा तो बाळदेव खग । विद्या सिकवी कळा अग ।
करकंडु पुण्य सयोग । कुशलाग सहस्रभट ।।१०९।।
एकदा करकंडु विमानी । विद्याप्रचीत पाहे नैनी ।
हस्तिनागपुरा येवोनी । क्रीडा स्मशानी खेळतुसे ।।११०।।
तत् पूर्वकथा अनुसार । जयभद्र मुनीविहार ।
शिष्य समवेत परिवार । स्मशानातर वनभूमी ।।१११।।
तेथे देखोनिया आश्चर्य । वेळु जाळित वेळुत्रय ।
नरकपाल मुखलोचनय । अनुपम सुदर ते ।।११२।।
शीष म्हणे वो गुरूराया । महत् कौतुक दिसे स्वामिया ।
शीषवचन ऐकानिया । सागे तया जयभद्र मुनी ।।११३।।
हस्तिनागपुरे राजिंद्र । होणार असे बलभद्र ।
अकुश दड आणि छत्र । त्रीणि पवित्र राजमुद्रा ।।११४।।
तेथे ब्राह्मण एक होता । श्रवण केली स्वामी वार्ता ।
द्रव्यलोभे मनाआतौता । छेदि त्वरिता वेळुत्रय ।।११५।।
घेवोनिया आला गृहासी । कित्येक दिन होता त्यासी ।
करकडु आला विलासी । हस्तीसैन्यसी फिरे ग्रामी ।।११६।।

राजचिन्ह लक्षण युक्ती । विद्याधर विमानी पाहती ।
करकंडु क्षितिवरौती । महोत्सव पाहती स्वेच्छा ॥११७॥
महा गज तो सुडादंड । विलोकिले नर उदंड ।
दृष्टि पडता करकंड । पाहिला प्रचंड राजेश्री ॥११८॥
तेजस्वी आणि रूपवंत । कळसाभिषेक तयात ।
जयस्वी शब्द गर्जनात । गजेंद्र ठेवित मस्तकी ॥११९॥
अनेक वाद्याचे गजरी । मिरवत आले राजमंदिरी ।
विधीयुक्त सिंहासनावरी । जनपरिवारी स्थापिले ॥१२०॥
जय जय शब्द महोत्सव । वाद्ये वाजती अपूर्व ।
करकंडु राज्यवैभव । श्रीजिनदेव पुष्प पूजने ॥१२१॥
तत् क्षण बालदेव खेचर । पालनपिता विद्याधर ।
पाहोनिया तो राज्यभार । विद्या सिद्धी सार संतुष्ट ॥१२२॥
पद्मावती सती ते माय । विमानी बैसोनिया स्वय ।
विद्याधरी सहित स्वय । केले अक्षय अक्षवान ॥१२३॥
तदा तो करकंडु बळी । निःक्षत्री राज्य भूमंडळी ।
देवपूजा जिनराउळी । राजा बळी सुखसंतोष ॥१२४॥
तत् प्रताप ऐकोनिया । दतीवाहन क्रोध हृदया ।
मम राज्यासी दिपे धनिया । करावे त्वया उपायासी ॥१२५॥
दूत धाडोनिया सत्वर । त्वरे ते हस्तिनागपूर ।
करकडुसी नमस्कार । समाचार सागे रायासी ॥१२६॥
आमचा प्रभु बळवान । नाम त्याचे दतीवाहन ।
तुम्ही त्याची सेवा करून । राज्य करण एकछत्री ॥१२७॥
वचन ऐकोनी तयाचे । मन क्षोभले तयाचे ।
रे रे दूत घेईन त्याचे । राज्य अवघे मीच मी ॥१२८॥

महाक्रोधाग्नि बलान्वित । नेत्र ताम्र धूम नीघत ।
ते पाहोनिया भयभीत । त्वरे करीत पलायन ॥१२९॥
दूर गेला चंपापुरीसी । वर्तमान सागे रायासी ।
तुम्ही द्विगुणबळ त्यासी । तुमचे राज्य घेईल ॥१३०॥
राया विषाद हर्षवदन । सांगसी पोरि खेळवन ।
कैसा बलाढ्य तो पाहीन । करावे रे सैन्यतयारी ॥१३१॥
करकडु तो येरीकडे । सैन्ये मेळउनीया गाढे ।
विद्याधर विमानारूढ । आले दडदड चंपापुरी ॥१३२॥
नगराबाह्ये उद्यानवनी । महावीर सुभटाग्रणी ।
रणवाद्य नाद किंकिणी । नाद गगनी न समाय ॥१३३॥
दंतीवाहन वीरश्रीय । चतुरगा सेना समुदाय ।
रणागण मेळा समुदाय । दोन्ही बाह्ये वीर उन्नत ॥१३४॥
तदा व्यूह प्रतिव्यूह । रचना केली अर्जुनसुत ।
दाखला पांडुपुराणात । पद्मपुराणात लवाकुश ॥१३५॥
तदंन्याय ते पद्मावती । जानोनिया त्वरितगती ।
विमानारूढ महासती । पवनगती चंपापुरी ॥१३६॥
विमानवासी पद्मा सुदर । युद्ध होतसे घोरांदुर ।
करकडु तो विद्याधर । सिंहा तिळभर होउ नेदि ॥१३७॥
दंतीवाहन क्रोधानल । बाण लाविला अग्नीजाल ।
वरून बाण सोडी बाळ । शात अनिल ठाई च ॥१३८॥
राव बाण पंचविषय । ते तरुणागी भेदले राय ।
बाणाहि लोका जितोनिय । करकडु राय देखिला ॥१३९॥
बाळ सकुमार ब्रह्मचारी । त्याच बाण तो काय करी ।
बाण छेदला वरचेवरी । राजेद्र चूरी दोन्ही कर ॥१४०॥

रायें सोडिला क्रोधवाण । शाति धरिली कुमरान ।
वाणामागे सोडी बाण । कुमरा मौन जपे नौकार ।।१४१।।

राजा घालित वाणजाळा । तेची होताती पुष्पमाळा ।
विमानी पाहे पद्मा वाळा । हृदयी कळवळा दोही पक्षी ।।१४२।।

तत् समयी पद्मावती । भ्रतारासन्मुख तिष्ठती ।
राव ते पाहोनिया चित्ती । वोळख पुरती स्फुरेना ।।१४३।।

म्हणे हे कवनाचि कवन । की स्वर्गाची देवागन ।
किंवा हे शेषाची पद्मीन । काय सून दशरथाची ।।१४४।।

की हे षोडश सतीत सती । किंवा रुक्मिणी स्नुषा रति ।
अथवा कर नेत्रावर्ती । न्याहाळून पाहती तीते ।।१४५।।

तेंव्हा ते पद्मीन सुदर । विनंती करि जोडोनी कर ।
म्हणे मी त्व दासी किंकर । ऐकावा समग्र वृत्तान्त ।।१४६।।

श्रवण होता करुणा शब्द । राव हृदयी जाला स्तब्ध ।
म्हणे हे काय बोले मुग्ध । श्रवण शब्द ओळखिली ।।१४७।।

कठ दाटला हुदक्यान । नेत्री चालले ते जीवन ।
पल्लव लावोनी नयन । दु ख मागोन आठवले ।।१४८।।

राव आक्रोश करि चित्ती । प्रधान सज्जन समजाविती ।
शोक शात हृदय स्फूर्ती । पद्मा सती ते आलगिलि ।।१४९।।

पद्मा म्हणे तुमचा नदन । ऐरावती जैसा भान ।
सग्राम तो स्थिर करोन । पुत्रा कळल वर्त्तमान ।
हत्तीवरोन उतरला ।।१५०।।

पित्यासन्मुख येवोनिया । करकमळ जोडोनिया ।
करकंडु लागला पाया । महाविनय करी क्लान्त ।।१५१।।

पुत्र माता त्या पितियासी । भेट जाली द्वादशवर्षी ।
पुत्र धरोनिया पोटसी । आलिंगिता त्यासी सद्‌गद्‌गद् ।।१५२।।
सज्जनी केला जयजयकार । आनदभेरी मगलाचार ।
पुत्र विभूती विद्याधर । दाटी फार गगनपंथ ।।१५३।।
चंपापुरी प्रवेश केला । अष्टविध देव पूजिला ।
अन्नदान तुर्यसंघाला । वस्त्राद्यै केला सन्मानविधी ।।१५४।।
पद्मावती प्रसादेन । पद्माराणी सुखसंपन्न ।
पुत्रपौत्रादि धनधान्य । पूर्वपुण्यान सर्वसुखी ।।१५५।।
कित्येक दिवसानतर । करकंडु यौवनभर ।
विद्याधर परमादर । कन्या सुदर सहस्राष्ट ।।१५६।।
विधियुक्त विवाह जाले । पृथ्वीराजे सर्व मिळाले ।
दंतीवाहन विनवीले । ज्यामात केले करकंडु ।।१५७।।
दहा सहस्र सुदर कन्या । महाविभूती वाद्ये नाना ।
दिव्य षोडशाभरणा । कृष्णगोपागना अधिक ।।१५८।।
अठरा सहस्र युवती । रानी स्थापिल पुत्राप्रति ।
एकछत्री ते राज्य करिती । प्रजा पाळिती पुत्रवत् ।।१५९।।
परिवार समस्त मिळोन । नित्य देवाचे दर्शन ।
पूजाविधी युक्त करोन । नवविधा पुण्य पुण्येन पै ।।१६०।।
तदा मन्त्री वदे रायासी । प्रणाम करी विनयासी ।
एक मागतो मी तुम्ही । चरमाख्य राजासी जिंकावे ।।१६१।।
तो वळ पद गर्वी थोर । पाड्याश्चळा असती पुर ।
तो देत नाही करभार । आश्रित वीर गडकिल्ला ।।१६२।।
ऐकोनी प्रधानाची मात । दूत धाडिला त्या त्वरित ।
न मानि या राजगर्वित । परतला दूत तत्क्षणी ।।१६३।।

राय ऐकताची त्वरे । क्रोध धडके वैश्वानर ।
सैन्य करोनिया सादर । ग्राम सत्वर वेष्टिला तो ॥१६४॥
दोघे झुजती धीर वीर । सैन्य मिळाले ते अपार ।
धनुर्विद्याते बाणयंत्र । वीरासी वीर नाटोपती ॥१६५॥
तेव्हा तो करकंडु बळवंत । शत्रु जिंकिला तो क्षणात ।
पळता धरोनिया त्यात । कोप हृदयात दाटला ॥१६६॥
दोहि बाहि तो क्षितितळी । पाडोनी बैसला उरस्थळी ।
गुडघा दिला कंठनाळि । सव्यपद भालि मुकुटी ॥१६७॥
क्रोधे रगडू पाहे त्यासी । तेथे देखिले जिनबिंबासी ।
मुकुट घेवोनी हस्तासी । रत्नबिंबासी नमस्कारी ॥१६८॥
हा हा म्या महत् पाप केल । क्रोधांधेन पाप घडल ।
आपनिंदा पाप उडाले । राजा बोले अरेरे मूर्खा ॥१६९॥
युद्धसमयी ही प्रतिमा । मुकुटी ठेवोनी अधमा ।
हिंसासमय नेनसीऽधमा । सप्तम नर्कधामा जाशील ॥१७०॥
क्षेमा धरोनिया अंतरे । उठि उठी रे मूर्खा त्वरे ।
कन्हत कुथत दोही करे । चरणावर लोळतु ॥१७१॥
त्या दोही कर उचलून । देता जाला अभयदान ।
त्याच राज्य त्याला देउन । केला स्वाधीन स्वसेवक ॥१७२॥
सागात घेवोनी तयासी । पाहती ग्राम रयतीसी ।
सुखी नांदावे पुत्रपौत्रासी । करभारासी देति प्रजा ॥१७३॥
देवपूजा श्रीगुरूभक्ती । षट्कर्म अस्त्र शास्त्रयुक्ती ।
सप्त क्षेत्र धन खर्चिती । शक्तीसार भक्ति करा भव्यै ॥१७४॥
देश वन वोलाडिती ते । पुढे देखिले कुतलदेशात ।
पुण्य क्षेत्र तेथ शोभत । वर्णिता मात बुद्धी थोडी ॥१७५॥

बळघाट अमृतवन । गरुडगगा वलाडुन ।
तेरपुर ग्राम पाहून । तेर नदीस्थान उतरले ।।१७६।।
देशिक राजे भेटी येती । महा आदरेण भावभक्ती ।
धार्मिक व्रतिक सत्कीर्ति । भिल्लवस्ती तेरमध्ये ।।१७७।।
प्रांतातील भिल्ल मिळोन । वस्तीस समूह मिळोन ।
कमळपुष्पफळ मनोज्ञ । रायाकारण भेटविली ।।१७८।।
सन्मान देवोनी तयासी । पुसती शुभ वृत्तान्तासी ।
वेणु भिल्ल वदे रायासी । करद्वयासी जोडोनिया ।।१७९।।
दक्षिणदिशी पचक्रषे । चारुपर्वत मनोज्ञ असे ।
तळि तडाग वन असे । जळासरिसे भरपूर ।।१८०।।
त्या चारु पर्वताउपरि । वस्ती धारासीव नगरी ।
मध्येभागी जिनमदिरी । शोभा भारी हा अनुपम ।।१८१।।
सहस्रस्तंभ चैत्यालयासी । बारदारी चौदिशेसी ।
मानस्तंभ तुर्यद्वारासी । मानगर्वासी गर्वहार ।।१८२।।
त्रयचौसोप्या मध्यतर । वेदिका अत्यंत सुदर ।
सिंहासन सुवर्णाकार । माणिक हिरे रत्नमय ।।१८३।।
त्रिकाळ श्री जिनपूजन । श्रावक श्राविका मिळोन ।
गंधोदक आरती करून । नवविधा पुण्य जोडिती ।।१८४।।
त्या पश्चिम पवन दिशी । दरी पर्वतमस्तकासी ।
वारूळ असे त्या स्थळासी । ऐरावती त्यास पूजीत ।।१८५।।
भावभक्तीन नित्य नित्य । शुडादडेन जळ आनीत ।
वल्मीकासी अभिसिंचित । आश्चर्य आम्हात राजेश्री ।।१८६।।
ते करकडु ऐकोनिया । हृदयी हर्ष धरोनिया ।
भिल्लासी वस्त्र देवोनिया । हस्ती पहावया हरुष ।।१८७।।

सैन्य समुदाय चालले । जिनेंद्र चैतालय देखिले ।
हस्तिवरोन उतरले । शिखर देखिले मनोज्ञे ॥१८८॥
तेथेचि राहोनी समग्र । पूजावयासी श्रीजिनेद्र ।
शुद्ध अष्टविधप्रकार । जयजयकार गर्जताती ॥१८९॥
मानस्तंभ पाहोनी नैनी । मान गळिती मानाभिमानी ।
महाद्वारी उभे राहुनी । वर्धमान नयनी देखिले ॥१९०॥
जय जय शब्द मुखी वदती । परोक्षवदना भावभक्ती ।
तीन चौसोप्या वोलाडिती । वेदिका पाहती अनुपम ॥१९१॥
पचरगी स्फटिकाकार । हिरे माणिक चौफेर ।
पहाता दृष्टि अगोचर । विलोकिता नेत्र चाचरति ॥१९२॥
तीन सिहासनावरुते । जिनवर्धमान शोभत ।
तीन छत्र रत्नजडित । पताका शोभत शुभ्रता ॥१९३॥
सूर्यासमान पत्रछेत्री । चामर ढाळिती पूज्य मत्री ।
मत्रघोशनादीर्घसूत्री । जयशब्द वक्त्री गर्जताती ॥१९४॥
रायश्रीफळ द्रव्य करी । ठेवोनी मुखी जय उच्चारी ।
देवा साष्टांग नुति करी । प्रदक्षिणा करी त्रिविध ॥१९५॥
दर्शनपाठ म्हणोनिया । पुनः पुन· वदन पाया ।
गुरूगादिसी पाहोनिया । नमोस्तु स्वामिया पचागी ॥१९६॥
ते मुनीराय अवधिज्ञानी । रत्नत्रय धर्म सद्‌गुणी ।
पंच महाव्रत पाळनी । समिती मनी पंच युक्ती ॥१९७॥
पंच इंद्रियनिरोधीति । षड् आवश्यक त्रिगुप्ती ।
पंचाचार पालन करिती । सागति धालक्षन ॥१९८॥
तेव्हा राजा कर जोडून । विनती करी विनयान ।
स्वामी भवांतर सागण । कृपा करोन गुरूराया ॥१९९॥

आसन्न भव्य प्राणी जानोनी । मधुर गिरा करोनी वाणी ।
राया ऐक चित्त देवोनी । पुण्यकरणी अगाध पै ।।२००।।
कुतल देश तेरपुरी । पूर्वजन्म याच नगरी ।
पुण्य नाही जीवा पदरी । विपत्ति भारी दरिद्रता ।।२०१।।
या नगरीचे राज्यधर । नील महानील चतुर ।
जिनभक्त श्रेष्टी वसुमित्र । पवित्र तत् गृही धनदत्त ।।२०२।।
गडरक्षक गडपाळ । म्हणोनी नाम त्या गोपाळ ।
एके दिनी तडागतळ । सहस्रदळ कमळ मध्ये ।।२०३।।
ते घ्यावया पोहत । शेषकन्या त्यामी रक्षित ।
पुष्प हे सर्वोत्कृष्ट देवात । आनिक कोन्हात योग्य नसे ।।२०४।।
गोपाळ म्हणे त्याच देवासी । फूल नेतो-श्रेष्ठी गृहासी ।
वृत्तान्त सागे श्रेष्ठी राज्यासी । पुसावयासी आले येथे ।।२०५।।
हेच सहस्रकूट चैताळ । सुगुप्ताचार्य मुनी दयाळ ।
सांगती ऐकती गोपाळ । हेचि कृपाळ सर्वोत्कृष्ट ।।२०६।।
एक पुष्प वाहल तुवा । तेन प्राप्त ऐशा वैभवा ।
मा अष्टविधा पूजा देवा । करिता ठेवा मोक्षपद ।।२०७।।
मुनीवचन ऐकोनिया । जातिस्मरण जाल राया ।
शरीर कप होवोनिया । क्षिति शय्या घाम अगी ।।२०८।।
सीतोपचार करोनी त्या । उठोनी बैसला वोळखी त्या ।
मम भवातराची कृत्या । सत्यसत्य श्रीपूज्यस्वामी ।।२०९।।
मम पूर्वजन्म भूमिया । सागितली जी स्वामिराया ।
आता कृपा करोनीया । पचगुरूपाया नौकार तो ।।२१०।।
सर्वोत्कृष्ट नौकार मत्र । गुरूमुखे घेऊनी स्वतत्र ।
सदैव जपजाप्यसूत्र । नरदेह पवित्र जीव हा ।।२११।।

पूजा अभिषेक नित्यशः । सुपात्रदान चतुर्विधिशः ।
जन्मभूमी पुण्याची आशा । स्वस्थचित्ताशा तृप्त जाली ॥२१२॥
मग विचार करोनी मनात । परिवार आनी समस्त ।
अठरा सहस्र स्त्रियाते । तेरपुरात वस्ती जाली ॥२१३॥
पूर्वी वर्धमान देवानी । समवशरणी वैसोनी ।
शतेंद्र बारसभा ज्ञानी । पचमीचे दिनी माहोसुध ॥२१४॥
जैनकाशी पुण्यक्षेत्र । भव्य प्राणी येताती याचे ।
अभव्यासी न घडे मात्र । ससारसूत्र गुगुगती ॥२१५॥
करकडु राजा सज्ञान । सर्वसुखी पूर्वपुण्येन ।
सपत्ति सतती सद्गुण । स्वरूप गुण शीलवंत ॥२१६॥
काही एक दिवस तेथ । क्रमिता हृदयी चिंतितार्थं ।
भिल्लाची सूचना वचनार्थ । धारासीव पथे चालावे ॥२१७॥
पावले चारू पर्वतासी । सहस्रखाब चैत्यालयासी ।
उतरले परिवारेसी । परोक्ष वंदनेसी साष्टाग ॥२१८॥
शुचीर्भूत ते होवोनिया । न्हवन पूजा करोनिया ।
गधोदक घेवोनी तया । मोक्षा जावया मार्ग तोचि ॥२१९॥
स्वाध्याय स्तुति आनि स्तोत्र । जपजाप्य नौकारमंत्र ।
गुरूभक्ती श्रीजिनसूत्र । दानसुपात्र चतुर्विधा ॥२२०॥
पश्चिमेसी दिशा पवन । पर्वत देखिला नयन ।
वारूळ पच हस्त प्रमाण । पाहे दुरून करकडु ॥२२१॥
तत् समयी ऐरावत तो । अभिषेक वारूळा करितो ।
कमळपुष्प त्या वाहतो । नमन करितो त्रिवार ॥२२२॥
येथे कारण काही आहे । चित्ती राजा विचारीताहे ।
वारूळाजवळ तो पाहे । काढोनी पाहे म्हणे राजा ॥२२३॥

मग तो वल्मीक खोदला । त्यात तो मंजूसा निघाला ।
पेटारा उकलून पाहिला । पाहिले रत्नाला अनुपम ।।२२४।।
रत्नमय श्री पार्श्वनाथ । पाहता पापनाशनार्थ ।
राया सतोष मनोरथ । भक्तिपंथ धर्म वत्सल ।।२२५।।
तेथे चैत्याल्ये बाधोनिया । अगळदेव स्थापोनिया ।
कारागरे कोरीतिया । प्रतिमा त्याठाया आकार ।।२२६।।
राजा पाहे तेथे येवोनी । नाभि देखिली दीर्घनयनी ।
कारागरा टाक काढोनी । बोले वदनी शिल्पकार ।।२२७।।
राया हे काढिता सत्वर । सोडसारखी पानीधार ।
जैसा गगेसी येतो पुर । जळ भरपूर चैत्याल्ये ।।२२८।।
राजा म्हणे काढ वेगीन । टाकी लाऊन यत्न करून ।
जैसे कारज उडे वेगेन । राया मने सशय फिटे ।।२२९।।
बाहेर येवोनि पश्चात्ताप । राजा करी निंदा आपोआप ।
शिल्पिकावरी केला कोप । हृदय व्याप चिंतातुर ।।२३०।।
विचार करिता मनासी । निश्चय केला हृदयासी ।
रत्नप्रतिमा दिसे मजसी । अन्न उदकासी घेईन ।।२३१।।
तेव्हा करकडुरायान । दर्भशय्यावरी बैसोन ।
सर्वहि संन्यास घेवोन । तीन दिन त्या मौनमुद्रा ।।२३२।।
तत् पुण्य करोनी शीघ्रता । नागकुमारं आला त्वरिता ।
राया ऐकावी पूर्ववार्ता । काळकर्ता रत्नबिब हे ।।२३३।।
चतुर्थं काळाचि ठेवि हे । पचमकाळि जतन नव्हे ।
म्याच आच्छादन केली हे । जळप्रवाहे भरपूर ।।२३४।।
नागकुमार मी देवाचा । निश्चय पाहून तुमचा ।
देव धाडिल सत्यवाचा । भावार्थ तुमचा सत्यची ।।२३५।।

अन्नोदक करा पारण । हृदयी रत्नबिंब आणोन ।
अष्टविध पूजा करोन । नागकुमरान जेवविला ।।२३६।।
दोघे बैसले एकातासी । राव पुसे नागदेवासी ।
कोने निर्मिले चैत्याल्यासी । रत्नाबिंबासी अनुपमे ।।२३७।।
वरौत वारुळामध्ये स्थानी । प्रतिमा ते पापनाशनी ।
पेटारी ठेविली कवनी । सागा वदनी नागदेवा ।।२३८।।
ऐक राया तू एकाग्रेसी । विजयार्द्ध उत्तर दिशी ।
नभतिलक ग्रामवासी । सुखसंपत्तिसी नरनारी ।।२३९।।
तेथे राजे दोघे सज्ञान । अमितवेग सुवेग भान ।
देवगुरूपदी तल्लीन । षट्कर्माचरण नित्यश. ।।२४०।।
ते दोघे जन भक्तिवंत । तीर्थयात्रे मनइच्छित ।
वदिता ते आर्यखडात । देखिले येथे जिनालय ।।२४१।।
वदना पूजना करोनी । चारू पर्वत पाहे नयनी ।
तेथे रत्नबिंब कोटकीर्नी । पाहता नैनी सतोषले ।।२४२।।
पूजा वदना तया तेथ । बिंब ठेविले पेटारीत ।
उचलिता न उचलत । बहुयत्नात करिती ते ।।२४३।।
महाक्षेदक्षीण जाहले । त्यावरी वारूळ वाढले ।
विद्याधर तेरपुरा गेले । वर्द्धमान पूजिले भक्तीन ।।२४४।।
तेथे ज्ञानकीर्ति मुनीद्र । अवधिज्ञानी कीर्तिचंद्र ।
नमोस्तुते त्रिहृदयाद्र । आशीर्वाद समग्र ऐकिला ।।२४५।।
तेथे खग हस्त जोडिती । स्वामिराया पृच्छा करिती ।
धारासीव वृत्तान्त सागती । रत्नमूर्ती त्या मजूसात वो ।।२४६।।
अवधीज्ञानी मुनीराये । अहो खगाधीप ऐकावे ।
मजूसी रत्नप्रतिमा आहे । सर्वसुख साह्यकारिनी ।।२४७।।

चैताळचावरीत चैताळ । भावार्थे कळें ज्ञानबळ ।
त्याचे निरोपण सकळ । कथा समूळ परिसावी ।।२४८।।
तेथेच सुवेग श्रावक । धनादि रत्न अमोलिक ।
रत्नप्रतिमा केली भाविक । तो सात्विक परि अर्थध्यानी ।।२४९।।
मरोनी जाला हस्ती वनी । रत्नबिंब ते ज्या ठिकानी ।
सुडा दंड नित्य पानी । भाव धरोनी कमळपुष्प ।।२५०।।
तोय पुष्प पूजा करीत । करकंडु येईल तेथ ।
हस्ती पाहून विस्मित । पेटारी हस्त काढील तो ।।२५१।।
हस्ती सर्व संन्यास करील । राजा त्यासी धर्म सागेल ।
मग जे जे पुढे होईल । ते ते पाहशील राजिंद्रा ।।२५२।।
ते ऐकोनिया मुनी वाणी । विद्याधर संतोष मनी ।
स्वामिसी नमोस्तु करोनी । चैत्यात्ये कोन्ही केले सांगा ।।२५३।।
धारासीव पुण्याचे क्षेत्र । अतिशय तीर्थ पवित्र ।
सहस्र स्तभ रंग विचित्र । भव्यसी मात्र पुण्यदाता ।।२५४।।
ऐसे द्रव्य खर्चिल कोन्ही । ते सागावे कृपा करोनी ।
वदते जाले महामुनी । मधुर वानी करोनिया ।।२५५।।
विजयार्द्ध दक्षिण दिशी । रथनुपूर शुभ वस्तिसी ।
नीलमहानील यशस्वी । जितिले पृथ्वीसी धनाढचे ।।२५६।।
सप्त क्षेत्री धन खर्चावे । जिन चैत्यालय बाधवावे ।
ते आले येथे भव्यजीव । हे अपूर्व सहस्रस्तभ ।।२५७।।
कित्येक दिवस राहोन । करोनिया पुण्य कारण ।
महाअभिषेक करोन । शीघ्रगमन विजयार्धासी ।।२५८।।
तेव्हा ते दोघे खगेश्वर । नील महानील चतुर ।
घेवोन दीक्षा तपशूर । स्वर्गमंदिर सर्वसुखी ।।२५९।।

इत्यादि सर्व शुभ कथा । अमितवेग जाला श्रोता ।
तेरग्रामी चैत्याल्यातीता । स्वामिदाता दीक्षाग्रहण ।।२६०।।

काळे समाधि साधी मरण । ब्रह्मोत्तर स्वर्गी जनन ।
तेथे विमानी बैसोन । तीर्थवदन धारासीवा ।।२६१।।

सुवेगबंधु तो धाकला । आर्त्तध्यान मृत्य पावला ।
पशुजन्म हस्ती जाहला । वोळखिला इंद्रान बधू ।।२६२।।

जातिस्मरण त्यासी जाल । जेष्टबधुसी ओळखिल ।
नेत्रासी जलधारा चाल । सम्यक्त्व दिधल हस्तीसी ।।२६३।।

नित्य येवोनी वारूळासी । शक्तीसार भक्ति तयासी ।
जळपुष्प पूजा वारूळासी । नित्य देवासी पूजितसे ।।२६४।।

करकंड महीनाथाने । चारुपर्वतासी येवोन ।
वारूळ उकरिल त्यान । पेटारी काढून नेले ।।२६५।।

हस्ती घेत सर्व सन्यास । त्यागिले चारा पानियास ।
तू गोपाळ होतासी तेरस । पूजिता देवास राज्य प्राप्त ।।२६६।।

तस्मात् श्रीजिनेद्रदेव । भक्ती युक्तीन पूजाभाव ।
भव्यप्राणीचे भव सर्व । सौख्यस्वभाव प्राप्त होय ।।२६७।।

इत्यादि तो नागकुमार । सबोधिला तो राज्यधर ।
धर्मबधुसी नमस्कार । गेला आपल्या स्वमदिर ।
पुण्य सुरेद्र मित्र होती ।।२६८।।

सथा करकंडु रायान । त्या हस्ती समीप जावोन ।
तृतीयदिनि धर्म श्रवण । सम्यक्त्व ध्यान करीद्रासी ।।२६९।।

तो दंती सम्यक्त्वध्यानेसी । देह ठेविला धर्मध्यानेसी ।
सहस्रार स्वर्ग तयासी । जन्म त्यासी महर्द्धिक ।।२७०।।

पहा पापी सुरेद्र जाला । धर्मे सर्व सुख पावला ।
सतत सपत जिवाला । जैन धर्माला करा भव्य ।।२७१।।
करकडु राज्य प्रचुर । जैनधर्म धुरंधर ।
माता पिता नि विद्याधर । सर्व परिवार सुखी भवेत् ।।२७२।।
तीन चैत्यालय नूतन । त्याची प्रतिष्ठा आनदान ।
संसार अस्थिर जानोन । वैराग्य मन उद्भवले ।।२७३।।
वसुपाळ पुत्रा राज्य दिले । क्षमा आलिगन सर्वा केले ।
स्त्रियाचे समुदाय मिळाले । गहिवरे दाटले जल नेत्री ।।२७४।।
अठरा सहस्त्र गोपागना । पट्टराण्या दशाण्ट जाना ।
त्यात पद्मिनी पद्मलोचना । जेण्ट भामिना राजियाची ।।२७५।।
राजासी पाहोनी समग्र । हृदयी दाटे महापूर ।
जैसी सीता घेता दीक्षाभार । मायापूर पद्मनाभादि[1] ।।२७६।।
जैसे नेमिनाथ लग्नवेळे । वैराग्य मनी उद्भवले ।
छपन्न क्रोड यादव आले । ते गहिवरले समुदायसी ।।२७७।।
की कन्या सासरी जाती । ग्रामस्त्रिया गहिवरती ।
की बाळक खाद्य मागती । दरिद्री चित्ती गहिवरे ।।२७८।।
किंवा शातिनाथ चक्रवर्ती । दीक्षा घ्यावया सिद्ध होती ।
शाहान्नव सहस्त्र स्त्रीचित्ती । गहिवरती मायामोहे ।।२७९।।
तेवि करकडु विरक्त । सद्गुरूपासी दीक्षा घेत ।
माता पिता पद्मावती ते । जालि दीक्षित तुर्यवर्ग[2] ।।२८०।।
तप करिती जगत् सार । भवसिंधु पार उतार ।
अंत.काळी सन्याससार । श्री जिनेश्वर ध्यान मनी ।।२८१।।

---

१ पद्मनाभ म्हणजे रामचद्र सीता, २. म्हणजे चार.

पदस्थ ध्याने करिता । देहे विसर्जन तत्त्वत ।
सहस्रार स्वर्ग प्राप्तता । निर्जरता इद्र देवेद्र ॥२८२॥
करकडु मुनीश्वरादि । दतीवाहन पिता मातादि ।
स्वधर्मपुण्यानुसारादि । स्वर्गपदी सर्वही सुखी ॥२८३॥
एक पुष्प तेरपुरात । गोपाळ घेवोनिया हस्त ।
सर्वोत्कृष्ट देवा वाहत । राज्य प्राप्त करकडुसी ॥२८४॥
पुन अष्टविध पूजोन । स्वर्गी इद्र प्राप्त विमान ।
हे जानोनिया भव्यजन । अष्टविधार्चन देव गुरूसी ॥२८५॥
अहो हो दुर्लभ नृजन्म । त्यात दुर्लभ जिनोत्तम ।
द्रव्यपूजा उत्तमोत्तम । करिता परम प्राप्त सुख ॥२८६॥
श्लोक–गोपालो धनदत्तवागपि पुरा मुग्धोऽपि पद्मेन वै ।
श्रीमत् जैनपदांबुजं शुभतरं सपूज्य पूज्योऽभवत् ।
देवाद्यै करकंडु नाम नृपतिः श्रीमत् प्रभाचद्रवत् ।
तस्मात् भव्यजनैर्जिनेद्रचरणाभोज सदाभ्यर्चते ॥२८७॥
गोपाळ धनदत्त राजा । उत्कृष्ट देवा केली पूजा ।
सहस्रदळ कमळपूजा । श्रीजिनराजापदार्चिले ॥२८८॥
देवपूजा पूज्य जाहले । गोपाळ भूपति इद्र जाले ।
जैसे चंद्र व्योमि शोभले । विमानी बैसले दिव्यरूप ॥२८९॥
तस्मात् श्रावक भव्यानि । पूजा श्री जिनेद्र चरणी ।
मनवचनकाया हे तिनी । नौकार स्मरणी भावार्थे ॥२९०॥
ऐसे करकडुचरित्र । गाती ऐकती ते पवित्र ।
पूजा करिती शक्तिमात्र । मार्ग पवित्र स्वर्गमोक्षे ॥२९१॥
श्रीपूज्यस्वामी रत्नकीर्ति । तत् पदरज चद्रकीर्ति ।
म्हराष्ट भाषा अल्पमति । सुज्ञान श्रोत्री साभाळावे ॥२९२॥

सके सत्रासे सेताळीस । तारन नाम संवत्सरास ।
रविवार तिथी चौथीस । धारासीवास पूर्ण कथा ।।२९३।।
अनुपम श्री जिनालय । तेथेच चातुर्मास वास्तव्य ।
आगळेश्वर पार्श्वराय । तत् चरणद्वय चंद्रकीर्ति ।।२९४।।

इति श्रीमत् तुर्यआराधना कथाकोश महत्पुराणे संमत सहितायां गौतम गणधर श्रेणिकसंवादो पुष्पपूजा तेर धारासीव करकंडु राजा भवचरित्र श्रीगुरूरत्नचंकीर्ती विरचिते नाम प्रसंग ५१ संपूर्ण शुभं भवतु कल्याण-मस्तु तथास्तु



# प्रसंग बावन्नावा

ॐ नमो पंच गुरूवर्यं । अरिहंत सिद्ध आचार्यं ।
नमन स्वामि उपाध्याय । श्री गुरूराय सर्वसाधू ।।१।।
श्लोक–श्रीमत् जिनं जगत्पूज्यं, भारती भुवनोत्तमां ।
नक्षे ह सद्गुरूं नत्वा, जिनपूजाफलोदयं ।।२।।
देव भारती रत्नत्रय । अनुपम भुवनत्रय ।
नमु आगळ पार्श्वपाय । मम हृदय ज्ञानदाता ।।३।।
श्रोता व्हावे सावधान । कथा शेवट भावार्थान ।
एकचित्त श्रवण कर्णं । जेन गमन स्वर्गमोक्षा ।।४।।
संस्कृत कठिण अर्थं । पराकृत ते परमार्थं ।
गुरू रत्नकीर्ती समर्थ । कवितार्थं महाराष्ट भाषा ।।५।।
तत् शीष लघुबीजचद्र । मज सांगती हे कथासूत्र ।
पूर्ण करा खंडित शास्त्र । गुरूमत्र वरदहस्ते ।।६।।
श्री सद्गुरू पद स्मरोनी । भारती माय जिनवाणी ।
चद्रकीर्ती हृदयमणि । बैसोनी कवित्व करी माय ।।७।।
श्रीमत् जिनेद्र चद्रप्रभाची । पूजा पापनाशन सत्यची ।
पदवी दे सर्व सुखाची । भव्यजीवाची करुणाब्धि ।।८।।

हे करावे भव्यजनानी । सदा असावे धर्मध्यानी ।
दर्शन सुध अष्टगुणी । स्वर्मोक्षदानी निसंशय ।।९।।

श्लोक–जिनबिंब–जिनागार–जिनयात्रा–प्रतिष्ठित. ।
दान–पूजा च सिद्धान्त–लेखनं धनसप्तकः ।।१०।।

सप्तक्षेत्री धन खर्चिती । त्याची निंदा दुर्जन करिती ।
पापी दुःखादि दारिद्रच भोगिती । रौद्रध्यान गति आसार ।।११।।

स्तवन पूजन भावेन । स्नपन जपन भक्तीन ।
जिनाना दृतिमादृतीन । शुद्ध त्रिकरण वसुविद्ध ।।१२।।

जिनयात्रा प्रतिष्ठा करा । जिनप्रतिमोधार त्वरा ।
जिनालय नूतन करा । धर्मधुरधरा नि शक ।।१३।।

ऐसे करावे भावभक्ती । निश्चय तयासी स्वर्गप्राप्ती ।
अनुक्रमे मोक्षासी जाती । सुख भोगिताती अनत ।।१४।।

इंद्र चद्र आनि नागेद्र । नरेद्र पूजिती जिनेद्र ।
विमानी बैसोन खगेद्र । खेचरेद्र विद्याधर ते ।।१५।।

जिनेशपूजा महापुण्य । मनप्रिय ज्ञानवचन ।
जिनपूजा समान पुण्य । दुज अन्य न भविष्यति ।।१६।।

अनेक भव्य पूजा करिती । चक्रवर्ती पद भोगिती ।
पूजापुण्य वर्णाया मति । नसे शक्ती लघुचद्रासी ।।१७।।

श्लोक–जलाद्यैरष्टभिर्द्रव्यैर्जिनार्चाया किमुच्यते ।
पद्मेनैकेन भेकेन, फल प्राप्त यदुत्तम ।।१८।।

जळादि श्रीफळपर्यंत । अर्घ्य अर्चना भावयुक्त ।
पद्मपत्र दर्दुरमुखात । भावपूजार्थ कथा वर्णु ।।१९।।

उक्तं–श्रीगुरूरत्न समंतभद्रस्वामी उवाचमत्तान् ।
तत् कथा फळपुण्यभाव महात्मनां अवदत् ।
अर्हच्चरणसपर्या महानुभाव महात्मनावदत् ।
भेकः प्रमोदमत्तः कुसुमेनैकेण राजगृहे ।।२०।।
श्रीगुरू तो ग्रंथकर्तार । पुष्पपूजाभाव दर्दुर ।
पूर्वभव त्या जातिस्मर । पुष्पमुखाग्र राजगृही ।।२१।।
तत् कथाः–जबूद्वीप लक्षयोजन । मध्ये मेरु दिशा दक्षिण ।
तीर्थंकराचे जन्मस्थान । महामनोज्ञ मगधदेश ।।२२।।
आर्यखड भरतक्षेत्र । तीर्थभूमि शुद्ध पवित्र ।
भव्य नादती धर्मसूत्र । नौकारमंत्र सदा ध्याति ।।२३।।
तेथे राजगृहनगर । श्रावक नांदती निरतर ।
भोगोपभोग ते समग्र । पुण्यसूत्रेन सुखी अस्ति ।।२४।।
इंद्रायनी जै श्रावकस्त्रिया । सम्यक्त्व शीळव्रत तया ।
नित्यनेंम जिनेद्रपाया । इंद्रपुरीया समाधिक ।।२५।।
ऐशापरी सुख संपत्ती । जिनेद्रवचन धर्मयुक्ती ।
तत् वर्णन कोन करिती । त्रैलोक्यप्रीती दानदाता ।।२६।।
त्या नगरी श्रेणिकराय । दर्शनज्ञान रत्नत्रय ।
श्रीमत्‌जिनेद्रदेवपाय । युगुळद्वय भ्रमरवत् ।।२७।।
महाक्रोध शत्रुचे वरी । शात जेवी चद्रशर्वरी ।
प्रजापाळक पुत्रापरी । हिताहित करी जीवाचे ।।२८।।
त्याची भामिनी चेलना सती । रूपलावण्य महामती
जिनधर्मी अत्यत प्रीती । शीळव्रती षड्‌गुण भार्या ।।२९।।
त्याच ग्रामात नागदत्त । श्रीजिनेद्र देव सद्‌भक्त ।
परी हृदयी मिथ्यामत । भवदत्ता स्त्री धर्मवंता ।।३०।।

मिथ्यामती तो सदा प्राणी । विहिर करितो अगणी ।
आयुपुरा त्या आर्त्तध्यानी । पसुयोनि बेडुककुळा तो ।।३१।।
नरा मृत्यु पापयोगेन । जळचर जाला आर्त्तध्यान ।
तस्मात् पापात न करण । भव्यजन सम्यक्त्वी प्राणी ।।३२।।
तत् भवदत्ताख्या स्त्रियसी । अष्टान्हिक व्रत तियसी ।
स्वहस्ते जळ आणायासी । मंडूक तयसी पाहिले ।।३३।।
त्यासी जाल जातिस्मरण । तदागे चढता दे लोटून ।
पुनः ये तो पूर्वप्रीतीन । दे लोटून कटाळुनिया ।।३४।।
तोचि पाहोनिया दर्दुर । आनिक असती जळचर ।
हृदयी करीते विचार । पुसावे बर गुरूराया ।।३५।।
तेव्हा ते गेली चैत्याल्यासी । पुसे श्री सुव्रत मुनीसी ।
अवधिज्ञाने सागे तिसी । नागदत्तासी रौद्रध्यान ।।३६।।
पापे जाला जळी मंडूक । तुज पाहोनी ममता सुख ।
अतरी करी सदुक्ख । जालो विन्मुख देवगुरूसी ।।३७।।
ऐकोनी स्वामिसी नमन । गृहासी गेली आनदान ।
भेक आनिला हिरीतून । ठेविला नेऊन हौदात ।।३८।।
तत् समयी विपुलाचळी । श्री वर्धमान महाबळी ।
षड्ऋतु पुष्पफळावळी । पाहे वनमाळी आश्चर्य ।।३९।।
पुष्पफळात घेवोनिया । श्रेणिकासमीप जावोनिया ।
नमस्कारोनी सागे राया । ठेवोनीयाते पुष्पफळ ।।४०।।
ईंद्र नागेद्र चद्र सूर्य । पूजा करिती पदद्वय ।
श्री वर्द्धमान देवराय । समुदाय समोशरणी ।।४१।।
श्रेणिकरायान ऐकोनिया । सभेसहित उठोनिया ।
परोक्षवंदना करोनिया । वनमाळिया वस्त्रार्पण ।।४२।।

अनंद भेरी वाजवूनी । नगरश्रावक मिळोनी ।
हस्ती अंबारी सोकासनी । अष्टविधार्चनि सामग्री ।।४३।।
ते समारंभेसी चालले । समोशरणासी पाहिले ।
मानस्तंभासी देखिले । लज्जित जाले मानगर्वी ।।४४।।
श्री वर्द्धमानस्वामी पाहिला । केवळज्ञानी तो शोभला ।
सप्त प्राप्तिहार्य बिंबला । सभा वेष्टिला द्वादशादि ।।४५।।
सुधाष्टविध द्रव्यपूजा । इंद्र करिती आत्मकाजा ।
संपूजकानां जिनराजा । स्तवनकाजा जपजाप्य ।।४६।।
जै जै शब्द उच्चारून । कर्मदहन हुताशन ।
दुःखदारिद्रात दावाग्न । घनाघन तो शांतिकर्ता ।।४७।।
जै जै शब्द वदति लोक । केवळभानु प्रकाशक ।
लोकालोक ज्ञानदीपक । विकासक भव्यलोचन ।।४८।।
तुम्ही तारक त्रिजगती । त्वं त्रैलोक्याधीश विभूती ।
त्वं दीनबंधू शरणागती । महाविपत्ती क्षयकर्ता ।।४९।।
तुझे पद सेवा करोनी । अनंत सुख पावती ज्ञानी ।
मिथ्यामती जे जे कुज्ञानी । नयेचि स्वप्नी हे दुर्लभ ।।५०।।
ततः श्रीमत् जिननायक । भुक्तिमुक्तीचा प्रदायक ।
तत् पद हृदयी विवेक । संसारसुख शुभदाता ।।५१।।
ऐशा स्तुती करोनिया । भक्तीयुक्तीन दृढपाया ।
गौतमादी नमोस्तु तया । श्रेणिकराया सभास्थित ।।५२।।
तदा ते भवदत्ता सती । श्रावक समुदाय भक्ती ।
वदनार्थं ते शक्ती भक्ती । पुण्यप्राप्ती पापनाशिनी ।।५३।।
साडे बारा कोडी ते वाद्ये । त्रैलोक्य शतइद्र वाद्ये ।
जै जै घोष तो महाशब्दे । दर्दुरा बोधे जातिस्मर ।।५४।।

ऐकोनी वाद्याचा गजर । दर्शनी पाहू महावीरं ।
कमळपुष्प धरी मुखाग्र । पूजाया देवेंद्र चालला ।।५५।।
मार्गी जाता रायाचा हस्ती । पाय पडला तया वर्ती ।
वर्द्धमान पूजावे चित्ती । अती मती मृत्यु जाहला ।।५६।।
भावपूजा अत.करण । भाव जडला महत् पुण्य ।
स्वधर्मस्वर्गी देव होऊन । महर्द्धिक नाम मुख्येंद्र ।।५७।।
पहा हो बेडकुळा इंद्र । त्रिजगी पुष्पपूजा थोर ।
पूजा त्रिशुद्ध भावसूत्र । जीव पवित्र का न होय ।।५८।।
तेंव्हा अतर्मुहूर्तनेन । षोडष वर्षे नवयौवन ।
दिव्यस्वरूप ते लावण्य । पूर्वपुण्येन त्या विभूती ।।५९।।
नाना नवरत्नाचे हार । दिव्यवस्त्रादि अलंकार ।
सुगध सुमनाचे हार । इंद्रायनी कर घालिती ।।६०।।
जानोनिया अवधिज्ञानी । पूर्वभवातराची कानि ।
पूजावया समोशरणी । बैसौनी विमानी ऐश्वर्य ।।६१।।
सिरि मुकुट रत्नजडित । भेकचिन्ह माथा शोभत ।
सहस्रदळ पुष्पार्चित । हर्षचित्त षट्पद जैसे ।।६२।।
पूजा श्री जिनराजचरणी । सर्वसुखात ते दायिनी ।
श्रेणिक पाहोनिया नैनी । गौतम मुनीसी पुसतु ।।६३।।
स्वामि याचे मुकुट सीरि । वेडकचिन्ह कैशापरी ।
याचे कारण सागावे वैखरी । सशयातरी तमहेळी ।।६४।।
ते ऐकोन गौतम मुनी । भव शृत्य त्या तुर्यज्ञानी ।
सांगे मधुरगिरा वानी । सर्व करणी मिथ्यातिची ।।६५।।
भव्य जीव सर्व ऐकती । बारा सभा चेलना सती ।
पूजाफळ जे नर करिती । सुख भोगिती स्वर्गमोक्ष ।।६६।।

श्रीजिनेद्र पूजा भावेन । सहस्त्रदळकमळान ।
अथवा अष्टविधार्चन । सुखसपन्न भवभवि ।।६७।।

धनधान्य नि महाभाग्य । राज्यसंपदा नि सौभाग्य ।
पुत्रमित्रकलत्रयोग्य । कुळ मनोज्ञ गोत्रादि पै ।।६८।।

दीर्घायु दुर्गतिनाशन । पापसताप विनाशन ।
अभीष्टफल प्राप्तकल्याण । मणिरत्नमुक्ताफळादि ।।६९।।

देवपूजेन यत् प्रकार । नागदत्त जीव दर्दुर ।
कमळपुष्प त्या मुखाग्र । भाव दृढतर पूजेचा ।।७०।।

तो हौदातून निघाला । त्वरेन मार्गासी चालला ।
भावार्थ अतरी धरिला । महावीर स्वामीला पुष्प वाहू ।।७१।।

टुण्टुण् चालता मार्गान । त्यावरे हस्तीचा चरण ।
पडता गेला तो मरून । धर्मध्यान स्वर्गी सुरेद्र ।।७२।।

अतर्मुहूर्तात इंद्र जाला । अवधिज्ञाने येथ आला ।
पूर्वपुण्य देव पूजिला । भव्यजीवाला पुण्य घडे ।।७३।।

श्लोक–सम्यक्त्व–द्रुम–सिचने शुभतरा, कादबिनी बोधदा ।
भव्यानां वरभारतीव नितरां, दूती सतां सपदे ।
मुक्ति–प्रोन्नत–मदिरस्य सुखदा, सोपान–पंक्ति शुभा ।
पायाद्वस्तुसमस्त–सौख्य–जननी पूजा जिनाना सदा ।।७४।।

सम्यक्त्व जेवि कल्पवृक्षा । मेघमाळा त्या तोयदक्ष ।
भव्यजीवा भारती साक्ष । अनुक्रमे मोक्षसंपदा ।।७५।।

मुक्ती महा शुभ मदीर । अनत सौख्याचे आगर ।
जिनपद–द्वय–दृढतर । पूजा निरंतर सदैव ।।७६।।

श्लोक–शक्राः स्नान–विधायिनः सुरगिरिः स्नानप्रपीठं पयः
सिंधुर्यस्य सुकुंडिका सुरगणाः सत्किंकराः सादराः ।।
नर्तक्योऽप्सरसः सुकीर्तिमुखरा गंधर्वसन्नाकिनो ।
जाता जन्ममहोत्सवेऽत्र भवता, स श्रीजिनः शं क्रियात् ।।७७।।

इंद्राचा जो ठिकान मेर । स्नान तया पीठिकाग्रावर ।
क्षीरसिंधु आनोनी नीर । करिती आदर न्हवन देवा ।।७८।।

अप्परा नृत्य करताती । गंधर्व गायन करती ।
जन्म महोत्सव सत्कीर्ती । जै जै वदति शतइंद्र ।।७९।।

श्लोक–श्रीमत्चारुमयूरवाहनपरा पद्मासना निर्मळ ।
मिथ्याध्वांतभरप्रणाशविलसत् भास्वत्प्रभाभासुरां ।
भव्याब्जवनप्रमोदजननी सन्मार्गसदर्शिनी ।
देवेंद्रादिसमर्चिता जिनपतेर्जियात् सतां भारती ।।८९।।

श्री शुभ सुंदर मयूर । वाहन पद्मासन निर्भर ।
मिथ्यात्व हेळि अंधःकार । नाशनशूर प्रभा दिव्य ।।८१।।

भव्यजना आनंद दाता । धर्ममार्ग दर्शविता ।
देवेंद्र आदि समर्चिता । जिनमुखोत्पन्ना भारती ।।८२।।

श्लोक–जातः श्रीमति मूलसंघतिलके सारस्वते सत् शुभे ।
गच्छे स्वच्छतरे प्रसिद्धमहिमाश्रीकुंदकुंदान्वये ।
श्रीजैनागमसिंधुवर्द्धनविधुर्विद्वज्जनैः सेवितः ।
श्रीमत्सूरिमतल्लिका गुणनिधि जीयात् प्रभाचंद्रवाक् ।।८३।।

मूळसंघ श्रेष्ठ आमचा । गच्छ जाना सरस्वतीचा ।
गण बळात्कार सत्य साचा । सद्गुरू जैनाचा निर्ग्रंथ ।।८४।।

जैन धर्म दशलक्षणी । स्नपन क्रिया जानती ज्ञानी ।
श्री कुंदकुंदाचार्य मुनी । श्रीसूरीमुनी प्रभाचंद्र ।।८५।।

श्लोक–प्रोद्यत्सम्यक्त्वरत्नो जिनकथितमहासप्तभंगीतरंगैः ।
निर्ध्दूतैकांतमिथ्यामतमलनिकरक्रोधनक्रादिदूर' ।
श्रीमत्जैनेंद्रवाक्यामृतविशदरसः श्रीजिनेंद्रप्रवृद्धि ।
जीयात् मे सूरिवर्यो व्रतनिचयलसत् पुण्यपण्यः श्रुताब्धिः ।।८६।।

क्रोधादिक खाय दूरस्त । श्रीजिनदेववाक्यामृत ।
विशदरस नित्यनित्य । बीजचंद्र उद्योत ज्यापरी ।।८७।।

यत् प्रकार जे सूरिवर्य । परीषह सहन धीर ।
व्रत–समिति–मनःपर्यय । पुण्यपुण्याचा यो श्रुताब्धी ।।८८।।

तेषा पादपयोजयुग्मकृपया श्रीजैनसूत्रोचिता ।
सम्यग्दर्शनबोधवृत्ततपसामाराधनासत्कथाः ।
भव्यानां वरशातिकातिविलसत् कीर्तिप्रमोदं श्रियं ।
कुर्युः संरचिता विशुद्धशुभदा श्री नेमिदत्तेन वै ।।८९।।

त्याहाचे पादपंकजयुग्म । तेचि मम हृदयधाम ।
जैन सूत्र कथा उत्तम । आराधना उत्तम चतुर्थ ।।९०।।

सम्यग्दर्शन सम्यग्ज्ञान । चारित्र त्रयोदश भान ।
तपसातीव्र तुर्याराधन । जिनमुखोत्पन्न सत्कथा ।।९१।।

भव्यजीवासी बोधशांती । वृद्धी कीर्ती अनिक कांती ।
मम सद्गुरू रत्नकीर्ती । चंद्रकीर्ती तत्पदरज ।।९२।।

गुरूकृपे कथा रचना । रचल्या चार आराधना ।
अष्टम नंदीश्वर भुवना । बावन जिना चतुर्दिशा ।।९३।।

**बावन अधिकार संपूर्ण ।**

प्रथम सम्यक्त्व दर्शन । त्याचे भेद ते अष्टगुण ।
त्रयोदश आध्ये संपूर्ण । सम्यक्त्वी जन ऐकती ।।९४।।

पहिली प्रतिमाते दर्शन । व्रत सम्यक्त्व जे श्रीजिन ।
एक अरहत देवाविन । दुजा नयन न पहावे ।।९५।।
तेच म्हणावे सम्यक्त्वी । देवदर्शन दृढभक्ती ।
यथाशक्ती करिती स्तुती । आराधना करिती प्रथमा ।।९६।।
सम्यक्त्व आराधना दूसरी । ते मोक्षमार्गाची पायरी ।
सम्यक्ज्ञान पचप्रकारी । ज्ञान आतरी भक्तियोग्य ।।९७।।
सम्यक् चारित्र त्रितय । ते आराधिती मुनीराय ।
तेरा प्रकार त्याची सोय । मोक्षउपाय मार्ग तोची ।।९८।।
चौथी भक्ती आराधना । ध्यान अध्ययन आनि जप ।
पचेद्रिया आवरी कोप । सिद्धस्वरूप तोचि मार्ग ।।९९।।
एवं चार ह्या आराधना । आराधना श्री जिनचरना ।
चद्रा द्यावी मोक्षमार्गणा । शरण शरणा सिद्धपदी ।।१००।।
तेरा अध्याय ते ज्ञानाचे । तितुकेचि जाना चारित्राचे ।
सम्यक् आराधना तपाचे । अध्याय तेराच सपूर्ण ।।१०१।।
बावनपुष्पाची हे माळा । श्रीजिनदेवापदकमळा ।
जावया मोक्षाचे राउळा । चंद्रकीर्ती भोळा इच्छितसे ।।१०२।।
मम इच्छा सर्व सपूर्ण । केली देवाधी त्या देवान ।
पुढती करी सपूर्ण । निश्चय मन साक्ष तोचि ।।१०३।।
कथा कवित्व अल्पमति । सज्जनि साभाळा सम्यक्त्वी ।
लघुदीर्घ व्यजनयुक्ती । कान्हा-मात्रा-शाति क्षमाभाव ।।१०४।।
श्रोता सज्जन ज्ञानपडित । देवपूजेसी अखडित ।
त्या सर्व सुख अखडित । शास्त्रयुक्त धर्मानुसारे ।।१०५।।
इति आराधनाकथाकोश । ऐकता सर्व पापाचा नाश ।
श्रोता वक्ता सदा निर्दोष । सुखसतोष सदा सर्वदा ।।१०६।।

इति चार आराधना कथाकोश श्री सद्गुरू श्री पूज्य रत्नकीर्ती तत् चरणरज चंद्रकीर्ती तीर्थवासी एकशत-विंशति (१२०) कथा विरचिते संपूर्ण शुभं भवतु कल्याणमस्तु जय जय शके १७४६ सत्राशे छेताळीस तारण नाम संवत्वरे मासोत्तममासे कार्तिकमासे वद्य पक्ष तिथी नवमी सोमवासरे तीर्थयात्रेस मुगतागीरीची यात्रा आनि भातकोलिची यात्रा तेथे ग्रंथ लिखित ज्ञानावरण कर्म निवारणार्थे धर्मउपदेशकारणार्थे अष्ट-कर्मनिवारणार्थं पंत १ बापोजी मांडवकर २ अवधूत ३ आंताजीपंत ४ चंद्रसागर ५ चंद्रकीर्ती तीर्थवासी पुढे उदंडी व्हाव ६ हे इच्छा देव पूर्ण करतील ॥ चार आराधना कथाकोश गुरूप्रसाद गुरूआज्ञेन संपूर्ण समाप्त शुभं भवतु कल्याणमस्तु तथास्तु आयुदीर्घास्तु जै जै जै जै जै छ छ छ छ ॥



# व्यक्तिनामसूची

(प्रथम सख्या पृष्ठाक व नतरची सख्या ओवीचा क्रमाक दाखविते)

---

# भौगोलिक नामसूची

( प्रथम सख्या पृष्ठाक दर्शविते नतरची सख्या ओवीची सख्या दाखविते.)

# पारिभाषिक शब्दसूची

(प्रथम सख्या पृष्ठाक व नतरची सख्या ओवीचा क्रमाक दाखविते)

# इतर किरकोळ शब्दसूची

(प्रथम संख्या पृष्ठांक व नंतरची संख्या ओवीचा क्रमांक दाखविते)

# संख्यानुक्रमणी

समाधिमरण
केवलज्ञान
लोकालोक
कल्पवासी-कल्पातीस
अडीच द्वीप
तीनगुप्ती
रत्नत्रय
त्रिकरण
तीन शल्य
तीन वेद
त्रिशुद्ध
तीन लोक
तीन गुणव्रत
तीखणी
तीन गुप्ति
त्रिकाल
त्रिताप
तुर्यसघ
तुर्यदान
चार आराधना
चार कषाय
चतुर्निकाय देव
चार ध्यान
चार गति
चार वेद
चार आर्त्तध्यान
चार रौद्रध्यान
चार धर्म्यध्यान
चार शुक्लध्यान
चार आश्रम
चार शिक्षाव्रत
चातुर्मास
चतुरग सैन्य
पचामृत
पचपरमेष्ठी-गुरू
पच पचोत्तर
पचाग ( नमोस्तु )
पच चारित्र
पच कल्याण
पच गति
पंच अणुव्रत
पच महाव्रत
पचाग
( तिथि-नक्षत्र-योग-करण)
पाचखणी
पाच पर्वत ( राजगृह )
पचमेर

पाच ज्ञान
पाच समिति
पच नमस्कार
पाच इद्रिये,
पंचाश्चर्य

पट् खन्ड
पट् रस
पट् काय
सहा काळ
सहा वेदाग
सहा ऋतु
पड् रिपु
पट् शास्त्र
पड्विध सैन्य
सहा गुण

सप्तक्षेत्र
सप्ततत्त्व
सप्तनगरी
सप्तशील
सात पर्वत
सात नरक
सात व्यसन
सप्त गुण

अष्टकर्म
अष्टांग ( नमोस्तु )
अष्ट अग ( सम्यक्त्व )
अष्टाह्निका

अष्ट मगल
अष्ट द्रव्य
अष्ट–गुण ( सम्यक्त्व )
अष्ट–प्रहर
आठ ऋद्धि
मघाष्टक
अष्टदिशा
अष्टौप्रहर

नव ग्रैवेयक
नव अनुदिश
नव नारायण
नव प्रतिनारायण
नव पदार्थ
नव हलधर

दशधर्म
दशलक्षणधर्म
दश अतकृत् केवली
दहा कल्पवृक्ष

अकरा रुद्र
अकरा अग
अकरा प्रतिमा
एकादश भूमडळ

बारा चक्रवर्ती
बारा तप
बारा अग
बारा अनुप्रेक्षा
बारा मास

# उद्धृत–पद्यानुक्रमणि

पहिला

१–७

P ३–२१

–२२

–२५

४–२७

–२९

–३१

–३३

७–६४

H ८–७४

–७५

११–१०९

P –११३

–१३६

दुसरा

२१–७६

२३–१०७

२४–१०६

२७–१५०

३३–२१३

–२१७

३५–२४१

३६–२४९

चौथा

४९–२४

४९–२९

५७–११७

–११८

पाचवा

M ६२–५०

–५१

६३–५४

–५७

६४–७१

६६–८७

H ६८–११७

६९–१२०

M ६९–१२८

७१–१४६

७३–१६७

७५–१९३

७७–२११

७९–२३४

८१–२५६

०

६२३–६६
–६७
६२५–९१
–९३
६२७–१२०
६२८–१२९
६३०–१५४
६३५–२१०

सत्तेचाळीसावा

६३६–५
६३७–१८
६३८–२१
P –२२
६४१–६१
६४३–७६
६४५–१०१
६४६–११९
६४७–१३०
६५०–१५९
६५१–१६८
–१७८

अठ्ठेचाळीसावा

६५३–६
६५५–२४
६५५–२७
–२८
६५७–४९
६५९–६८
६६०–८७
६६१–८८
६६३–१११
–११२
६७८–२९४

एकोणपन्नासावा

६८०–९
६८८–१२०
–१०३
–१०५
६८९–११३
६९४–१७२
६९५–१८५

पन्नासावा

६९६–४
७०६–१२३
७१०–१६६
७१४–२११

एक्कावन्नावा

७१५–३

# शुद्धिपत्रक

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ७ – | ७ | तद्विधाप्रभावे | तद्विधा प्रभावे |
| ९ – | ७ | कलोनि | करोनि |
| ९ – | २२ | कलेचि | कळेचि |
| १० – | ३ | जर | नर |
| १३ – | ६ | येक | एक |
| १९ – | १६ | स्थीर | स्थिर |
| २२ – | २० | तु | तू |
| २६ – | ११ | चित्र | चित्त |
| ३४ – | १६ | अंजिका | अर्जिका |
| ५० – | ४ | आश्वीर्य | आश्चर्य |
| ६० – | १३ | जिमदिरि | जिनमदिरि |
| ६३ – | १४ | त्तीष्ठोनि | त्तिष्ठोनि |
| ६३ – | १४ | जीकावया | जिंकावया |
| ८४ – | ९ | तपाचि | तयाचि |
| ९० – | १४ | सम्याग्मध्यात | सम्यग्मिथ्यात |
| ९४ – | २२ | क्वचिन्नसेवसनभूषण | क्वचिन्नसे वसनभूषण |
| ९६ – | ३ | तु | तू |
| ९६ – | ७ | मि | मी |
| १०१ – | २ | ये वोन | येवोन |
| १०२ – | २२ | वर्णिली | पर्णिली |
| १०३ – | ३ | तिस्कर | तस्कर |

# शुद्धिपत्रक

| पृष्ठ ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ७ – ७ | तद्विधाप्रभावे | तद्विधा प्रभावे |
| ९ – ७ | कलोनि | करोनि |
| ९ – २२ | कलेचि | कळेचि |
| १० – ३ | जर | नर |
| १३ – ६ | येक | एक |
| १९ – १६ | स्थीर | स्थिर |
| २२ – २० | तु | तू |
| २६ – ११ | चित्र | चित्त |
| ३४ – १६ | अजिका | अर्जिका |
| ५० – ४ | आश्वीर्य | आश्चर्य |
| ६० – १३ | जिमंदिरि | जिनमदिरि |
| ६३ – १४ | त्तीष्ठोनि | त्तिष्ठोनि |
| ६३ – १४ | जीकावया | जिकावया |
| ८४ – ९ | तपाचि | तयाचि |
| ९० – १४ | सम्यागमथ्यात | सम्यग्मिथ्यात |
| ९४ – २२ | क्वचिन्नसेवसनभूपण | क्वचिन्नसे वसनभूषण |
| ९६ – ३ | तु | तू |
| ९६ – ७ | मि | मी |
| १०१ – २ | ये वोन | येवोन |
| १०२ – २२ | वर्णिली | पर्णिली |
| १०३ – ३ | तिस्कर | तस्कर |

| पृष्ठ ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| १०६ – ९ | दक्षिजा | दक्षिणा |
| ११३ – १० | पद्मश्रियाणिकापासी | पद्मश्रियाजिकापासी |
| ११४ – ३ | कायाकोशे | कथाकोशे |
| १२३ – १२ | आमहित | आत्महित |
| १२४ – १२ | अणव्रत | अणुव्रत |
| १२४ – १९ | गुत्पाचार्य | गुप्ताचार्य |
| १३५ – १६ | तस्काराचा | तस्कराचा |
| १४५ – १४ | पर्वोनि | पर्तोनि |
| १५९ – १३ | नान वटि | नानवटि |
| १७४ – १ | जि | जी |
| १९९ – २ | तजय भार | गजमभार |
| २०३ – ११ | नानदत्त | नागदत्त |
| २०८ – २ | तूल्य | तुल्य |
| २०८ – २ | शेक्तीसार | शक्तीसार |
| २०८ – १५ | ण्याहाचे | त्याहाचे |
| २२५ – १८ | व्रगाम्रापति | स्वग्रामाप्रति |
| २९६ – २४ | गोभय | गोमय, |
| ३१७ – २ | दूष्टासि | दुष्टासि |
| ३३० – १६ | वादिले | वाढिले |
| ३३१ – ११ | पारक्यासी | परक्यासी |
| ३३४ – २ | तमोस्तु | नमोस्तु |
| ३४९ – ७ | प्ताड | ताड |
| ३५२ – २२ | शाशन | शासन |
| ३५५ – १३ | एकोनि | ऐकोनि |
| ३८७ – १५ | कढारपिंग | कडारपिंग |
| ४०७ – १ | दुलर्भ | दुर्लभ |
| ४१४ – ११ | वोलाडोनि | वोलाडोनि |

| पृष्ठ ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ४२५ – १७ | स्फुदे | स्फुरे |
| ४२६ – ६ | द्यीतिथ | द्वितीय |
| ४३७ – २२ | आप्त | आत्म |
| ४४२ – ७ | अधान | अभिधान |
| ४४४ – १० | पुण्याद्दभूत | पुण्याद्भुत |
| ४५३ – १९ | हस्थि | हस्ति |
| ५२३ – १३ | नागशर्भा | नागशर्मा |
| ५३२ – ७ | षग् | षड् |
| ५३७ – १० | नायख्ये | नामख्ये |
| ५४४ – १४ | नौकरासी | नौकारासी |
| ५५५ – २१ | मनिकिया | मुनिक्रिया |
| ५५५ – २२ | पढिक्कमाप्रा | पडिक्कमामि |
| ५८८ – २२ | मुक्यि | मुक्ति |
| ५९३ – २० | १२७ | १३७ |
| ५९९ – १६ | १०२ | २०२ |
| ६०८ – १५ | १३ | ९३ |
| ६१० – ८ | मत्यासि | मत्स्यासि |
| ६१६ – ९ | गणहरदेविवत्तैथिय | गणहरदेविदगथिय |
| ६४२ – ३ | एक दासीवा श्रमा | एकदा सीवश्रमा |
| ६४७ – १९ | वेशात | देशात |
| ६५० – २१ | योमकीर्ती | सोमकीर्ती |
| ६६५ – १२ | नदीचे | नदीचे |
| ७०१ – १५ | स्छिर | स्थिर |

